# समाजशास्त्राचीं तत्त्वें

## अनुभवजन्य सिद्धान्त
## व
## गृहसंस्था

हा ग्रंथ

हर्बर्ट स्पेन्सर च्या

The Principles of Sociology

ग्रंथाधारें

**नारायण लक्ष्मण फडके, बी. ए.**

ह्यांनीं लिहिला.

प्रकाशक

**बळवंत गणेश दाभोळकर**

नारायण पेठ घर नंबर ४६८ पुणें–सिटी.

शक वर्ष १८२७—इ० सन १९०६.

पुणें पेठ बुधवार एथें

गंगाधर गोविंद गोंधळेकर ह्यांनीं आपल्या

" भारत भूषण " छापखान्यांत छापिला.

## पुढील ग्रंथ

# जननमरण–मीमांसा

हा ग्रंथ प्रोफेसर विठ्ठल बाळकृष्ण भाटे, बी.ए. हे लिहीत आ-
हेत. ह्या ग्रंथांत प्रा णी आणि वनस्पति ह्या शास्त्रांतील बऱ्याच
विषयांचा व जननमरण संबंधानें आधुनिक शास्त्रें व विचार त्यां-
चा समावेश होणार आ . खुलाशाची जाहिरात लवकरच प्रसि-
द्ध करूं. ग्रंथ जून महि ांत बाहेर पडेल. किंमत १॥ रुपया-
राहील; व पृष्ठसंख्या सुम रें ४२५ होईल.

नारायण पेठ, घर नंबर ४१
पुणें–सिटी.

बळवंत गणेश दामोळकर
प्रकाशक.

फडके, बी. ए. ह्यांकडून लिहविला.-किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१४. **भारतवर्षीय भूवर्णन** (प्राचीन )–रा० रा० **शंकर बाळकृष्ण दीक्षित** ह्यांनीं लिहिला.—प्रती शिल्लक नाहींत.

१५. **ज्ञेयमीमांसा** ( उत्तरार्ध)–हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "First Principles" ग्रंथाच्या "The Knowable" भागाच्या आधारानें रा०रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. ह्यांकडून लिहविला.–किंमत २॥ रुपये; टपालहंशील ३ आणे.

१६. **जीवितकर्तव्य** अथवा **संसारकर्तव्य**—दी राइट ऑनरेबल **लॉर्ड एव्हबरी** ह्यांच्या "The Use of Life" ह्या ग्रंथाच्या आधारें रा० रा० दत्तात्रेय **नारायण नावर** बी. ए., एल्एल्. बी. ह्यांकडून लिहविला. प्रती शिल्लक नाहींत.

१७. **राणीच्या राज्याचा इतिहास**—**जस्टिन्** मॅकार्थीकृत "A History of Our Own Times" ह्या ग्रंथाधारें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी.ए.ह्यांनीं लिहिला. किंमत २ रुपये; टपालहंशील २ आणे.

१८. **आत्मविद्या**—रा०रा०हरि **गणेश गोडबोले**, बी.ए. ह्यांनीं आर्यतत्त्वज्ञानाच्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांच्या आधारें स्वतंत्र रीतीनें लिहिला.—प्रती शिल्लक नाहींत.

१९. **समाजशास्त्राचे मूल सिद्धान्त**-हर्बर्ट स्पेन्सर ह्यांच्या "The Principles of Sociology" ह्या ग्रंथाधारें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. ह्यांनीं लिहिला.—प्रती शिल्लक नाहींत.

२०. **समाजशास्त्राचे अनुभवजन्य सिद्धान्त व गृहसंस्था** –हर्बर्ट स्पेन्सरच्या "Principles of Sociology" ह्या ग्रंथाधारें रा० रा० **नारायण लक्ष्मण फडके**, बी. ए. ह्यांनीं लिहिला. किंमत २ रु०; ट० ह० ३ आणे.

# कायम वर्गणीदार आणि त्यासंबंधानें माहिती

प्रतिवर्षी मी दोन नवीन ग्रंथ प्रसिद्ध करीत असतों: एक साधारणपणें मे-जून महिन्यांत व दुसरा नवंबर-डिसेंबरांत. हे ग्रंथ आधुनिक शास्त्रांवर, विद्वानांस श्रमाचा मोबदला देऊन, भाषांतररूपानें अगर स्वतंत्रग्रंथरूपानें मी मुद्दाम लिहवितों. आतांपर्यंत निरनिराळ्या शास्त्रांवर विद्वानांकडून २० मराठी ग्रंथ मीं लिहविले व प्रसिद्ध केले. शास्त्रीय ग्रंथ बहुधा कोणासहि रूक्ष व नीरस वाटणारे असतां, इतके ग्रंथ मीं प्रसिद्ध केले कसे, हें खरोखर आश्चर्य वाटण्यासारखें आहे. परंतु सुशिक्षित व समजंस माणसांच्या मदतीचें, आणि माझ्या अल्पसंतोषाचें, सतत उद्योगाचें व दीर्घपरिश्रमाचें हें फल आहे. मजकडून प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेत जाऊं अशाबद्दल आजरोजीं सुमारें ५०० सभ्य गृहस्थांचें मजजवळ लेखी वचन आहे. आणि जोंपर्यंत त्यांत कमतरता येणार नाहीं तोंपर्यंत आणखी कांहीं ग्रंथ लिहवीन व प्रसिद्ध करीन अशी माझी उमेद आहे. कायम वर्गणीदार असलेल्यांखेरीज ज्या कोणांस ह्या उद्योगास मदत करणें योग्य वाटेल व सोय असेल त्यांस पुढीलप्रमाणें नियमांनीं कायम वर्गणीदार होतां येईल.

(१) प्रत्येक ग्रंथाच्या अमुक प्रती घेण्याबद्दलचें लेखी वचन असावें.

(२) आवडीप्रमाणें अमुक विषयाचा ग्रंथ हवा, अगर अमुक विषयाचा ग्रंथ नको, असें म्हणतां यावयाचें नाहीं प्रसिद्ध होत जाईल त्या प्रत्येक ग्रंथाच्या वचन दिल्याप्रमाणें तितक्या प्रती स्वीकारल्या पाहिजेत.

प्रत्येक ग्रंथाची किंमत १॥ किंवा २ रुपये असते. म्हणजे वर्षाचे कांठीं ३ किंवा ४ रुपये किंमतीचे ग्रंथ प्रसिद्ध होतात. आणि पुढें प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाची तपशीलवार माहिती अगोदरच्या ग्रंथांत दिली जाते. तसेंच परगांवच्यांस व्ह्याल्युपेएबलनें व पुण्यांतल्यांस प्रती घेऊन येणाराजवळ किंमत द्यावी लागते.

**कायम वर्गणीदारांस फायदा एणेंप्रमाणें आहे:—**

( १ ) पुण्यांतील कायम वर्गणीदारांस, आगाऊ वर्गणीदार होणारांकरितां ठेविलेल्या किंमतींत ४ आणे कमी पडतील.

( २ ) परगांवच्यांस टपालहंशील व व्ह्याल्युपेएबल मनीआर्डरचा खर्च पडावयाचा नाहीं.

( ३ ) बाहेरगांवीं ५ प्रती एकत्र घेणारांस टपाल व व्ही. पी.चा खर्च न पडतां ५ प्रती ऐवजीं ६ प्रती मिळतील.

नारायण पेठ, घर नंबर ४६८
पुणें–सिटी.

**बळवंत गणेश दाभोळकर.**
प्रकाशक.

# प्रस्तावना

" समाजशास्त्राचीं तत्त्वें " ह्या विषयाची मूलपीठिका त्याचा पहिला भाग जो " मूलसिद्धान्त " त्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत दिलेलीच आहे; म्हणून तिजबद्दल एथें ज्यास्त खुलासा करण्याचें कारण दिसत नाहीं. करितां प्रस्तुत ग्रंथाचा पहिला व मूलग्रंथाचा दुसरा भाग जो " समाजशास्त्राचे अनुभवजन्यसिद्धान्त " त्यामध्यें कोणत्या विषयाचें निरूपण केलेलें आहे तें प्रथम पाहूं.

हा भाग समाजशास्त्रविषयक अनुभवजन्यसिद्धान्तांच्या संबंधानें असल्यामुळें समाज म्हणजे काय असा प्रश्न सहज प्रथम उद्भवतो म्हणून तसा प्रश्न पहिल्या प्रकरणांत करून "समाज हें एक इंद्रियजाल आहे" हें जें त्या प्रश्नाचें उत्तर तें बरोबर कसें आहे हें दुसऱ्या भागांत दाखविलेलें आहे. त्याचें तात्पर्य असें आहे कीं, इंद्रियजालाची—म्हणजे कोणत्याहि वनस्पतिरूप किंवा प्राणिरूप जीवाची—जशी वाढ होत जाते तशीच समाजाचीहि होते जाते. तद्वतच जीवाची वाढ होत जाईल तसे त्याचे भाग जसे परस्परविसदृश होत जातात, तसेच समाजाचेहि भाग तो वाढत असतां परस्परविसदृश होत जातात. शिवाय जीवाचे निरनिराळे भाग जसजसे निरनिराळे व्यापार करीत असतात, तसे समाजाचे निरनिराळे भागहि निरनिराळे व्यापार करीत असतात. पुनः जीवाचे विविध भाग आणि त्यांचे विविध व्यापार हे जसे एकमेकांवर अवलं-

बून असतात, तसेच समाजाचे विविध भाग आणि त्यांचे विविध व्यापार हेहि एकमेकांवर अवलंबून असतात. तद्वतच, कोणताहि लक्षांत घेण्यासारखा जीव म्हणजे अनेक–सूक्ष्मजीव–समुदाय असतो ही गोष्ट लक्षांत आणतां, जीव आणि समाज ह्यांमध्यें आणखी एकप्रकारचें साम्य नजरेस येतें. तें हें कीं, दोघांचेहि ठिकाणीं समुदायाचें जीवित एकाएकीं बंद पडलें तरी त्याच्या घटकांचें जीवित कांहीं काळपर्यंत चालूच राहतें; आणि एरवीं, एकंदर समुदायाचें आयुष्य घटकांच्या आयुष्यापेक्षां दोघांचेहि ठिकाणीं ज्यास्त असतें.

अशा रीतीनें दुसऱ्या [illegible]गांत समाज हें एक इंद्रियजाल आहे ही गोष्ट [illegible] किंवा व्यापक दृष्टचा स्थापन के[illegible] [illegible]ने नऊ ह्या पुढच्या सात प्रकरणात [illegible] ह्यांच्या वाढी, त्यांच्या रचना, त्या[illegible] व्यापार आणि त्यांची पोषक, विभाजक, आणि [illegible] अशी तीन प्रकारचीं इंद्रियें, ह्यासंबंधाचीं अनेक उदाहरणे [illegible]न तीच गोष्ट अगदी सविस्तर रीत[illegible] सिद्ध करून दाखविलेली आहे. नंतर [illegible]रणांत समाजांचें सरल, संयुक्त, आणि पुनः[illegible] वर्गीकरण एका दृष्टीनें कसें करतां येतें, [illegible] करून युद्धशील किंवा प्राधान्येंकरून उ[illegible] [illegible]से दुसऱ्या दृष्टीनें कसें करतां येतें, हें खुलासेवार रीतीनें दाखवून, अकराव्या प्रकरणांत युद्धशील समाजास उद्यमशील समाजाचें, आणि उद्यमशील समाजास पुनः युद्धशील समाजाचें, स्वरूप कसें येत जातें ह्या प्रश्नाचें वि-

वेचन केलेलें आहे. अशा रीतीनें समाजरूपी इंद्रियजालाचा पूर्ण विचार झाल्यानंतर, शेवटच्या म्हणजे बाराव्या प्रकरणांत समाजविषयक ज्या पूर्वीच्या तत्त्ववेत्त्यांच्या कल्पना त्यांचें परीक्षण प्रथम केलें आहे; नंतर, समाजविषयक अनुभवजन्यसिद्धान्तांची इमारत उभारण्यासाठीं समाज व जीव ह्यांमधील साम्यांची जी परांची एथवर उभारिलेली होती ती काढून टाकिली म्हणजे ती सिद्धान्तरूपी इमारत कशी दिसते हें सविस्तर रीतीनें सांगितलें आहे; म्हणजे, ग्रंथाच्या एकंदर विषयाची गोळाबेरीज स्पष्ट व सुसंगतवार रीतीनें करून दाखविलेली आहे; आणि, शेवटीं, समाजोत्क्रान्ति हा एकंदर उत्क्रान्तीचा एक भाग असल्यामुळें ती "ज्ञेयमीमांसेंत" निरूपिलेल्या उत्क्रान्तिविषयक नियमानुसार कशी होत जाते, त्या उत्क्रान्तींत उत्क्रान्तिसूत्राची पूर्तता कशी होत जाते, आणि ज्यास्त ज्यास्त मोठा आकार, अधिकाधिक सुसंबद्धता, विविधस्वरूपता आणि निश्चितता ह्यांकडे समाजांची प्रगति कशी होत जाते, हें स्पष्ट करून दाखविलें आहे.

एवंच समाजशास्त्राच्या मूल व अनुभवजन्य सिद्धान्तांचा विचार झाल्यानंतर पुढें समाजांतील ज्या निरनिराळ्या संस्था, म्हणजे गृहसंस्था, विधिसंस्था, धर्मसंस्था, राजसंस्था, उद्योगसंस्था आणि धंदेसंस्था, त्यांचा विचार करावयाचा राहतो, आणि तो झाला म्हणजे समाजशास्त्राच्या सर्व तत्त्वांचा विचार झाला असें म्हणतां येईल. पैकीं गृहसंस्था ह्या सर्वांत प्रथम येतात, कारण समाजाचे घटक म्हटले म्हणजे

गृहें किंवा कुटुंबें हींच होत. म्हणून तद्विषयक संस्थांचा विचार पुढील म्हणजे प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत केलेला आहे. त्याचें आतां सिंहावलोकन करूं.

कुटुंब हा जसा एकंदर समाजाचा एक घटक आहे, तसा समाज हा मानवजातीचा एक घटक आहे; आणि मानवजाति ही एकंदर प्राणिकोटीची एक घटक आहे. म्हणून प्राण्याच्या प्रत्येक जातीचें किंवा उपजातीचें संरक्षण कशा रीतीनें होतें ह्या गोष्टीचा विचार ह्या भागाच्या पहिल्या प्रकरणांत केला आहे; आणि उपजाति, आणि उपजातिघटक जीं आईबापें व मुलें, किंवा जनक व संतति, ह्यांचीं हिताहितें परस्परांशीं कितपत सुसंगत व विसंगत आहेत हें दुसऱ्या प्रकरणांत दाखविलें आहे.

आतां कुटुंब म्हटलें म्हणजे त्यांत स्त्री, पुरुष, व त्यांची संतति एवढ्यांचा अवश्यमेव समावेश होतो; आणि संतति उत्पन्न व्हावयाची ती स्त्री व पुरुष ह्यांच्या संबंधापासूनच व्हावयाची; म्हणून त्या संबंधांचा विचार पुढील प्रकरणांतून केलेला आहे. आतां स्त्रीपुरुष-संबंध दोन प्रकारचे आहेत, वैवाहिक आणि अवैवाहिक; पैकीं अवैवाहिक संबंध हे मूळचे होत; म्हणून त्या संबंधांचा विचार तिसऱ्या प्रकारणांत केला आहे. बरें, वैवाहिकसंबंधांकडे पाहतां, विवाहप्रकार मुख्यत्वेंकरून तीन प्रकारचे दिसतात. एक पत्नी असून अनेक पती हा एक प्रकार; अनेक पत्न्या असून एक पति हा दुसरा प्रकार; आणि एक पति आणि एकच पत्नी हा तिसरा प्रकार. शिवाय विवाह करावयाचा तो ज्ञातींतीलच स्त्री-

शीं करावयाचा, किंवा ज्ञातिबाह्य स्त्रीशीं करावयाचा, असे त्यांत दोन प्रकार दिसून येतात. म्हणून ह्या निरनिराळ्या पद्धतींचा विचार चार ते आठ ह्या पुढील पांच प्रकरणांत केलेला आहे.

आतां ह्यांपैकीं कोणत्या तरी पद्धतीनें विवाह झाला म्हणजे मुलें आलींच; आणि पति, पत्नी, व संतति हीं तीन आलीं म्हणजे कुटुंब बनलेंच. म्हणून कुटुंबविषयक विचार फारच सविस्तर रीतीनें नवव्या प्रकरणांत केलेला आहे; आणि नंतर दहाव्या व अकराव्या प्रकरणांत स्त्रिया व मुलें ह्यांची स्थिति प्रारंभीं कशी असून समाजप्रगतीबरोबर ती हळूहळू सुधारत कशी गेलेली आहे, हें सविस्तर रीतीनें दाखविलें आहे. अशा रीतीनें एकंदर गृहसंस्थांचा विचार पुरा झाल्यानंतर, बाराव्या म्हणजे अखेरच्या प्रकरणांत, मागच्या एकंदर विषयांची गोळाबेरीज करून त्या संस्थांची स्थिति आजपर्यंत कसकशी बदलत गेलेली आहे हें प्रथम दाखविलें आहे, आणि नंतर त्या संस्थांची स्थिति पुढें कशी होण्याचा संभव आहे ह्याबद्दलचें दिग्दर्शन फार मार्मिक रीतीनें करून एकंदर ग्रंथाची समाप्ति केली आहे.

प्रस्तुत शास्त्राच्या पहिल्या भागाप्रमाणेंच हे दोन्हीहि भाग समजण्यास फार सोपे आणि वाचण्यास फार मनोरम असून त्यांतील एकंदर कोटिक्रम ज्या भरपूर पुराव्याच्या पायावर रचलेला आहे, तो सर्व पुरावा विश्वसनीय अशाच ग्रंथांतून गोळा केलेला आहे.

पुणें, फेब्रुआरी १९०६. ना० ल० फडके.

# अनुक्रमणिका

## समाजशास्त्राचे अनुभवजन्य सिद्धान्त



## गृहसंस्था

---

# प्रकरण पहिलें

## समाज म्हणजे काय ?

१. ह्या प्रश्नाचें प्रथम उत्तर दिलें पाहिजे. समाज म्हणजे एक स्वतंत्र वस्तु आहे असें मानावयाचें किंवा नाहीं, आणि तशी मानली तर ती इतर सर्व वस्तूंपासून अगदीं भिन्न मानावयाची किंवा कांहीं वस्तूंशीं सदृश मानावयाची, ह्या दोन गोष्टींचा उलगडा होईपर्यंत प्रतिपाद्य विषयाची जी आपली कल्पना ती अस्पष्ट रहाणार आहे.

कोणी असें म्हणेल कीं समाज हें कांहीं व्यक्तींचें समुदित नांव आहे. नामवाद व वस्तुवाद हे वाद या ठिकाणीं आणून नामवादी कदाचित् असें म्हणेल कीं जसें एकाद्या उपजातीचे निरनिराळे घटक तेवढे असून त्यांपासून भिन्न अशी स्वतंत्र उपजाति कांहीं नसते, तसे समाजाचे व्यक्तिरूपी घटक तेवढे असून समाज म्हणून कांहीं निराळा नसतो. तो कदाचित् अशी कोटी लढवील कीं एकाद्याच्या व्याख्यानाला जमलेली मंडळी व्याख्यानान्तीं निघून जाऊन जसें असें सिद्ध करून दाखविते कीं आपण स्वतंत्र वस्तु नसून केवळ कांहीं व्यक्तींची विशिष्ट रचना आहों, तद्वतच समाजघटक किंवा राष्ट्रघटक व्यक्तींची स्थिति होय.

परंतु वरील कोटिक्रमांतील बाकीच्या विधानांवर आक्षेप न घेतां शेवटच्यावर घेतां येण्यासारखा आहे.

तो असा कीं श्रोतृमंडळामध्यें विशिष्ट रचना तत्पुरती असून समाजामध्यें ती कायमची असते आणि एकाद्या वस्तूच्या निरनिराळ्या भागांच्या व्यक्तित्वाहून भिन्न असें त्या सगळ्या वस्तूला जें व्यक्तित्व प्राप्त होतें त्यास कारण त्या वस्तूच्या घटकावयवांच्या संबंधांचें नित्यत्व हेंच असतें. एकादा गोळा फुटून त्याचे तुकडे झाले कीं त्याचें वस्तुत्व नष्ट होतें; आणि उलट पक्षीं पूर्वीं पृथक् असे कांहीं दगड, विटा, आणि लांकडें कांहीं नियमित रीतीनें एकमेकांशीं जुळविल्यास घर नांवाची वस्तु बनते.

ह्या दृष्टीनेंच समाज ही एक स्वतंत्र वस्तु आपण मानितों; कारण जरी ती पृथक् घटकांची बनलेली असते, तरी त्यांच्या त्या समुदायामध्यें एकप्रकारचा परस्परावलंबीपणा असतो; कारण ज्या प्रदेशावर समाज पसरला असेल त्या सर्व प्रदेशांत त्या व्यक्तींच्या रचनांत एकप्रकारचें सामान्य चिरस्थायित्व दृष्टीस पडत असतें. आणि समाजाची जी आपली कल्पना आहे ती ह्या विशिष्ट धर्मावरून उत्पन्न झालेली आहे. कारण एकसारखा बदलत जाणारा जो संघ प्राथमिक माणसांमध्यें आढळत असतो त्यास समाज हा शब्द न लावतां जेथें जीवित ठरीव बनून निरनिराळ्या भागांच्या मांडणींत कांहीं स्थैर्य उत्पन्न झालें असेल, तेथेंच तो आपण लावितों.

२. पण आतां समाज ही एक वस्तु जर मानिली, तर ती कोणत्या प्रकारची वस्तु मानावयाची? आमच्या ज्ञानेंद्रियांनीं आपणास ज्ञात होणाऱ्या प्रत्येक वस्तूपासून ती आपल्यास अगदीं निराळी भासते. इतर वस्तूंशीं तिचें कांहीं सादृश्य असल्यास तें ज्ञानेंद्रियांनीं समजण्या-

सारखें दिसत नाहीं, म्हणून केवळ विचारान्तीं ज्ञान होण्यासारखें तें असलें पाहिजे. तिच्या भागांच्या नित्य संबंधांवरून जर ती स्वतंत्र वस्तु बनत असेल, तर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं तिच्या भागांचे जे हे स्थिर संबंध ते दुसऱ्या कांहीं वस्तूंच्या स्थिर संबंधांसारखे आहेत कीं काय? आतां एकादा समाज व दुसरी कांहीं वस्तु ह्यांच्यामध्यें जर कांहीं साम्य असेल तर त्यांच्या घटकावयवांची रचना सारख्या तत्त्वांवर केलेली आहे अशाच प्रकारचें असणार हें उघड आहे.

समाजरूपी समुदायाची ज्यांच्याशीं तुलना करतां येईल असे दोनच समुदाय आहेतः—एक सेंद्रिय समुदाय व दुसरा निरिंद्रिय समुदाय. तेव्हां तीन प्रश्न उद्भवतातः—१. समाजाचे गुणधर्म एकाद्या अचेतन वस्तूच्या गुणधर्मासारखे आहेत कीं काय? २. ते एकाद्या सचेतन वस्तूच्या गुणधर्मासारखे आहेत कीं काय? आणि ३. ते ह्या दोहींच्या गुणधर्मांहून अगदीं भिन्न आहेत कीं काय?

पहिला प्रश्न केला कीं लागलेंच त्याचें उत्तर नाहीं म्हणून स्पष्ट दिसतें. ज्या सगळ्यांचे भाग सचेतन आहेत तें अचेतनांसारखें सामान्य गुणधर्मांनीं असूं शकणारच नाहीं. दुसऱ्या प्रश्नाचें जरी असें एकदम उत्तर देतां येत नाहीं तरी तें होय म्हणूनच द्यावें लागणार आहे. म्हणून समाजाच्या निरनिराळ्या भागांचे स्थिर-संबंध सजीव वस्तूच्या भागांच्या स्थिरसंबंधांसारखे असतात असें विधान करण्यास जीं कारणें आहेत त्यांचा विचार आतां केला पाहिजे.

---

# प्रकरण दुसरें

## समाज हें एक इंद्रियजाल आहे.

३. जेव्हां आपण म्हणतों कीं वाढ ही सामाजिक समुदाय आणि सेंद्रिय समुदाय ह्यांस सामान्य आहे, तेव्हां निरिंद्रिय समुदायांशीं त्यांचें मुळींच साम्य नसतें असें म्हणण्याचा आमचा उद्देश नसतो. निरिंद्रिय समुदायांपैकीं कांहीं, उदाहरणार्थ स्फटिकस्वरूप पदार्थ, हे दृश्य रीतीनें वाढत असतात; आणि ते सर्व समुदाय, उत्क्रान्तीच्या क्लृप्तीप्रमाणें, केव्हां तरी घनीभवनानेंच उत्पन्न झालेले असतात; तथापि, अचेतन वस्तूंच्या मानानें पाहतां, सचेतन वस्तू आणि समाज ह्यांच्या ठिकाणीं आकारवृद्धि इतकी स्पष्ट दिसत असते कीं, तो त्या दोहोंचा विशेष गुणधर्म म्हणतां येण्यासारखा आहे. पुष्कळ सजीव वस्तु त्यांच्या एकंदर आयुःक्रमांत वाढत असतात; आणि बाकीच्या बराच काळपर्यंत वाढत असतात. समाजांची वाढ बहुधा त्यांचे विभाग होत तोंपर्यंत किंवा ते जित होत तोंपर्यंत होत असते.

तर मग, समाजांचें सचेतन सृष्टीशीं ज्यांच्या योगानें साम्य स्थापित होतें, आणि अचेतन सृष्टीशीं वैषम्य स्थापन होतें असा हा पहिला गुणविशेष होय.

४. सचेतन देहाप्रमाणें समाजरूप देहांचे ठिकाणीं दुसरा असा एक विशेष दृष्टीस पडतो कीं त्यांची जशी आकारवृद्धि

होत जाईल, तशी घटनावृद्धिहि होत जाते. हलक्या जीवाप्रमाणें वरिष्ठ जीवाच्या गर्भाच्या ठिकाणीं स्पष्टपणें निरनिराळे भाग थोडेच असतात, पण त्याचा आकार वाढत जाईल तशी त्याच्या भागांची संख्या वाढत जाऊन विभिन्नपणाहि वाढत जातो. समाजाचेंहि असेंच आहे. प्रथम त्याच्या घटकसमूहांमधील परस्परभेद अल्प प्रमाणावर असून संख्येनेंहि थोडे असतात; पण जशी लोकसंख्या वाढत जाईल तसे विभाग व पोटविभाग वाढत जाऊन ज्यास्त ज्यास्त स्पष्टहि होत जातात. शिवाय,जीवामध्यें त्याच्या सामान्य नमुन्या बरहुकूम पूर्ण वाढ होईतों पावेतों रचनाभेद जसे वाढत असतात,तसेच समाजामध्येंहि वाढत असतात. आतां एकंदर सूर्यमाला व तिचे ग्रह वगैरे निरनिराळे घटक इत्यादि निरिंद्रिय समुदायांमध्येंहि घनीभवनाबरोबर रचनाभेद जरी वाढत असतात, तरी ते इतके साधे असतात, व इतके मंदपणें वाढत असतात कीं, ते जमेस न धरिले तरी चालण्यासारखें आहे. परस्परभिन्न भागांची सचेतन देहांप्रमाणें समाजरूपी देहांमध्यें संख्यावृद्धि इतकी मोठी होत असते कीं, या सामान्य गुणविशेषावरून त्यांचा निरिंद्रिय वस्तूपासून पृथक्पणा स्पष्ट दिसतो.

५. रचनावैविध्य जसें वाढत जाईल तसें व्यापारवैविध्यहि वाढत जातें. ही गोष्ट ध्यानांत आणतां, समाज व जीव यांमधील साम्य ज्यास्त स्पष्टपणें लक्ष्यांत येतें.

वाढत जाणाऱ्या प्राण्यामध्यें प्राथमिक, दुय्यम, आणि तिय्यम असे जे विभाग उत्पन्न होत असतात, त्यांना मोठाले व धाकटाले विभिन्नभाव उगीच प्राप्त होत नसतात.

त्यांच्या आकारांत व घटनांत जशी वैविध्यें उत्पन्न होत जातील, तशीं त्याच्या क्रियांमध्येंहि उत्पन्न होत जातात. म्हणजे त्यांना भिन्न भिन्न इंद्रियें उत्पन्न होऊन तीं भिन्नभिन्न व्यापार करूं लागतात. पोषक नलिकेची रचना जसजशी विशिष्ट होत जाईल, तसतशी पोषक द्रव्यांचें निगीलन करण्याची सर्व क्रिया ती अंगावर घेते; आणि तिचे निरनिराळे भाग पचनाक्रियेचे निरनिराळे भाग करूं लागतात. चलन करणें किंवा पकडणें ह्यांना उपयोगी पडणारा जो अवयव त्याला शाखा व पोटशाखा उत्पन्न होत जातात, व त्या शाखा ह्या मुख्यक्रियेचे अंगभूत भाग करूं लागतात. समाजाचे जे निरनिराळे भाग त्यांचीहि अशीच स्थिति आहे. समाजांत उत्पन्न होणारा प्रबलवर्ग इतर वर्गापासून विसदृश होतो इतकेंच नाहीं, तर तो इतरांचें नियंत्रणहि करूं लागतो; आणि ह्या प्रबल वर्गाचे जेव्हां कमी व ज्यास्त प्रबल असे पोटवर्ग पडतात, तेव्हां तेहि एकंदर नियंत्रणाचे निरनिराळे भाग बजावूं लागतात. बरें, नियंत्रित वर्गांचीहि अशीच स्थिति आहे. त्यांचे जे निरनिराळे समूह बनतात ते निरनिराळे धंदे करितात,आणि ह्या समूहांतील प्रत्येक समूहाचे पोटभाग निरनिराळे होत जाऊन त्यांचीं पोटकर्तव्येंहि निरनिराळीं होत जातात.

आणि ज्या दोन प्रकारच्या वस्तूंची आपण एथें तुलना करीत आहों त्या इतर प्रकारच्या वस्तूंहून भिन्न कशा होतात हें एथें आपणास पूर्वीपेक्षांहि ज्यास्त स्पष्टपणें कळतें. कारण निरिंद्रिय वस्तूंमध्यें जे रचनाभेद हळूहळू उत्पन्न होत असतात, त्यांच्याबरोबर ज्यांस वास्त-

विकरीत्या व्यापारभेद म्हणतां येईल ते उत्पन्न होत नाहींत.

६. विसदृश भागांच्या ह्या विसदृश क्रियांना समाज व जीव यांच्या संबंधानें व्यापार म्हणणें कां बरोबर आहे, आणि अचेतन वस्तूंच्या संबंधानें त्यांना तें नांव देणें बरोबर कां नाहीं, हें पुढचा व अत्यंत स्पष्ट असा जो सामान्य गुणविशेष त्याचा विचार केल्यावर लक्षांत येणार आहे.

समाज व जीव ह्या दोघांचेंहि ठिकाणीं उत्क्रान्तीच्या योगानें भेद उत्पन्न होतात इतकेंच नाहीं, तर निश्चितपणें संबद्ध असे भेद, म्हणजे ज्यांपैकीं प्रत्येकाच्या योगानें अन्य भेद शक्य होतात असे भेद, उत्पन्न होतात. निरिंद्रिय वस्तूचे जे भाग त्यांचा परस्परसंबंध असा कांहीं असतो कीं, इतरांवर फारसा परिणाम उत्पन्न न करतां त्यांपैकीं एकच भाग बराच बदलूं शकतो. पण जीव किंवा समाज ह्याच्या भागांची गोष्ट निराळी असते. त्यांपैकीं प्रत्येकाचे भागांमध्यें होणारे फेरबदल परस्परांवरून निश्चित होत असतात, व परस्परांवर अवलंबून असतात. शिवाय दोहोंहि मध्यें उत्क्रान्ति वाढत जाईल तसें हें परस्परावलंबित्व वाढत जातें. अगदीं हलक्या दर्जाचा प्राणी असतो तो सगळाच पोट, सगळाच फुप्पुसें, व सगळाच अवयव असतो. आतां ज्या प्राण्याला चलनवलन करण्यास किंवा खाद्य पकडण्यास अवयव आहेत असा प्राणी ह्या प्राण्यापासून उत्पन्न व्हावयास ज्या भागांचे ठिकाणीं अन्न आंत घेण्याची शक्ति राहिली आहे त्या भागांकडून त्या अवयवास पोषणप्राप्ति व्हावयास लागली पाहिजे. तद्वतच रक्त व इतर रस शुद्ध करणारीं फु-

प्पुसें उत्पन्न व्हावयास त्यांस पोषकरस आणून देण्याचें काम, इतर कांहीं इंद्रिय उत्पन्न होऊन त्यानें आपल्या शिरावर घेतलें पाहिजे. समाजाचीहि स्थिति अशीच असते. समाज कोवळा असतां तो सगळाच युद्ध करणारा असतो, पारध करणारा असतो, झोंपडीं बांधणारा असतो, व हत्यारें करणारा असतो. प्रत्येक भाग सर्व गरजा स्वताच पुरवीत असतो. तेव्हां सुधारणा होऊन कायमची फौज स्थापन होईल ही स्थिति उत्पन्न होण्यास त्या फौजेस अन्न, पोषाक, आणि युद्धसामग्री ह्यांची बाकींच्याकडून पुरवणी होईल अशा व्यवस्था अगोदर उत्पन्न झाल्या पाहिजेत. एका ठिकाणीं जर लोक शेतकी करून राहूं लागले व दुसरीकडे खाणी खणून राहूं लागले—एकीकडे जर लोक केवळ माल उत्पन्न करूं लागले व दुसरीकडे तो सर्वत्र पाठवूं लागले, तर ह्या गोष्टी उत्पन्न होण्यास इतरांसाठीं असें कांहीं तरी विशेष काम करणारा जो प्रत्येक वर्ग त्याच्याकरितां त्या इतर वर्गांनीं प्रत्येकीं योग्य अशी कांहीं कामगिरी बजाविली पाहिजे.

प्राण्याप्रमाणें समाज जो सजीव गोळा बनतो, त्यास कारण हा श्रमविभागच होय. ह्या मुख्य गुणविशेषाच्या संबंधानें जीवशरीर आणि समाजशरीर हीं अगदीं परस्परसदृश आहेत. स्तनवत् प्राण्यामध्यें फुप्पुसांची क्रिया बंद झाल्यास लागलींच काळजाची बंद पडते, कोठ्याची पचनशक्ति अगदीं गेल्यास इतर भागांच्या क्रिया हळूहळू बंद पडतात, हातापायांची शक्ति गेल्यास अन्न न मिळाल्यामुळें किंवा संकटापासून दूर पळतां न आल्यामुळें एकंदर शरीरास मरण प्राप्त होतें, डोळ्यां-

सारखीं लहान इंद्रियेंहि गेलीं, तरी बाकीच्याना मोठी अडचण उत्पन्न होते; ह्या सर्व गोष्टी ध्यानांत आणतां भागांचें परस्परावलंबित्व हा ह्या प्राण्याचा विशेष गुणधर्म होय असें म्हणावें लागतें. इकडे समाजाचे ठिकाणीं खाणवाल्यांनीं लोखंड व कोळसा न पुरविल्यास लोहारांचें काम अडतें; सूत काढून कापड विणणारांनीं आपलें काम बंद ठेविल्यास शिप्यांचें काम बंद पडतें; शेतकरी व धान्याचे दुकानदार यांनीं आपलीं कामें बंद ठेविल्यास कारागीर स्वस्थ बसतात; तद्वतच संरक्षण करून घेणाऱ्या लोकांनीं जीवनसाधनांचा पुरवठा न केल्यास सरकारी अमलदार, न्यायाधीश, पोलिस सर्वच जाग्यावर बसतात; ह्या सर्व गोष्टी ध्यानांत आणतां, ह्या ठिकाणींहि भागांचें परपस्परावलंबित्व अगदीं कडकडीत आहे असें म्हणावें लागतें. सारांश, समाज व जीव ह्या दोन वस्तू एरवीं जरी परस्परविभिन्न आहेत, तरी ह्या मुख्य गुणधर्मासंबंधानें व त्यांत अंतर्गत होणाऱ्या इतर गुणधर्मासंबंधानें त्या परस्परसदृश्य आहेत.

७. एकमेकांवर अवलंबून असणाऱ्या भागांच्या संयुक्त क्रियांच्या योगानेंच सगळ्या वस्तूचें जीवित कसें बनतें, आणि ह्या सामान्य गुणविशेषावरून समाजजीवित व प्राणीजीवित ह्यांच्यामध्यें सादृश्यभाव कसा उत्पन्न होतो हें ह्याहिपेक्षां ज्यास्त स्पष्टपणें लक्षांत येण्यास ही गोष्ट ध्यानांत आणावी कीं, प्रत्येक दृश्य जीवाचें जीवित, नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहींत इतक्या सूक्ष्म घटकांच्या जीवितांचें मिळून बनलेलें असतें.

मिक्सोमिसिटिस् (Myxomycetes) नांवाचा एक

विलक्षण सूक्ष्मतम जीववर्ग आहे, त्याच्या ठिकाणीं ह्या गोष्टीचें उत्तम उदाहरण दृष्टीस पडतें. त्या प्राण्यानें उत्पन्न केलेलीं जीं बीजें त्यांचे केशयुक्त असे सूक्ष्मतम जीव बनतात; ते कांहीं वेळ फार चलनवलन करून अमीबा ( Amoeba ) नांवाच्या दुसऱ्या एका सूक्ष्मतम जीवाचा आकार धारण करितात, इकडे तिकडे फिरतात, पोषकद्रव्यें आपल्यांत ओढून घेतात, वाढतात, आणि मध्यें तुटून त्यांची संख्यावृद्धि होते. नंतर हे, आमीबाकार जीव एकत्र जमतात, त्यांचे संधि होऊन मोठाले समुदाय बनूं लागतात आणि हे समुदाय सांधले जाऊन त्यांचे आणखी मोठाले समूह बनतात. आणि नंतर त्यांचा जो गोळा बनतो तो कधीं कधीं दिसण्यासहि मारामार पडते एवढा सूक्ष्म असतो, व कधीं कधीं हाताएवढा मोठा असतो. हा जो अनियमिताकार, बहुधा जाळ्यासारखा व चिकट पदार्थासारखा हातास लागणारा गोळा त्याच्या भागांचीं चलनवलनें एकाद्या विशाल ऱ्हायझोपॉड (Rhizopod) प्राण्याप्रमाणें केंसासारख्या अनेक खोट्या पायांनीं होत असतात, व ते कुजणाऱ्या पदार्थांवर किंवा झाडांच्या देंटांवरहि हळूहळू सरपटत जातांना दृष्टीस पडतात. सारांश ह्या ठिकाणीं पुष्कळ सूक्ष्म जीव एकत्र होऊन असा गोळा बनलेला दिसतो कीं, त्याच्या ठिकाणीं त्यांचें व्यक्तिशः जीवित बाह्यतः नष्ट झाल्यासारखें दिसतें, पण वास्तविकपणें त्यांचें जीवित त्यांच्याच जीवितांच्या संयोगानें बनलेलें असतें.

दुसऱ्या कांहीं ठिकाणीं पूर्वी पृथक् असलेले जीव एकत्र होऊन, ज्यांचें व्यक्तित्व नष्ट झालें आहे असे गोळे बन-

त्याच्या ऐवजीं आपल्याला असे घटक दृष्टीस पडतात कीं ते एकाच बीजापासून वृद्धि होऊन उत्पन्न झालेले असतात, आणि निरनिराळे होत नाहींत तथापि त्यांचीं पृथक् जीवितें फार स्पष्टपणें दिसत असतात. वाढणाऱ्या स्पंजाचे शिंगासारखे घट्ट तंतू एकप्रकारच्या चिकट पदार्थानें आच्छादित होतात; आणि सूक्ष्मदर्शकयंत्रानें पाहिल्यास ते चलनवलन पावणारे सूक्ष्मतम जीव आहेत असें आढळून येतें. सगळ्या स्पंजाला मिळून जीवित नसतें असें म्हणतां येत नाहीं, कारण त्याच्या ठिकाणीं कांहीं संयुक्त क्रिया दृष्टीस पडतात. वरचे आमीबाकार जीव एकमेकांत मिळून जाऊन आपलें व्यक्तित्व गमावतात, व त्यांचा एक संरक्षक थर किंवा त्वचा बनते. तंतूंचें आधारभूत जाल ह्या सूक्ष्मतम जीवांच्या संयुक्त क्रियांनींच बनत असतें; आणि लहान छिद्रांतून जलप्रवाह आंत ओढून मोठ्या छिद्रांतून ते बाहेर टाकण्याचें कामहि हेच सूक्ष्मतम जीव करीत असतात. पण अशा रीतीनें दुर्बल असें संयुक्त जीवित जरी स्पंजाच्या ठिकाणीं दृष्टीस पडतें तरी त्या असंख्य अशा सूक्ष्मतम घटक जीवांचें जीवित स्पंजाच्या जीवितावर फारसें अवलंबून राहिलेलें दिसत नाहीं; म्हणजे हे घटक, पोट-श्रमविभाग ज्यांच्यांत बहुतेक मुळींच उत्पन्न झाला नाहीं अशा राष्ट्रासारखे दिसतात. किंवा प्रोफेसर हक्स्ले म्हणतात त्याप्रमाणें “ स्पंज म्हणजे एकप्रकारचें पाण्याखालचें शहर असतें, त्याठिकाणीं लोकांची मांडणी गल्ल्या व रस्ते ह्यांमध्यें अशा रीतीनें झालेली असते कीं, प्रत्येकास जातां जातां पाण्यांतून खाद्य ओढून घेतां यावें.”

अत्यंत उच्च प्राण्यांमध्येंहि घटकांचीं जीवितें आणि समूहाचें जीवित ह्यांच्यांतील संबंध आढळून येतो. रक्त हें जें द्रवद्रव्य आहे त्याच्यांत पोषकद्रव्याबरोबर असंख्य सजीव व्यक्ति फिरत असतात, व त्यांस रक्ताचे कॉर्पसल ( corpuscle ) किंवा सूक्ष्मकण असें म्हणतात. ह्यांचीं प्रत्येकीं निरनिराळीं जीवनचरित्रें असतात. पहिल्या अमदानींत प्रत्येक रक्तकण पांढरा कॉर्पसल म्हणून ज्ञात असून आमीबाप्रमाणें स्वतंत्ररीत्या चलनवलन करीत असतो; त्यास " रंगीत अन्न ( तांबडें कार्पसल ) भरवितां येतें, व तें त्याच्या पोटांत जमलेलें दृष्टीस पडतें;" आणि " कांहीं ठिकाणीं हे श्वेत कार्पसल त्यांच्यापेक्षां लहान असे त्यांचे सोबती जे तांबडे कॉर्पसल त्यांस प्रत्यक्ष खातांना दृष्टीस पडतात. " बरें, घटकांचें हें जें पृथक्जीवित तें द्रवामध्यें ते तरंगल्यामुळें जेथें त्याचीं चिन्हें सहज दिसतात तेथेंच प्रचीतीस येतें असें नाहीं. नाकपुड्यांसारखे हवा जाण्याचे जे शरीरांतील मार्ग आहेत त्यांचे म्यूकस नांवाच्या शेंबडी पदार्थानें आच्छादिलेले जे पृष्ठभाग त्याच्यावर केशयुक्त एपिथीलियम नांवाच्या कडेस कडा लावलेल्या सूक्ष्म अशा दीर्घ पिशव्यांचा ( cells ) एक थर असतो; आणि त्या प्रत्येक पिशवीच्या उघड्या भागावर कित्येक केशाकार सूक्ष्म अवयव असून ते सारखे हालत असतात. ह्या केशाकार अवयवांचीं एकाच दिशेनें हालणीं हीं स्पंजामधील छिद्राकार मार्गांतून जे सूक्ष्मतम जीव भरलेले असतात त्यांच्या हालण्यासारखींच असतात; आणि स्पंजांतील ह्या केशयुक्त सूक्ष्मतम जीवांच्या संयुक्त क्रिया जशा जलप्-

वाहास पुढें पुढें ढकलीत असतात, तद्वतच एपिथीलियमवरील केशयुक्त पिशव्यांच्या संयुक्त क्रिया त्याच्यावर उत्पन्न होणारा जो शेंबडी पदार्थ तो पुढें पुढें ढकलीत असतात. ह्या एपिथीलियम पिशव्यांना स्वतंत्र जीवित असतें ह्याबद्दल आणखी पुरावा पाहिजे असल्यास त्यांस तेथून काढून योग्य अशा घनद्रव्य विरवणाऱ्या द्रवामध्यें ठेवावें म्हणजे त्या कांहींकालपर्यंत आपल्यावरील केंसाच्या सारख्या चालवलेल्या लाटेसारख्या गतींनीं बऱ्याच जोरानें चलनवलन करीत राहतात. ''

एवंच सामान्य असा जीव म्हणजे, ज्यांना पृथक् जीवित आहे व ज्यांच्यापैकीं बऱ्याच घटकांना स्वतंत्ररीतीनें राहतां येतें, अशा घटकांचें बनलेलें राष्ट्रच आहे असें जर मानतां येतें, तर मानवी जीवांचें बनलेलें जें राष्ट्र तें एक इंद्रियजाल किंवा जीवच आहे असें मानण्यास आपल्यास फारशी अडचण भासणार नाहीं.

८. घटकांचीं जीवितें व समुदायाचें जीवित ह्यांच्यांतील जो संबंध त्याचा आणखी एक विशेष राष्ट्र व जीव ह्या दोन्ही ठिकाणीं आढळून येतो. दोहोंच्याहि ठिकाणीं एखाद्या मोठ्या आघाताच्या योगानें सगळ्या घटकांचीं जीवितें एकदम नष्ट केल्याशिवाय समुदायाचें तेवढें जीवित नष्ट करतां येतें; आणि उलट पक्षीं, असा आकस्मिक घाला पडून आखूड न झाल्यास समुदायाचें जीवित त्याच्या घटकांच्या जीवितापेक्षां फार ज्यास्त काळपर्यंत टिकूं शकतें.

बेडकासारख्या थंडरक्ताच्या प्राण्याचे ठिकाणीं त्याच्या केशयुक्त सूक्ष्म पिशव्या तो प्राणी मृत झाल्यावर पुष्कळ वेळपर्यंत अगदीं नियमित रीतीनें आपल्या क्रिया

करूं शकतात. त्याच्या स्नायूच्या दोऱ्यांचें चेतना मिळाल्यास आकुंचन पावण्याचें सामर्थ्य त्या प्राण्याच्या मरणानंतर बराच वेळ कायम राहतें. तद्वतच पित्त वगैरे उत्पन्न करणाऱ्या इंद्रियांस कृत्रिम रीत्या रक्ताचा पुरवठा केल्यास तींहि तो तो पदार्थ आपल्यांतून ओतण्याची क्रिया बराच वेळ करितात. आणि काळजासारख्या सगळ्याच इंद्रियाचेहि सर्व घटक तें कापून काढिल्यास पुष्कळ तास पर्यंत आपल्या संयुक्त क्रिया करीत राहतात. त्याच प्रमाणें रानटी लोक वगैरे एकदम चाल करून आल्यास किंवा अशाच कांहीं अन्य कारणांनीं, ज्या व्यापारविषयक चळवळी, सरकारच्या व्यवस्था, वगैरेचें मिळून राष्ट्राचें संयुक्त जीवित बनत असतें, तें एकदम बंद पडेल, पण तेणेंकरून राष्ट्रांतील सर्वच घटकांच्या क्रिया लागलयाच बंद पडावयाच्या नाहींत. त्यांच्यौपकीं कांहीं वर्ग, व विशेषतः खाद्योत्पत्ति करणारे सर्व देशभर पसरलेले लोक, राष्ट्रविघातानंतर पुष्कळ दिवसपर्यंत जिवंत राहून आपापले धंदे करीत राहतील.

उलट पक्षीं सगळ्याचा सगळा प्राणी एकीकडे जिवंत असतां दुसरीकडे त्याचीं घटक अशीं जीं सूक्ष्म सजीव द्रव्यें तीं प्रत्येकीं उत्क्रान्त होऊन, आपापलीं कार्यें करून, नष्ट होत असतात, व त्यांजबद्दल तसलींच नवीं सजीव द्रव्यें उत्पन्न होत असतात. कातडीच्या अगदीं आंतील थरांत नव्या सूक्ष्म पिशव्या जुन्या दुभागून बनत असतात, व त्या मोठ्या होत जातील तशा सामान्य थराच्या बाहेर ढकलल्या जातात, आणि चपट्या होऊन, त्यांची बाह्य त्वचा बनून शेवटीं तातोख्यासारख्या

सोलून निघून जातात, आणि तिकडे त्यांच्या ठिकाणीं नव्या उत्पन्न होतात. यकृत किंवा पित्ताशय ह्याच्या घटक सूक्ष्म पिशव्या ज्या द्रव्यापासून त्या पित्तांचें पृथक्करण करितात तें द्रव्य ओढून घेऊन वाढतात, लवकरच मरतात, आणि त्यांची नवी पिढी उत्पन्न होते. हाड हें देखील जरी इतकें जाड व दिसण्यांत निश्चल किंवा निष्क्रिय असें दिसतें, तरी त्याच्यांत बारीक रक्तवाहिन्या भरलेल्या असतात, व त्यांतून जुन्या द्रव्यांची रिकामी जागा भरून काढण्यास नवीं द्रव्यें हाडांत जात असतात. आणि अशा रीतीनें जुन्या द्रव्यांबद्दल नवीं उत्पन्न होणें हें शरीराच्या कांहीं घटकांत जरी जलद व कांहींत जरी मंदरीत्या चाललेलें असतें, तरी एकंदरींत अशा प्रमाणावर चाललेलें असतें कीं सगळ्या शरीराच्या एकंदर हयातींत त्याचा प्रत्येक भाग पुष्कळ वेळां मरून पुनः पुनः उत्पन्न व नष्ट होऊन जातो.

समाज आणि त्याचे घटक ह्यांचेंहि असेंच आहे. व्यक्तिशः माणसें जरी मरत असतात, तरी सगळा समाज व त्याचे मोठाले भाग हे नेहमीं कायमचे असतात. एकाद्या कारखान्याच्या शहरांतील मालक व मजूर जरी व्यक्तिशः सर्व मरून गेले, तरी त्यांचा जो एकंदर वर्ग ती संस्था एका शतकानंतरहि पहिल्या एवढीच राहते. ह्या उद्यमविषयक घटनेच्या ह्यापेक्षां लहान भागांचीहि अशीच स्थिति असते. एकादी व्यापारी पेढी कित्येक पिढ्यांपूर्वीं स्थापन झालेली असते, व तिचे सर्व भागीदार आणि कारकून वगैरे एकामागून एक मरून जातात, तरी ती मूळ स्थापकांच्या नांवानें त्याच ठिकाणीं चालू

राहून तिच्या गिऱ्हाइकांशीं तिचे पहिल्यासारखेच व्यवहार चालू राहिलेले असतात. स्थानिक, व सामान्य अशा अधिकारिसंस्था, धर्मसभा, फौजा, आणि मित्रमंडळ्या, धंदेमंडळें, वगैरे सर्व संस्था ह्यांच्या ठिकाणीं त्यांच्या घटकांच्या जीवितांपेक्षां जास्त दीर्घ आयुष्य दृष्टीस पडतें. एवढेंच नाहीं, तर ह्या नियमानुसार आणखी असेंहि आढळून येतें कीं एकंदर राष्ट्राचें अस्तित्व त्याच्या ह्या संयुक्त भागांपैकीं कित्येकांहून ज्यास्त काळ कायम राहत असतें. खाजगी मंडळ्या, स्थानिक सार्वजनिक मंडळें, दुय्यम राष्ट्रीय संस्था, विशेष धंदा चालविणारीं शहरें, हीं मोडकळीस येऊं लागलीं, तरी सगळें राष्ट्र आपलें जीवित कायम राखून, एकंदर आकार आणि रचना ह्यांनीं वाढत राहूं शकतें.

समाज व जीव ह्या दोहोंच्याहि ठिकाणीं निरनिराळ्या भागांचे परस्परावलंबी व्यापार प्रत्येकीं पुष्कळ घटकांच्या क्रियांचे बनलेले असल्यामुळें असें घडून येतें कीं, हे घटक जरी एकामागून एक मरत गेले, तरी त्यांच्याबद्दल नवे उत्पन्न होत असल्यामुळें, ज्या व्यापारांत त्यांचें अंग असतें त्यांच्यांत लक्षांत येण्यासारखा कमजास्तपणा होत नाहीं. प्रत्येक स्नायूच्या ठिकाणीं प्रत्येक मांसजनक द्रव्य जसें वापरून नष्ट होत जाईल तसें तें निघून जात असतें, व त्याच्या ऐवजीं नवें उत्पन्न होत असतें, पण तोंपर्यंत इकडे बाकीचे भाग आपलीं संयुक्त आकुंचनें नेहमीं चालवीतच असतात. आणि त्याच प्रमाणें एकाद्या सरकारी अधिकाऱ्यानें पेनशन घेतल्यास किंवा एकादा दुकान-

दार मेल्यास त्या खात्याचें किंवा त्या धंद्याचें काम म्हणण्यासारखें बिघडत नाहीं.

ह्यामुळें प्रत्येक व्यक्तिरूप इंद्रियजालाप्रमाणें प्रत्येक समाजरूप इंद्रियजालाचे ठिकाणीं सगळ्याचें मिळून जीवित त्याच्या घटकांच्या जीवितांनींच जरी उत्पन्न केलेलें असतें, तरी तें त्या जीवितांहून भिन्न असें असतें.

९. समाजजाल व जीवजाल ह्यांमधील हीं जीं सादृश्यें सांगितलीं त्यांवरून आतां नजर काढून त्यांच्यामध्यें जें एक अत्यन्त मोठें वैसदृश्य दृष्टीस पडतें तिकडे ती लाविली पाहिजे. प्राण्याचे ठिकाणीं त्याचे सजीव भाग एकमेकांस चिकटलेले असतात, पण राष्ट्रघटक जे सजीव भाग ते सुटे असतात, व कमजास्त प्रमाणावर दूरवर पसरलेले असतात. तर मग ह्यादोघांमध्यें सादृश्यभाव कसा असूं शकेल?

हा मित्रभाव जरी अगदीं महत्त्वाचा आहे, आणि त्यामुळें प्रथमदर्शनीं त्या दोहोंमध्यें तुलना करणें जरी अगदीं गैरवाजवी दिसतें, तरी त्याचें परक्षिण करूं लागल्यास तो दिसतो त्यापेक्षां कमी महत्त्वाचा असें सिद्ध होतें. इतक्यांतच आह्मी असें दाखविणार आहों कीं तो दिसतो तितका महत्त्वाचा आहे असें कबूल केलें तरी समाज व प्राणी ह्या दोहोंमध्यें जें साम्य आह्मीं दाखविलें आहे त्यास बाध येत नाहीं, तथापि प्रथम आह्मी असें दाखविणार कीं ह्या गोष्टीच्याहि संबंधानें त्या दोहोंमध्यें वरवर दिसतो तितका भेद नाहीं.

पहिली गोष्ट अशीं कीं प्राण्याचा सगळा देह त्यांतील द्रव्यदृष्ट्या जरी सुसंयुक्त (सगळे भाग एक-

मेकांस चिकटलेला) असा असतो, तरी त्याचे सगळेच घटक सजीव नसतात. तर त्याचे कांहीं भाग पूर्ण सजीव भागांनीं उत्पन्न केलेले असून ते पुढें अर्धवट निर्जीव होतात, आणि कांहीं ठिकाणीं अगदीं निर्जीव होतात. उदाहरणार्थ, त्वचेच्या खालीं जो प्रोटोप्लाझमचा (सजीव द्रव्य; हा एक अगदीं सरलस्वरूप घटनाविहीन सर्व जीविताचा भौतिक पाया—असा पदार्थ आहे, त्याच्या अंगी आकुंचनशक्ति आहे, आणि त्याची रासायनिक घटना आल्ब्युमेन किंवा अंड यांतील पांढरा बलक ह्याच्या सारखीच असते.) थर असतो तो वास्तविकरीत्या सजीव घटकांचा बनलेला असतो, पण त्यापासून उत्पन्न झालेल्या ज्या सूक्ष्म पिशव्या त्यांचा एपिथीलियम नामक पापुद्रा बनून त्या निष्क्रिय अशा संरक्षक घटना बनतात, आणि ह्या थरापासून पुढें नखें, केंस, शिंगें इत्यादि अचेतन भाग उत्पन्न होतात; म्हणून हे भाग जरी देहाचे घटक आहेत तरी त्यांस सजीव घटक म्हणतां येणार नाहीं. तद्वतच, कार्टिलेज किंवा मऊ हाडें, टेन्डान किंवा हाडें व स्नायु ह्यांना जोडणाऱ्या दोऱ्या, वगैरे जीं विविध इंद्रियघटकद्रव्यें किंवा टिशू ह्या प्रोटोप्लाझमच्या थरांपासून शरीरांत इतरत्र उत्पन्न होत असतात, ते जसजसे ज्यास्त ज्यास्त विशिष्ट होत जातील तसतसे कमी सजीव होत जातात. सारांश, सर्व शरीरभाग जरी एकमेकांस चिकटून असतात, तरी त्यांतले प्रोटोप्लाझमचे किंवा सजीव द्रव्याचे तेवढे थर एकस्वरूप असल्यामुळें त्यांसच वास्तविकरीत्या सुसंयुक्त म्हणतां येईल.

दुसरी गोष्ट अशी कीं समाजरूपी इंद्रियजालाचा योग्यरीतीनें विचार केल्यास तें दिसतें त्यापेक्षां कमी सुटें किंवा खंडयुक्त आहे असें लक्षांत येईल. प्राणिरूपी इंद्रियजालांत एकंदर क्रियांमध्यें अंग असलेल्या अशा अर्धवट सजीव व निर्जीव अशा भागांचा पूर्ण सजीव भागांबरोबर जसा आपण समावेश करितों, तसा राष्ट्ररूपी देहांत त्याचे अत्यन्त सजीव घटक व जे त्यांतील मुख्य चमत्कारिक जनक, त्या मनुष्यांचाच तेवढा समावेश न करतां, समाजास त्या मानानें कमी महत्त्वाचीं जीं घरगुती जनावरें, जीं माणसाच्या कह्यांत वागून त्यास मदत करितात, त्यांचा, आणि त्यांच्यापेक्षांहि कमी सजीव अशा ज्या वनस्पति, ज्या माणूस उत्पन्न करितो, व ज्यांपासून माणसें व जनावरें ह्या दोहोंच्या क्रिया चालण्यास त्यांस खाद्याचा वगैरे पुरवठा होतो, त्यांचाहि समावेश केला पाहिजे. शिवाय, समाजाच्या रचना व क्रिया ह्यांच्यावरहि ह्या कमी दर्जाच्या जीवांचा परिणाम घडतो; उदाहरणार्थ, अमुक प्रकारचींच जनावरें वाढविलीं तर धनगरी नमुन्याचा समाज बनतो, अमुक प्रकारची वनस्पति वाढविली तरच अमुक प्रकारचा कारखाना चालतो. सारांश, माणसांच्या शारीरिक व मानसिक घटना आणि त्यांच्या रोजच्या क्रिया ह्या इतर प्राणी व वनस्पति ह्यांवरून कांहीं अंशीं निश्चित होत असल्यामुळें समाजरूपी देहांत त्यांचा समावेश केलाच पाहिजे. आणि अशा दृष्टीनें समाजाकडे पाहतां त्याचे भागांचा निकटपणा जीवाच्या भागांच्या निकटपणाशीं ज्यास्त साम्य पावतोसें दिसतें.

अशा प्रकारचा कोटिक्रम कोणी लढवूं शकेल. पण त्याचा स्वीकार न करतां, आणि समाजदेहाचें वियुक्तत्व प्राणिदेहाच्या संयुक्तत्वाहून ठळक रीतीनें भिन्न आहे हें कबूल करूनहि, त्यांच्यामधील समान्तर भावावर येणाऱ्या आक्षेपास समर्पक उत्तर देतां येईल.

१०. प्राण्याचे जीवितव्यापार चालण्यास त्याचे भाग संयुक्त असणें जरी अवश्य आहे, आणि समाजदेहाचे घटक शारीरिक दृष्ट्या एकमेकांस चिकटलेले नसल्यामुळें तशा रीतीनें त्यास आपले संयुक्त व्यापार चालवितां येत नाहींत हें जरी खरें आहे, तरी ते आपले संयुक्त व्यापार अन्य बंधनांच्या योगानें चालवीत असतात. ते एकमेकांशीं शरीरानें संयुक्त नसले तरी मनोवृत्तींची भाषा आणि लेखी व तोंडी भाषा ह्यांनीं आपल्यामधील पोकळ जाग्यांतून आपणास जोडून घेत असतात. देहाच्या परस्परावलंबी क्रिया चालण्यास एका भागापासून दुसऱ्या भागाकडे जात, जोम आणि वेळ यांनीं योग्य अशा चोदना किंवा प्रेरणा जाव्या लागत असतात, व त्या अणूंच्या लाटांनीं जात असतात. त्या क्षुद्र प्राण्यांत अनिश्चित रीतीनें जात असतात, व वरिष्ठ प्राण्यांत निश्चित मार्गांनीं जात असतात. तीच गोष्ट समाजामध्यें माणसा माणसामध्यें चालणाऱ्या विचार व विकार ह्यांच्या खुणांनीं होत असते; प्रथम अस्पष्ट रीतीनें व थोडक्या अंतरावरून, आणि मागून ज्यास्त स्पष्टरीतीनें व ज्यास्त अंतरावरून. म्हणजे, प्राण्यामध्यें जो निरोप्याचा व्यापार प्रत्यक्षरीत्या एका भागापासून दुसऱ्या भागीं पाठविलेल्या चोदनांनीं होत असतो,

तो समाजामध्यें मनोवृत्तींची भाषा आणि बुद्धीची भाषा ह्यांच्या द्वारा चालत असतो.

एवंच देह किंवा इंद्रियजाल बनण्यास जें भागांचें परस्परावलंबित्व अवश्य असतें तें समाजामध्यें पूर्णपणें दृष्टीस पडतें. समाजसमुदाय जरी संयुक्त नसतां नियुक्त असतो तरी ह्या अवलंबनाच्या योगानें तो सजीव गोळा बनतो.

११. पण वरील आक्षेप व त्याचें उत्तर ह्यांनीं जी विचारदिशा दिसूं लागते त्याच दिशेनें पुढें जातां फार महत्त्वाचा असा दुसरा एक गर्भित भिन्नभाव दृग्गोचर होतो; आणि त्याच्या योगानें सामाजिक जीविताच्या योगानें जी उद्देशसिद्धि करावयाची त्याबद्दलची आपली कल्पना मुळापासून बदलून जाते.

समाजरूपी इंद्रियजालाच्या वियुक्तत्वामुळें त्याच्या निरनिराळ्या भागांचें व्यापारविभजन व परस्परावलंबित्व उत्पन्न होण्याचें जरी बंद होत नाहीं, तथापि ज्या भेदीकरणामुळें शरीराचा एक भाग विचार व विकार यांचें इंद्रिय बनतो, व इतर भाग अचेतन बनतात, तें भेदीकरण होण्याचें बंद होतें. कोणत्याहि वर्गांतील उच्च प्राणी नीचांपासून जे भिन्न दिसतात ते त्यांच्या संमिश्र व योग्य रीतीनें संकलीभवन किंवा व्यवस्थित स्वरूप पावलेल्या ज्ञानतंतुजालामुळें दिसतात. हलक्या प्रतीच्या प्राण्यांतून सूक्ष्म असे जे ज्ञानतंतु इकडे तिकडे पसरलेले असतात, ते शरीराच्या इतर इंद्रियांच्या फायद्यासाठीं पसरलेले असतात असें म्हणतां येईल; पण उच्चतर प्राण्यांत ज्ञानतंतूंचीं जीं जाड जुडगीं बनलेलीं असतात त्यांच्या हितासाठीं इतर इंद्रियें उत्पन्न झालेलीं असतात असें

म्हणावें लागतें. वृद्धिंगत पावलेलें ज्ञानतंतुजाल एकंदर शरीराचें स्वास्थ्य कायम रहावें अशा रीतीनें जरी त्याच्या व्यापारांचें नियमन करीत असतें, तरी त्या सर्व व्यापारांचा अन्तिम उद्देश ज्ञानतंतुजालाचें कल्याण व्हावें हा असतो; कारण दुसऱ्या एकाद्या इंद्रियास इजा झाल्यास तेणेंकरून ह्या जालास जो त्रास होईल त्या मानानें ती इजा कमज्यास्त भयंकर असते. पण समाज वियुक्त असल्यामुळें त्याच्यामध्यें इतकें अत्यन्त वाढलेलें भेदीकरण उत्पन्न होत नाहीं. प्राण्यामध्यें शरीराचे सूक्ष्म असे जे सजीव घटक त्यांतील बहुतेक कायमचे विशिष्ट स्थानापन्न झालेले असल्यामुळें ते आपापल्या जागीं वाढतात, स्वव्यापार करितात, अन्य घटक उत्पन्न करितात, आणि मरून जातात; त्यामुळें पिढ्यानुपिढ्या त्यांस आपापल्या व्यापारांना ज्यास्त ज्यास्त योग्य असें स्वरूप देतां येतें. एवंच कांहीं विशेषतः संवेदनाक्षम बनतात, आणि इतर अगदीं संवेदनाहीन बनतात. पण समाज देहाचें निराळें असतें. त्याचे घटक संयोगविहीन असल्यामुळें आणि वरच्यासारखे कायमचे स्थानबद्ध नसल्यामुळें, त्यांच्यांतील कांहीं अगदीं संवदेनाहीन व्हावे व कांहीं संवेदनापूर्ण व्हावे, इतका भेद त्यांच्यांत उत्पन्न होत नाहीं. अशा प्रकारच्या भेदभावांचीं कांहीं चिन्हें त्यांच्यांत दिसतात हें खरें आहे. सारख्याच कारणांवरून निरनिराळ्या माणसांच्या ठिकाणीं निरनिराळ्या जोमांच्या संवेदना व मनोवृत्ति उत्पन्न होत असतात. कोणी अगदीं कोंवळ्या मनाचा असतो, व कोणी घट्ट मनाचा असतो. हातांनीं काम करणारे व उ-

घडे वाघडे राहणारे लोक मानसिक श्रम करणाऱ्या व ज्यास्त जपून वागणाऱ्या लोकांपेक्षां कमी संवेदनायुक्त किंवा कमी कोमल मनाचे असतात. पण प्राण्याप्रमाणें समाजशरीरांतील नियामक घटनांना संवेदनास्थानें म्हणून जरी विशिष्ट स्वरूप येण्याचा कल दिसतो, तरी व्यापारस्थैर्य उत्पन्न होण्यास जी शारीरिक संयुक्तता असावी लागते, तिचा त्याच्या ठिकाणीं अभाव असल्यामुळें ह्या कलास प्रतिबंध होतो; आणि हातकाम करणाऱ्यांना आपलीं कामें योग्य रीतीनें करण्यास मनोवृत्तीची सारखी जरूरी लागत असल्यामुळेंहि प्रतिबंध होत असतो.

एवंच ह्या दोन प्रकारच्या इंद्रियजालांमध्यें हा अगदीं मुळापासूनचा भेद आहे. त्यांच्यापैकीं एकांत ज्ञानवत्ता सर्व शरीराच्या एका लहानशा भागांत संचित झालेली असते; दुसऱ्यांत ती सर्व देहांत पसरलेली आहे: म्हणजे, त्याच्या सर्व घटकांना, जरी समप्रमाणावर नाहीं, तरी बऱ्याच अंशीं समप्रमाणावर, सुखदुःखक्षमता असते. करितां, समाजाला संवेदनैकस्थान किंवा मेंदूचा गड्डा नसल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं घटकांच्या कल्याणाहून भिन्न असें समुदायाचें कल्याण साधावयाचें नसतें. समाज हा त्याच्या घटकांच्या फायद्यासाठीं अस्तित्वांत असतो, घटक समाजाच्या फायद्यासाठीं असत नाहींत. हें नेहमीं ध्यानांत वागविलें पाहिजे कीं एकंदर समाजसंस्थेच्या भरभराटीसाठीं जरी फार मोठे प्रयत्न होत असतात, तरी त्या संस्थेच्या हक्कांची स्वतंत्र किंमत अशी कांहींच नाहीं, आणि त्यांना जी कांहीं किंमत येते ती त्यांच्या ठिकाणीं

त्यांतील घटकव्यक्तींच्या हक्कांचा ज्या मानानें समावेश होईल त्या मानानेंच येते.

१२. हा जो शेवटचा विचार तो आपल्या एकंदर विचारसरणीचा अंगभूत नसून केवळ विषयानुरूप असल्यामुळें आतां मुख्य विषयाकडे वळून, समाजास इंद्रियजाल समजण्यास जीं कारणें एथवर दिलीं त्यांची गोळाबेरीज घेऊं या.

त्याची सारखी वाढ होत असते. तो वाढत जाईल तसे त्याचे भाग विसदृश होत जातात. म्हणजे त्याच्यांत रचनावृद्धि होते. विसदृश भाग उत्पन्न होत जातील तसे ते विसदृश व्यापार करूं लागतात. हे व्यापार परस्परभिन्न असतात इतकेंच नाहीं तर त्यांच्या भिन्नपणांचा असा परस्पर संबंध असतो कीं ते एकमेकांमुळेंच शक्य होत असतात. अशा रीतीनें परस्परांनीं केलेल्या मदतीपासून समाजाच्या भागांचें परस्परावलंबित्व उत्पन्न होतें. आणि हे परस्परावलंबी भाग, एकमेकांच्या आधारानें व एकमेकांसाठीं रहात असल्यामुळें त्यांचा जो समुदाय बनतो तो ज्या तत्त्वावर प्राण्याची रचना झालेली आहे त्याच तत्त्वावर रचलेला दिसतो. समाजाचें प्राण्याशीं जें साम्य तें प्रत्येक लक्षांत घेण्यासारख्या आकाराचा प्राणी म्हणजे एक सूक्ष्मजीवसमुदाय किंवा समाजच असतो ही गोष्ट ध्यानांत आणतां, जास्त स्पष्ट होतें; आणि दोघांच्याहि ठिकाणीं समुदायाचें जीवित एकाएकीं बंद पडलें तरी घटकांचें जीवित कांहीं वेळ चालू राहतें, आणि समुदायाला असा जोराचा आघात न बसल्यास त्याचें आयुष्य त्याच्या घटकांच्या आयुष्याहून पुष्कळ

दीर्घ असतें, ह्या गोष्टी ध्यानांत आणतां वरील साम्य जास्तच स्पष्ट होतें. आतां एक संयुक्त व एक वियुक्त असा जरी त्या दोघांमध्यें भेद आहे, आणि त्यामुळें त्या दोन रचनांचे साध्य हेतु जरी भिन्न असतात, तरी त्यांच्या रचनानियमांत फरक नाहीं. कारण भागांचा परस्परांवरील अधिकार समाजशरीरामध्यें जरी प्रत्यक्षरीत्या परस्परांशीं संक्रांत करतां येत नाहीं, तरी तो अप्रत्यक्षरीत्या करतां येतो.

समाजास इंद्रियजाल किंवा जीव समजण्यास जीं कारणें आहेत त्यांचें एथवर अगदीं सामान्य किंवा व्यापक दृष्ट्या निरूपण केल्यामुळें, समाज आणि जीव यांच्यांतील साम्याचें सूक्ष्मदृष्ट्या विवेचन करण्याची आतां आपली तयारी झाली आहे.

---

# प्रकरण तिसरें

## समाजाची वाढ

१३. जीवांप्रमाणें समाजांसहि बीजापासून सुरवात होते, म्हणजे ते ज्या गोळ्यापासून उत्पन्न होतात त्यांचे आकार त्यांपैकीं कांहींकांस शेवटीं जे आकार प्राप्त होतात त्या मानानें अत्यन्त सूक्ष्म असतात. भटकणाऱ्या लहान लहान जमावांपासून अत्यन्त मोठालीं राष्ट्रें उत्पन्न झालीं आहेत ह्याबद्दल संशय नाहीं. ऐतिहासिक कालाच्या पूर्वींच्या लोकांचीं हत्यारें पाहतां तीं हल्लींच्या रानटी लोकांच्या हत्यारांहूनहि जास्त ओबडधोबड दिसतात, आणि त्यांवरून माणसांचे मोठाले समुदाय बनण्यास अवश्य अशा कलांचा त्यांच्यांत अभाव होता हें व्यक्त होतें. प्राचीन कालच्या ऐतिहासिक जातींमध्यें पूर्वींचे जे धर्मविधी कायम राहिले होते त्यांवरून त्यांचे पूर्वज तत्पूर्वीं एका काळीं गारेच्या सुऱ्या वापरीत व लांकडावर लांकूड घांसून विस्तव उत्पन्न करीत असें दिसतें; आणि शेतकीचा धंदा सुरू होण्यापूर्वीं ज्या लहान लहान समुदायांनीं राहणें शक्य आहे तसलेच समुदाय करून ते रहात असले पाहिजेत.

ह्या सगळ्याचा तात्पर्यार्थ असा निघतो कीं, अगदीं दूरवरच्या प्राचीनकाळीं जे लहान लहान मनुष्यसमुदाय असणें शक्य होतें, त्यांपासून प्रत्यक्ष आणि अप्र-

त्यक्ष घनीभवनांनीं किंवा संकलनांनीं त्यांच्याहून लाखों-पट मोठे असे समाज हळू हळू झाले आहेत. ही जी वाढ आहे ती जीवांमध्यें होणाऱ्या वाढीच्या प्रमाणावरच आहे.

१४. जीवविषयक उत्क्रमण आणि समाजविषयक उत्क्रमण ह्यांच्यामध्यें दिसणारा जो हा समान गुणधर्म त्याच्यामध्यें आणखी एक समान्तरभाव आहे. तो हा कीं निरनिराळ्या वर्गांतील घटकसमूहांमध्यें होणाऱ्या वाढी फारच निरनिराळ्या प्रमाणांवर असतात.

प्राणिप्रकारांचा जो एकंदर समुदाय आहे त्याच्याकडे नजर फेंकतां असें दिसतें कीं एका मोठ्या वर्गाचे, म्हणजे प्रोटोझोआ ( Protozoa ) नामक एक अत्यन्त सूक्ष्म जीववर्ग आहे त्याचे, घटक केवळ सूक्ष्मदर्शक यंत्रानें दिसणाऱ्या सूक्ष्म आकारा पलीकडे, म्हणजे ज्या आकारापासून उच्चतर प्राण्याच्या वाढीस सुरवात होते त्या आकारापलीकडे, क्वचितच जातात. आतां सीलेंटरेटा ( Coelenterata ) नामक जो अनेक जातींच्या प्राण्यांचा त्याच्या वरचा वर्ग आहे, त्यामध्यें हैड्रा नामक लहान प्राण्यापासून मेड्युसा नामक मोठ्या प्राण्यापर्यंत निरनिराळ्या आकारांचे जीव आहेत. आतां ॲन्युलोस ( Anunlose ) नामक कड्याकड्यांचा प्राणिवर्ग आणि मोलस्क नांवाचा मऊ अंगाचा प्राणिवर्ग, असे जे ह्याच्या वरचे वर्ग आहेत, त्यांच्यामधील वरच्या दर्जाचे व खालच्या दर्जाचे प्राणी ह्यांजमध्यें आकारासंबंधानें अत्यन्त मोठाले भेद दृष्टीस पडतात. हे सर्व बिनहाडाच्या प्राण्यांचे वर्ग झाले, पण जे मणक्याचे प्राणी आहेत, त्यांच्यामध्यें फारच विशाल आकारभेद आहेत.

आतां मानवी समाजांच्या एकंदर समुदायाकडे दृष्टि फेंकतां तेथेंहि असलेच आकार भेद आपल्या नजरेस येतात. पुष्कळ प्रदेशांवर पसरलेले असे सूक्ष्म मनुष्यसमुदाय अद्यापि आहेत, आणि अगदीं प्रारंभीच्या समाजाचे ते अद्यापि अस्तित्वांत असलेले मासलेच होत. उदाहरणार्थ, वुडव्हेडा किंवा रानव्हेडा नामक जे रानटी लोक आहेत, ते कधीं कधीं जोड्या जोड्यानेंच राहतात, व कधीं कधीं एकल होतात; दुसरे बुशमेन; ते कुटुंबाकुटुंबांनीं फिरत असतात; आणखी प्रसंगवशातच त्यांचे एका कुटुंबाहून जास्त मोठे समाज बनत असतात; नंतर फ्युजिअन लोक येतात, कारण त्यांच्यांत बाराबारांचे किंवा विसाविसांचे संघ बनलेले असतात. आस्ट्रेलियन, टास्मेनियन, आणि आण्डामानीज, ह्या लोकांत विसांपासून पन्नासांपर्यंत टोळींत माणसें असतात. आणि त्याचप्रमाणें एस्किमो लोकांप्रमाणें मुलूख वाईट असल्यास, किंवा डिगर इंडियन लोकांप्रमाणें जीवनकलांची वृद्धि झाली नसल्यास, किंवा हिंदुस्थानांतील जुआंग नामक डोंगरी लोकांप्रमाणें शेजारच्या उच्चतर जाती वाढीच्या आड येत असल्यास, रानटी टोळ्यांचा हा आकार वाढत नाहीं. जेथें जमीन सुपीक असून अन्नाचा पुरवठा चांगला होत असेल, आणि जेथें एके ठिकाणीं राहण्याची संवय लागून शेतकी सुरू होईल व जास्त धान्य पिकूं लागेल, तेथें ह्यांहून मोठाले समूह दृष्टीस पडतात; उदाहरणार्थ पॉलिनिशयन बेटांत व आफ्रिकेंत. अशा ठिकाणीं एक-दोन शेंकडे, किंवा एक दोन हजार, किंवा जास्त हजार लोक, कमजास्त प्रमाणावर एकत्र राहिलेले आढळतात.

आणि ह्यांच्यापेक्षां उच्चतर समाजांकडे पाहतां, अंशतः समुदित अशा हजारांच्या ऐवजीं पूर्णपणें समुदित असे लाखच्यालाख दृष्टीस पडतात.

१५. समाज आणि प्राणी ह्यांच्या वाढींमध्यें आणखी एक साम्य आहे. प्रत्येकामध्यें आकारवृद्धि दोन तऱ्हांनीं होत असते, व त्या कधीं एकत्र व कधीं पृथक् दृष्टीस पडतात. घटकांची केवळ संख्यावृद्धि होऊन सगळ्याची आकारवृद्धि होत असते ही एक तऱ्हा; आणि कित्येक समुदाय संयुक्त होऊन आणि पुनः असले कित्येक संयुक्त समुदाय एकत्र होऊन, आकारवृद्धि होत असते ही दुसरी तऱ्हा. पहिलें साम्य अगदीं स्पष्ट असल्यामुळें त्याचीं उदाहरणें नकोत; पण दुसरें दाखविणारीं उदाहरणें दिलीं पाहिजेत.

हें साम्य लक्षांत येण्याकरितां सेंद्रिय घनीभवन किंवा संकलन कसें होत जातें हें थोडक्यांत सांगितलें पाहिजे. एकंदर वनस्पतिकोटींत जें संयोगीभवन व पुनःसंयोगीभवन चाललेलें असतें, तें समजण्यास सोपें असल्यामुळें त्याचें उदाहरण प्रथम घेऊं. अत्यन्त कनिष्ट प्रतीच्या वनस्पति म्हणजे सूक्ष्म सजीव पिशव्या असतात; त्यापैकीं कांहीं जातींच्या वनस्पति कोट्यवधि एकत्र होऊन, सांचलेल्या पाण्यास हिरवट रंग येत असतो, आणि इतर जातींच्या असल्या सूक्ष्मतम वनस्पतींचा मिळून ओलट जागयांवरील कोशेरा बनत असतो. असल्या अनेक पिशव्या एकत्र होऊन वनस्पतींचीं लहान सुतें, तबकड्या, गोल वगैरे बनत असतात, आणि आकृतिविहीन व पातळ सपाटीसारखे गोळे ह्यांचेच ब-

नत असतात. ह्या शेवटच्या पैकीं एकास जेव्हां त्याच्यांत, पान, देंठ, मूळ इत्यादि भेद कांहींच दिसत नाहीं तेव्हां थॅलस ( Thallus ) असें म्हणतात, व जेव्हां त्याच्यांत असली कांहीं रचना दृष्टीस पडते तेव्हां फ्रॉन्ड ( Frond ) किंवा पुष्पविहीन वनस्पतींतील पानासारखा भाग असें म्हणतात; पण हे प्रथम सांगितलेले, अगदीं हलक्या दर्जाचे वनस्पति एकत्र होऊन बनलेले असतात. हे फ्रॉन्ड किंवा पानासारखे भाग हलक्या जातीच्या पुष्पविहीन किंवा गुप्तपुष्प वनस्पतींत अर्धवट जुळलेले असून वरच्या प्रतीच्या तसल्या वनस्पतींत कायमचे जुळलेले असतात; आणि नंतर तीं पानें एका देंटास जुळून जातात. ह्यापासूनच पुढें पुष्पयुक्त किंवा स्पष्टपुष्प अशा वनस्पतीचा उभा दांडा, म्हणजे पानांसहित कोंब, उत्पन्न होतो. म्हणजे काय, तर ह्या ठिकाणीं सूक्ष्म पिशव्यांच्या बारीक समुदायांचा बनलेला कायमचा मोठा समुदाय दृष्टीस पडतो. आणि नंतर ह्या उभ्या देंटास किंवा दांड्यास जेव्हां आडवे दांडे फुटतात, व जेव्हां त्यांस पुनः फांद्या फुटतात, तेव्हां ही संयोगिता जास्त संमिश्र होते. प्राणिकोटींतहि असेंच होतें; जरी कमी नियमित रीतीनें आणि गुप्तपणें. सूक्ष्मतम वनस्पतीप्रमाणें सूक्ष्मतम प्राणी म्हणजे वस्तुतः सजीव अणूंचा सूक्ष्म समूह असतो. अशा सूक्ष्मतम प्राण्यांचे संघ ज्यांच्यांत दृष्टीस पडतात असे पुष्कळ प्राण्यांचे प्रकार व पायऱ्या आहेत. स्पंजासारख्या कांहीं प्राण्यांमध्यें ह्या सूक्ष्मतम जीवांचें पृथक् अस्तित्व बहुतेक स्पष्टपणें दिसत असतें; पण ह्या संयुक्त समुदायांचें

उत्क्रमण जसें वाढत जाईल, तसें घटकसमुदायांचें पृथक् अस्तित्व कमी स्पष्ट होत जातें. सीलेंटरेटा ह्या वर्गापैकीं कांहीं जातीच्या प्राण्यांत घटकजीवांना जरी बरेंच स्वातंत्र्य असतें, व ते सुटे केले म्हणजे आमीबा (प्रोटोझोआपैकीं अत्यन्त सूक्ष्म प्राणी; त्याचे आकार वरचेवर बदलत असतात.) प्रमाणें जरी इकडे तिकडे चलनवलन करूं लागतात, तरी त्यांचें पृथक्व्यक्तित्व त्यांच्या समुदायाच्या व्यक्तित्वांत झांकून गेलेलें असतें; उदाहरणार्थ, सामान्य हैड्रा हा प्राणी (हे नळीसारखे प्राणी असून गोड्या पाण्यांत सांपडतात, व त्यांना पुष्कळ पाय असतात; ह्यांचे दुभांगून दुभांगून अनेक प्राणी बनत असतात.). ह्या दुय्यम समुदायांचा संयोग होऊन तिय्यम समुदाय बनतात. ह्याचीं कांहीं उदाहरणें ह्या सीलेंटरेटा वर्गातच दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, फांद्यांचा हैड्रॉइड; ह्याच्यांतील घटकजीव सुटे राहून फक्त त्यांचा एक समूह बनलेला असतो. दुसरी एक व्हेलेला म्हणून याच वर्गांतील प्राणिजाति आहे त्यांतील घटकजीव एकमेकांत इतके मिसळून गेलेले असतात कीं, ते निरनिराळे जीव आहेत हें पुष्कळ दिवस शास्त्रज्ञांच्या लक्षांत आलेलें नव्हतें. मोलस्कव आन्युलोरा ह्या वर्गातूनहि असल्या प्रकारचे प्राणी आढळतात.

सामाजिक वाढ अशाच संयोगांनीं व पुनःसंयोगांनीं होत असते. मूळ लोकांचा सामाजिक समूह सजीव अणूंच्या साध्या समूहाप्रमाणें केवळ संख्यावृद्धि होऊन मोठ्या आकारास कधीं पावत नाहीं. फ्यूजियन लोकांच्या प्रदेशांतील हवा वाईट असल्यामुळें तेथें उत्पन्न

इतकें थोडें होतें कीं, सरासरी वीस माणसांहून जास्त माणसांस एकत्र राहतां येत नाहीं. आंदामान बेटांत किनाऱ्यावर काय ती वस्ती होते, कारण किनाऱ्याच्या पुढें आंत सगळी अत्यन्त दाट झाडी आहे; म्हणून तेथें चाळीसांवर जास्त माणसांस फार दूर गेल्याविना एकत्र राहतां येत नाहीं. बुशमेन लोकांचा प्रदेश इतका निःसत्व आहे कीं, तेथें एका कुटुंबासहि कधीं कधीं दुभागावें लागतें. हीं सर्व समाजाच्या अत्यन्त सरल स्वरूपाचीं, व त्यापासून भटकणारे समूह कसे बनतात ह्याचीं, उदाहरणें होत. बऱ्याचशा सुपीक प्रदेशांतहि लोकसमूहांना अशा रीतीनें फांकण्याची आवश्यकता शेवटीं उत्पन्न होते. ते फांकू लागले म्हणजे मग असंबद्ध, होतात, आणि त्यांच्या भाषा जसजशा भिन्न होत जातील, तसतशा त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या बनत जातात. पुष्कळ वेळां, असेंच पुनःपुनः होत जाणें ह्या पलीकडे कांहीं होत नाहीं. म्हणजे टोळ्यांचे तंटे, कांहींचा नाश व क्षय, आणि कांहींची वाढ व पुनः विभागणी, अशी स्थिति होत राहते. मोठाले समाज जे बनतात ते असले लहान समाज एकत्र होऊनच जमतात; पण ते पूर्वीं पृथक् असल्यामुळें त्यांच्यांत असणारे जे भेद ते अगदींच बुजून जात नाहींत. हल्लींच्या सुधारलेल्या जातींच्या पूर्वजांत जशी ही गोष्ट पूर्वीं चाललेली होती, तशी हल्लींहि असुधारलेल्या जातींत चाललेली आढळते. अत्यन्त हलक्या रानटी लोकांत लहान टोळ्या जशा अगदीं स्वतंत्र असतात, तसली स्वतंत्रता त्यांच्या वरच्या दर्जाच्या रानट्यांत दिसत नाहीं; तर त्यांचे जमा-

व मोठाले असून ते कांहींसे संयुक्त असतात. उदाहरणार्थ, उत्तर अमेरिकेंतील कोमांची लोकांच्या तीन मोठ्या टोळ्यांपैकीं प्रत्येकीं अनेक लहान लहान जमाव असून, त्यांच्यांत जो कांहीं अल्पस्वल्प संयोग दृष्टीस पडतो तो त्यांच्या मुख्याच्या आंगच्या पराक्रमावरच अवलंबून असतो. तद्वतच, डाकोटा लोकांचे सात मुख्य जमाव असून त्यांच्यांत एकंदर चाळीस लहान जमाव आहेत. त्याप्रमाणेंच इरोक्किस लोकांच्या पांच राष्ट्रांमध्यें प्रत्येकीं आठ आठ टोळ्या होत्या. अल्पप्रमाणावरच संयुक्त असलेले जे हे मूळ समुदाय त्यांचे, स्थिति अनुकूल असल्यास, जास्त निकट संयोग बनतात; पण त्यांस कायमचें स्वरूप कधींकधींच येतें. क्यारेन्स लोकांबद्दल मेसननें वर्णिली आहे तशी स्थिति बहुधा होत असते. " त्यांच्यांत प्रत्येक गांव म्हणजे एक स्वतंत्र राष्ट्रच असतें. आणि प्रत्येक नाईक त्यांचा राजा असतो; पण कधीं कधीं त्यांच्यांत एकादा छोटा नेपोलियन उत्पन्न होतो, आणि तो एकादें राज्य जिंकून बादशहा बनतो; पण त्यांच्या वंशाचा अधिकार त्याच्या बरोबरच लयास जातो. " आफ्रिकेंत अशीच स्थिति आहे. लिव्हिंग्स्टन् म्हणतो, " पूर्वीं सगळे मागांजा लोक, त्यांचा मोठा नाईक जो उंडी त्याच्या अमलाखालीं होते; पण त्याच्या मरणानंतर तें सर्व राज्य कोसळलें. आफ्रिकेंतील प्रत्येक साम्राज्याची अगदीं प्राचीन कालापासून अशीच स्थिति झालेली आहे. " तेथें डेहामी किंवा आशांटी ह्यांच्या सारखें बरेंच वर्षेपर्यंत टिकणारें संयुक्त राज्य कधीं कधींच बनतें. मादागास्कर बेट आणि पालि-

निशियामधील कांहीं वेटें ह्यांच्या इतिहासांकडे पाहतां तीच स्थिति दृष्टीस पडते; म्हणजे त्यांचे संयोग कायमचे नसून अल्पकालिक असत. नष्ट झालेल्या सुधारलेल्या जातींचे जे अगदीं पुरातन काल त्या कालीं त्यांस असल्याच स्थितींतून वर यावें लागलें होतें. उदाहरणार्थ, ईजिप्त देशांत प्रारंभीं अनेक टोळ्या होत्या; त्यांनीं एककालींच स्वतंत्र राज्यें स्थापण्यास सुरवात केली होती, व त्यांतील प्रत्येकाचे कायदे व धर्मसंस्था पृथक् होत्या. ग्रीक लोकांत प्रथम जीं लहान लहान संयुक्त राज्यें बनलीं, तीं दुर्बल शहरांचा सबल शहरांनीं पाडाव करून बनलीं. आणि उत्तर यूरोपांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्यापूर्वीं ज्या अनेक टोळ्या जर्मनींत होत्या, त्या ह्याच नमुन्यावर बनलेल्या होत्या; म्हणजे, संयोगीकरणाच्या दुसऱ्या पायरीवर त्या होत्या.

असले संयुक्त समाज स्थिर झाले, म्हणजे त्याच पद्धतीवर पुनः त्यांचे जास्त संयुक्त समाज बनतात; त्यांच्यांतील संयुक्तभाव बहुधा दुर्बल असून कधींकधींच पक्का बनतो. उदाहरणार्थ, इजिप्शन लोकांच्या वर सांगितलेल्या टोळ्या एकत्र होऊन त्यांचीं प्रथम उत्तर इजिप्त व दक्षिण ईजिप्त अशीं दोन राज्यें बनलीं, आणि शेवटीं हीं दोन्ही राज्यें एक होऊन एक मोठें इजिप्शन राष्ट्र बनलें. मेसापोटेमियामधील राजांचे जे इतिहास आहेत त्यांवरूनहि त्यांच्यामध्येंहि लहान संयोगाचे बनणारे हे मोठाले संयोगच दिसून येतात. ग्रीक लोकांतहि पुढें अशींच दोन मोठीं संयुक्त राष्ट्रं बनलीं. रोमन लोकांतहि असेंच झालें; व ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं व

मागून सर्व उत्तरयूरोपांत असेच संयोग बनत गेले. नंतर फ्रान्सदेशांतल्याप्रमाणें लहान लहान जमिनदारीचे प्रांत बनले, व ते एकत्र होऊन मागून मोठालीं राज्यें बनलीं.

एवंच जीवांचे ठिकाणीं आणि समाजांचे ठिकाणीं संयोगीकरण व पुनःसंयोगीकरण ह्यांच्या अनेक मजली दृष्टीस पडतात. दोघांचेहि ठिकाणीं अत्यन्त लहान समूहांचें कांहींसें संकलन झालें म्हणजे त्यांचें संयोगीभवन होऊन मोठाले समूह बनण्याची क्रिया सुरू होते; आणि दोन्हीहि ठिकाणीं ह्याच नमुन्यावर दुय्यम समूहांचे तिय्यम समूह बनतात.

१६. जीव व समाज ह्यांच्या वाढींत आणखी एक साम्य आहे. वर सांगितल्याप्रमाणें समूहांतील घटकांची संख्यावृद्धि होऊन वाढ होणें आणि समूहांचे संयोग होऊन वाढ होणें ह्या दोन्ही गोष्टी दोघांचेहि ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून होऊं शकतात.

जीवविषयक व समाजविषयक मूलसंघ लहान असतात इतकेंच नाहीं, तर त्यांच्यांत संकलीभवनाची उणीव असते. हलक्या जातीच्या प्राण्यांस त्यांच्यांतील अल्प जीवद्रव्याच्या मानानें जास्त जागा लागत असते, आणि हलक्या प्रतीचे समाजहि त्यांच्यांतील व्यक्तिसंख्येच्या मानानें विस्तीर्ण प्रदेशावर विखरलेले असतात. परंतु प्राण्यांचे घनीभवन जसें आकारवृद्धि आणि घटकद्रव्यसंनिकर्ष ह्या दोन्हीं रूपीं होत असतें, तसेंच समाजाचें घनीभवनहि प्रत्येक संघांतील लोकसंख्या वाढून, आणि अनेक संघ एकत्र होऊन, होत असतें. रानटी लोकांच्या देशांतून इकडे तिकडे असलेली पातळ

वस्ती, आणि तेवढ्याच यूरोपांतल्या प्रदेशांतील दाट वस्ती ह्यांच्यांतील भेद पाहतां, किंवा पूर्वीच्या काळची इंग्लंदची वस्ती आणि हल्लींची इंग्लंदची वस्ती ह्यांच्यांतील भेद पाहतां, समूहांचा संयोग होऊन जी वाढ होते त्याखेरीज मधल्या मधल्या रिकाम्या जागा भरूनहि वाढ होत असते ही गोष्ट स्पष्ट होते. ज्याप्रमाणें वरिष्ट जातीचा प्राणी कनिष्ट जातीच्या प्राण्यापेक्षां आकारानेंच मोठा होतो असें नाहीं, तर जास्त घन आणि वजनदारहि होतो, त्याप्रमाणें वरिष्ट समाजाचेंहि असतें.

एवंच, जीवाप्रमाणें समाजाच्या वाढींतहि उत्क्रान्तीचा मुख्य विशेष दुबार स्वरूपानें दृष्टोत्पत्तीस येतो. म्हणजे, त्याच्यांत घनीभवन जें दिसतें तें एकंदर गोळा मोठा होण्याच्या रूपानें जसें दिसतें, तसेंच त्या गोळ्याचे भाग जास्त परस्परसन्निध होऊन जो सुसंबद्धपणा उत्पन्न होत असतो, त्या रूपानेंहि दिसतें.

तथापि ही गोष्ट एथें सांगणें बरोबर दिसतें कीं, एका समाजांतील घटक दुसऱ्यांत रहावयास जाऊन जी समाजाची वाढ होत असते, तसल्यासारखें कांहीं प्राण्याच्या वाढींत दिसत नाहीं. पुष्कळशा प्राथमिक समाजांत आणि थोड्याशा वाढलेल्या समाजांत ही एक महत्त्वाची गोष्ट असते; परंतु सामान्यतः लोकसंख्या वाढून आणि अनेक समूह एकत्र होऊन जी वाढ होत असते, तिच्या परिणामांशीं तुलना करतां, ह्या आतां सांगितलेल्या वाढीचा परिणाम इतका अल्प असतो कीं, प्राणी आणि समाज ह्यांच्यांतील जें एकंदर साम्य त्यास त्यानें फारसें वैगुण्य येत नाहीं.

---

# प्रकरण चवथें

## समाजरचना

१७. सजीव शरीरांप्रमाणें समाजांमध्येंहि गोळ्याच्या वृद्धीबरोबर रचनेची वृद्धि बहुधा होत असते. घनीभवन हा जो उत्क्रान्तीचा मूल विशेष तो उत्पन्न होत असतां, दोघांचेहि ठिकाणीं उत्क्रमणाचा दुय्यम विशेष जो विभिन्नीकरण, तोहि बऱ्याच अंशांनीं दिसूं लागतो.

सरासरी वनस्पतींसारखेच दिसणारे जे कांहीं अत्यन्त हलके प्राणी आहेत ते वजा करतां बाकींच्याच्या ठिकाणीं असा सामान्य नियम दिसतो कीं, मोठ्या समुदायांची ( प्राण्यांची ) इंद्रियव्यवस्थाहि मोठ्या प्रमाणावर असते. प्राण्याच्या सभोवतालचें आवरण त्याचें वसतिस्थान, आणि त्याचा नमुना, ह्यांवरून ह्या नियमास अनेक बारीकसारीक अपवाद उत्पन्न होतात हें खरें आहे; परंतु ते जमेस धरिले तरी हें सत्य कायमच राहतें कीं, विस्तृत अशा गोळ्यांचें संयुक्त जीवित चालण्यास संकीर्ण रचनांची किंवा व्यवस्थांची जरूरी असते. समाजाचेंहि असेंच आहे. लहान लहान समूहांकडून जसजसें मोठमोठ्या समूहांकडे जावें, तद्वतच साध्या समूहांकडून जसें संयुक्तसमूहांकडे जावें, आणि एकेऱ्या संयुक्तसमूहांकडून दुहेऱ्या संयुक्तसमूहांकडे जावें, तसतसे त्यांच्या भागांचे विभिन्नभाव वाढत

गेलेले दृष्टीस पडतात. जो समाजसमुदाय सूक्ष्म असतां समस्वरूप असतो, तो मोठा होत जाईल तसा सारखा विविधस्वरूप होत जातो; आणि त्याचा आकार मोठा होण्यास त्याच्यांत मोठी संमिश्रता आलीच पाहिजे. हें ज्या पायऱ्यांनीं होत जातें त्यांतील मुख्य मुख्य पायऱ्यांकडे आतां आपण नजर देऊं.

दक्षिण अमेरिकेंतील कायाग्वा, किंवा वुड–( रान ) इंदियन, या लोकांप्रमाणें ज्या ठिकाणीं एक कुटुंब दुसऱ्या कुटुंबापासून अंतरावर राहत असतें, त्या ठिकाणीं समाजव्यवस्था बनणें अशक्यच असतें; आणि जेथें निरनिराळ्या कुटुंबांमध्यें अल्पस्वल्पच दळणवळण असेल, तेथेंहि तीं थोडीं आणि भटकणारीं असतील तोंपावेतों त्यांच्यांत कांहीं व्यवस्था उत्पन्न होत नाहीं. एस्किमो, फ्यूजियन, आस्ट्रेलियन, बुशमेन, इत्यादि लोकांत, कोणी तरी ठराविक नाईक बनून पहिला विभागभेद जो उत्पन्न व्हावयाचा तोहि झालेला नसतो. त्यांच्यांत जो कोणी जास्त बलिष्ठ, किंवा ज्यास्त लुच्चा, किंवा जास्त अनुभवी असेल, त्याच्या कह्यांत कांहीं दिवस राहणें ह्या पलीकडे त्यांच्यावर कोणाचा ताबा नसतो; आणि तो मुख्य अमक्याच कुटुंबांतील असावा असेंहि ठरलेलें नसतें. ज्या ठिकाणीं ह्यापेक्षां मोठाले साधे समूह असतील, तेथें कोणत्या तरी प्रकारचा मुख्य प्रथम दृष्टीस पडूं लागतो. हा जरी अगदीं सार्वत्रिक नियम नसला, तरी सामान्य नियम आहे. मुख्यविहीन समूहांवर कोणाचाच अंमल नसल्यामुळें ते अव्यवस्थित असतात, आणि बराचसा मोठा आकार येण्यापूर्वीं ते

फाटतात. परंतु शंभराच्या आंतबाहेर लोकसंख्या झाली म्हणजे बहुधा सरल किंवा संयुक्त असा अंमल सुरू होतो, म्हणजे एक किंवा ज्यास्त माणसें नैसर्गिक, किंवा दैविक, किंवा दोन्ही प्रकारचा अंमल त्यांजवर करूं लागतात. हें पहिलें सामाजिक विभिन्नीकरण होय. त्यानंतर लवकरच दुसरें एक उत्पन्न होतें, आणि त्याचा कल नियामक भाग आणि कामकरी भाग ह्यांच्यामध्यें विभाग उत्पन्न करण्याकडे असतो. अगदीं हलक्या दर्जाच्या टोळ्यांत पुरुष आणि स्त्रिया ह्यांच्या स्थितींतील जो भेद त्याच्या रूपानेंच तो विभाग ओबड धोबड रीत्या दिसत असतो; म्हणजे, पुरुषांच्या अंमलावर कोणताहि दाब नसून ते त्या टोळींतील बाह्य व्यापार, आणि मुख्यत्वेंकरून लढाईरूपी व्यापार, करीत असतात, आणि स्त्रिया हमाल बनून कुटुंबपोषणाचे जे कमी कुशलतेचे भाग ते उरकीत असतात. परंतु टोळीची वाढ होऊन आणि नायकाची स्थापना होऊन, जेव्हां तीस लढाईच्या कामांत श्रेष्ठत्व प्राप्त होतें, तेव्हां कामकरी भागांत गुलामांची भर पडून त्याचा आकार वाढतो. ह्या गोष्टीस मुकाट्यानें सुरवात होते. प्रत्यक्ष लढाईत जिंकलेल्यांस जेते लोक मारीत असतात आणि बहुधा खात असतात, पण जित टोळींत जीं माणसें लढाईस येण्यासारखीं नसतील त्यांस जेते लोक गुलाम करितात. उदाहरणार्थ, लढाईनंतर पकडलेल्या स्त्रियांस व मुलांस पाटागोनियन लोक दास बनवितात. नंतर, आणि विशेषतः नरभक्षकपणा बंद झाला म्हणजे, पुरुषांस गुलाम बनविण्याचा परिपाठ सुरू होतो; आणि

अशा रीतीनें अशा ठिकाणीं समाजाचा कामकरी भाग अधिकारी भागापासून अगदीं निराळा होऊन जातो. उदाहरणार्थ, चिनूक लोकांत गुलाम हे सर्व कावाडकष्टाचें काम करीत असतात. बलुची लोक लागवडीचें श्रमाचें काम स्वतः करीत नाहींत, तर तेथील मूळचे लोक जे जत, ज्यांस त्यांनीं जिंकिलें आहे, त्यांजवर तें टाकितात. आफ्रिकेंत गोल्डकोस्टवर गुलामांस शेताच्या कामावर लावितात.

प्राथमिक सामाजिक समूहांच्या संयोगानें दुहेरा समाज बनून जी वृद्धि होत असते, त्याबरोबर आणखी एक विभागभेद उत्पन्न होतो. संयुक्तसंघ एकत्र राहण्यास त्यांतील प्रत्येक संघाचा जसा नाईक पाहिजे, तसाच त्या सगळ्या समूहाचाहि एक नाईक पाहिजे; म्हणून विभिन्नीकरणव्यापारानें पूर्वीं संघाचा नाईक उत्पन्न झाला, त्याच व्यापारानें आतां त्या समूहाचा, म्हणजे नायकांचा नाइक उत्पन्न होतो. कधींकधीं हा संयोग एकाद्या सामान्य शत्रूपासून संरक्षण करण्यासाठीं उत्पन्न होतो, आणि कधींकधीं एका टोळीनें बाकींच्यांस जिंकिल्यानें उत्पन्न होतो. असें झालें म्हणजे ती प्रबल टोळी आपलें श्रेष्ठत्व कायम ठेवण्यासाठीं आपलें लढाऊ कौशल्य वाढवूं लागते, आणि अशा रीतीनें त्या संयुक्त समूहाच्या इतर भागांपासून भिन्न होते.

सगळ्या समाजावर एका अधिकारी वर्गाला अंमल चालवितां यावा, इतकी अशा प्रकारच्या संघांच्या संघांची संयुक्तता उत्पन्न झाली कीं म्हणजे मग त्यांचीं इतर असल्याच संयुक्त संघांशीं सख्यें होऊं लागतात

किंवा त्यांचे त्यांजवर विजय हे होऊं लागतात, आणि शेवटीं कधीं कधीं दोघांचा एक मिलाफ होतो. असें झालें म्हणजे नियामक वर्गांत आणखी संमिश्रता उत्पन्न होते, कारण त्यांच्यांत राजा, स्थानिक शास्ते, आणि लहानसहान नाईक असा विभाग उत्पन्न होतो; आणि त्याबरोबरच लढवय्ये, भिक्षुक, गुलाम, इत्यादि अगदीं स्पष्ट विभाग उत्पन्न होतात. एवंच आकारवृद्धि होत जाईल तशी रचनेची संमिश्रता उत्पन्न होत जाते हें स्पष्ट दिसतें.

१८. जीव आणि समाज ह्या दोन्ही समुदायांमध्यें आकारवृद्धिबरोबर ही जी विविधस्वरूपता वाढत जात असते, तिच्या ठिकाणीं दोन्ही उदाहरणांत आणखी एक सामान्य धर्म दृष्टीस पडतो. नियामक वर्गाच्या वाढीमुळें उत्पन्न होणारें जें विभागवैसदृश्य त्याखेरीज, नियमित वर्गामध्येंहि वैसदृश्यें उत्पन्न होत जातात, म्हणजे प्राण्यांच्या ठिकाणीं पोषक इंद्रियें इत्यादिकांमध्यें भेद उत्पन्न होत जातात, आणि समाजांच्या ठिकाणीं निरनिराळ्या उद्यमसंस्थांमध्यें भेद उत्पन्न होत जातात.

जेव्हां अत्यन्त हलक्या प्रतीचे प्राणिसमुदाय एकत्र होऊन त्यांच्यापेक्षां उच्चतर जातीचा प्राणिसमुदाय बनतो, आणि जेव्हां ह्या दुहेरी समुदायांचे संयोगानें तिहेरी समुदाय बनतात, तेव्हां प्रत्येक घटक इतर सर्व घटकांशीं सदृश असतो; पण उत्क्रमण होत जाईल तशीं त्यांच्यांत वैसदृश्यें उत्पन्न होत जातात, आणि हळूहळू तीं जास्त ठळक होत जातात. सीलेंटरेटा ह्या प्राणिवर्गाच्या ठिकाणीं ह्या सर्व पायऱ्या स्पष्टपणें दृष्टीस पडतात. त्या वर्गांतील सामान्य हैड्रा प्राण्याच्या कुशींतून

त्यांचीं लहान लहान पोरें कळ्यांसारखीं बाहेर फुटून येतात, आणि त्यांची पूर्ण वाढ झाली म्हणजे आपल्या जनकापासून सुटीं होतात. पण संयुक्त हैड्राइड ह्या प्राण्यांत नवे जीव जरी अशाच रीतीनें उत्पन्न होतात, तरी ते त्यास कायमचे चिकटलेले राहतात, आणि त्यांनाहि अशाच रीतीनें नवे जीव उत्पन्न होऊन सगळ्यांचें मिळून एक फांद्याफांद्यांचें झाडच बनतें. जेव्हां असल्या संयुक्त समूहाच्या निरनिराळे घटकांचीं जीवनें सारख्याच रीतीनें आणखी बहुतेक स्वतंत्ररीत्या चाललेलीं असतात, तेव्हां त्यांच्यापैकीं ज्यांचीं उत्पादक इंद्रियें बनतील ते खेरीज करून बाकीचे परस्परसदृशच राहतात; ही स्थिति जे प्राणी एका ठिकाणीं चिकटून राहिलेले असतील त्यांची आहे; पण जे समूह पाण्यावर तरंगत असतात किंवा पोहत असतात, त्यांत निरनिराळ्या घटकांची परिस्थिति निरनिराळी असल्यामुळें ते विसदृश होत जातात, आणि भिन्नभिन्न व्यापार करूं लागतात. अनेक छोट्या सामाजिक समूहांच्या बनलेल्या मोठ्या समूहाचें असेंच असतें. प्रत्येक टोळीमध्यें प्रारंभीं तिच्या हलक्या प्रकारच्या जीवनास योग्य असे अंधक अंधक श्रमविभाग असतात, आणि ते बाकीच्या टोळ्यांतील श्रमविभागांसारखेच असतात. पण त्यांचा संयोग झाला म्हणजे जिनसांचा विनिमय करण्यास सोपें जातें; आणि समूहांतील घटक टोळ्या निरानिराळे जिन्नस चांगले उत्पन्न होतील अशा निरानिराळ्या ठिकाणीं रहात असतात, त्यांच्यांत निरनिराळे उद्योग सुरू होतात, आणि अशा रीतीनें उद्यमरचनांमध्यें वैसदृश्यें उत्पन्न

होतात. आस्ट्रेलियांतील टोळ्यांप्रमाणें ज्या टोळ्या संयुक्त झालेल्या नसतील त्यांचे ठिकाणींहि लढाई होऊन विघ्न येई तोंपर्यंत निरनिराळ्या स्थानीं होणाऱ्या जिनसांचा विनिमय चालत असतो. आणि मादागास्कर किंवा आफ्रिकेंतील नीग्रो लोकांचीं मुख्य संस्थानें ह्यांच्या इतकें समाजसंकलीभवन झालें म्हणजे एका सरकाराच्या शासनामुळें उत्पन्न होणारी जी शांतता ती व्यापारविषयक दळणवळण सुलभ करिते. सदृश भाग कायमचे एकत्र राहिल्यामुळें परस्परावलंबित्व शक्य होतें; आणि हें परस्परावलंबन वाढत जाईल तसें भागांचें वैसदृश्यहि वाढत जातें.

१९. संकलीभवन वाढत जाईल तसे जे रचनाभेद उत्पन्न होत जातात ते प्राणी व समाज ह्या दोघांचेहि ठिकाणीं एकाच सामान्य नियमाला अनुसरून होतातः म्हणजे, हीं विभिन्नीकरणें प्रथम ज्यास्त सामान्य असून मागाहून ज्यास्त विशिष्ट होऊं लागतात. प्रथम मोठाले आणि साधे असे विभागभेद उत्पन्न होतात; नंतर अशा विभिन्न झालेल्या प्रत्येक भागांत, त्यांचे विसदृश विभाग पडतील असे फरक उत्पन्न होतात; नंतर ह्या प्रत्येक पोटभागांत लहानसान वैसदृश्यें उत्पन्न होतात; आणि अशा रीतीनें सारखें गाडें चालतें.

मणक्याच्या प्राण्याचा जो मधला हाडांचा स्तंभ त्याच्या वाढीच्या निरनिराळ्या पायऱ्यांकडे पाहतां त्यावरून प्राण्यामध्यें ह्या नियमाची बजावणी कशी होते हें चांगलें दिसतें. अगदीं प्रारंभीं ब्लॅस्टोडर्म (Blastoderm) नांवाच्या गर्भाच्या वाटोळ्या तबकडींतून जे सूक्ष्म पिशव्यांचे एक किंवा ज्यास्त थर उत्पन्न होत

असतात त्यांमध्यें एक लांब खोलगट जागा उत्पन्न होते, व तीस प्रिमिटिव्ह ग्रूव्ह किंवा "प्राथमिक पन्हळ" असें म्हणतात, आणि हाच काय तो पाठीच्या व डोक्याच्या हाडांचा कणा या वेळीं असतो; त्याच्यांत अद्यापि पाठीच्या हाडांची कांहींएक खूण नसते, किंवा त्याचा जो भाग पुढें डोकें बनावयाचा, व जो भाग पाठीचा कणा बनावयाचा, त्यांच्यांतहि अद्यापि कांहीं फरक दिसत नसतो. पण लवकरच ह्या पन्हळाच्या कडा वाढत जाऊन आणि अग्रवर्ती भागीं ज्यास्त जलद एकमेकांवरती दुमटून, आणि त्याबरोबर पन्हळाचा तो भाग ज्यास्त रुंद होऊन, डोक्याचा भाग पाठीच्या कण्यापासून किंचित् निराळा दिसूं लागतो, आणि कण्याच्या भागाच्या कड्याकड्या बनूं लागल्यामुळें आणि डोक्याचा भाग सबंदच राहिल्यामुळें हा भेद जास्तच स्पष्ट होत जातो. नंतर मग ह्या मुख्य भागांतील प्रत्येकांत बारीक विभाग उत्पन्न होऊं लागतात. ही अंकुररूपी कपाळाची करटी पुढें वांकून येऊं लागते, व त्याबरोबरच तिच्यांत तीन फैलाव उत्पन्न होतात, त्यांच्यांत पुढें मेंदूचे तीन भाग राहत असतात; इकडे पाठीच्या कण्याच्या कड्या पडण्याची क्रिया त्याच्या टोंकांपर्यंत पसरून जाऊन, प्रोटोव्हर्टिब्री नामक कोंवळ्या हाडांची सरासरी समस्वरूप अशी रांग उत्पन्न होते. हीं हाडें प्रथम समस्वरूप असतात इतकेंच नाहीं, तर सरलस्वरूपहि असतात; म्हणजे ते सर्व द्रव्याचे एकप्रकारचे काटकोन गोळे असतात; नंतर हळू हळू ह्यांच्यामध्यें भेद उत्पन्न होऊं लागतात, म्हणजे मानेचीं हाडें, पाठीचीं हाडें, आणि कुल्ल्याचीं हाडें; आणि

अशा प्रकारचे निरनिराळ्या भागांमध्यें भेद उत्पन्न होत असतां प्रत्येक भागांतील प्रत्येक हाडासहि त्याचें विशिष्ट स्वरूप येऊं लागतें. शिवाय एकंदर गर्भांत असेच व्यापार चाललेले असतातच; आणि त्यांच्या योगानें त्याचे मोठाले भाग परस्परभिन्न होत जाऊन त्या भागांचे भागहि परस्परविसदृश होत जातात. सामाजिक उत्क्रमण चाललें असतां असलींच रूपान्तरें दृष्टीस पडतात. धर्मविषयक नियंत्रण करणारी संस्था किंवा रचना कशी उत्पन्न होते हें पाहिल्यास तें त्याचें उत्कृष्ट उदाहरण होणार आहे. साध्या टोळ्यांतून, आणि प्रथम प्रथम त्यांच्या बनलेल्या संघांतून, एकच माणसें जादूगार, उपाध्ये, भविष्यवादी, भूतकाढ्ये, आणि वैद्य, एवढ्यांचीं कामें करीत असतात. पण समाजाचें संकलीभवन होत जाईल तसे हे दैविक व्यापार आणि ते करणारांचे दर्जे हे दोन्ही भिन्न होत जातात. फीजी बेटांत उपाध्ये व भविष्यवादी हे निराळे आहेत; सांडविच बेटांतहि तसेंच आहे. न्यूझीलंदर लोकांत उपाध्ये आणि जादूगार हे निराळे असतात; आणि काफर लोकांत भविष्यवादी व पाऊसपाड्ये ह्यांखेरीज वैद्यांचे दोन वर्ग आहेत, औषधांनीं रोग बरे करणारे, व मंत्रतंत्रानें बरे करणारे. प्राचीन अमेरिकेंतल्या प्रमाणें जे याच्या पुढें गेलेले समाज असतील त्यांच्यांत प्रारंभींच्या ह्या एकप्रकारच्याच धंद्यामध्यें आणखी भेद उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, मेक्सिकोमध्यें भुतांशीं भांडून रोग बरे करणारे आणि त्यांचें संतर्पण करून तसें करणारे, असे जादुगारांचे दोन भेद होते. शिवाय उपाध्यायवर्गांत यज्ञकर्ते, भविष्यवादी, स्तोत्रक-

तें, तीं म्हणणारे, आणि तरुणांस शिकविणारे, इतके भेद होते. वरिष्ट राष्ट्रांतून हे विभाग इतके ठळक झाले आहेत कीं, पूर्वी ते सर्व एकच होते हें देखील ध्यानांत येत नाहीं. हलीं जो शास्त्रज्ञ वर्ग दिसतो व ज्याचे आणखी निरनिराळे पोटवर्ग बनले आहेत, तो प्रारंभीं ज्योतिष वर्तविणारे जे उपाध्ये त्याच्यापासून उत्पन्न झाला; तद्वतच हलींचे सर्व वैद्यविभाग पूर्वींच्या वैद्योपाध्यापासून उत्पन्न झाले आहेत; आणि स्वतः उपाध्यायवर्गांतहि पोपापासून क्यूरेटापर्यंत किंवा शंकराचार्यापासून कारट्यापर्यंत भेद उत्पन्न झाले आहेत. तद्वतच जर एकाद्या उद्यमसंस्थेची किंवा रचनेची उपपत्ति करूं लागलों, तरी तीच स्थिति दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, लोखंडासंबंधी सर्व प्रकारच्या क्रिया करणाऱ्या मूळच्या लोहारापासून, त्याचा रस करून गाळणारे, तें ओतणारे, त्याची कांब किंवा पत्रा पाडणारे, पत्रे वळवून त्यांचे नळ बनविणारे आणि निरनिराळीं लोखंडाचीं हत्यारें करणारे, इतके विभाग उत्पन्न झाले आहेत.

हें जें रूपान्तर एथें उदाहरणांनीं व्यक्त केलें आहे तें, उत्क्रमण चाललें असतां सर्वत्र जी समस्वरूपास विविधस्वरूपता प्राप्त होत असते, तिचेंच एक रूप आहे; पण एथें विशेषतः ध्यानांत ठेवावयाची गोष्ट ही कीं प्राणी आणि समाज ह्यांच्या उत्क्रमणांत हें रूपान्तर विशेषतः मोठ्या प्रमाणावर दिसून येत असतें.

२०. प्राणिविषयक व समाजविषयक गोष्टींचा आणखी बारीक विचार करतां आणखी एक प्रकारचा सामान्तरभाव त्यांच्यांत दृष्टीस पडतो. म्हणजे, प्राण्यांचीं

इंद्रियें आणि समाजांचीं इंद्रियें ह्यांच्या अंतर्रचना एकाच तत्त्वावर झालेल्या असतात.

प्राण्याच्या पोटांतील निरनिराळीं इंद्रियें पुष्कळ गोष्टींत जरी एकमेकांपासून भिन्न असतात, तरी त्यांच्यांत कांहीं सामान्य गुणधर्म दृष्टीस पडतात. ह्या प्रत्येक इंद्रियांत त्याच्या निरनिराळ्या भागांस पोषक द्रव्य पोंचविणाऱ्या, तसेंच त्यांची ज्या द्रव्यांवर क्रिया चालत असेल तीं आणणाऱ्या, त्यांच्यांत नवीं द्रव्यें बनतील तीं नेणाऱ्या, आणि त्यांच्यांतील निरुपयोगी भाग वाहून नेणाऱ्या, योजना असतात; तसेंच त्यांच्या व्यापारांचें नियमन करणाऱ्याहि योजना सर्वांचे ठिकाणीं असतातच. यकृत् आणि मूत्रपिंड ह्या इंद्रियांच्या निरनिराळ्या व्यापारांप्रमाणें त्यांचे सामान्य आकार आणि सूक्ष्म घटना हीं जरी भिन्न असतात, तरी त्यांपैकीं प्रत्येकांत शुद्धरक्तवाहिन्या, अशुद्धरक्तवाहिन्या, आणि रस किंवा लसवाहिन्या, ह्या आहेतच; आणि तद्वतच त्यांच्यांतील घाणेरडीं द्रव्यें वाहून नेणारे फांद्या फुटलेले सूक्ष्म पन्हळ आणि त्यांचे व्यापार कमी किंवा ज्यास्त करणारे ज्ञानतंतु, हेहि प्रत्येकांत आहेतच. आतां जीं उच्चतर इंद्रियें आहेत, आणि जीं रक्त बनाविणें, शुद्ध करणें, आणि त्याचें अभिसरण करणें, ह्या क्रिया करण्याच्या ऐवजीं, बाह्यव्यापार चालवून सामान्य जीवितास मदत करीत असतात, उदाहरणार्थ, ज्ञानतंतुविषयक आणि स्नायुविषयक इंद्रियें, ह्यांच्या संबंधानेंहि वरील गोष्ट बऱ्याच अंशीं खरी आहे. ह्या इंद्रियांमध्येंहि तयार झालेलीं द्रव्यें आणण्यासाठीं, नासलेलीं द्रव्यें काढून नेण्यासाठीं,

आणि निर्जीव झालेलीं द्रव्यें वाहून नेण्यासाठीं पन्हळ असतात; तद्वतच त्यांना आवरणाऱ्या ज्ञानतंतूंच्या सूक्ष्म पिशव्या आणि धागे हे असतातच. सारांश, शरीरांत जरी पुष्कळ ठळक असे रचनाभेद आहेत, तरी त्यांच्यांत हीं रचनासाम्येंहि आहेत.

समाजाचेंहि असेंच आहे. राष्ट्राच्या उपयोगासाठीं कांहीं जिन्नस उत्पन्न करणारें किंवा अन्य तऱ्हेनें राष्ट्रीय गरजा पुरविणारें जें कांहीं मनुष्यसंघरूपी इंद्रिय त्याच्या ठिकाणीं त्याच्या उपयोगी पडणाऱ्या अशा कांहीं रचना असून, त्या इतर सामाजिक व्यापार करणाऱ्या प्रत्येक इतर इंद्रियांतील रचनांसारख्याच वस्तुतः असतात. विशिष्ट प्रदेश कापसाचें कापड करणारा असो वा चाकू कात्र्या बनवणारा असो, त्याच्या ठिकाणीं त्याला कच्चा माल आणून देणारीं, आणि तेथें तयार झालेला माल गोळा करून तो इतर ठिकाणीं पाठविणारीं साधनें असतातच. तद्वतच त्या ठिकाणीं सर्व राष्ट्रभर फिरत असलेल्या जिनसांतून तेथें काम करणाऱ्या लोकांना व त्यास कामावर लावणाऱ्या लोकांना पाहिजेत तेवढे जिन्नस आणून त्यांस त्यांचा पुरवठा करण्याचीं साधनें असतातच; तद्वतच तेथील उद्योगास तेजी किंवा मंदी आणणाऱ्या बातम्या वगैरे आणणारीं टपालाचीं वगैरे साधनें असतात; आणि शिवाय तेथें व्यवस्था राखण्यासाठीं, आणि लोकांकडून योग्य उद्योग करविण्यासाठीं राजकीय, धार्मिक वगैरे नियामक संस्थाहि असतात. आतां पदार्थ उत्पन्न करणारे हे जे प्रदेश तेथून नजर काढून ते आपल्यांत ओढून घेणारीं

आणि बाहेर पाठविणारीं जीं बंदर वगैरे ठिकाणें तिकडे जर लाविली, तरी तेथेंहि जिनसांची वांटणी करणारीं आणि कामकऱ्यांचें नियमन करणारीं तसलींच साधनें दृष्टीस पडतात. ज्या ठिकाणीं सामाजिक इंद्रियाला द्रव्योत्पादक क्रिया करण्याच्या ऐवजीं एकाद्या विश्वविद्यालयाप्रमाणें कांहीं समाजघटकांना कांहीं विशिष्ट सामाजिक व्यापार करण्यास तयार करण्याचें काम असतें, त्या ठिकाणींहि एकंदर रचना ह्याच सामान्य तत्त्वावर झालेली असते: म्हणजे, तेथील स्थानिक पोषण आणि नियमन करण्यासाठीं केलेल्या योजना कांहीं बाबतींत इतर ठिकाणच्या योजनांहून जरी भिन्न असल्या, तरी सामान्यतः सारख्याच असतात; म्हणजे, त्या ठिकाणींहि जिनसांची वांटणी करणारे, आणि गांवांत व्यवस्था ठेवणारे, इतर ठिकाणासारखेच वर्ग असतात, आणि विश्वविद्यालयाच्या वगैरे व्यवस्थेसाठीं एक विशिष्ट वर्ग उत्पन्न झालेला असतो.

आतां सजीव शरीरांतील इंद्रियांमधील रचनासाम्याप्रमाणें सामाजिक इंद्रियांमधील हें रचनासाम्य, त्यांच्या परस्परावलंबाबरोबरच उत्पन्न होतें ही गोष्ट ध्यानांत आणतां, व्यक्तिरूपी इंद्रियजाल आणि राष्ट्ररूपी इंद्रियजाल ह्यांच्यामध्यें स्वभावसादृश्य किती मोठें आहे, हें पूर्वीपेक्षां जास्त स्पष्ट रीतीनें लक्षांत येतें.

२१. समाज आणि प्राणी ह्यांमध्यें आणखी एक रचनासाम्य आहे तें दाखविलें पाहिजे. सजीव शरीरांत इंद्रियांची घटना तीन मार्गांनीं होत असते, त्यांस आपण प्राथमिक, दुय्यम आणि तिय्यम असें म्हणूं; आ-

णि समाजाचीं इंद्रियेंहि अशाच तीन मार्गांनीं बनत असतात. तेव्हां ह्या तीन समान्तर मार्गांचा आतां यथाक्रम विचार करूं.

हलक्या प्रतीच्या प्राण्यांमध्यें पित्ताची उत्पत्ति यकृताच्या द्वारां न होतां, आंतड्याच्या आवरणाच्या एका भागांत कांहीं सूक्ष्म पिशव्या रुतलेल्या असतात त्यांच्याकडून होत असते. ह्या सूक्ष्म पिशव्या रक्तांतून कांहीं द्रव्यें पृथक् करण्याचें काम व्यक्तिशः करीत असतात, आणि पृथक् केलेलीं द्रव्यें ओकण्याचेंहि काम व्यक्तिशःच करीत असतात. म्हणजे असल्या प्राण्यांच्या ठिकाणीं पित्तोत्पादक इंद्रिय बनलेलें नसतें; तर अद्यापि संकलीभूत न झालेले असे कांहीं घटक तें काम करीत असतात. कोंवळ्या समाजामधील एकाद्या बीजभूत उद्यमरचनेचें असेंच असतें. प्रथम प्रत्येक धंदेवाला आपला धंदा एकटाच चालवीत असतो, आणि तयार केलेले जिन्नस गिऱ्हाइकांस स्वतःच विकीत असतो. उदाहरणार्थ, अद्यापि इंग्लंदासारख्या देशांतहि खेड्यापाड्यांतून व लहान शहरांतून लोहार, चामार, वगैरे लोक एकेकटेच काम करीत असून स्वतः आपला माल विकीत असतात. ही पहिली स्थिति झाली.

आतां एका काळीं दोन रूपान्तरें होऊन प्राण्यामधील बीजभूत अशा ह्या उत्पादक इंद्रियाला यापेक्षां उच्चतर स्थिति प्राप्त होत असते. वर सांगितलेल्या पिशव्या ज्या विस्कळित असतात, त्यांचा एक घट्ट झुबका बनतो; आणि प्रत्येकीं त्या संयुक्त बनतात. एकेरीच सूक्ष्म पिशवी आपापलें विशिष्ट द्रव्य उत्पन्न करून ओकण्या-

च्या ऐवजीं पिशव्यांचें एक कुटुंबच जिच्यांत आहे अशी एक लहानशी पोतडी आपल्या नजरेस येते, आणि ह्या पोतडीच्या एका टोंकास तोंड असून त्यांतून त्या सर्वांनीं उत्पन्न केलेला पदार्थ बाहेर येऊं लागतो. याबरोबर असल्या अनेक पोतड्यांचा संकलित समूह बनून त्यांतील प्रत्येकींत निरनिराळे उत्पादक घटक असून प्रत्येकीचें उत्पादित द्रव्य बाहेर टाकण्याचें द्वारहि निराळें असतें. असल्या नमुन्याच्या जीवविषयक इंद्रियाशीं फारच सदृश असें इंद्रिय अर्धवट सुधारलेल्या समाजांत आपल्या दृष्टीस पडतें. असल्या स्थाईक व वाढणाऱ्या समाजांत, विशिष्ट धंद्यांतून विशिष्ट प्रवीण झालेले जे एकेरे धंदेवाले त्यांच्या कामाला सारखी मागणी असते; म्हणून ते कधीं कधीं आपल्या मुलांची आपल्या कामीं मदत घेऊं लागतात. हा प्रघात प्रथम कारणपरत्वें सुरू होऊन मग कायमचा बनतो; आणि शेवटीं अशी रूढीच सुरू होते कीं, प्रत्येक माणसानें आपल्या मुलांला आपला धंदा शिकविलाच पाहिजे. ह्याचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात. पेरू देशांत इतर धंद्यांप्रमाणें कलाकौशल्याचे धंदेहि वंशपरंपरेनें चालत असत. ह्यासंबंधानें त्यांच्यामध्यें हिंदुस्थान किंवा ईजिप्त ह्यांच्या सारखाच ज्ञातिविभाग असे. मेक्सिकोंतहि बहुधा बापाचा धंदा मुलगा शिकत असे. यूरोपियन राष्ट्रांतहि प्राचीन काळीं उद्यमविषयक अशीच व्यवस्था होती. रोमन लोकांत मुलास बापाचा धंदा करणें भाग असे, आणि नवऱ्यास नवरीच्या कुळाचा धंदा पत्करणेंहि भाग असे. मध्ययुगांत फ्रान्सांत धंदे वंशपरंपरा चा-

लत, आणि प्राचीन इंग्लंदांत तशीच स्थिति असे. विशिष्ट धंदा करणाऱ्या एका कुळापासून कालेंकरून तोच धंदा करणारीं अनेक कुळें उत्पन्न होऊन गिल्ड किंवा धंदेजमाव ह्यांची उत्पत्ति झाली; आणि एकच धंदा करणाऱ्या आप्तकुळांचा एक संघ बनून तो बहुधा गांवाच्या एकाच भागीं राहूं लागला, आणि त्यामुळेंच शहरांच्या निरनिराळ्या भागांत, सोनारआळी, सुतारआळी, इत्यादि नांवें प्राप्त होऊं लागलीं. आतां असल्या ह्या आळ्यांतून प्रत्येक कुटुंबांत बापाबरोबर मुलगे काम करीत असून ते बाहेरून धंद्यास लागणारा कच्चा माल प्रत्येकीं आणीत, आणि उत्पन्न केलेला पदार्थ प्रत्येकीं विकीत; ह्या गोष्टी ध्यानांत आणतां वर वर्णिलेल्या इंद्रियरूप पोतड्यांशीं, व त्यांच्या निरनिराळ्या द्वारांशीं, त्यांचें किती साम्य असे हें लक्षांत येईल.

आतां ह्या साम्याच्या तिसऱ्या पायरीबद्दल विचार करूं. प्राणी जसजसा जास्त उत्क्रान्त होत जाईल तसतसे त्याचे शरीरव्यापार जास्त चपळ होऊन त्यासाठीं विशिष्ट इंद्रियहि मोठें व्हावें लागतें, आणि अशा रीतीनें इंद्रियांची आकारवृद्धि झाल्यामुळें त्यांची रचनावृद्धिहि होते. उदाहरणार्थ, वर सांगितलेल्या पोतड्यांची संख्यावृद्धि झाली, आणि त्यांनीं उत्पन्न केलेलें द्रव्य एकेच ठिकाणीं येऊन जमणें अवश्य झालें, म्हणजे असें होतें कीं, ज्या खोलग्यांत तें द्रव्य जमावयाचें त्याच्या कडांची जास्त जागा त्यांस व्यापावी लागते; म्हणून ती जागा तशीच त्याच बाजूनें वाढण्याची सोय नसल्यास जास्त जागा मिळण्यासाठीं त्या खोल-

ग्याची एक एक तोंडी कोथळी बनते. बरें, आणखी जाग्याची जरूरी लागल्यास ह्या मूळ कोथळीस आणखी दुय्यम कोथळ्या फुटतात; आणि त्या सर्वांचीं तोंडें तिच्यांतच उघडत असल्यामुळें ही मूळ कोथळी म्हणजे त्या लहान कोथळ्यांनीं उत्पन्न केलेलें द्रव्य वाहून नेणारा एक पन्हळच बनतो. अशा रीतीनें यकृतासारख्या पोटांतील मोठ्या इंद्रियाचें उत्क्रमण होतें, व त्याच्यांत एक मुख्य पन्हळ असून त्यास येऊन मिळणाऱ्या लहान लहान पन्हळ्या त्याच्या सर्व आवारांत पसरलेल्या असतात. आतां समाजांतहि वर सांगितलेल्या उद्यमविषयक इंद्रियापासून अशाच पायऱ्यांनीं उच्चतर इंद्रियाचें उत्क्रमण होत असतें. जो धंदा पूर्वीं कुटुंबांत होत असतो तो एका उडीसरसाच कारखान्यांत व्हावयास लागत नाहीं, तर पायरीपायरीनें ती स्थिति प्राप्त होते. पहिली पायरी ही कीं कुटुंबांतील माणसांत एकाद्या बाहेरच्या शिष्याची, व बहुशः आप्ताची, भर पडूं लागते; त्याच्यावर कुटुंबांतील मुख्य माणूस प्रथम बापाप्रमाणेंच नजर ठेवित असतो, म्हणजे तो त्यास धंद्याप्रमाणें नीतिहि शिकवितो, अर्थात् तो त्याच्या दत्तक मुलासारखाच बनतो. ही सरणी एकदां स्थापन झाली म्हणजे ह्याच्या पुढची पायरी ही कीं असल्या कायमच्या एकाद्या शिष्याच्या ऐवजीं दिवसा काम करण्यास अनेक शिष्य विशिष्ट करार करून येऊं लागतात. नंतर मग कुटुंबाचा धनी ह्या विस्तृत कुटुंबानें तयार केलेल्या जिनसांखेरीज इतरांनीं तयार केलेले जिन्नसहि विकूं लागतो; आणि नंतर कांहीं कालानें स्वतः जिन्नस तयार

करण्याचें अगदींच सोडून देऊन आपल्या कुटुंबांतील व इतर कारागिरांनीं केलेल्या जिनसांचा तो केवळ विक्रेता बनतो. असें होतां होतां घरांतल्या कामकऱ्यांपेक्षां बाहेरच्यांचीच संख्या जास्त होते, आणि शेवटीं यंत्राचा उपयोग होऊं लागून कारखान्याची उत्पत्ति होते. त्या कारखान्यांत अर्थात् अनेक खोल्या असून प्रत्येकांत अनेक माणसें एकच जिन्नस तयार करीत असून तो कारखान्याच्या बाहेर जाण्याच्या अगोदर इतर खोल्यांतून होणाऱ्या तसल्याच जिनसांच्या पन्हळ्यांस त्याचीहि पन्हळी मिळत असते. शेवटीं, फारच वाढलेल्या उद्यमविषयक इंद्रियाचे ठिकाणीं एकाच शहरांत एकच पदार्थ उत्पन्न करणारे अनेक कारखाने स्थापन होतात, आणि तसलेच शेजारच्या गांवांतहि स्थापन होतात; आणि त्या सर्वांचे ठिकाणीं निरनिराळ्या मार्गांनीं कच्चा माल येऊं लागून त्याच्या बनलेल्या कापडाचे वगैरे गठ्ठे बाहेर जाऊं लागतात.

ह्या सर्व पायऱ्या थोड्याशा पिढ्यांत चढून गेलेल्या नव्या धंद्यांचीं कांहीं उदाहरणें सांपडतात. उदाहरणार्थ, इंग्लंदच्या मध्यभागीं इस्टाकण्या तयार करण्याचीं एकेरी हातयंत्रें पन्नास पाउणशें वर्षांपूर्वीं रस्त्याच्या बाजूनें झोंपड्यांतून जिकडेतिकडे दिसत असत; व तेथें त्या तयार करणारेच विकीत असत; नंतर कांहीं काळानें असलीं अनेक यंत्रें चालताहेत अशीं कित्येक दुकानें तेथें दिसूं लागलीं. तेथें बाप, मुलगे, आणि कदाचित् एकादा बाहेरचा माणूस हीं कामें करीत असत. शेवटीं वाफेच्या यंत्रानें असले पुष्कळ माग एकत्र चा-

लताहेत अशा मोठ्या इमल्याची उत्पत्ति झाली, आणि अखेरीस एकाच शहरांत असले अनेक इमले दिसूं लागले.

२२. रचनाविषयक ह्या साम्यांची शेवटची जी पायरी आहे ती तर ह्याहूनहि ज्यास्त विलक्षण आहे. दोघांमध्येंहि प्रारंभीची वाढ होण्याची पद्धति आणि मागाहून तिच्याबद्दल उत्पन्न झालेली नूतन पद्धति ह्यांच्यामध्यें फरक दृष्टीस पडतो.

प्राण्याचें उत्क्रमण होऊन हलक्या नमुन्याच्या जीवापासून उच्च नमुन्यांचे जीव उत्पन्न होत असतां वर सांगितलेल्या सर्व मजली, सूक्ष्म फरक होऊन होऊन, इंद्रियें चालून गेलीं आहेत; पण आतां उच्चतर नमुन्याच्या प्राण्यांचें जें व्यक्तिशः उत्क्रमण चाललेलें असतें तें होत असतां ह्या मजली बऱ्याच आंखूड होतात, आणि त्यांच्या इंद्रियांची उत्पत्ति त्या मानानें बरीच झपाट्यानें होते. उदाहरणार्थ, स्तनवत् प्राण्याच्या गर्भातील यकृत अनेक सूक्ष्म पिशव्या संचित होऊन उत्पन्न होतो; त्यांचा लवकरच आंतड्याच्या कडांतून पुढें आलेला एक गोळा बनतो; आणि त्यांबरोबर त्यांच्यांत आंतड्यांतून एक कोथळी खोल जाते. त्या सूक्ष्म पिशव्यांच्या गोळ्यांत लहान लहान पन्हळ्या एकीकडे बनत असतां दुसरीकडे या कोथळीस मुख्य पन्हळाचें स्वरूप येतें, व त्याच्याशीं त्या पन्हळ्यांचा संबंध जडतो; आणि त्याबरोबरच उच्चतर उच्चतर नमुन्यांचें उत्क्रमण क्रमाक्रमानें होत असतां इंद्रियांत जे फेरबदल पूर्वी होऊन गेले होते, ते सर्व एकामागून एक याच्यांत आतां उत्पन्न होतात. उद्यमविषयक इंद्रियांच्या घटनेंतहि असेंच

होतें. आतां कारखान्याच्या पद्धतीची चांगली स्थापना झाली असल्यामुळें म्हणजे ती पद्धति जणूं काय समाजशरीराच्या हाडींच खिळून गेली असल्यामुळें, ज्या ज्या धंद्याला ती योग्य असेल तेथें ती एकदम उचललेली आढळून येते. उदाहरणार्थ, एकाद्या ठिकाणीं एकादा नवीन धातु सांपडल्यास तेथें त्या धातूचे एकदम कारखानेच स्थापन होऊं लागतात; प्रथम एकेरे धंदेवाले उत्पन्न व्हावे, मागून तसलीं एकेरीं कुटुंबें उत्पन्न व्हावीं, मागून त्यांचे संघ उत्पन्न व्हावे, इत्यादि मजली त्यास चालून जाव्या लागत नाहींत; तर त्या ठिकाणीं अवश्य तीं माणसें व उपकरणें लागलींच नेलीं जातात, आणि सुधारलेल्या अशा त्या नमुन्याची उत्पादक रचना उत्पन्न होते. शिवाय एकच असला कारखाना तेथें उत्पन्न होतो असें नाहीं, तर त्यांचा एक समुदायच उत्पन्न होतो. म्हणजे, इतर जी स्थिति प्राप्त होण्यास शतकेंच्या शतकें जावीं लागलीं, ती असल्या ठिकाणीं थोड्याच वर्षांत बनून जाते.

उत्क्रमणपद्धतींत ह्याच्या सारखाच पण ह्याच्याहूनहि जास्त ठळक असा आणखी एक फेरबदल दोघांच्याहि ठिकाणीं होऊन जातो. उच्च प्राण्याच्या गर्भाच्या ठिकाणीं निरनिराळ्या इंद्रियांच्या महत्त्वाच्या भागांचे पाये जसे क्रमाक्रमानें न पडतां जणूकाय पुढच्या तयारीसाठीं अगोदर क्रम सोडून एकदमच पडले जातात, तद्वतच त्याच्या सर्व शरीराच्या संबंधानें असें होतें कीं, जीं इंद्रियें पूर्वीं त्या नमुन्याची क्रमाक्रमानें प्रथम उत्क्रान्ति होत असतां तिच्या बऱ्याच मजला आक्रमिल्यावर उत्पन्न झालीं, तीं ह्या उत्क्रमण पावणा-

च्या गर्भांत त्या मानानें बरींच लवकर उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, अगदीं हलक्या प्रतीच्या मणक्याच्या प्राण्यांत मेंदूची उत्पत्ति कधींच होत नाहीं, तरी स्तनवत् प्राण्याच्या गर्भांत त्याचीं चिन्हें लवकरच दिसूं लागतात; तद्वतच अगदीं कोंवळ्या मणक्याच्या प्राण्यांत पोषक इंद्रियांची पुरी उत्पत्ति झाल्यावरहि त्या मणक्याच्या कड्या पडल्याचीं अस्पष्टच चिन्हें दिसत असतात, पण मणक्याच्या उच्चतर प्राण्यांत पाठीच्या कण्याच्या कड्या पोषक इंद्रियांची घटना होण्याच्या पूर्वींच दिसूं लागतात. समाजोत्क्रमणांत अशा प्रकारचा हा क्रमबदल जुन्या समाजाच्या दृढ संवयी ज्यांवर वंशपरंपरेनेंच आलेल्या आहेत अशा नव्या समाजांत दृष्टीस पडतो. ह्याचीं उदाहरणें अमेरिका, आस्ट्रेलिया, आफ्रिका, वगैरे खंडांतून जीं यूरोपियनांचीं नवीं राष्ट्रें बनत आहेत, त्यांच्यांत दृष्टीस पडतात. तेथें एकाद्या नव्या वसवलेल्या शहरांत थोडींशींच घरें बांधलीं गेलीं नाहींत तोंच सडका, होटेलें, देवळें, पोस्टहपीसें, वगैरे एकदम उत्पन्न होतात, आणि आगगाडीचा रस्ता तर पुढें वसाहती व्हावयाच्या म्हणून अगोदरच रानांतून बांधला जाऊं लागतो; आणि सोन्याच्या वगैरे खाणींच्या जवळ खाणवाल्यांच्या थोड्याशा झोंपड्या उभारल्या गेल्या नाहींत तोंच, जो छापखाना व जें वर्तमानपत्र यूरोपांतील तसल्याच गांवांत उत्पन्न होण्यास शतकेंच्या शतकें जावीं लागलीं, तीं तेथें एकदम उत्पन्न होतात.

———

# प्रकरण पाचवें

## समाजव्यापार

२३. रचनाभेद उत्पन्न झाले म्हणजे त्यांजबरोबर व्यापारभेद उत्पन्न झालेच पाहिजेत. म्हणून मागच्या प्रकरणांत जें सांगितलें त्यांपैकीं पुष्कळ, अवश्य तो शब्दांचा फेरफार करून, एथेंही म्हणतां येईल. वास्तविकरीत्या पाहतां समाजामध्यें पुष्कळ रचनाभेद प्रत्यक्षरीत्या दृष्टीस न पडतां त्यांच्या व्यापारभेदांवरूनच लक्षांत येत असल्यामुळें, व्यापारभेदांचें वर्णन गर्भितरीत्या अगोदरच येऊन गेलें आहे असें म्हणतां येईल.

पण व्यापारविषयक कांहीं विशेष असे आहेत कीं ते रचनाविषयक विशेषांत स्पष्टरीत्या गर्भित होत नाहींत. म्हणून त्यांचें थोडेंसें वर्णन करणें जरूर आहे.

२४. इंद्रियजाल संमिश्र बनणें म्हणजे एकंदर जालाची अशी रचना होणें कीं त्याच्या निरनिराळ्या भागांना परस्परावलंबी क्रिया करतां याव्या, हें जर खरें असेल, तर ज्या मानानें ही संमिश्रता उच्चतर असेल त्या मानानें प्रत्येक भागाचें इतरांवर इतकें मोठें अवलंबन उत्पन्न झालें पाहिजे कीं, त्यांचा याच्याशीं वियोग किंवा याचा त्यांच्याशीं वियोग एकंदर जीवितास घातक व्हावा. हें सत्य प्राणी आणि समाज ह्या दोन्ही इंद्रियजालांच्या ठिकाणीं सारख्याच स्पष्टपणानें दिसून येतें.

अत्यन्त हलक्या दर्जाचे प्राणिसमुदाय अशा रीतीनें बनलेले असतात कीं, त्यांचा प्रत्येक तुकडा इतर सर्व तुकड्यांशीं दिसण्यांत सारखा असून त्यांच्या सारख्याच क्रिया करीत असतो; आणि म्हणून त्यांच्या ठिकाणीं स्वाभाविक किंवा कृत्रिम वियुक्तता उत्पन्न झाल्यास वियुक्त झालेल्या दोन भागांपैकीं कोणाच्याहि जीवितांत सांगण्यासारखा मुळींच प्रत्यवाय येत नाहीं. ऱ्हायझोपॉड नामक अत्यन्त सूक्ष्म जीवाचा असा घटक जो अंधुक रीतीनें विभिन्नीकरण पावलेला प्रोटोप्लाझमचा ठिपका, तो कांहीं कारणानें दुभांगला गेल्यास प्रत्येक विभागाचें गाडें पूर्वींप्रमाणेंच चालतें. ह्याच्या वरच्या पायरीचे जे जीवसमुदाय आहेत व ज्यांचे घटक एकंदरींत परस्परसदृशच असतात, त्यांचीहि स्थिति अशीच आहे. सजीव स्पंजाच्या शिंगासारख्या टणक द्रव्याच्या धाग्यांवर जे केशसदृश इंद्रिययुक्त असे अत्यंत साध्या घटनेचे सूक्ष्मतम जंतु असतात त्यांस एकमेकांच्या मदतीची इतकी अल्प अपेक्षा असते कीं, स्पंजाचे कापून दोन सारखे तुकडे केले तरी प्रत्येक तुकड्याच्या क्रिया पहिल्या सारख्याच चालतात. नेहमींच्या परिचयांतील पॉलिप ( नळीच्या आकृतीचा ताज्या पाण्यांतील जंतू ) ह्या प्राण्याप्रमाणें ज्याच्यामध्यें घटकांच्या ठिकाणीं कांहींसें वैसदृशच आलेलें असेल, त्या ठिकाणीं अशा कापण्यानें कांहीं घोंटाळा उडतो, पण तो अल्पकालिक असतो. म्हणजे त्याच्या केलेल्या दोन किंवा अधिक तुकड्यांच्या नेहमींच्या सरळ क्रिया पुनः सुरू होण्याच्या अगोदर त्याच्या घटकांस योग्य आकार येण्यास कांहीं

वेळ जावा लागतो. अत्यन्त हलक्या दर्जाचे जे असल्या प्रकारचेच समाज त्यांचें असेंच होतें. रानटी माणसांचा मुख्यविहीन असा भटकणारा समूह फुटला तरी त्यांतील माणसांस कांहींच अडचण उत्पन्न होत नाहीं. त्यांच्यांतील प्रत्येकजण लढवय्या, शिकारी,— स्वताचीं हत्यारें, खोपट, वगैरे बनवणारा असल्यामुळें, आणि असलींच काबाडकष्टाचीं कामें करणारी त्याची बायको असल्यामुळें, लढाईच्या आणि कांहीं अंशीं शिकारीच्या प्रसंगींच तेवढी त्यास दुसऱ्यांशीं मिळून वागण्याची आवश्यकता भासते, आणि लढाईखेरीज सगळ्या टोळीशीं मिळून वागणें आणि अर्धांशीं मिळून वागणें हीं दोन्ही सारखींच असतात. जेथें एकादा नाईक उत्पन्न होऊन थोडेंसें विभिन्नीकरण झालेलें असेल, त्या ठिकाणींहि त्या टोळींत आपखुशीनें किंवा जबरीनें वियुक्तपणा उत्पन्न झाल्यास सांगण्यासारखी अडचण पडत नाहीं. टोळींतील कांहीं माणसें अन्य प्रदेशीं रहावयास निघून जाण्याच्या अगोदर किंवा मागाहून दुसरा कोणी तरी माणूस नाईक बनतो, आणि त्यांचें तें हलक्या दर्जाचें सामाजिक जीवित पुनः सुरू होतें.

पण ज्याच्यांत इंद्रियरचना फार संमिश्र झालेली आहे अशा प्राण्याची किंवा समाजाची गोष्ट निराळी आहे. स्तनवत् प्राण्याचे दोन तुकडे केल्यास तो एकदम मेल्याशिवाय कधीं रहावयाचा नाहीं. कोंबडीचें मुंडकें धरून पिळवटल्यास ती लागलीच मरते. सर्पटणाऱ्या प्राण्यांच्या देखील शेपट्या कापिल्यास जरी ते जगतात, तरी त्यांचा मुख्य देह कापिल्यास जगत नाहींत. आणि

कड्याकड्यांच्या प्राण्यामध्यें कांहीं हलक्या जातीचे जंतू जरी कापिल्यानें मरत नाहींत, तरी फुलपांखरासारखे किडे, किंवा कोळी, विंचू वगैरे त्याच वर्गांतील प्राणी, किंवा खेकडे वगैरे त्यांतीलच जलचर, कापिले असतां मरतात. उच्च प्राण्यापेक्षां उच्च समाजांत असल्या अंगविकर्तनाचा परिणाम जरी कमी घातक असतो, तरी एकंदरींत बरीच हानि करितो. मुंबईसारख्या शहराचा सभोवतालच्या गांवांशीं अगदीं संबंध तुटल्यास त्यांतील सामाजिक जीवित, जिनसांचा पुरवठा तुटला जाऊन, थोडक्याच दिवसांत बंद पडेल. कोळशाच्या खाणी असलेले प्रांत, आणि शेजारचेच लोखंडाचे कारखाने असलेले प्रांत ह्यांच्यांत विभाग झाल्यास त्यांचे धंदे बंद पडून लागलेंच त्यांस सामाजिक मरण येईल, आणि लवकरच व्यक्तिशः येऊं लागेल. एकाद्या सुधारलेल्या राष्ट्रांत कोणी मुख्य शास्ता राहूं नये असा त्याच्यांत विभाग झाल्यास जरी तें लवकरच नवीन शास्ता उत्पन्न करूं शकतें, तरी तसें होईतोंपर्यंत कायमची फांकाफांक होण्याची भीति फार असते, आणि पुनः सर्व व्यवस्था चांगली लागेतोंपर्यंत त्यास पुष्कळ दिवस अव्यवस्था व दुर्बलता ह्यांमध्यें काढावे लागतात.

सारांश, उत्क्रमण उच्चतर होत जाईल तसें व्यापारांचें परस्परावलंबन जास्त जास्त निकट होऊं लागतें. व्यक्तिविषयक आणि सामाजिक अशा दोन्ही प्रकारच्या हलक्या दर्जाच्या समुदायांत त्यांच्या भागांच्या क्रिया एकमेकींवर फारच अल्प अंशानें अवलंबून असतात; पण दोन्ही प्रकारच्या उच्चतर समुदायांत ज्या क्रिया-

संमिश्रणामुळें सगळ्या समुदायाचें जीवित बनून येतें, तें असेल तरच, ज्या घटकक्रियांची मिळून त्यांच्या भागांचीं जीवितें बनतात, त्या शक्य होतात.

२५. समाज आणि प्राणी ह्यांस लागू असा आणखी एक इंद्रियव्यापारविषयक सिद्धान्त त्यांच्या रचनांवरून निघत असतो त्याचा आतां विचार करूं. तो हा कीं, ज्या ठिकाणीं भागांचें विभिन्नीकरण फारच अल्प झालेलें असेल, तेथें ते एकमेकांचे व्यापार तेव्हांच करूं शकतात; पण जेथें तें पुष्कळ झालेलें असेल तेथें त्यांस ती गोष्ट अर्धवट रीत्या करतां येते, आणि कधीं कधीं मुळींच करतां येत नाहीं.

ह्या ठिकाणींहि सामान्य पॉलिप ह्या जंतूचें उदाहरण चांगलें लागू पडतें. हे कोथळीच्या आकाराचे प्राणी असे आहेत कीं, त्यांचें कोथळीप्रमाणें आंतलें अंग बाहेर काढतां येतें, म्हणजे कातडीचा पक्वाशय बनतो, आणि पक्वाशयाची कातडी बनते; आणि नंतर तीं लागलींच एकमेकांचे व्यापार करूं लागतात. पण जास्त जास्त उच्च इंद्रियजालाच्या प्राण्याकडे जसें जावें, तसा हा व्यापारविनिमय कमी कमी साध्य होऊं लागतो. तरी पुष्कळ उच्च अशा प्राण्यांतहि तो विनिमय कांहीं अंशीं शक्य रहातोच. माणसांमध्यें देखील पोषक पन्हळानें अन्नरस ओढून घेण्याचें जें सामर्थ्य हल्ली एकट्यानेंच बळकाविलें आहे, त्याचीं कांहीं चिन्हें त्याच्या त्वचेच्या ठिकाणीं दृष्टीस पडतात; कारण ति च्यावरघांसलेल्या किंवा चोळलेल्या द्रव्याचे थोडके अंश शरींरांत भिनूं शकतात. पण हा व्यापारविनिमय ज्या इं-

द्रियांचे व्यापार एकमेकांशीं संबद्ध आहेत, त्यांच्या ठिकाणीं फार स्पष्टपणें दिसतो. उदाहरणार्थ, पित्त काढून टाकण्याच्या यकृताच्या व्यापारास कांहीं अडथळा आल्यास शरीरांतील द्रव्यें बाहेर काढून टाकणारीं मूत्रपिंड आणि त्वचा हीं जीं दुसरीं इंद्रियें त्यांच्या द्वारा पित्ताचा निकाल लागूं लागतो. घशांतून जाणाऱ्या अन्नमार्गांत चाळणपुळी वगैरे होऊन अन्न मिळण्यास अडथळा होऊं लागल्यास अडकलेलें अन्न त्या मार्गाचें प्रसरण करून तेथें एक पिशवी बनवितें, आणि त्या ठिकाणीं अर्धवट पचनक्रिया सुरू होते. पण एकमेकांचीं कामें करण्याचीं हीं जीं विभिन्नीभूतभागांचीं अल्प सामर्थ्यें तीं ज्या ठिकाणीं विभिन्नीभाव ह्याच्यापेक्षां जास्त मोठा झाला असेल त्या ठिकाणीं दिसत नाहींत. शरीराच्या नाक, तोंड, इत्यादि निरनिराळ्या उघड्या छिद्रांस झांकणारी व बाह्य त्वचेस लागून असलेली कफादि मल करणारी म्यूकस मेंब्रेन नांवाची जी मऊ अंतस्त्वचा ती उलटून बाहेर आल्यास जरी बाह्य त्वचेचे बरेच गुणधर्म व सामर्थ्यें धारण करूं शकेल, तरी सेरस मेंब्रेन नांवाची रक्तांतील पाण्यासारखा पदार्थ उत्पन्न करणारा आणि शरीराचीं बंद असलेलीं छिद्रें झांकणारा जो पातळ पापुद्रा आहे, त्यास तसें करितां येणार नाहीं. तद्वतच हाडें किंवा स्नायु यांस पोटांतील यकृत् वगैरेचीं कामें पडल्यास तीं मुळींच करतां यावयाचीं नाहींत.

उच्च आणि नीच अशा समाजांमध्येंहि हीं लहान व मोठीं विनिमयसामर्थ्यें दृष्टीस पडतात. ज्या ठिकाणीं टोळीचा प्रत्येक घटक इतर सर्व घटकांसारखीच जीवि-

तसरणी अनुसरत असतो, त्या ठिकाणीं असली अदलाबदल होण्यास विसदृशव्यापारच नसतात; आणि ज्या ठिकाणीं हत्यारें चांगलीं करणाऱ्या एका घटकानें तीं देऊन इतर वस्तु करणाऱ्या इतर घटकांपासून त्या घेणें यांत गर्भित तेवढेंच अल्प विभिन्नीकरण उत्पन्न झालेलें असतें, त्या ठिकाणीं त्या विशिष्ट घटकाचा नाश झाल्यास टोळीची फारशी हानि होत नाहीं; कारण इतरांस त्याच्या इतकीं चांगलीं हत्यारें करतां न आलीं तरी कशीं तरी करतां येत असतातच. बऱ्याच मोठ्या आकाराच्या स्थाईक झालेल्या समाजांतहि असली स्थिति बऱ्याच अंशीं दिसून येते. प्राचीन मेक्सिकन लोकांबद्दल झुरिटा असें म्हणतो कीं, प्रत्येक इंदियन ज्यांस फार कौशल्य किंवा नाजूक हत्यारें लागत नाहींत असे सर्व हातधंदे करूं शकतो; आणि पेरू देशांतहि घरगुती कामास लागणाऱ्या सर्व गोष्टी प्रत्येक माणसास याव्या अशी अपेक्षा असे. म्हणजे काय तर त्या ठिकाणीं धंद्याच्या संबंधानें त्या समाजांच्या निरनिराळ्या भागांमध्यें विभिन्नीकरण इतकें अल्प झालेलें होतें कीं, त्यांस एकमेकांचे धंदे जरूर पडल्यास उचलतां येत असत. पण फार सुधारलेल्या राष्ट्रांत उद्योगधंद्याच्या इतर संबंधानें विशिष्टीकरण फार मोठें झालेलें असल्यामुळें, एक भाग आपले व्यापार करावयास चुकल्यास ते दुसऱ्यांस उचलतां येत नाहींत. शेतीवरील मजुरांसारख्या सामान्यतः अकुशल कामकऱ्यांनीं देखील संप केल्यास त्यांचीं कामें शहरांतील मजुरदारांस फारशीं चांगलीं करतां यावयाचीं नाहींत; आणि लोखंडाच्या कारखान्यांतील तयार झाले-

ल्या कारागिरांनीं तसें केल्यास, आणि त्यांच्या ऐवजीं शेत्ये किंवा कापसाच्या गिरणींतील माणसें लाविल्यास तें काम बहुतेक बंदच पडेल. आणि न्याय करण्याचीं किंवा कायदे करण्याचीं वगैरे जीं ह्याच्यापेक्षांहि उच्च-तर कामें आहेत तीं खाणवाले किंवा गलबत्ये यांस मुळींच करतां यावयाचीं नाहींत.

ह्या दोन्ही ठिकाणीं हा जो भेद दृष्टीस पडतो त्याचें कारण एकच आहे हें उघड आहे. ज्या मानानें एकाद्या प्राण्याच्या एकाद्या भागाचे घटकांश एकाच प्रकारची क्रिया करीत असतील,–उदाहरणार्थ, पदार्थ आंत ओढून घेण्याची, किंवा कांहीं द्रव्य उत्पन्न करण्याची, किंवा आकुंचन करण्याची, किंवा एकादी प्रेरणा संक्रांत करण्याची,–आणि ज्या मानानें ती क्रिया करण्यास ते योग्य होत जातील त्या मानानें इतर क्रिया करण्याची त्यांची योग्यता नष्ट होते; आणि समाजामध्यें एकादें विशिष्ट काम योग्य रीतीनें बजाविण्यास घ्यावें लागणारें शिक्षण, त्या कामांपासून फार भिन्न अशीं अन्य विशिष्ट कामें बजावण्यास माणसास अयोग्य करितें.

२६. समाज आणि प्राणी यांच्यामध्यें व्यापारविषयक हीं जीं दोन मुख्य साम्यें त्यांवरून उत्पन्न होणारीं अन्य कांहीं तसलींच साम्यें आहेत, त्यांच्यावर जागा असती तर विस्तारानें लिहितां आलें असतें. म्हणून जागेच्या अभावीं त्यांस अल्प उल्लेख करूं.

एक गोष्ट अशी कीं, दोन्ही ठिकाणीं ज्या मानानें व्यापारविभाग जास्त जास्त दृढ होत जाईल त्या मानानें जीवितशक्ति जास्त होत जाते. दोन्ही ठिकाणीं विस-

ष्टश क्रिया करण्यास प्रत्येकीं योग्य अशा निरनिराळ्या रचना उत्पन्न होण्यापूर्वीं त्या क्रिया योग्य रीतीनें होत नसतात; आणि एकमेकांच्या क्रियांचा उपयोग करून घेण्यास योग्य अशीं साधनें नसल्यास तसा उपयोग फारच अल्प होत असतो. पण इंद्रियजाल उच्चतर होत जाईल त्या मानानें प्रत्येक भागाचें कर्तव्य जास्त मर्यादित झाल्यामुळें तो तें जास्त चांगल्या रीतीनें बजावूं लागतो; एकमेकांना एकमेकांचे फायदे देण्याची साधनें जास्त मोठीं बनतात; प्रत्येक भाग इतरांस, व इतर सर्व त्यास जास्त सफाईनें मदत करूं लागतात; आणि ज्या क्रियासामग्र्यास आपण व्यक्तिविषयक किंवा समाजविषयक जीवित म्हणून नांव देतों त्याचें वर्धन होतें.

ज्या फेरबदलांच्या योगानें व्यापारवैशिष्ट्य उत्पन्न होतें त्यांमधील समान्तरभावाविषयींहि पुष्कळ सांगावयाचें राहिलें आहे; पण हें साम्य आणि इतर साम्यें प्राणिविषयक व समाजविषयक इंद्रियांच्या निरनिराळ्या मोठाल्या जालांच्या किंवा चक्रांच्या उत्क्रमणाचें जें विवेचन आह्मी आतां करणार आहों, आणि त्यांत त्यांच्या निरनिराळ्या रचनाविशेषांचा व व्यापारविशेषांचा जो एकत्र विचार करणार आहों, त्यांवरून उत्तम रीतीनें लक्षांत येतील.

---

# प्रकरण सहावें

## इंद्रियसमूह

२६ अ. उत्क्रांतिविषयक क्लृप्तीमध्यें असें एक सत्य अंतर्भूत झालेलें आहे कीं तें त्या क्लृप्तीव्यतिरिक्तच स्थापन झालेलें होतें. सर्व प्राणी शेवटीं कितीहि परस्परविसदृश बनले तरी प्रारंभीं त्यांच्या वाढीस सुरवात सारख्याच रीतीनें होते. भिन्न भिन्न होत जाणाऱ्या प्राणिनमुन्यांना जे पहिले रचनाविषयक फेरबदल सामान्यतः आक्रमावे लागले, ते प्रत्येक नमुन्याच्या प्रत्येक नवीन प्राण्याला त्यांत प्रथम होणाऱ्या फेरबदलांमध्यें पुनः आक्रमावे लागतात. मुख्यत्वेंकरून परोपजीवि प्राण्यामध्यें दिसणारे कांहीं अपवाद वजा करतां हाच सामान्य नियम दिसतो.

प्राण्यांमध्यें वाढीच्या संबंधानें ही जी सामान्य सरणी दृष्टीस पडते तिला समान्तर किंवा सदृश अशी कांहीं सामान्य सरणी समाजांमध्येंहि दृष्टीस पडली पाहिजे असें आपणास साहजिकच वाटतें, आणि तशी प्रत्यक्ष दृष्टीस पडतेहि.

२७. कोणत्याहि वस्तूचे आंतले व बाहेरचे असे जे दोन प्रकारचे भाग त्यांच्या परिस्थितींत भेद आसल्यांमुळें इंद्रियविषयक मूळचीं विभिन्नीकरणें उत्पन्न होत असतात. त्यांच्या प्रारंभीच्या ज्या पायऱ्या त्यांचा विचार

एथें न करतां त्यामुळें जे निरनिराळे सरलस्वरूप इंद्रियसमूह उत्पन्न होतात त्यांचा आतां विचार करूं.

सीलेंटरेटा ह्या वर्गापैकीं ज्या समुदित घटकांचा मिळून अत्यन्त हलक्या दर्जाचा प्राणी बनलेला असतो, त्या घटकांची रचना अशा रीतीनें झालेली असते कीं, त्यांचा एक बाह्य थर असून त्याच्या सभोवतालचें आवरण व त्यांत राहणारे जीव ह्यांच्याशीं प्रत्यक्ष संबंध येत असतो, आणि आंतला एक थर असून तो पाचक पिशवीला आवरण घालीत असतो, व त्याचा प्रत्यक्ष संबंध अन्नाशीं तेवढाच येत असतो. बाह्य थराच्या घटकांपासून जे केसांसारखे लहान लहान अवयव बनतात त्यांच्या योगानें बारीक प्राणी धरले जातात, आणि ज्या तंतुरूप सूक्ष्म पिशव्या उत्पन्न होतात, त्यांचा उपयोग त्याच्यावर हल्ला करणाऱ्या त्याच्यापेक्षां मोठ्या प्राण्याविरुद्ध शस्त्रासारखा तो करीत असतो; इकडे आंतील थराचे घटक एकप्रकारचा विद्रावक रस आपल्यांतून ओतीत असतात, आणि त्याच्या योगानें गिळलेल्या अन्नास त्यांच्या व इतर घटकांच्या पोषणास योग्य असें स्वरूप देत असतात. एकंदर प्राणिकोटीमध्यें सर्वत्र दिसणारा जो मूळ भेद त्याची पहिली पायरी ही होय; तो भेद अर्थात् जमीन, हवा, भक्ष्य व शत्रु ह्या बाह्यावरणाशीं संबंध असलेले शरीराचे बाह्यभाग, आणि त्या भागांनीं मिळविलेले जे पोषक पदार्थ, त्यांचा सर्व शरीराच्या फायद्यासाठीं उपयोग करणारे अंतर्भाग, ह्यांच्यामधील होय. पण वरच्यापेक्षां जास्त दर्जाच्या सीलेंटरेटामध्यें एक संकीर्णता उत्पन्न होते. त्यांच्या ठि-

काणीं घटकांच्या प्रत्येक एकेऱ्या थराच्या ऐवजीं दुहेरी थर असतो, आणि ह्या दोन दुहेऱ्या थरांमध्यें एक पोकळी असते. ही पोकळी ह्या नमुन्याच्या प्राण्यामध्यें पक्वाशयापासून अर्धवट पृथक असून त्याच्या वरच्या नमुन्याच्या प्राण्यांमध्यें ती त्यापासून पूर्णपणें पृथक होते. ह्या शेवटच्या प्राण्यामध्यें बाहेरच्या दुहेऱ्या थराची शरीराची भिंत बनते; आंतील दुहेरा थर पोषक पोकळीचें बाह्याच्छादन बनतो; आणि दोन थरांमधील जी पोकळी तींत निगीर्ण केलेलें पोषक द्रव्य रहात असून तीस पक्वाशयाच्या इंद्रियां सभोवतालची कोथळी असें म्हणतात. प्रथम वर्णिलेले दोन सरळ थर व त्यांच्यामधला प्रोटोप्लाझम हे वरिष्ट प्राण्याच्या बाह्य व अंतरिंद्रियसमूहाशीं जरी केवळ कांहीं बाबतींतच सदृश असतात, तरी मागून वर्णिलेले दोन दुहेरे थर आणि त्यांच्यामधील पोकळी हीं त्यांच्याशीं घटनेच्या संबंधानें सदृश असतात. कारण उत्क्रमण चाललें असतां बाहेरच्या दुहेऱ्या थरापासून हाडांचा सांगाडा, ज्ञानतंतु आणि स्नायु यांचीं जाळीं, ज्ञानेंद्रियें, संरक्षक रचना, इत्यादि उत्पन्न होतात; आणि आंतील दुहेऱ्या थरापासून पोषक पन्हळ आणि शरीरांतील पोकळी बहुतेकांशीं व्यापून टाकणारीं त्या पन्हळास जोडलेलीं इंद्रियें, या सर्वांची उत्पत्ति होते.

समाजदेहांचें उत्क्रमण चाललें असतां तत्त्वतः वरच्याशीं सदृश अशा पहिल्या पायऱ्या त्यांच्यांतहि दृष्टीस पडतात. अगदींच समस्वरूप अशा हलक्या टोळ्यांपासून जेव्हां आपण त्यांच्या वरच्या दर्जाच्या टोळ्यांकडे जातो, तेव्हां आपणास धनी आणि गुलाम अ-

से दोन वर्ग आढळून येतात; पैकीं धनी आपल्या टोळीचें संरक्षण आणि इतर टोळ्यांवर हल्ले हीं कामें करीत असतात, आणि अशा रीतीनें सभोवतालच्या स्थितीशीं त्यांचे विशेष संबंध येत असतात; आणि गुलाम हे सर्वांच्या पोषणासाठीं, म्हणजे मुख्यत्वेंकरून धन्याच्या, आणि नंतर आपल्या पोषणासाठीं, घरगुती कामें करीत असतात. आतां धनी आणि दास हा भेद प्रथम अनिश्चित असतो हें उघडच आहे. ज्या ठिकाणीं टोळी मुख्यत्वेंकरून रानटी जनावरांवर आपला निर्वाह करीत असेल, त्या ठिकाणीं तिच्यांतील सत्ताधारी माणूस लढवय्याप्रमाणें पारधीहि असल्यामुळें, खाद्य मिळविण्याच्या कामीं ते बरीच मदत करीत असतात; आणि लढाईमध्यें जे थोडेसे ते कैदी करितील, त्यांस ते पोषणाच्या धंद्यापैकीं कमी हुशारीचीं व जास्त मेहनतीचीं कामें करावयास लावीत असतात. परंतु शेतकीच्या स्थितीच्या स्थापनेबरोबर वरील भेद जास्त स्पष्ट होतो. सत्ताधारी वर्गातील माणूस शेतामध्यें गुलामांच्या कामावर नजर ठेवीत असतां कधीं कधीं त्यांस हातभार लावितात, तरी वश्य वर्गच बहुतकरून अन्नाचा पुरवठा करण्याच्या कामाशीं प्रत्यक्ष रीत्या संबद्ध असतो, आणि सत्ताधारी वर्ग त्या कामापासून जास्त दूर असून, टोळीच्या अंतःकृत्यांबद्दल तो केवळ सूत्रधारित्व करूं लागतो, व बाह्य कृतींच्या संबंधानें मात्र तो कर्ता व सूत्रधारी अशा दोन्ही स्वरूपीं दिसत असतो; मग तीं कृत्यें स्वसंरक्षणविषयक असोत, किंवा इतरातिक्रमविषयक असोत. अशा रीतीनें एकमेकांशीं संलग्न असलेल्या

दोन थरांचा बनलेला जो समाज त्याच्यांतील प्रत्येक थरांत निरनिराळ्या पायऱ्या उत्पन्न होऊन पहिली संमिश्रता उत्पन्न होते. वर वर्णिलेली रचना लहान टोळ्यांस पुरते; पण ज्या ठिकाणीं टोळ्यांचे समुदाय बनलेले असून सरकार, लष्कर, आणि उद्योगधंदे एतद्विषयक संस्था वरच्यापेक्षां उच्चतर बनलेले असतात, त्या ठिकाणीं वरचे व खालचे दोन्ही थर प्रत्येकीं विभिन्नीकरण पावूं लागतात. वरिष्ट वर्गामध्यें स्थानिक असे लहान सहान भेद उत्पन्न होत असून शिवाय त्यांस चिकटून असलेल्या अशा लोकांचा एक बनत असतो, आणि तेहि बहुतेक लढवय्येच असतात; इकडे कनिष्ट वर्गाचे बद्ध आणि मोकळे असे दोन विभाग असतात. मलाया आणि पालिनीशिया एथील अनेक समाज या पायरीवर आपल्या दृष्टीस पडतात. पूर्व आफ्रिका, कांगो, आणि गोल्डकोस्ट वगैरे किनारे, इत्यादि ठिकाणीं असलाच पोटविभाग दिसून येतो; म्हणजे राजा व त्याचे आप्त, नाईकवर्ग, सामान्य लोक, आणि गुलाम, असे भेद त्यांच्यांत दृष्टीस पडतात; पैकीं पहिले दोन वर्ग त्यांचे आश्रित हे समाजांतील समुदायकृत्यें करीत असतात. आणि शेवटचे दोन वर्ग चरितार्थास लागणारे जिन्नस उत्पन्न होतील अशा सामान्यतः वरच्याहून भिन्न क्रिया करीत असतात.

२८. समाज आणि प्राणी ह्या दोघांमध्येंहि बाह्येंद्रियसमूह आणि अंतरिंद्रियसमूह ह्याप्रमाणें एकमेकांपासून स्पष्टपणें भिन्न झाले म्हणजे, त्या दोहोंच्या मध्यें असणारा, आणि दोघांचेंहि सहकार्य सुलभ कर-

णारा, असा तिसरा समूह उत्पन्न होतो. मुख्यत्वेंकरून भिन्न असणाऱ्या दोन भागांचें परस्परावलंबित्व उत्पन्न होण्यास कोणी तरी मध्यें पाहिजेच; आणि ज्या मानानें त्यांची वाढ होत जाईल त्या मानानें त्यांनीं उत्पन्न केलेले पदार्थ आणि त्यांचे एकमेकांवर चालणारे प्रभाव ह्यांचा विनिमय करणारी यंत्रसामग्रीहि वाढली पाहिजे; आणि तशी ती वाढलेली दिसते.

प्रथम वर्णिलेला हलक्या दर्जाचा सीलेंटरेटा हा प्राणी, आंतील व बाहेरचा थर आणि मधला प्रोटोप्लाझम ह्यांचाच केवळ बनलेला असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं बाह्य थराच्या घटकांनीं पकडलेल्या भक्ष्यांतून जें पोषक द्रव्य आंतील थराच्या घटकांनीं ओढून घेतलें असतें, तें ते बाह्य थरांतील घटकांकडे बहुतेकांशीं प्रत्यक्ष रीत्या संक्रांत करीत असतात. पण त्या वर्गापैकीं वरिष्ठ प्राण्यामध्यें असें होत नाहीं. दुहेरी थराची शरीराची भिंत आणि दुहेरी थराची पोषक पन्हळी ह्यांच्यामध्यें त्यापासून कांहीं अंशीं पृथक् अशी पचनेंद्रियांच्या सभोवतालची कोथळी त्याच्यामध्यें असते; आणि ती पचवलेल्या अन्नाची सांठवण म्हणून बनते, व तिच्यांतून तयार झालेल्या अन्नाचा आपापला वांटा सभोवतालचे टिस्स्यू किंवा इंद्रियघटक घेत असतात. द्रव्यविभजन करणाऱ्या इंद्रियसमूहाचा जणूकाय हा पहिला अंकुर होय. ह्यांहून वरिष्ठ वरिष्ठ प्राण्यांकडे, उदाहरणार्थ, मोलस्का नांवाच्या मऊ अंगाच्या प्राणिवर्गाकडे जसें जावें, तशी ही कोथळी पक्वाशयापासून अगदीं भिन्न होऊन तिच्या फांद्या सर्व शरीरभर पसरलेल्या दृष्टीस पडतात, व

शरीरांतील मुख्य इंद्रियांकडे पोषकद्रव्य नेत असतात; आणि कोथळीच्या मध्यभागीं आकुंचन पावणारी एक नळी असून तिच्या राहून राहून पडणाऱ्या ठोक्यांमुळें त्या पोषकद्रव्यांत अनियमित हालचाली उत्पन्न होत असतात. ह्याच्या पुढची पायरी म्हटली म्हणजे ही नळी लांब होऊन तीस फांद्या फुटणें ही होय; आणि अशा रीतीनें तिचे विभाग व पोटविभाग होतां होतां तीस मधील हृदय किंवा काळीज, आणि सभोंवतालचें लहानमोठ्या रक्तवाहिन्यांचें जाळें, असें स्वरूप येतें. हें स्वरूपान्तर जसजसें वृद्धिंगत होत जाईल, तसतशी पाचक इंद्रियांनीं घेतलेल्या पोषकद्रव्याची, बाह्य व अंतरिंद्रियांना ह्या रक्तविषयक रचनांनीं त्यांच्या त्यांच्या गरजांप्रमाणें वांटणी होऊं लागते. आतां हा विभाजक इंद्रियसमूह अर्थात् पूर्वीच्या दोन समूहांच्या मध्येंच उत्पन्न झाला पाहिजे; आणि ज्या भागांना तो पोषकद्रव्यें पुरवीत असेल, ते भाग ज्या मानानें दूर दूर जातील, जास्त होतील, आणि प्रत्येकीं अधिकाधिक संमिश्र होत जातील, त्या मानानें त्याला जास्त जास्त फांटे फुटले पाहिजेत.

समाजांतहि असेंच होतें. अत्यन्त हलक्या दर्जाच्या समाजांत विभाजक किंवा वांटणी करून देणारे इंद्रियसमूह मुळींच नसतात, म्हणजे अशा ठिकाणीं रस्ते नसतात व व्यापारीहि नसतात. असल्या समाजांतले धनी व दास हे दोन वर्ग परस्परसंनिकृष्ट असतात. सत्ताधारी वर्गापैकीं प्रत्येकाच्या गुलामांचा त्याच्याशीं इतका प्रत्यक्ष संबंध असतो कीं, त्यांनीं उत्पन्न केलेल्या जिनसांचा पुरवठा त्यास प्रत्यक्षरीत्या, किंवा कोणाहि

मध्यस्तांशिवाय, होत असतो; आणि प्रत्येक कुटुंब स्वावलंबी असल्यामुळें निरनिराळ्या कुटुंबांत उत्पन्न केलेल्या जिनसांचा विनिमय करण्यास कोणी गुमास्ते लागतच नाहींत. ह्या दोन मूल वर्गांचे कांहींसे पोटविभाग झाल्यावरहि आपणास असें आढळून येतें कीं, जोंपर्यंत समाजघटक टोळ्या प्रत्येकीं जरूर ते पदार्थ स्वतांच उत्पन्न करीत असतात, तोंपर्यंत विभाजक इंद्रियसमूहाची उत्पत्ति त्यांच्यांत बहुधा होत नाहीं. त्यांचा विनिमय करण्यासाठीं कधींकधींच त्यांतील लोक एकत्र जमत असतात. परंतु अशा टोळ्यांचें दृढसंयोगीभवन होऊन त्यांच्यांतील उद्योगधंदे विशिष्टस्थानबद्ध होत चालले, म्हणजे त्यांनीं उत्पन्न केलेले पदार्थ संक्रांत करण्याच्या योजना प्रथम दिसूं लागतात; कोठें कोठें डोक्यावर जिन्नस घेऊन विकूं लागतात, कोठें उदम्यांच्या फिरत्या मंडळ्या बनतात, आणि रस्ते तयार होतील तसें, घाऊक व किरकोळ व्यापारी यांचें जाल उत्पन्न होऊन, तें सर्व देशभर पसरूं लागतें.

२९. एवंच ह्या दोन प्रकारच्या देहांमध्यें ह्या तीन इंद्रियसमूहांच्या संबंधानें समान्तरभाव दृष्टीस पडतात. शिवाय ते त्या दोघांच्याहि ठिकाणीं एकाच क्रमानें उत्पन्न होतात, आणि एकाच कारणावरूनहि उत्पन्न होतात.

समाज हा पृथ्वीपासून द्रव्यें ओढून घेऊन रहात असतो—उदाहरणार्थ, घरें, जळण, इत्यादिकांसाठीं लागणारीं खनिज द्रव्यें, अन्न आणि वस्त्र ह्यांसाठीं तिच्या पृष्ठभागावरील वनस्पतिद्रव्यें, आणि माणसाच्या नजरेखालीं किंवा आपोआप ह्यांपासून उत्पन्न झालेलीं

प्राणिद्रव्यें; आणि हीं द्रव्यें जीं घेतात तीं समाजाचा जो तळचा थर असेल त्यांतून घेतात, आणि गुमास्त्याच्या हवालीं करितात; ते गुमास्ते जिनसांच्या सामान्य प्रवाहांत त्यांस मिसळून देतात: आणि ह्या अगदीं तळच्या थराचा जो वरचा भाग असतो, तो कारखाने आणि गिरण्या ह्यांत त्या जिनसांस योग्य स्वरूप देऊन मग ते विकत घेणारांकडे पाठवीत असतो. ह्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, प्राणिशरीराच्या पोषणामध्यें त्याच्या पोषकइंद्रियांचे घटक जीं कामें करीत असतात, तींच कामें हातकामांत गुंतलेले लोक समाजपोषणाच्या व्यापारांत करीत असतात. तद्वतच मोठ्या किंवा लहान प्रमाणांवर सर्व प्रकारचे जिन्नस विकत घेणारे व विकत देणारे, हळूहळू बनत चाललेल्या मार्गांनीं ते जिन्नस सर्व प्रांत, शहरें आणि व्यक्ती ह्यांच्याकडे पाठविणारे, आणि अशा रीतीनें व्यक्तींनीं काम करून उत्पन्न करून घेतलेली जी चीस ती भरून काढण्यास त्यांस समर्थ करणारे, जे सर्व लोक ते, प्राण्याच्या ठिकाणीं एकंदर रक्त वगैरे वाहून देणारीं इंद्रियें ज्या क्रिया करीत असतात, तसल्याच क्रिया समाजाच्या संबधानें करीत असतात; कारण हीं इंद्रियेंहि शरीरांतील प्रत्येक घटना व तिचा प्रत्येक घटक ह्यांच्याकडे त्यांच्या क्रियावत्तेच्या मानानें पोषकद्रव्यांचा पुरवठा वाहून नेत असतात. आणि हीहि गोष्ट तितकीच उघड दिसते कीं, शरीरांचे ठिकाणीं ज्याप्रमाणें मेंदू, ज्ञानेंद्रियें, व त्यांच्या धोरणानें चालणारे अवयव, हे पोषकपृष्टभागांपासून दूर असूनहि, त्यांचें पोषण रक्त वगैरे वाहून नेणाऱ्या नलिकांच्या वांकड्यातिकड्या जा-

ळ्यानें जसें होत असतें, त्याप्रमाणेंच समाजाचे नियंत्रक भाग कामकरी भागांपासून दूर असूनहि, त्यांस जरूर त्या खाद्य वगैरे पदार्थांचा पुरवठा किती तरी वांकड्यातिकड्या विभाजक मार्गांनीं होत असतो.

आतां दोन्हींहि ठिकाणीं उत्क्रमणाचा क्रमहि एकच आहे हीहि गोष्ट तितकीच स्पष्ट आहे. हैड्रासारखा जो प्राणी फारच लहान व फार निष्क्रिय असतो त्याच्या ठिकाणीं, ओढून घेण्याच्या व्यापारानें आंतल्या थराकडून बाहेरच्या थराकडे पोषकद्रव्याची झालेली संक्रान्ति पुरे होते. पण ज्या मानानें बाह्यरचना जास्त चपळ होत जातील आणि जास्त खर्च करूं लागतील त्या मानानें शेजारच्या टिस्स्यूमधून पोषकद्रव्य केवळ ओढून घेतल्यानें त्यांची झीज भरून येत नाहीं; आणि ज्या मानानें शरीराचा एकंदर गोळा होत जाईल, आणि म्हणून पोषकद्रव्य खाणाऱ्या भागांपासून तो तयार करणारे भाग ज्या मानानें दूर होत जातील, त्या मानानें पोषकद्रव्य नेऊन पोहोंचविण्याच्या साधनांची अपेक्षा जास्त जास्त उत्पन्न होत जाते. पहिले दोन इंद्रियसमूह एकमेकांपासून अगदीं पृथक होई तोंपर्यंत ह्या तिसऱ्या समूहाचें काम नसतें; आणि जेव्हां मूळचे दोन समूह उत्पन्न होतात, तेव्हां ह्या तिसऱ्या समूहाचीहि त्यांच्यासारखी वाढ झाल्याविना, त्यांची स्वताची फारशी वाढ होत नाहीं. समाजोत्क्रमणामध्येंहि आपल्या दृष्टीस तेंच पडतें. ज्या ठिकाणीं धनी व दास एवढेच दोन वर्ग असून त्यांचा प्रत्यक्ष संबंध असेल, तेथें उत्पादित पदार्थ एकाकडून दुसऱ्याकडे नेण्याच्या साधनाला जागा नसते; पण जेव्हां

समाज मोठा होऊन निरनिराळीं नियंत्रण कामें करणारे निरनिराळे वर्ग, आणि निरनिराळे कारखाने असलेलीं निरनिराळीं ठिकाणें, उत्पन्न होतात, तेव्हां असल्या साधनाला जागा उत्पन्न होते इतकेंच नाहीं, तर हें साधन ज्या मानानें वाढत जाईल, त्या मानानेंच तो समाज वाढत जातो व संमिश्र होत जातो.

आणि आतां ह्या तीन महा समूहांचे परस्परसंबंध आपल्या ध्यानांत आले असल्यामुळें, त्यांपैकीं प्रत्येकाचें उत्क्रमण कसें होतें ह्याचा पृथक् पृथक् विचार करण्याचा समय आला आहे; म्हणून तो पुढील तीन प्रकरणांत क्रमाक्रमानें करूं.

# प्रकरण सातवें

## पोषक इंद्रियसमूह

३०. सजीव शरीरामध्यें पोषणव्यापार चालविणारे भाग आणि समाजशरीरामध्यें उत्पादक धंदे चालविणारे भाग ह्यांचे दोघांच्याहि ठिकाणीं पोषक इंद्रियसमूह बनलेले असतात; आणि पोषण करणें हें दोघांचेंहि एकच काम असतें. हे भाग कांहीं सामान्य नियमांस अनुसरून विभिन्नीकरण पावत असतात, आणि ते नियम दोघांनाहि सामान्यच आहेत; आणि ह्या नियमांपैकीं अत्यन्त महत्त्वाचा नियम म्हटला म्हणजे ज्याला अनुसरून ह्या भागांचे विभाग विशिष्टस्थानापन्न होतात तो होय.

ह्या विशिष्टस्थानापन्नतेचें वनस्पतिकोटींतील नमुनेदार उदाहरण म्हटलें म्हणजे झाडाचे जमिनीच्या खालचे भाग व जमिनीच्या वरचे भाग ह्यांच्यामधील सामान्य भेदाचें होय; पैकीं पहिले भाग पाणी आणि खनिजद्रव्यें हीं ओढून घेत असतात, आणि दुसरे प्रकाशाच्या सहाय्यानें हवेचा एक घटकवायु जो कार्बानिक आसिड त्यांतला कार्बन् वियुक्त करून तो ओढून घेत असतात. हा त्यांचा व्यापारभेद प्रारंभीं त्यांच्या परिस्थितिभेदावरून उत्पन्न होत असतो हें ह्या गोष्टीवरून सिद्ध होतें कीं, झाडांचे मूळ बनलेल्या भागावर जर

अपारदर्शक साल वाढलेली नसली, तर तो जमिनीच्या पृष्ठभागावर आला म्हणजे हिरवा होतो व कार्बानिक आसिडचें पृथक्करण करूं लागतो; उलट, झाडांच्या फांद्या खालीं वांकून जमिनींत शिरल्या म्हणजे त्यांस लहान लहान मुळें फुटतात. तात्पर्य काय कीं सगळ्या झाडाच्या फायद्यासाठीं त्याचे हे दोन मुख्य विभाग ज्या निरनिराळ्या पोषणक्रिया करितात, त्यांच्यांतील हा भेद त्यांच्या परिस्थितिभेदावरून उत्पन्न होत असतो.

प्राणिकोटीमध्यें, इतर प्राण्यांच्या शरीरांत राहणारे कांहीं जंतुवर्ग वजा करतां ( कारण ते पोषकद्रव्यांमध्यें बुडालेले असल्यामुळें बाह्य आच्छादनाच्याच द्वारा आपलें पोषण करीत असतात ), त्यांचे बाह्य भाग पोषणव्यापारास मुळींच हातभार लावीत नाहींत. मागेंच सांगितल्याप्रमाणें ज्या मूलभेदीकरणानें बाह्य थरांमध्यें त्यांच्या स्थानांवरून शक्य ते व्यापार साकल्येंकरून सुरू होतात, त्याच भेदीकरणानें आंतील थरांमध्यें गिळलेलें खाद्य उपयोगास लावण्याचे व्यापार साकल्येंकरून स्थापन होतात. एथें आपणास ध्यानांत आणावयाची गोष्ट ही कीं, पोषकद्रव्याशीं पोषक पन्हळाच्या निरनिराळ्या भागांचे येणारे जे निरनिराळे संबंध त्यांस अनुसरून ते भाग खाद्य उपयोगास आणण्याच्या एकंदर सरणीचे निरनिराळे भाग कसे वांटून घेत असतात हें पहावयाचें. उत्क्रमणाचा क्रम स्थूलमानानें लक्षांत आणावयाचा असल्यास हलक्या प्राण्याची व्यापारभेद उत्पन्न न झालेली समस्वरूप पोषक नळी, आणि पक्षी किंवा स्तनवत् प्राणी ह्यांच्यांतील अनेक लहान-मोठे

व्यापारभेद उत्पन्न झालेलें विविधस्वरूप पोषणयंत्रजाल, यांच्यांतील मोठा फरक ध्यानांत आणावा. खाद्य घनस्थितींत प्राप्त होत असल्यामुळें त्याचें प्रथम चूर्ण करावें लागतें; आणि म्हणून चूर्ण करणारीं यंत्रें बनलीं म्हणजे तीं एकंदर यंत्रांच्या प्रारंभीं किंवा नजीकच उत्पन्न होतात; हीं यंत्रें म्हटलीं म्हणजे दांत होत, आणि दांत नसतील तेथें स्नायूयुक्त कोठा, उदाहरणार्थ, पांखराचा, होय. बरें, खाल्लेल्या पदार्थाचे तुकडे झाले म्हणजे ते रक्तांत मिसळून जाण्यापूर्वीं त्यांचें आणखी बारीक चूर्ण व्हावें लागतें; म्हणून पोषक पन्हळाच्या पुढच्या एका भागाला एका आकुंचन पावणाऱ्या कोथळींत विद्रावक रस उत्पन्न करणाऱ्या सूक्ष्म नलिकांच्या साह्यानें, चावून खाल्लेल्या अन्नाचें पुरें पिष्ट करावें लागतें. ह्या कोथळींत बनलेला जो लगदा किंवा मलिदा त्यावर ह्या पन्हळाच्या पुढच्या भागास आणखी कार्य करावें लागतें. चावून तुकडे करणें, किंवा मोठ्या तुकड्यांचें विद्रावण करून त्यांचे सूक्ष्म धागे बनवणें, हें काम आतां राहिलेलें नसतें; तेव्हां ह्यापुढें जें काम होतें तें असें असतें कीं, त्या खाद्यांतील द्रव्यें रक्तांत मिसळून जातील अशा तऱ्हेचें त्यांस स्वरूप येण्यास योग्य ते द्रव त्यांत मिसळून द्यावयाचे. अशा रीतीनें तयारी पूर्ण झाली म्हणजे मग तीं द्रव्यें रक्तांत ओढून घ्यावयाचीं एवढेंच कार्य शिल्लक राहतें, आणि तें कार्य तीं द्रव्यें पोषक पन्हळाच्या एका विशिष्ट भागीं येऊन होत असतें. पोषक पन्हळास जोडलेल्या ज्या मोठाल्या रसवाहिन्या त्यांच्या विशिष्टस्थानापन्नतेचीहि अशीच गोष्ट आहे.

सामाजिक देहामध्यें ज्या अनेक उद्योगधंद्यांच्या योगानें सगळ्या देहाचें पोषण होत असतें, त्यांची विशिष्टस्थानापन्नता अशाच रीतीनें उत्पन्न होत असते. समाजांत प्रथम जे धंदेभेद उत्पन्न होतात, ते समाज ज्या प्रदेशावर बसलेला असेल त्याच्या सर्व भागांवर घटकांची सेंद्रिय व निरिंद्रिय परिस्थिति सारखी नसते, ह्यावरून उत्पन्न होतात. आणि अशा रीतीनें मुख्य भेद उत्पन्न झाले म्हणजे, दुय्यम भेद, ज्या धंद्याला ज्या दुसऱ्या धंद्यांत उत्पन्न झालेल्या पदार्थांची जरूरी असेल त्यांच्या नजीक ते स्थापले जाणें, ह्या तत्त्वावर उत्पन्न होतात. ह्यांपैकीं पहिल्याप्रकारचें स्थानवैशिष्ट्य अर्धवट सुधारलेल्या लोकांतहि दिसून येतें. फीजी बेटांपैकीं कांहीं बेटांची लांकडी हत्यारांबद्दल ख्याति आहे, व कांहींची चटया व टोपल्या ह्यांच्याबद्दल आहे, व कांहींची भांडीं व रंग ह्यांबद्दल आहे असें ज्याक्सन म्हणतो; ह्या भेदांचें कारण अर्थात् त्या त्या बेटांत आपोआप उत्पन्न होणारे पदार्थ निरनिराळे आहेत हें होय हें उघड आहे; तद्वतच सामोआ बेटांत जाळीं करण्याचा धंदा मुख्यत्वेंकरून आंतल्या खेड्यांतून होत असतो असें टर्नर म्हणतो, व त्याचेंहि कारण त्या धंद्याला योग्य तें कच्चें द्रव्य तेथें आसपास मिळतें हें होय. ह्याच्याहून जरासे जास्त सुधारलेले जे आफ्रिकेंतील समाज, त्यांच्यामध्येंहि असल्याच कारणांवरून असलींच विभिन्नीकरणें उत्पन्न झालेलीं दृष्टीस पडतात. लोआंगोमध्यें "समुद्रकिनाऱ्यावर कोळी नेहमीं येत असतात", आणि तेथें "विस्तवावर खारें पाणी सुकवून मीठ करणारेहि दुसरे

लोक आहेत." ह्या ठिकाणीं विशिष्ट स्थानीं विशिष्ट सवलतीमुळें विशिष्ट धंदे उत्पन्न झालेले दिसतात, हें उघडच आहे. प्राचीन काळच्या अमेरिकेंतील समाजामध्यें-हि अशीच स्थिति असे, आणि हल्लीं सुधारलेल्या राष्ट्रांतहि तीच स्थिति आहे. समुद्रकांठची प्रजा बहुधा मासे धरणें, होड्या वल्हविणें, आणि जहाजें बांधणें, इत्यादि कामांत गुंतलेली असते; आणि किनाऱ्यावर वरील कांहीं विशिष्ट स्थळें देशी माल परदेशीं पाठविणें, आणि परदेशचा माल स्वदेशीं आणणें, ह्या कामांत गुंतलेलीं असतात; इकडे किनारा सोडून अंतर्भागाची प्रजा जमीन व हवा यांच्या मानानें निरनिराळीं पिकें उत्पन्न करणें आणि दगड किंवा विटा किंवा निरनिराळे धातू खाणींतून वगैरे काढणें, वगैरे धंद्यांतून गुंतलेली असते. नंतर मग ह्या मुख्य स्थानवैशिष्ट्याच्या अनुरोधानें दुय्यम स्थानवैशिष्ट्यें उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, जेथें पाणचक्क्या उभारण्याची सोय नसेल तेथें कारखाने बहुधा कोळशाच्या खाणींनजीक उत्पन्न होतात. जेथें दोन कच्च्या द्रव्यांची अपेक्षा असेल, उदाहरणार्थ, कोळसे आणि लोखंड—तेथें तीं शेजारीं शेजारीं असतील अशा ठिकाणीं तसले कारखाने उत्पन्न होतात. म्यांचेस्टर, बर्मिंघाम, शेफील्ड वगैरे शहरानजीकचे लोखंडाचे, किंवा कापसाचे, किंवा चाकू--कातऱ्यांचे कारखाने, ह्याच तत्त्वावर एकवटलेले आहेत.

३१. सामाजिक किंवा व्यक्तिविषयक देहाच्या पोषणासाठीं लागणाऱ्या द्रव्याची सिद्धता करण्यासाठीं इंद्रियांचें हें जें स्थानवैशिष्टय उत्पन्न होत असतें त्याम-

ध्यें आणखीहि एक साधर्म्य दृष्टीस पडत असतें. तें हें कीं दोघांच्याहि ठिकाणीं पोषक रचनांचें विभिन्नीकरण आणि वृद्धि हीं नियामक रचनांच्या विभिन्नीकरणाहून व वृद्धीहून अगदीं अन्य तऱ्हेनें होत असतात.

ज्या ठिकाणीं ह्या दोन्ही प्रकारचे समुदाय प्रथम सारख्या तुकड्यांचे बनलेले असून पुढें ते हळूहळू घन होत जातात अशा ठिकाणीं हें साधर्म्य फारच स्पष्टरीतीनें दृष्टीस पडतें. आन्युलोस ( कड्या कड्यांचे प्राणी ) वर्गातील प्राण्यामध्यें हें रूपान्तर व त्याबरोबर होणाऱ्या सर्व गोष्टी उत्तम तऱ्हेनें दिसून येतात. जलचर किड्यांपैकीं हलक्या जातीचा किडा ज्या कड्यांचा मिळून बनलेला असतो त्या सर्वांची रचना सारखीच असते. प्रत्येक कडींत पोषक नलिकेस मध्येंच जरा फुगवटी आलेली असते; प्रत्येक कडींत हृदयाचें आकुंचन पावणारें अंग मध्येंच जरा फुगरें झालेलें असतें; प्रत्येकीमध्यें दुहेऱ्या ज्ञानतंतूंच्या दोरीचा कांहीं भाग असून जेथें तीस मध्येंच जोड भाग उत्पन्न झाले असतील तेथें एकेक जाडा भागहि उत्पन्न झालेला असतो; प्रत्येकीमध्यें ज्ञानतंतु आणि रक्तवाहिन्या ह्यांचीं जीं मुख्य जुडगीं त्यांच्या सारख्या सारख्याच फांद्या असतात; तद्वतच प्रत्येकीमध्यें एकाच नमुन्याचीं स्नायूंचीं जुडगीं असतात; प्रत्येकींत शरीराच्छादनांतून दोन दोन छिद्रें असतात; सारांश, पुनरुत्पादक इंद्रियांपावेतों सर्व इंद्रियांची प्रत्येक कडींत अशीच स्थिति असते. बाह्यतःहि प्रत्येकीला सारखींच चलन साधनें, सारखेंच कल्ले किंवा श्वाससाधनें, आणि कधीं कधीं सारखेच डो-

ळ्यांचे जोडहि असतात. पण जर उच्चतर जातीच्या आन्युलोसांकडे पाहिलें—उदाहरणार्थ, कीटक व कवच-युक्त प्राणी—तर त्यांच्या कड्या एकमेकींशीं जास्त संकलित झालेल्या असून त्यांपैकीं कांहीं तर एकमेकींत इतक्या मिळून गेलेल्या असतात कीं, त्यांच्यांतील सांधे दिसण्यांत येत नाहींत, आणि त्यामुळें त्यांच्यांत पोषक इंद्रियांचे मूळच्या कड्यांशीं जे संबंध ते ह्यांच्या ठिकाणीं अगदीं नष्ट झालेले असतात. पतंग आणि बागुरडे ह्यांच्यामध्यें पोट जरी बाह्यतः कड्याकड्यांचें बनलेलें म्हणून दिसतच असतें, तरी त्यांचें पोषण करणारे जे अंतर्भाग ते कड्यांच्या हलक्या प्राण्याप्रमाणें प्रत्येक कडींत सारखेच दिसत नाहींत, तर गळ्यांतील पिशवी, पोट, रसवाहिन्या, व आंतडीं हीं प्रत्येकीं दोन, तीन, चार किंवा जास्त कड्यांवरहि पसरलेलीं असतात. पण इकडे सर्व भागांचीं कामें व्यवस्थित रीतीनें चालविणारे जे ज्ञानतंतूंचे पुंज, ते ह्या उच्चतर प्राण्यामध्यें निरनिराळ्या कड्यांतून जरी काहीं अंशीं परस्पर विसदृश असे दृष्टीस पडतात, तरी त्यांचे निरनिराळ्या कड्यांशीं जे मूळचे संबंध ते नष्ट झालेले नसतात. पतंगामध्यें त्याच्या बाह्य चलनवलनांचें नियंत्रण करणारे जे मागचे ज्ञानतंतुगुच्छ ते जरी बऱ्याच अंशीं मूलस्थानभ्रष्ट आणि संकलीभूत झालेले असतात, तरी पोटाच्या कड्यांतील गुच्छ आतां पहिल्या मानानें लहान झालेले असले तरी स्वस्थानींच असतात.

लहान समाजांचें कायमचें संकलीभवन होऊन बनलेल्या मोठ्या समाजामध्यें उत्पन्न होणाऱ्या उद्यमविषय-

क रचनांच्या संबंधानेंहि असेंच घडून येतें: म्हणजे त्या रचना राजकीय लहान-मोठ्या विभागांशीं कांहींएक संबंध न ठेवितां पसरत असतात. याचीं आपल्याला पाहिजे तितकीं उदाहरणें सांपडतात. प्रथम अर्धवट विभिन्नीकरण पावलेल्या कृषिविषयक उद्यमाकडे पाहतां त्यांत कोठें धान्यें उत्पन्न करण्याच्या कामास, कोठें गुराढोरांची वृद्धि करण्याच्या कामास, आणि डोंगराळ प्रदेशांत मेंढ्या-बकऱ्यांचे कळप बनविण्याच्या कामास, प्राधान्य आलेलें असून हीं विभिन्नीकरणें जिल्हे किंवा तालुके असल्या राजकीय विभागांस न जुमानतां झालेलीं असतात; तद्वतच निरनिराळे कारागिरीचे कारखानेहि पूर्वींच्या किंवा हल्लींच्या राजकीय विभागांस अनुसरून मुळींच वाढलेले दिसत नाहींत. उदाहरणार्थ, इंग्लंदांत लोखंड उत्पन्न करण्याचा धंदा वूस्टर, स्टॅफर्ड, आणि वारिक या प्रांतांच्या कांहीं कांहीं भागांत उत्पन्न झालेला आहे. तद्वतच कापसाचें कापड करण्याचा धंदा लांकाशायर ह्या जिल्ह्यांतच नसून डार्बीच्याहि कांहीं भागांत पसरलेला आहे. कोळसे व लोखंड यांच्या ज्या न्यूकासल व डर्हम यांच्या सभोंवती खाणी आहेत त्यांचेंहि असेंच आहे. ह्यांच्यापेक्षां लहान राजकीय विभाग आणि लहान धंदे ह्यांचेंहि असेंच आहे. कारागिरीचें शहर खेड्याच्या मर्यादांस न जुमानतां वाढत असतें; आणि कधींकधीं तर या मर्यादांचें अतिक्रमण एकाच कारखान्यानेंहि केलेलें दिसून येतें. लंदनमध्यें मोठ्या प्रमाणावर हेंच दृष्टीस पडतें. तें शहर कित्येक खेड्यांवर पसरलेलें आहे; आणि मिडलसेक्स व सरे या जिल्ह्यां-

च्या मर्यादांनीं त्याच्या वाढीस मुळींच प्रतिबंध झालेला नाहीं. कधीं कधीं असें दृष्टीस पडतें कीं उद्यमविषयक ह्या स्थानवैशिष्ट्याचा जो हा परिणाम त्यास राष्ट्रीय मर्यादाहि अडथळा आणूं शकत नाहींत. उदाहरणार्थ, हालाम असें सांगतो कीं लोंकरीच्या कारागिरीचा धंदा फ्लांडर्स देशामधून ऱ्हाईन नदीच्या कांठानें फ्रान्स देशाच्या उत्तेरकडील प्रांतांत पसरत गेला. इकडे नियंत्रण करणाऱ्या रचनांचीं प्रमाणें कितीहि बदललीं, तरीं मूळ विभागांशीं जे त्यांचे संबंध ते अशा रीतीनें नष्ट होत नाहींत. इंग्लंदच्या कौंटींचे जे अधिकारीवर्ग आहेत ते पूर्वीं जीं त्या कौंटींतून स्वतंत्र राज्यें होतीं त्यांचेच निदर्शक आहेत. फ्रान्सांतहि १७८९ सालची महा राज्यक्रान्ति होई तोपावेतों प्रारंभींचीं ८० फ्रेंच राज्यें प्रांत म्हणून लहान लहान स्थानिक सरकारेंच होतीं.

३२. समाजदेह आणि व्यक्तिदेह ह्यांच्यांतील पोषक रचनांच्या वाढीमध्यें हें जें साधर्म्य दृष्टीस पडतें त्याचा पूर्ण अर्थ ध्यानांत येण्यास त्याचें वर्णन, बारीकसारीक गोष्टी न देतां अगदीं सामान्यस्वरूपीं दिलें पाहिजे. प्राण्याच्या पचनेंद्रियसमूहामध्यें होणाऱ्या उत्क्रमणाच्या सरणीचें अगदीं सामान्य वर्णन करूं म्हटल्यास तें कसें होणार आहे? तें असें होणार आहे कीं एकंदर पोषक पन्हळ त्याच्या अंतभागांशीं संबंध येणाऱ्या जीव किंवा वनस्पति द्रव्यांना योग्य अशा रचना व व्यापार धारण करीत असतो; आणि शिवाय त्याचे क्रमवार भाग त्या द्रव्यांच्या रूपान्तराच्या ज्या क्रमवार पायऱ्या त्यांच्या सिद्धतेला योग्य अशीं रूपें धारण करींत अस-

तात. म्हणजे, पोषण करणारीं जीं बाहेरचीं द्रव्यें, ज्यांच्यावर त्या प्राण्याचा अंतर्भाग क्रिया करीत असेल, त्यांच्यावर त्या अंतर्भागाचे सामान्य व विशेष गुणधर्म अवलंबून असतात. आणि, अशाच सामान्य शब्दांनीं समाजांतील उद्यमविषयक रचनांच्या उत्क्रमणाच्या सरणीचें कसें वर्णन केलें पाहिजे? अर्थात् असें केलें पाहिजे कीं, समाजांतील कामकरी वर्गाचा ज्या खनिज, प्राणिज आणि उद्भिज्ज द्रव्यांशीं संबंध येत असेल, त्यांना योग्य अशा क्रिया व तदनुरूप रचना त्या सरणीस प्राप्त होतात; आणि त्या समाजांतील कांहीं भागांमध्यें जीं उद्यमवैशिष्ट्यें उत्पन्न होतात तीं त्या भागांचा ज्या ज्या स्थानिक उत्पन्नांशीं संबंध येतो त्यांच्यांतील सेंद्रिय व निरिंद्रिय भेदांवरून ठरत असतात.

एवंच उद्यमविषयक विभिन्नीकरणें जरी भौतिक परिस्थितीवर अवलंबून असतात, तरी नियंत्रणविषयक किंवा शासनसंबंधी रचनांमधील विभिन्नीकरणें तिजवर अवलंबून नसतात. ह्या विरोधाचा पूर्ण अर्थ ह्या शासनविषयक रचनांचें जेव्हां पुढें विवेचन करूं तेव्हां ध्यानांत येईल.

---

# प्रकरण आठवें

## विभाजक इंद्रियसमूह



२३. सहाव्या प्रकरणांत इंद्रियांच्या तीन महासमूहांचे जेव्हां संबंध निरूपिले तेव्हां असें दाखविलें होतें कीं प्राण्यांत किंवा समाजांत पोषक इंद्रियसमूह व नियामक इंद्रियसमूह ह्यांची वाढ, तिजबरोबर विभाजक इंद्रियसमूहाची वाढ झाल्याशिवाय व्हावयाची नाहीं. प्रत्येकीं स्वावलंबी व अधर्वट रीत्या संयुक्त अशा टोळी-समूहापासून पूर्णपणें संयुक्त अशा समूहाप्रत जी संक्रान्ति व्हावयाची, ती उत्पन्न केलेले पदार्थ एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणाऱ्या संस्था उत्पन्न झाल्याविना होणें नाहीं; ज्याप्रमाणें सारख्या पालिपाइट प्राण्यांच्या संघाला त्याच्या खाणाऱ्या घटकांपासून पोंहणाऱ्या घटकांकडे पोषकद्रव्याची संक्रान्ति करणारें कांहीं साधन उत्पन्न झाल्याशिवाय त्याचा तज्जातीय उच्चतर जंतु बनावयाचा नाहीं. तद्वतच, ज्याप्रमाणें आनिलीड प्राणी कड्यांचा बनलेला असून प्रत्येक कडीला तिचीं चलनसाधनें, श्वाससाधनें, पचनसाधनें, आणि ज्ञानसाधनें असतात, म्हणून त्यास वाहनसाधनें उत्पन्न झाल्याशिवाय पुष्कळ निरनिराळ्या भागांनीं व रचनांनीं विशिष्ट अशा कवचधारीचें किंवा किड्याचें स्वरूप यावयाचें नाहीं से; त्याप्रमाणें, प्रत्येकीं स्थानिक नाईक व स्था-

निक कारागीर व व्यापारी असलेल्या व अल्प रीतीनेंच एकमेकांच्या अनुषंगानें वागणाऱ्या लहान लहान टोळ्यांचा बनलेला जो समाज, त्यास त्याच्यांत रस्ते आणि व्यापारी वर्ग ह्यांची वाढ झाल्याशिवाय, उद्यमवैशिष्टयसंयुक्त अशा संकलित समाजाचें स्वरूप यावयाचें नाहीं.

तात्पर्य, ह्या ठिकाणीं आपल्यास व्यक्तिविषयक व समाजविषयक विभाजक इंद्रियसमूहांमध्यें त्याच्या निरनिराळ्या पायऱ्यांवर जीं सादृश्यें व्यक्त होतात तीं पहावयाचीं आहेत.

३४. ऱ्हायझोपॉड ह्या नमुन्याचे जे प्रोटोझोआ असतात त्यांस भागाभागाला वाहनसाधनें किंवा दळणवळणाचे मार्ग नसतात. त्यांच्या भागांचें नैकट्य, त्यांच्यांतील व्यापारांचें सादृश्य, आणि त्यांच्या सापेक्षस्थानवर्त्तेचें भिन्नत्त्व, यांमुळें त्यांच्यांत विभाजक इंद्रियसमूह उत्पन्न होणें जसें असंभाव्य आहे तसेंच निरर्थकहि आहे. मिक्सोमाय्सिटीज ( myxomycətəs ) नांवाचे जे अत्यन्त सरल जीवसमूह आहेत, व ज्यांस वनस्पतिशास्त्रज्ञ "कुत्र्याचें मूत" ह्या वनस्पतिवर्गांत घालितात, आणि प्राणिशास्त्रज्ञ प्रोटोझोआ ह्या प्राणिवर्गांत घालितात, ते जरी विस्तारानें बरेच मोठे असतात, तरी ते समस्वरूप असून पोषकद्रव्याच्या विभजनासाठीं त्यांच्यांत वहनमार्ग मुळींच नसतात. हलक्या समाजांचें असेंच असतें. ज्या टोळ्या लहान, स्थानान्तर करणाऱ्या, आणि श्रमविभागविहीन अशा असतात त्यांच्या ठिकाणीं ह्या प्रत्येक विशेषामुळें दळणवळण मार्ग उत्पन्न होण्याचा संभव नाहींसा हो-

तो. एक किंवा दोन डझनाच्या समूहामध्यें दळणवळण इतकें अल्प व अनिश्चित असतें कीं, त्यांच्या झोंपड्यांमध्यें पायवाटा बहुधा बनत नाहींत. कारण ते बहुधा स्थानान्तर करणारे असल्यामुळें प्रत्येक अल्पकालिक वसतिस्थानीं ज्या मळलेल्या पायवाटा बनूं लागल्या असतील, त्या ते तेथून उठले म्हणजे लवकरच बुजून जातात; आणि ज्या ठिकाणीं ते स्थाईक राहणारे असतील त्या ठिकाणीं देखील ते जर विस्कळित रहात असले, आणि त्यांच्यांत उद्यमवैसदृश्यें मुळींच नसलीं, तर त्यांतील व्यक्तींचीं निरनिराळ्या स्थानीं चलनवलनें इतकीं अल्प होतात कीं, त्यांच्या पावलांचे मागमोस फारच अंधक राहत असतात.

ज्या प्राणिसमूहांचे भाग परिस्थिति निरनिराळी असल्यामुळें निरनिराळे व्यापार धारण करितात, त्यांच्या ठिकाणीं त्या निरनिराळ्या भागांनीं उत्पन्न केलेलीं द्रव्यें एकमेकांत संक्रान्त करण्यासाठीं वहनमार्गाची अपेक्षा उत्पन्न होऊन, ते समूह वाढत जातील तसे ते मार्ग मोठे होत जातात. हैड्रा हा प्राणी केवळ दुहेऱ्या पडद्याच्या कोथळीचा बनलेला असतो; त्यामुळें त्याच्या ठिकाणीं आंतल्या पडद्यानें ओढून घेतलेलें पोषकद्रव्य दृश्यछिद्रांविना बाह्य थराप्रत जाऊन पोंहोचत असेल, आणि तें अल्पतम विरोधाच्या रेषांनीं जात असून त्या रेषा एकदां खुल्या झाल्या म्हणजे पुनःपुनः त्याच मार्गांनीं त्या द्रव्याची सारखी संक्रान्ति होऊन ते मार्ग ज्यास्त रुंद होत असतील. पण जसजसें हैड्रापेक्षां उच्चतर अशा जीवांकडे जावें तसतसे त्यांचे शरीरभाग पोटापासून जास्त

जास्त दूर होऊन, ज्याचे फांटे सर्व शरीरभर पसरले आहेत अशा पक्काशयाची उत्पत्ति होते. अशा पाचक सूक्ष्म पन्हळांतून कच्चया पोषकद्रव्यांची वांटणी मेडयूसी ( Medusæ ) नामक सूक्ष्म जलचर जंतूंमध्यें आणि प्लानेरी ( Planariæ ) नामक वातीसारख्या खाऱ्या व गोड्या पाण्यांतील कीटकांमध्यें होत असते. परंतु ह्यांच्याहून उच्चतर जंतूंमध्यें पक्काशयासभोंवती एक कोथळी असून तिच्यांत गाळणींतून निघालेलें पोषकद्रव्य राहत असतें; आणि ही कोथळी रसाभिसरणजालाची बीजभूत असून तिच्यांतून सर्व टिस्यूंमध्यें अभिसरणमार्ग फांटे फुटून गेलेले असतात; आणि हे सूक्ष्म खड्डे बहुधा शरीराच्या निरनिराळ्या भागीं त्यांतील द्रवांना मागणी उत्पन्न होऊन प्रथम बनत असतात, आणि त्याच मार्गांनीं पुनःपुनः द्रवाभिसरण झाल्यानें कायम होत असतात. सजीव शरीरांप्रमाणें समाजांमध्येंहि मालाच्या व माणसांच्या चलनवलनांनींच दळणवळणमार्ग प्रथम उत्पन्न होऊन पुढें ते जास्त सोईस्कर होत जातात. कधीं कधीं जनावरांनीं पाडलेल्याच पायवाटांनीं माणसें जाऊं लागतात; उदाहरणार्थ, नाग लोक रानांतून वनपशूंनीं पाडलेल्या वाटांचेंच अनुसरण करितात. सर्व पूर्व आफ्रिकेंत रानटी लोकांच्या वस्तींतून पायवाटा अशाच रीतीनें बनलेल्या आहेत. आबिसिनियामध्यें राजमार्ग म्हटला म्हणजे मेंढवाटे सारखाच असतो, आणि पुष्कळ पाय त्याच्यावरून गेल्यामुळें तो अमळ रुंद झालेला असतो. शहरें उत्पन्न होतील इतकी सामाजिक वाढ झाली तरी पुष्कळ माणसें जाऊन जा-

ऊन जे मार्ग बनतील त्यांपलीकडे रस्ते बनत नाहींत. बेचुआनामधील नव्या व जुन्या राजधानीमधल्या रस्त्याचें वर्णन करतांना बर्चेल असें म्हणतो कीं, हा रस्ता एकेक माणूस जाईल अशा रुंदीच्या कित्येक पायवाटांचा बनलेला आहे, व त्या पायवाटा एकमेकींस समान्तर असून कांहीं वांकड्यातिकड्याहि आहेत; अशा प्रकारच्या १२ किंवा १८ वाटा कांहीं यार्डांच्या आंत माझ्या दृष्टीस पडल्या.

आतां वर सांगितलेल्या प्राण्यांहून वरिष्ठ प्राण्यांकडे पाहतां शेवटीं अशीं शरीरें आपल्या दृष्टीस पडतात कीं, त्यांमध्यें ज्यांच्या सभोंवतीं स्पष्ट आच्छादन उत्पन्न झालेलें आहे अशा नळ्यांतून रक्त वाहत असतें. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें खरें रुधिराभिसरणजाल म्हटलें म्हणजे त्याला प्रारंभ शरीराच्या मध्यभागीं होऊन तेथून तें बाह्यांगांकडे पसरत जातें. प्रथम पक्वाशयाच्या सभोंवतालच्या कोथळींत एक लहानशी उघड्या तोंडाची नळी उत्पन्न होते; आणि तिच्या तालबद्ध आकुंचनाच्या योगानें सभोंवतालच्या द्रवांत चलनवलन सुरू राहून तो द्रव एकदां त्या नळीच्या ह्या तोंडांतून आंत शिरतो, व एकदां त्या तोंडांतून आंत शिरतो; आणि हळूहळू हें बीजभूत हृदय लांबट होत जाऊन, आणि त्याला लहान लहान आकुंचन पावणाऱ्या नळ्या उत्पन्न होऊन त्या शरीरांतील खड्ड्यांतून पसरत जातात, आणि अशा रीतीनें रुधिरयंत्राची उत्पत्ति होते. समाजदेहांतील दळणवळणमार्गांचेंहि असेंच होतें. अगोदर हे मार्ग वर सांगितल्याप्रमाणें अनिश्चित असून जेथें दळवळण फार असेल

तेथें त्यांस निश्चितस्वरूप प्रथम येतें; उदाहरणार्थ, डेहामीमध्यें बहुतेक रस्ते जरी केवळ पायवाटा आहेत, तरी किनाऱ्याकडे जाणारे बहुतेक रस्ते गाड्या जाण्यासारखे आहेत, आणि दोन राजधान्यांना जोडणारा सहासात मैलांचा रस्ता तर इंग्लंदांतील फार रुंद रस्त्यां इतका मोठा आहे, असें बर्टन म्हणतो. इंग्लंदांतील रस्त्यांची एक-दोन शतकांमागें अशीच स्थिति होती. त्यांच्या सभोंवती कुंपणें किंवा रेलिंग वगैरे कांहीं नसून एका रस्त्यांत चिखल फार झाला म्हणजे दुसरा रस्ता पडे. पुढें जेव्हां डामर वगैरे घालून रस्ते मजबूत करण्याची युक्ति निघाली, तेव्हांच राजरस्ते व खाजगी रस्ते रुंद व कायमचे बनूं लागले.

शरीर व समाज ह्यांच्या दळणवळणमार्गांमध्यें किंवा विभाजक इंद्रियसमूहामध्यें आणखीहि साम्यें दाखवितां येण्यासारखीं आहेत. व्यापार जसा वाढत जातो तशी सामान्य रस्त्यांशिवाय आणखी आगगाडी सुरू होते; तिचे बहुधा एका रुळाच्या ऐवजीं जाण्याचे व येण्याचे असे दोन रूळ असतात, आणि त्यायोगानें शुद्धरक्तवाहिन्या व अशुद्धरक्तवाहिन्या अशा दुबार अभिसरणमार्गांशीं त्यांचें साम्य ज्यास्तच जुळतें. तद्वतच, पूर्ण झालेल्या रुधिराभिसरणजालांत मोठाले रक्ताचे पन्हळ सर्वांत ज्यास्त सरळ असतात, त्यांपासून निघणारे यांच्याहून लहान असून कमी सरळ असतात, यांना फुटणारे फांटे त्यांच्याहूनहि ज्यास्त वांकडेतिकडे असतात, आणि केंसासारख्या सूक्ष्म नलिका फारच वांकड्यातिकड्या गेलेल्या असतात; तद्वतच देशांतील दळणवळणाचे मु-

ख्य रस्ते सर्वांत सरळ असतात, लहान सहान शहरांतील कमी सरळ असतात, खेड्यांतील त्यांहून वांकडे असतात, आणि शेतांतील त्याहून वांकडे असतात.

आणखी एक विलक्षण साम्य ह्या दोहोंमध्यें दृष्टीस पडतें. मोलस्कासारख्या बऱ्याच विवृद्ध झालेल्या प्राण्याच्या ठिकाणीं रुधिराभिसरणाचे मुख्य भाग जरी इतक्या पूर्णत्वास पोहोंचलेले असतात, मुख्य पन्हळांच्या सभोंवती बाहेरून स्नायुमय आच्छादनें उत्पन्न झालेलीं असतात, आणि आंतून पेव्हमेंट एपिथेलियम नामक पातळ पापुद्रा उत्पन्न झालेला असतो, तरी त्यांच्या टोंकांकडचे भाग अपूर्ण असतातः म्हणजे त्यांच्या लहान लहान नलिका प्राथमिक किंवा कच्चा प्रकारच्याच खड्ड्यांतून किंवा मांसांतील पोकळ भागांत मध्येंच संपलेल्या दृष्टीस पडतात. त्याचप्रमाणें समाजांतील वाढलेल्या विभाजक इंद्रियसमूहांतील मुख्य मुख्य मार्गांच्या सभोंवती जरी स्पष्ट बंधनें असतात, आणि त्यांचे पृष्ठभाग पुष्कळ रहदारी सोसतील अशा प्रकारचे मजबूत बनवलेले असतात, तरी त्या रस्त्यांचे शाखांची रचना तितकी मजबूत नसते, आणि त्यांना फुटलेले फांटे तर त्यांहूनहि ज्यास्त कच्चे असून ते मध्येंच संपलेले असतात, आणि त्यांच्या सभोंवती कुंपणें नसून त्यांच्यावर खडीहि घातलेली नसते, तर त्या शेत व रान, डोंगर व मुरें ह्यांतून खटारे, घोडीं व वाटसरू, ह्यांना जाण्याच्या केवळ वाटा असतात.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट एथें ध्यानांत आणिली पाहिजे; ती ही कीं, व्यक्तिरूपी व समाजरूपी देहां-

मध्यें इतर देहांशीं झगडण्याचीं साधनें मोठ्या प्रमाणावर उत्पन्न झालीं म्हणजे हे विभाजक मार्ग केवळ अंतःपोषणासाठींच उत्पन्न होतात असें नाहीं तर, कांहीं अंशीं, आणि बहुधा मुख्यत्वेंकरून, पोषक भागांकडून खर्चिक भागांकडे द्रव्यांची संक्रान्ति करण्यासाठींच उत्पन्न होतात. ज्ञानतंतु व स्नायु यांचीं मोठीं जाळीं उत्पन्न झालीं आहेत अशा प्राण्यांमध्यें मोठाल्या नलिका एका आंतड्यांतून दुसऱ्याकडे रक्त वाहून नेण्यापेक्षां मेंदू आणि हातपाय यांच्याकडे तें वाहून नेण्यासाठींच विशेषेंकरून उत्पन्न झालेल्या असतात; तद्वतच ज्या राष्ट्राचा लढाईकडे भर विशेष असेल, त्याच्यांतील मुख्य मार्ग शत्रूंवर हल्ले व त्यांच्यापासून स्वसंरक्षण ह्यांच्यासाठींच विशेषतः तयार केलेले असतात. लढाईकरितां माणसें व इतर युद्धसामग्री हीं नेणाऱ्या रस्त्यांची अशा देशांत इतर रस्त्यांपेक्षां ज्यास्त अवश्यकता उत्पन्न होते, आणि म्हणून त्यांसच प्रथम निश्चित स्वरूप येतें. आशान्टीमधील वर सांगितलेल्या राजरस्त्यांची अशीच स्थिति आहे, प्राचीन पेरूव्हियन लोकांचे रस्ते सैन्यें नेण्यासाठीं तयार केलेले असत, आणि रोमन लोकांच्या साम्राज्यांतहि तीच स्थिति असे. आतां रस्ते कोणत्याहि हेतूनें केले, मग ते व्यापारासाठीं असोत किंवा लढाईसाठीं असोत, त्यांच्या बुडीं तत्त्व एकच असतें. तें हें कीं, मागणीचीं ठिकाणें आणि पुरवठ्याचीं ठिकाणें ह्यांच्यामध्यें ते उत्पन्न होत असतात.

३५. आतां एके ठिकाणीं रक्त व सीरम ( रस किंवा लस ) आणि दुसरे ठिकाणीं माणसें व माल ह्यांचे

जे वहनमार्ग आढळून येतात त्यांजवरून दृष्टि काढून त्या मार्गांतून होणाऱ्या हालचालींकडे जर ती लाविली, तर आणखी कांहीं साम्यें दृग्गोचर होतात.

हलक्या प्रतीच्या प्राण्यांमध्यें वहनमार्गांचा अभाव असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं टिस्स्यूंमधून पोषकद्रव्यांचें अत्यन्त मंद व अनियमित प्रसरण होत असतें; तद्वतच प्राथमिक समाजांमध्यें अल्प विनिमयापलीकडे कांहींच व्यवहार होत नसल्यामुळें अशा रीतीनें अदलाबदल केलेले पदार्थ फारच मंद व अनियमित रीत्या समाजांत पसरत असतातः म्हणजे काय, तर, अशा ठिकाणीं हालचाली फार दुर्बल असून त्यांस अभिसरण हें नांव मुळींच देतां येत नाहीं. पण आसिडियन सारखे मोलस्का वर्गांतील जे प्राणी आहेत त्यांच्याकडे पाहतां त्यांच्या ठिकाणीं पक्वाशयासभोंवतालची कोथळी, व तिच्यांत धडधडणारी एक धमनी ह्यांची उत्पत्ति झालेली असल्यामुळें, त्यांच्यांत पोषकद्रव्यांचें जें विभजन चाललेलें असतें, त्यास जरी अभिसरण असेंच म्हणतां येत नाहीं, तरी तें बऱ्याच अंशीं त्याच्यासारखें असतें. सभोंवतालच्या द्रवांत ह्या हृदयाचे ठोके असे तरंग उत्पन्न करितात कीं तेणेंकरून इंद्रियांतील व अवयवांतील छिद्रें व पोकळ जागा ह्यांच्यामध्यें त्या द्रवाचे मंद प्रवाह जाऊं लागतात, व कांहीं वेळानें ते उलटून विरुद्ध दिशेनें हालचाल उत्पन्न करितात. ही जी लाटांची उलटसुलट गति, जिच्या योगानें एक भाग प्रचुरपूरित झाला म्हणजे तेथून प्रवाह उलटून जो भाग रिकामा झाला असेल तिकडे तो सुरू होतो, ती वाढीस

लागलेल्या समाजांतील विभजनविषयक प्राथमिक हालचालींशीं सदृश आहे. त्याठिकाणीं एकाच दिशेनें सारखे प्रवाह सुरू राहून समाजाच्या वाढीस सुरुवात होत नाहीं, तर कांहीं कांहीं कालानें प्रवाहदिशा बदलून, म्हणजे कधीं कांहीं ठिकाणीं वस्ती वाढून आणि कधीं तेथील कमी होऊन, वाढीस सुरवात होते. जत्रा किंवा बाजार म्हणून ज्यास म्हणतात त्या रूपानें व्यापारविषयक लाटेची प्रथम उत्पत्ति होते. ही स्थिति जराश्या सुधारलेल्या समाजांत आढळून येते. सांडविच बेटांतील लोक वैरूकू नदीवर आपले जिनसांची अदलाबदल करण्यासाठीं कांहीं ठराविक वेळीं जमत असत; आणि निरनिराळ्या बेटांतील फिजियन लोक असेंच करीत. आतां हें उघडच आहे कीं वस्ती वाढत जाईल तसे माणसें व माल ह्यांचे हे विरुद्ध दिशांनीं होणारे प्रवाह ज्यास्त वरचेवर होऊं लागतात. अर्धवट सुधारलेल्या आफ्रिकन राष्ट्रांतून ह्याच्या निरनिराळ्या पायऱ्या दृष्टीस पडतात. खालच्या नैजर नदीवर "प्रत्येक शहरांत प्रत्येक चार दिवशीं बाजार भरत असतो", आणि नदीच्या निरनिराळ्या भागीं पंध्रवड्यानें एकदां बहुधा मोठा बाजार भरतो. पण तिंबक्तूसारख्या मोठ्या ठिकाणीं दररोज बाजार भरत असतो. मादागास्करमध्यें राजधानींत रोज बाजार असून प्रांतिक शहरांतून कांहीं दिवसांनीं भरतो. प्राचीन अमेरिकन समाजांतून ह्याच्या वरची पायरी दृष्टीस पडत असे, उदाहरणार्थ, चिब्चा लोकांत रोज लहान बाजार भरून शिवाय आठवड्यानें मोठा बाजार भरत असे. मेक्सिकोमध्यें असले मोठे व्यापार दर

पांच दिवशीं भरत असून ते निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या दिवशीं भरत; शिवाय एका प्रांतांत विकत घेऊन दुसऱ्या प्रांतांत माल विकणारे फिरते व्यापारी त्यांच्यांत असतच; ही पुढच्या स्थितीची पहिली पायरी होय. आतां हें स्पष्टच आहे कीं कधींकधींच्या बाजारास रोजच्या बाजाराचें अशा रीतीनें स्वरूप येणें म्हणजे पुरवठ्याच्या ठिकाणाहून मागणीच्या ठिकाणीं माल संक्रान्त करण्याच्या लाटा नियमित रीतीनें वरचेवर येणें होय. पुढें जशी वस्ती वाढत जाईल व सुधारणा होत जाईल, तसें हें विभजन जास्तच जलद होऊं लागून त्यास अभिसरणाचें स्वरूप येतें. उदाहरणार्थ, मोठाल्या शहरांतून दररोज नवा माल सकाळीं येत जाऊन दुधासारखे पदार्थ तर दिवसांतून एकापेक्षां अधिक वेळां येऊं लागतात. शिवाय आगगाड्या वगैरे सुद्धां होऊन हे जिन्नस व माणसें जाण्या येण्याचे वेगहि वाढले जातात, आणि दिवसांतून माल व माणसें ह्यांच्या खेपाहि वाढूं लागतात. एवंच जें प्रथम विभजन मंद, दुर्बल, व अनियमित असें असतें तें नंतर जलद, नियमित व जोरदार कसें बनतें हें यावरून स्पष्ट दिसून येतें.

३६. आतां दळणवळणाचे मार्ग आणि त्यांतून होणाऱ्या हालचाली ह्यांच्यावरून दृष्टि काढून खुद्द फिरणाऱ्या प्रवाशांकडेच जर लाविली, आणि त्यांचीं स्वरूपें व निरनिराळ्या भागांशीं त्यांचे संबंध ह्यांचा जर विचार केला, तर आणखी साम्यें आपल्या दृष्टीस पडतात.

पोषकद्रव्य हें हलक्या प्राण्याच्या ठिकाणीं साधें असून उच्च प्राण्यांत तें त्या मानानें संमिश्र होऊन जा-

तें; म्हणजे त्याच्या शरीराच्या निरनिराळ्या भागांस लागणाऱ्या व त्यांनीं उत्पन्न केलेल्या सामान्य व विशिष्ट द्रव्यांचें तें एक विविध संमिश्रण बनलेलें असतें. एवंच हलक्या समाजांत मालाचे जे प्रवाह ठिकठिकाणाहून ठिकठिकाणीं चाललेले असतात, त्यांत संमिश्रता बहुतेक मुळींच नसते; पण जसें उच्च समाजांकडे जावें, तशी त्या प्रवाहांतील जिनसांची विविधता वाढत जाते. शिवाय, घटनाविषयक हें सादृश्य आणखी एका तऱ्हेनें आढळून येतें; कारण दोन्ही ठिकाणीं साधेपणा व कच्चेपणा एकत्र दृष्टीस पडतात, आणि संमिश्रता व पक्वता हींहि तशींच एकत्र आढळतात. हलक्या प्रतींच्या प्राण्यांमध्यें कच्चा पचनानें उत्पन्न झालेला पदार्थ तशाच कच्चा स्थितींत शरीराच्या निरनिराळ्या भागांसन्निध पाचक नळीच्या पसरलेल्या भागांतून जात असतो; पण उच्चतर प्राण्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या पदार्थांचे म्हणजे साखर, चरबी, प्रोटीनयुक्त पदार्थ, इत्यादिकांचें विभजन होण्यापूर्वीं स्वच्छीकरण होत असतें. आणि शरीरास उपयुक्त अशा पुष्कळ द्रव्यांचें रक्तांत मिश्रण होऊन तें जसें संमिश्रस्वरूप बनतें, आणि शिवाय त्या स्वच्छीकरणांत वगैरे अंग असलेले तांबडे व पांढरे कार्पसल किंवा कण त्याच्यांत उत्पन्न होऊन ही संमिश्रता जशी वाढते, तशीच अणुविषयक रूपान्तरें उत्पन्न करण्यास मदत करणारीं निरिंद्रिय द्रव्यें त्याच्यांत असल्यामुळें, आणि त्या रूपान्तरानें उत्पन्न केलेलीं निरुपयोगी व नासकीं द्रव्यें शरीराबाहेर निघून जाण्यासाठीं त्यांत मिसळल्यानें, ही संमिश्रता जास्तच वाढते.

तद्वतच हलक्या समाजांतील प्रवाह व उच्च समाजांतील प्रवाह ह्यांची तुलना करून पाहतां तेथेंहि असेंच दृष्टीस पडतें कीं त्याच्यांत संमिश्रता जी उत्पन्न होते ती खाण्यास व वापरण्यास योग्य अशा पदार्थांची संख्या वाढूनच मुख्यत्वेंकरून होते, आणि सामाजिकजीविताचीं कित्येक निरुपयोगी व नासकीं उत्पन्नें जरी फिरणाऱ्या प्रवाहांत न मिसळतां जमिनीखालच्या द्वारांतून निघून जात असतात, तरी दुसरीं कांहीं तसलीं उत्पन्नें ज्या दळणवळणमार्गांनीं खाण्याचे व वापरण्याचे सामान्य पदार्थ येत असतील, त्याच मार्गांनीं निघून जात असतात. आतां मालाच्या सामान्य प्रवाहांवर स्थानिक रचनांच्या काय क्रिया घडत असतात हें आपणांस पाहणें आहे. सजीव शरीरामध्यें निरनिराळीं इंद्रियें त्यांच्यामधून वाहणाऱ्या द्रव्यांतून आपल्या पोषणासाठीं लागतील तीं द्रव्यें घेत असतां, जीं इंद्रियें द्रव्यें उत्पन्न करणें व तीं काढून टाकणें ह्या कामांत गुंतलेलीं असतात तींहि जीं विशिष्ट द्रव्यें बाहेर टाकीत असतात किंवा इतर द्रव्यांशीं संयुक्त करीत असतात तीं रक्तापासूनच घेतात. तोंडांतील लाळ उत्पन्न करणारी सूक्ष्म नलिका जीं द्रव्यें रक्तांतून ओढून घेते त्यांतून असा एक द्रव उत्पन्न करिते कीं, त्याच्या योगानें स्टार्च या द्रव्याची साखर बनते, आणि अशा रीतीनें ती अन्नाच्या पुढील पचनास मदत करिते; तद्वतच पाचक सूक्ष्मनलिका आम्ल वगैरे पदार्थ तयार करून ओकतात; तद्वतच यकृत् हें इंद्रिय रक्तांतील नासकीं कांहीं द्रव्यें पृथक् करून तीं पित्ताच्या रूपानें आंतड्यांत ओतितें; बरें, ह्या सर्व इंद्रि-

यांचे निरनिराळे घटक आपापल्या क्रिया करूनच राहतात, वाढतात, व जास्त जास्त होतात. समाजाच्या इंद्रियांचेंहि असेंच आहे. पुढें सांगावयाच्या बंधनाखालीं तीं सर्व इंद्रियें वांटल्या जाणाऱ्या मालाच्या प्रवाहांतून त्यांस पोषणास जरूर तेवढे भाग काढून घेत असतां, त्यांच्या पैकीं जीं लहान-मोठे कारागिरीचे कारखाने चालवीत असतील तीं सर्वत्र वाहत असलेल्या मालाच्या संमिश्र प्रवाहांतून लागतील तीं द्रव्यें घेऊन त्यांजवर आपली कारागिरी चालवीत असतात; आणि ते ते जिन्नस तयार झाले म्हणजे वरील प्रवाहांत ते पुनः मिसळून देत असतात. आपणास ह्या क्रिया ज्या क्रयविक्रय रूपानें दृग्गोचर होत असतात तें रूप अमळ एकीकडे ठेवून, त्यांजकडे केवळ ती एक भौतिक सरणीच आहे ह्या दृष्टीनें पाहतां आपल्या असें ध्यानांत येतें कीं, प्रत्येक उद्यमविषयक रचना तिच्या रस्त्यांतून जाणाऱ्या अनेक द्रव्यांस स्पर्शहि न करतां, ज्या द्रव्यांवर कांहीं क्रिया करण्यास योग्य असेल तेवढीच त्या मिश्र प्रवाहांतून ती काढून घेते, आणि सर्वांच्या उपयोगासाठीं ज्या वस्तु तिनें तयार केल्या असतील त्या ती फिरत्या वस्तुप्रवाहांत टाकून देते.

बरें, दोन्ही ठिकाणीं प्रतिस्पर्धा ही आहेच हीहि गोष्ट ध्यानांत आणिली पाहिजे. प्रतिस्पर्धा ही केवळ समाजांतच दृष्टीस पडते असें जरी सामान्यतः सर्व लोक समजतात, तरी ती सजीव शरीरामध्येंहि दृष्टीस पडतेच; मात्र निरनिराळ्या क्रिया करणाऱ्या भागांमध्यें ती जितकी स्पष्ट दृष्टीस पडते तितकी एकच क्रिया करणाऱ्या भागांम-

ध्यें दिसत नाहीं. शरीरांतून वाहणाऱ्या एकंदर पोषक-द्रव्यसंचयास सर्व शरीराचें पोषण करावयाचें असतें. प्रत्येक इंद्रिय या सामान्य संचयाचा कांहीं भाग आपल्यांतील घीस भरून काढणें व आपली वाढ करून घेणें ह्या कामासाठीं ओढून घेत असतें. अर्थात् प्रत्येक इंद्रिय त्या संचयाचा जेवढा भाग घेईल तेवढ्यानें बाकीच्यांकरितां शिल्लक राहणारा संचय कमी होत असतो. सर्व इंद्रियें पृथक् पृथक् व संयुक्तरीत्या रक्ताकरितां प्रत्येक इंद्रियाशीं स्पर्धा करीत असतात. म्हणून प्रत्येकाचें हित जरी इतर सर्वांच्या हितावर अप्रत्यक्षरीत्या अवलंबून असतें, तरी प्रत्यक्षरीत्या प्रत्येक इतरांस विरोध करीत असतें. यामुळें असें होतें कीं, मेंदूची क्रिया फार वाढल्यास तिकडे इतकें रक्त निघून जातें कीं पचनक्रिया बंद पडते; उलटपक्षीं, पुष्कळ जेवल्यावर पचनेंद्रियाची रक्तावर मागणी इतकी वाढते कीं, मेंदूंतील रक्त कमी होऊन झोंप येऊं लागते; तद्वतच अत्यन्त जोराचे श्रम केल्यास चलनेंद्रियांकडे रक्त फार जाऊन पचनास विघ्न येतें, किंवा विचार व ( मनो ) विकार हीं कमी होतात, किंवा दोन्ही बंद होतात. ह्या गोष्टींवरून जशी प्रतिस्पर्धा सिद्ध होते, तसेंच असेंहि सिद्ध होतें कीं एकाद्या भागावर मागणी केल्यानें त्याच्या व्यापाराला जी तेजी येते तिच्यावर, त्या भागाकडे रक्त वाहून जाणें ही गोष्ट अवलंबून असते. पुढें आपल्या असें दृष्टीस पडणार आहे कीं, ह्या स्पर्धाविषयक व्यवस्थेच्या संबंधानें मागणी व पुरवठा ह्यांच्यामध्यें समतोल ह्याच्यापेक्षांहि जलद उत्पन्न

करण्याची व्यवस्था वरिष्ट प्राण्यांमध्यें असते; मुख्यत्वें-करून त्यांच्या त्यांच्या क्रियावत्तेच्याच मानानें निर-निराळ्या भागांना रक्ताचा पुरवठा कमजास्त होत असतो. रोगरूपी वाढी आपल्याकडे फार रक्त ओढून घेतात इतकेंच नव्हे, तर त्याची वांटणी करण्याकरितां आप-ल्यांत रुधिराभिसरणजाल उत्पन्न करीत असतात; ह्या-वरून शरीराच्या एकाद्या भागीं नवीन टिस्स्यू उत्पन्न झाल्यास त्यास द्रव्यांचा जास्त पुरवठा होण्यास तेवढेंच कारण कसें बस्स होतें हें स्पष्ट दिसतें. आतां समाजामध्यें व्यक्तीच केवळ नव्हत तर स्थानिक व सामान्य लोकवर्गहि मालाच्या एकंदर संचयांतून मिळेल तेवढा भाग ओढून घेत असतात, आणि सामान्यतः त्यांच्या त्यांच्या निरनिराळ्या क्रियावत्तांच्याच मानानें हीं त्यांचीं ओढून घेण्याचीं सामर्थ्यें कमजास्त असतात, हें आपण दररोज पाहतोंच. बाहेरगांवीं पाठविण्या-साठीं किंवा देशांतल्याच उपयोगासाठीं लोखंडाची कमी जरूर लागल्यास कारखानदार भट्ट्या विझवून टाकि-तात, कामकऱ्यांस रजा देतात, आणि पोषणांसाठीं लागणाऱ्या वस्तूंचा पहिल्यापेक्षां लहान प्रवाह त्या प्रांताकडे जाऊं लागतो; तेणेंकरून त्या प्रांताच्या वाढीस धक्का बसून, स्थिति तशीच कायम राहिल्यास त्याची अवनतिहि सुरू होते. कापसाची महर्गता झाल्यानें लोंकरीच्या कापडाला ज्यास्त मागणी उत्पन्न झाल्यास तें तयार करणाऱ्या कारखान्यांची क्रियावत्ता वाढून त्यांच्याकडे ज्यास्त कच्चा माल जाऊं लागून त्यांच्या-तून तयार झालेला मालहि पूर्वीपेक्षां ज्यास्त जाऊं

लागतो इतकेंच नाहीं, तर त्या प्रांताकडे माणसें, द्रव्य, खाण्यालेण्याचे पदार्थ, इत्यादि सर्व प्रकारचे जिन्नस ज्यास्त जाऊं लागतात; आणि त्यामुळें जुन्या कारखान्यांचे आकार वाढून नवे उत्पन्न होऊं लागतात. आतां हें उघडच आहे कीं प्रत्येक व्यक्तिविषयक इंद्रियाप्रमाणें प्रत्येक समाजविषयक इंद्रियांत ही जी सरणी दृष्टीस पडते, ती पोषणविषयक सामान्य द्रव्यसंचयांतून मिळेल तितकें द्रव्य ओढून घेण्याची जी त्याच्या घटकांची प्रवृत्ति तिजपासून उत्पन्न होत असते; आणि हेंहि उघडच आहे कीं यामुळें केवळ घटकांघटकांतच नव्हे, तर इंद्रियाइंद्रियांतहि उत्पन्न होणारी जी चढाओढ तिजमुळें सजीव शरीराप्रमाणें समाजामध्येंहि असें घडून येतें कीं, इतरांच्या जरूरीसाठीं ज्या भागांस फारच क्रियावत्ता दाखवावी लागते, त्यांचें पोषणहि फार होऊन त्यांची वाढहि तशीच होते.

३७. आतां ह्या सादृश्यांबरोबर कांहीं भेदहि उत्पन्न होत असतातच, आणि ते व्यक्तिविषयक देहाची संयुक्तता आणि सामाजिक देहाची वियुक्तता ह्यांच्यांतील प्रारंभींच सांगितलेला जो भेद त्यामुळेंच उत्पन्न झालेले असतात. पैकीं शेवटीं जें सादृश्य सांगितलें त्याबरोबरच जो भेद दिसत असतो त्याचें निरूपण प्रथम करूं.

व्यक्तिविषयक शरीरघटकांप्रमाणें समाजघटक जर बहुतेकांशीं विशिष्ट विशिष्ट स्थानबद्ध असे असते, तर त्यांच पोषणहि त्यांच्याच सारखें झालें म्हणजे, पोषकद्रव्याचे त्यांचे वांटे त्यांच्या शेजारालाच आणून भागलें नसतें, तर प्रत्यक्ष त्यांचे घरींच आणून द्यावे लागले असते. ज्या

पद्धतीनें कांहीं प्रकारचीं खाद्यें कांहीं वाहनसाधनांनीं दररोज प्रत्येकाच्या घरीं जात असतात, ती पद्धति सार्वत्रिक करावी लागली असती. पण समाजघटकांचीं रहावयाचीं गांवें व घरें जरी निश्चल असतात, तरी ते स्वतः चल असल्यामुळें त्यांना होणारा पुरवठा कांहीं अंशीं वर सांगितल्याप्रमाणें आणि कांहीं अंशीं त्यांच्याच उद्योगानें होत असतो. शिवाय ह्याच सामान्य कारणामुळें ह्या दोन ठिकाणीं फिरत्या प्रवाहांना गति मिळण्याचे जे मार्ग त्यांमध्येंहि भेद उत्पन्न होतो. व्यक्तिविषयक शरीराच्या भागांचा प्रत्यक्ष संयुक्तभाव असल्यामुळें आकुंचन पावणाऱ्या एका इंद्रियाच्या द्वारा पोषक द्रव पुढें पुढें ढकलीत नेणें शक्य होतें; पण सामाजिक शरीरांत असल्या संयुक्ततेचा अभाव असल्यामुळें, आणि आवश्यक अशा घटकांच्या रूपान्तराचीहि त्याच्या ठिकाणीं वाण असल्यामुळें, त्यांतील मालाच्या प्रवाहांचें प्रगमन अशा रीतीनें होणें शक्य नाहीं.

तथापि हे भेद लक्षांत आणिल्यानंतर आपल्या असें ध्यानांत येतें कीं त्यांच्या योगानें मुख्य सादृश्यांत कांहींसाच कमीपणा येतो. दोन्ही ठिकाणीं जोंपर्यंत भागांचें विभिन्नीकरण मुळींच उत्पन्न झालेलें नसतें, तोंपर्यंत त्या भागांमध्यें दळणवळण ठेवणाऱ्या मार्गांची मुळींच जरूरी नसते; आणि विभिन्नीकरण झाल्यावरहि जोंपर्यंत भाग अगदीं निकट संयोगानें राहत असतात, तोंपर्यंत संक्रमणसाधनांची आवश्यकता उत्पन्न होत नाहीं. पण प्राणिविषयक किंवा समाजविषयक श्रमविभाग जेव्हां इतका उत्पन्न होतो कीं, कांहीं अंतरांवरचे भाग सहक्रिया

करूं लागतात, तेव्हां विभजनमार्ग व विभाजकशक्ती ह्यांच्या उत्पत्तीची आवश्यकता उत्पन्न होते; आणि नंतर इतर इंद्रियसमूहांच्या वाढीबरोबरच विभाजक इंद्रियसमूहाची वाढ व्हावी लागते.

सारख्याच जरूरीमुळें दोन्ही ठिकाणीं प्रवहणेंहि सारख्याच रीतीनें वाढत जातात. दुर्बल क्रिया, अल्प प्रमाणावर विनिमय, संक्रान्तीप्रत अडचणी, ह्या सर्व कारणांमुळें, कधीं ह्या ठिकाणीं व कधीं त्या ठिकाणीं, अशा रीतीनें फार मंद व अनियमित अशीं पूरणें व रिक्तभाव होण्यापलीकडे प्रथम जास्त कांहीं उत्पन्न होत नाहीं; पण भागांची संख्या वाढत जाऊन, त्यांचे व्यापार जसजसे जास्त विशिष्ट व अतएव जास्त चांगल्या रीतीनें होऊं लागतात, आणि तेणेंकरून जास्त मोठा जीवितसंचय उत्पन्न करूं लागतात, तसतशी नियमित दिशांनीं मोठालीं विभजनें उत्पन्न होण्याची आवश्यकता वाढत जाते. म्हणजे, अनियमित, दुर्बल, व पुष्कळ अंतरानें होणाऱ्या मंद गतींच्या ऐवजीं, सारख्या चालणाऱ्या स्थानिक मागण्यांमुळें नियमित व जलद असा तालबंध उत्पन्न होतो. दुसरें असें कीं, व्यक्तिविषयक किंवा समाजविषयक समुदाय जसजसा जास्तजास्त संकीर्ण होत जाईल, तसतसे त्याच्यांत वाहणारे जे प्रवाह तेहि जास्त जास्त संमिश्र होत जातात; म्हणजे, त्या प्रवाहांतून प्रथम थोडकीं कच्चीं अशीं द्रव्यें असून पुढें पुष्कळ पक्क द्रव्यें उत्पन्न होतात. शिवाय दोन्ही ठिकाणीं पोषणास आवश्यक द्रव्यें उत्पन्न करणाऱ्या रचनांचे ह्या प्रवाहांशीं सारखेच संबंध दृष्टीस पडतात;

म्हणजे त्या रचना ज्या कच्च्या द्रव्यांवर त्यांस स्वव्यापार करावयाचे असतील तीं द्रव्यें त्या प्रवाहांतून ओढून घेतात, आणि स्वतः उत्पन्न केलेले पदार्थ प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या त्या प्रवाहांत टाकीत असतात; आणि दोन्हीहि ठिकाणीं ह्या रचना खाद्य द्रव्यांच्या वाहत्या संचयांतून आपापले वांटे घेण्यासाठीं एकमेकांशीं स्पर्धा करीत असल्यामुळें, त्यांना त्यांच्या त्यांच्या क्रियावत्तांच्या मानानें तो तो वांटा मिळवून आपआपली घीस भरून काढण्यास व वाढण्यास सांपडतें.

अत्यन्त सामान्य रीतीनें सांगितलें असतां ह्या ठिकाणीं जें सत्य आपणास ध्यानांत ठेवणें आहे तें असें आहे कीं, व्यक्तिशरीराप्रमाणें समाजशरीरामध्यें विभाजक इंद्रियसमूहाची वाढ त्याच्या परास्परावलंबी भागांमध्यें संक्रमणाची ज्या मानानें जरूर असेल त्या मानानें होत असते. सभोंवतालच्या वस्तूंशीं बाह्य व्यापार करणारे व पोषणासाठीं आवश्यक त्या द्रव्यांशीं अंतर्व्यापार करणारे असे जे मूळचे दोन इंद्रियसमूह, त्यांच्यामध्यें हा समूह असल्यामुळें, त्याची रचना त्या दोन सगळ्याच्या सगळ्या समूहांमध्यें आणि त्यांपैकीं प्रत्येकाच्या पोटविभागांमध्यें हा वहनव्यापार चालविण्यास योग्य अशी असते.

---

# प्रकरण नववें

## नियामक इंद्रियसमूह

३८. व्यक्तिविषयक व समाजविषयक मोठे इंद्रियसमूह प्रथमतः एकमेकांपासून कसे भिन्न होत जातात हें ध्यानांत आणतांना आपण असें लक्षांत आणिलें होतें कीं, बाह्य व अंतर्भागांना त्यांच्या स्थानानुरूप जे व्यापार करणें जरूर पडत असतें त्यांस योग्य असे ते भाग बनत जातात. पैकीं बाहेरच्यांस सभोंवतालच्या क्रिया व कर्ते ह्यांच्यांशीं व्यवहार करावा लागत असतो, व आंतल्यास आंत घेतलेल्या द्रव्यांशीं व्यवहार करावयाचा असतो. अंतरिंद्रियांचा ज्या द्रव्यांशीं संबंध येतो त्यांच्या स्वरूपांस व विभजनांस अनुसरून त्या इंद्रियांचें उत्क्रमण कसें होत असतें हें आपण अगोदरच पाहिलें आहे. म्हणून सभोंवतालच्या वस्तूंच्या गुणविशेषांनुरूप बाह्य व्यापार करणाऱ्या रचनांचें उत्क्रमण कसें होतें हें आतां पाहिलें पाहिजे.

ह्या ठिकाणीं ज्या सामान्य गोष्टीचें निरूपण करावयाचें आहे, तिचें ज्यास्त विशिष्ट रीतीनें कथन करावयाचें म्हणजे असें म्हटलें पाहिजे कीं, प्राण्यांचीं पोषक इंद्रियें आणि समाजांतील उद्यमसंस्था ह्यांना ज्या प्रमाणें पोषणाच्या कामीं उपयोगीं पडणाऱ्या सेंद्रिय व निरिंद्रिय पदार्थांशीं व्यवहार करण्यास योग्य अशीं रूपें

येत असतात, त्याप्रमाणेंच नियामक व खर्च करणाऱ्या इंद्रियसमूहांसहि ( म्हणजे प्राण्याचे ठिकाणीं ज्ञानतंतुविषयक व चलनवलन करणाऱ्या इंद्रियांस, आणि समाजाचे ठिकाणीं सरकारस्वरूपी व लष्करी संस्थांस ) सभोंवतालच्या व्यक्तिरूपी व समाजरूपी शरीरांशीं ( म्हणजे एके ठिकाणीं पकडावयाच्या किंवा टाळावयाच्या प्राण्यांशीं, व दुसऱ्या ठिकाणीं जिंकावयाच्या किंवा विरोध करावयाच्या समाजांशीं ) व्यवहार करण्यास योग्य अशीं स्वरूपें येत असतात. दोन्हींहि ठिकाणीं सगळ्या समुदायाला इतर समुदायांशीं विरोध करून वर्तन करण्याची जी योग्यता येते ती अप्रत्यक्ष रीत्या तसे विरोध केल्यानेंच उत्पन्न झालेली असते.

३९. गति मंद असणें म्हणजे शत्रूच्या तडाक्यांत सांपडणें होय; अंगीं चपळाई नसणें म्हणजे भक्ष्य धरण्यास चुकणें होय; दोन्ही प्रसंगीं मृत्यु हाच परिणाम उत्पन्न व्हावयाचा. दृष्टि तीक्ष्ण असल्यास वनस्पतिभक्षक पशूचें दूरच्या मांसभक्षक पशूपासून संरक्षण होतें; आणि गरूडाला अगदीं खालीं असलेल्या प्राण्यावर बिनचूक झडप घालण्यास तिची अगदीं जरूर आहे. कानांची तीक्ष्णता व नाकाचा तिखटपणा ह्यांचीहि गोष्ट अशीच आहे हें उघडच आहे; हल्ला व संरक्षण करण्याचीं नखें, दांत, शिंगें इत्यादि जीं साधनें आहेत, त्या सर्वांचेंहि असेंच आहे. आणि हेंहि तितकेंच खरें असलें पाहिजे कीं, जें ज्ञानतंतुजाल ज्ञानेंद्रियांच्या द्वारा येणाऱ्या माहितीचा उपयोग करून ह्या बाह्य क्रिया करण्याची चेतना उत्पन्न करितें, व त्या क्रियांना मार्ग दाख-

वितें, तें ज्ञानतंतुजाल आपल्या मालकास भक्ष्य, शत्रू व प्रतिस्पर्धी ह्यांच्याशीं प्रसंग येईल तेव्हां वरचढपणा प्राप्त करून देऊन स्वताची वाढ करून घेत असतें. ज्यांना केवळ बीजभूत डोळे व अल्पच चलनवलनशक्ती प्राप्त झालेल्या आहेत अशा हलक्या प्रतींच्या प्राण्यांवरून नजर काढून ज्यांस दूरदृष्टि, बरीचशी अक्कल, आणि पुष्कळसें चापल्य प्राप्त झालें आहे अशा वरिष्ट प्रतीच्या प्राण्यांकडे जर ती लाविली, तर असें स्पष्ट लक्षांत येतें कीं, ज्याठिकाणीं ह्या उणीवांमुळें पहिल्यांस जीवनाशाची आप्ति येते त्याच ठिकाणीं दुसऱ्यांस ह्या त्यांच्या श्रेष्ठपणांमुळें जीवसंरक्षण प्राप्त होतें. ह्या सगळ्याचा गर्भितार्थ असा निघतो कीं, ज्ञानेंद्रियें व चलनेंद्रियें ह्यांची, आणि त्यांचा उपयोग करणारें जें आंतील व्यवस्थापक यंत्रजाल त्याची, जी क्रमाक्रमानें सुधारणा होत जाते ती अप्रत्यक्ष रीत्या देहांच्या एकमेकांशीं होणाऱ्या चढाओढी व विरोध ह्यांपासून उत्पन्न होते.

राजकीय समुदायांतील उत्क्रमण कसें होतें, आणि परातिक्रम व स्वसंरक्षण ह्यांसाठीं ज्या साधनांचा तो समुदाय उपयोग करीत असतो त्यांची वाढ कशी होते, ह्या गोष्टीकडे नजर दिल्यास असलेंच सत्य दृष्टोत्पत्तीस येतें. सर्वत्र समाजांमध्यें होणाऱ्या ज्या लढाया त्यांपासून सरकाररूपी संस्थांची उत्पत्ति होते, आणि सभोंवतालच्या समाजांविरुद्ध समुदितक्रिया ज्यास्त चांगल्या करतां याव्या अशा ज्या सुधारणा त्या संस्थांत किंवा रचनांत होत असतात, त्यासहि कारण ह्या लढायाच अस-

तात. संयोगास उत्तेजन देणारीं हीं कारणें जेथें नसतील तेथील स्थितीचा प्रथम विचार करूं.

ज्या ठिकाणीं अन्न दुर्मीळ असून लोकवस्ती फार पातळ असेल, आणि त्यामुळें सहकारित्वाला जड येत असेल त्या ठिकाणीं कायमचा नाईक दृष्टीस पडत नाहीं. फ्यूजियन लोक, दक्षिण अमेरिकेंतील कायाग्वा किंवा रानइंदियन लोक, सीलोनमधील जंगलवेड्डा लोक, आणि दक्षिण आफ्रिकेंतील बुशमेन लोक, ह्यांची स्थिति अशीच आहे. ते संरक्षणासाठीं एकत्र मिळत नाहींत, व त्यांच्यांत ठरीव अधिकारीहि नाहींत. कांहीं दिवस कोणी तरी इतरांवर वरचढपणा करीत असतो ह्यापलीकडे त्यांच्यांत कांहीं दिसत नाहीं. तद्वतच एस्किमो लोक एकमेकांपासून फार दूर दूर राहत असून त्यांबद्दल हर्न साहेब असें म्हणतो कीं, ते अगदीं स्वतंत्रपणाच्या स्थितींत राहतात, व त्यांपैकीं कोणीहि इतरांवर अधिकार चालविल्याचें किंवा इतरांना नमून राहिल्याचें दिसत नाहीं; शिवाय त्यांना लढाई म्हणजे काय हें मुळींच माहीत नाहीं. तद्वतच चिपिवायन लोकांचा मुलूख नापीक असल्यामुळें त्यांच्या परस्परभेटी कधींकधींच होत असतात, आणि म्हणून त्यांच्यांतहि कायमच्या नाईकपणासारखें कांहींच दृष्टीस पडत नाहीं; श्रेष्ठ स्वभावामुळें एकाद्यास कांहीं दिवस कांहींसा वरचढपणा येईल तेवढाच, व तो अर्थात् फारच अल्प असतो.

अन्यत्र लोकांची वस्ती सांगण्यासारखी दाट होण्यास त्यांचे स्वभाव आड येत असतात; ते मंडळींतले मुळींच असत नाहींत, किंवा कोणास नमूनहि वागत नाहींत.

उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील आबोर नांवाचे डोंगरी लोक स्वतःच असें म्हणतात कीं, आह्मीं ज्यांस एका गुहेंत राहतां येत नाहीं अशा वाघांसारखे आहों; आणि म्हणून त्यांचीं घरें एकेक दोन दोन अशीं दूर दूर विखरलेलीं असतात. मलाया द्वीपकल्पांतील मंत्र लोकांचें असेंच आहे; ते भांडण झाल्याबरोबर लागलेच निराळे होतात. ह्या ठिकाणीं त्यांची विखरणी, व विखरण्याचा स्वभाव हीं दोन्ही त्यांच्यामध्यें राजकीय मुख्याचें उत्क्रमण होण्याच्या आड येतात. पण सरकाररूपी व्यवस्था असल्याच ठिकाणीं असत नाहीं असें नाहीं. तर ज्या टोळ्या स्थाईक असून बऱ्याच पुढें गेलेल्या असतील, पण युद्धशील नसतील, त्यांच्यांतहि असेंच दिसून येतें. आराफूरा व डार्लिंपल बेटवाले ह्या पापूअन् लोकांत नांवाचेच नाईक दृष्टीस पडतात. कारण ते लोक अशा समतेनें व शांततेनें एकमेकांशीं राहत असतात कीं, त्यांच्यांतील वडील माणसांच्या हुकमाव्यतिरिक्त त्यांस इतर शासनाची जरूरच भासत नाहीं. टोडा लोकहि असेच शांत, गरीब व स्नेहशील असल्यामुळें त्यांच्यांत लष्करी व्यवस्था मुळींच नसून राजकीय मुख्यहि कोणीच नाहीं. शांतिप्रिय बोडो व ढिमाल लोकांचें असेंच आहे; त्यांच्याबद्दल असें वर्णन आढळतें कीं, ते प्रामाणिक व सत्यवादी असून सूड, क्रौर्य, किंवा जबरदस्ती ह्यांपासून अगदीं मुक्त आहेत, व त्यांच्यांत नायकांचा अधिकार अगदीं नांवाचा असतो. तद्वतच लेप्चा लोक स्वभावानें फार गोडे व उपकारी आहेत असें सर जॉन हूकर

यानें वर्णन केलें असून, त्यांच्याबद्दल क्यांबेल साहेब असें म्हणतो कीं, ते विलक्षण प्रामाणिक व विलक्षण क्षमाशील असे असून त्यांना शिपायाचा धंदा मुळींच आवडत नसल्यामुळें ते हिंदुस्थानसरकारच्या सैन्यांत मुळींच शिरत नाहींत; आणि ते इतके अल्प नमून वागणारे आहेत कीं, अन्यायास मान वांकविण्यापेक्षां जंगलांत पळून जाऊन कंदमुळांवर राहणें त्यांस जास्त आवडतें.

आतां ही मुख्यविहीनस्थिति कशी बदलते, आणि राजकीय व्यवस्थेस कशी सुरवात होते हें पहा. एडवर्डस् म्हणतो कीं क्यारिब लोक शांततेच्या वेळीं कोणासहि आपला मुख्य म्हणून मानीत नसत; पण तो असेंहि म्हणतो कीं, 'अनुभवावरून त्यांच्या अशी गोष्ट लक्षांत आली होती कीं, लढाईत शौर्याप्रमाणेंच कोणाच्या तरी कह्यांत वागणें हें आवश्यक असतें.' तद्वतच हम्बोल्ट साहेब क्यारिब लोकांच्या टोळ्यांतील जुटींस उद्देशून असें म्हणतो कीं, ह्या लढवय्या लोकांस स्वसंरक्षणाव्यतिरिक्त समाज करून राहण्याची कांहीं जरूर भासत नाहीं. तसेंच क्रीक लोकांबद्दल स्कूलक्रॅफ्ट असें म्हणतो कीं, ते सर्वांवर कांहीं संकट आलें असेल तेवढें टाळण्या पलीकडे समाजबंधन ओळखीत नाहींत. तसेंच बॉनविक् असें म्हणतो कीं, टास्मेनियन लोकांत नाईक असत हें खरें आहे, पण ते निवडलेले नसत, किंवा वंशपरंपराहि नसत. तथापि लढाईच्या वेळीं ते त्यांस आपल्या टोळ्यांचे मुख्य म्हणून ओळखीत, आणि लढाई संपली म्हणजे पुनः रानांत शांतपणें राहाण्यास निघून जात. इतरत्र कायमचे

नाईक उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात. कॉट्झेब्यू असें म्हणतो कीं कामस्चाडले लोक मुख्य म्हणून कोणी ओळखीत नाहींत; आणि दुसरा एक असें म्हणतो कीं, त्यांच्यांत मुख्य अधिकार म्हटला म्हणजे वृद्ध माणसांचा किंवा विशेषतः शूर माणसांचा असे. आणि नंतर असें विधान आढळतें कीं, हीं विधानें त्या लोकांस रशियन लोकांनीं जिंकिलें त्या पूर्वींचीं, म्हणजे शत्रूविरुद्ध त्यांस एकजूट करावी लागण्यापूर्वींचीं, आहेत. दुसऱ्या टोळयांशीं भांडणें सुरू होऊन हा जो साधा नाईकपणा उत्पन्न होतो त्यास जातीजातींत ज्यास्त भांडणें होऊं लागलीं म्हणजे संयुक्त नायकीचें स्वरूप येतें. पाटागोनियन लोकांबद्दल फॉकनर असें सांगतो कीं, त्यांच्या टोळ्या जरी एकमेकांशीं सारख्या भांडत असतात, तरी त्या स्प्यानिअर्ड लोकांविरुद्ध वरचेवर एकत्र होत असतात. उत्तर अमेरिकेंतील इंदियन लोकांचीहि अशीच स्थिति आहे. त्यांच्यांतील सहा राष्ट्रांचें जें संयुक्त राष्ट्र बनलें, व बरेच दिवस एकमेकांस सहाय्य करावयाचें या पद्धतीवर एकत्र राहिलें, तें प्रथम इंग्लिशांशीं लढाई उत्पन्न झाल्यावरून अस्तित्वांत आलें. इतर समाजांशीं तंटे उत्पन्न होऊन सरळ नायकीस संयुक्त नायकीचें स्वरूप ज्या पायऱ्यांनीं येत जातें, त्यांचें उदाहरण पालिनिश्यन लोकांत दृष्टीस पडतें. सामोआ बेटांत “ आठ किंवा दहा गांव-वस्त्या एरवीं स्वतंत्र असून स्वसंरक्षणासाठीं तेवढ्या एकमेकींच्या अनुमतानें एकत्र मिळून एक प्रांत किंवा राष्ट्र बनवितात. जेव्हां

दुसरा एकादा प्रांत लढाईची भीति घालितो, तेव्हां कोणत्याहि एकट्या गांवास त्याच्याशीं लढतां येत नाहीं. यांपैकीं कांहीं प्रांतांचा किंवा राष्ट्रांचा राजा असतो; दुसऱ्यांस राजा म्हणून कोणी पसंत पडत नाहीं. सगळ्या समूहावर अधिकार चालविणारा राजा किंवा प्रांत त्यांच्यांत मुळींच नाहीं. तरी लढाईच्या वेळीं ते दोन दोन किंवा तीन तीन प्रांत एकत्र होतात." ग्रीक वगैरे प्राचीन काळच्या सुधारलेल्या लोकांच्या इतिहासावरून हीच गोष्ट व्यक्त होते. इस्रलाईट लोकांच्या पूर्वीं विभक्त असलेल्या टोळ्यांच्या मोआबाइट, आमोनाईट, ईडोमाइट व फिलिस्टाइन या लोकांशीं ज्या लढाया झाल्या, त्यावेळीं त्या एकत्र होऊन त्यांचें हीब्रचू राष्ट्र बनलें. आथीनियन राष्ट्रहि याच मुद्यावर वाढून एवढ्या प्रसिद्धीस आलें. पुढें ट्यूटन लोकांमध्यें राज्यांची वाढ अशीच झाली. ख्रिस्ती शकाच्या वेळीं त्या लोकांत निरनिराळ्या टोळ्यांचे निरनिराळे नाईक असत; आणि लढाईच्या वेळीं मात्र अनेक टोळ्यांचा एक नाईक तितक्यापुरता बनत असे. रोमन साम्राज्याशीं पहिलीं चार शतकें जे त्यांचे झगडे झाले त्यावेळीं अशीच स्थिति होती. पुढें पांचव्या शतकांत या लढाया फार दिवस सारख्या चालून त्यावेळचे लष्करी पुढारी, एकापेक्षां अधिक टोळ्या संयुक्त होऊन त्यांचे कायमचे राजे बनले.

आतां प्रथम कांहीं वेळचा लष्करी मुख्य उत्पन्न होऊन पुढें तो कायमचा बनणें, व हळूहळू त्यास राजकीय मुख्याचें स्वरूप येणें, ह्या गोष्टी ज्याअर्थीं शेजा-

रच्या समाजाशीं लढाया होऊन उत्पन्न होत असतात, त्याअर्थी त्यांचा लष्करी धंदा जसा सुरू राहील तशी त्यांची राजकीय सत्ता वाढत जाते. लुटारूपणाचा स्वभाव आणि स्वैच्छिक सत्ता ह्यांच्यामधील हा संबंध सर्वत्र दृष्टीस पडतो. एशिया खंडांत किरगीझ लोकांत ही स्थिति दृष्टीस पडते. ते गुलाम पकडणारे व लुटारू असून त्यांचे नाईक पूर्वीं जे निवडले जात असत ते आतां वंशपरंपरा झाले आहेत; ते फार जुलमी व स्वेच्छाचारी आहेत त्यांस मातापं असें म्हणतात. आफ्रिका खंडांत निआमनिआम लोकांत तीच स्थिति आहे; ते नरभक्षक असून त्यांच्या राजाची सत्ता अमर्याद आहे. आशान्टी व डाहोमे एथें अशीच स्थिति आहे. तेथीलहि लोक मोठे क्रूर असून तेथील राजांची सत्ता इतकी अमर्याद आहे कीं, तेथील मोठाले अधिकारी देखील राजाचे केवळ बंदगुलाम असतात. पोलिनिशियामध्यें फिजियन लोकांत तीच स्थिति आहे. त्यांच्या टोळ्या एकमेकींशीं नेहमीं भांडत असून त्यांच्यांत राजनिष्ठा इतकी शिखरास पोहोंचलेली आहे कीं, एका मुलखांतील गुलाम असें म्हणतात कीं, राजाचें खाद्य बनणें व स्वतास बळी देणें हें आमचें कर्तव्यच आहे.

जितका समाज युद्धशील तितकी राजकीय मुख्याची सत्ता जास्त, हा नियम प्राचीन व अर्वाचीन सुधारलेल्या राष्ट्रांच्या इतिहासांतहि दृष्टीस पडतोच. उदाहरणार्थ, आसिरियन व इजिप्शन लोकांच्या शिलालेखावरून ती गोष्ट व्यक्त होते, आणि पॉझेनियास सारखे सेनापति पुढें मोठे स्वेच्छाचारी अधिकारी बनतात, ही गोष्ट स्पार्टन लोकांच्याहि लक्षांत आली

होती. फौजांवर नेहमीं अंमल चालविल्यानें अंगीं स्वेच्छाचारी सत्ता चालविण्याची प्रबल वृत्ति कशी उत्पन्न होते हें नेपोलियनादि आधुनिक ऐतिहासिक पुरुषांतहि दिसून येतेंच.

एवंच ह्या ठिकाणीं जें अनुमान आपण बसवावयाचें तें हें कीं, ज्याप्रमाणें व्यक्तिशरीरामध्यें सभोंवतालच्या शरीरांशीं झगडा करणारें ज्ञानतंतु व स्नायु यांचें इंद्रियजाल तो झगडा करूनच उत्पन्न व वृद्धिंगत होतें, त्याप्रमाणेंच समाजांतील सरकार व लष्कर यांचें जाल समाजासमाजांत होणाऱ्या लढायांनींच प्रथम उत्पन्न होऊन त्याबरोबरच वाढत जातें. अथवा जास्त यथार्थरीतीनें बोलावयाचें असल्यास असें म्हटलें पाहिजे कीं, इतर समाजांविरुद्ध सहकारीभावानें योग्य झगडा करण्यास सरकारव्यवस्थेचा जो भाग त्या समाजास समर्थ करीत असतो त्याचें उत्क्रमण अशा रीतीनें होतें.

४०. आतां नियामक इंद्रियसमूहाचा विचार करूं. प्रथम सरकाररूप कर्तृत्वशक्तीस संमिश्र स्वरूप ज्या पायऱ्यांनीं येत जातें त्या पायऱ्यांकडे नजर फेंकूं.

लहान व अविभिन्नीकृत अशा व्यक्तिरूप व समाजरूप समूहांत व्यवस्था लावणारी सरकाररूपी रचना संमिश्र बनत नाहीं; तिची त्याला जरूरहि नसते, व ती बनविणारीं व पोसणारीं द्रव्येंहि त्याच्यांत नसतात. पण संयुक्तसमूहांत संमिश्रतेस सुरवात होते. दोन्ही ठिकाणीं कनिष्ठव्यवस्थापक स्थानांवर अंमल चालविणारें श्रेष्ठव्यवस्थापक स्थान उत्पन्न होऊन ह्या संमिश्रतेस सुरवात झालेली दृष्टीस पडते. प्राण्यांचे ठिकाणीं आन्युलोस

वर्गाचे जीव ह्याचें फार स्पष्ट उदाहरण आपणास पुरवितात. आनिलीड नांवाच्या तांबड्या रक्ताच्या व अनेक कड्यांच्या किड्यांत निरनिराळ्या कड्यांतील निरनिराळ्या ज्ञानतंतुरचना मुख्य तंतुपुंजाच्या किंवा पुंजांच्या धोरणानें चालतांना बहुतेक मुळींच आढळत नाहींत. पण ज्या उत्क्रमणानें निरनिराळ्या कड्यांचें संकलन व विभिन्नीकरण होऊन उच्चतर जातीचा आन्युलोस प्राणी बनत असतो, त्याच्या योगानें सर्वांच्या पुढें असणारें जें त्याचें आंग त्याच्या ठिकाणीं जास्त चांगल्या नमुन्याचीं ज्ञानेंद्रियें व क्रिया करणारीं टोंकें उत्पन्न होऊन, त्यांच्याशीं जुळलेला असा ज्ञानतंतुपुंजांचा गुच्छहि उत्पन्न होतो;आणि तो उत्पन्न होत जाईल तसा त्याचा मागील कड्यांतील तंतुपुंजांवरील अंमलहि वाढत जातो. शतपादासारखे जे या वर्गांतील अल्पसंकलित जंतु आहेत, त्यांच्या ठिकाणीं हें ज्ञानतंतुजाल जरी फारसें स्पष्ट दिसत नाहीं तरी उच्चतर प्रकारचे कवचीचे प्राणी आणि कोळी, विंचू वगैरे प्राणी इत्यादि संकलित वर्गांमध्यें हें जाल मोठें होतें. अर्धवट रीतीनें सुसंबद्ध असलेल्या संयुक्त सामाजिक समूहांपासून सुसंकलित समूहांकडे जसें जावें तशी हीच स्थिति दृष्टीस पडत जाते. आतां हें उघडच आहे कीं, समाजोत्क्रमणाच्या ज्या पहिल्या पायऱ्यांवर जिंकणाऱ्या टोळीच्या नायकास शेजारच्या टोळ्यांचे नायकांपासून जिवंत असे तोपर्यंत खंडणी तेवढी घेतां येते, त्या पायऱ्यांवर राजकीय व्यवस्थापन अल्पच असतें; म्हणून ह्या स्थानिक मुख्यांना संधि साधली म्हणजे हें किंचित्कालिक नियंत्रण झुगारून देऊन पुनः आपलें स्वातंत्र्य स्थापतां येतें. स्व-

तंत्र साध्या टोळीच्या स्थितीच्या पलीकडे गेलेल्या पुष्कळ जातींत निरनिराळ्या प्रमाणांनीं संयुक्तीभवन दृष्टीस पडत असून स्थानिक मुख्य एका सामान्य मुख्याचा अधिकार निरनिराळ्या प्रमाणांनीं मानीत आहेत असें दृष्टीस पडतें. सांडविच बेटवाले जेव्हां प्रथम सांपडले तेव्हां त्यांच्यांत राजा असून पूर्वी स्वतंत्र असलेले दंगेखोर लोक त्याच्या हाताखालीं आहेत असें आढळून आलें; ताहिती बेटांतहि तशीच स्थिति होती. न्यूझीलंदर लोकांत तीच स्थिति होती, आणि मालागासी लोकांत नंतर एक शतकपर्यंत तसेंच होतें. असल्या समाजांत राजकीय व्यवस्था कशी असते, हें प्रत्येक प्रांताचे लोकांवर सामान्य व स्थानिक शास्ते जो कमजास्त अधिकार चालवीत असतात त्यावरून लक्षांत येतें. उदाहरणार्थ, ताहितियन लोकांबद्दल आपण असें वाचितों कीं, प्रांताच्या मुख्याची सत्ता त्याच्या प्रांतांत श्रेष्ठ असून राजाच्या सगळ्या देशावरील सत्तेपेक्षां ज्यास्त असे. कूसा लोकांबद्दल लिटेन्स्टिन असें सांगतों कीं, नाईक व त्यांच्या हाताखालचे अधिकारी हे सर्व राजाचे अंकित असतात, परंतु लोक त्या नायकांना इतके अंधवत् चिकटलेले असतात कीं, ते त्यांच्याबरोबर आपल्या राजावर देखील उठतात. क्रूकशांक म्हणतो कीं, आशान्टीमधील एकाद्या नायकाचा गुलाम आपल्या धन्याच्या संमतीशिवाय राजाची आज्ञा बहुधा ऐकणार नाहीं. आणि आरॉकेनियन लोकांमधील तीनप्रकारच्या नायकांबद्दल टाम्सन असें म्हणतो कीं, जे नाईक लहान प्रांतावर अधिकार चालवितात त्यांची सत्ता वरिष्ट नायकांपेक्षां कमी अनिश्चित असते. यूरोपांत रा-

जापासून प्रथम जमिनी घेऊन बनलेले जे सरदार त्यांचे-हि अंकित ह्याप्रमाणेंच मुख्य राजापेक्षां त्या सरदारास-च ज्यास्त मानीत.

आतां विशेषेंकरून ध्यानांत आणावयाची गोष्ट ही कीं, स्थानिक शास्त्यांचें मुख्य अधिकाऱ्याला हें जें व-शीभवन चाललेलें असतें, त्याबरोबरच त्या संयुक्त समू-हाच्या घटकांचें इतर तसल्याच समूहांशीं चालणाऱ्या झगड्यांत सहकारित्वहि वाढत जात असतें. पंखांचे किडे आणि पंजांचे कवचीदार प्राणी वगैरे ज्या श्रेष्ठ जातीच्या आन्युलोसांचे त्यांस मुख्य ज्ञानतंतुगुच्छ उ-त्पन्न झाले आहेत म्हणून वर्णन केलें, त्यांमध्यें आणि पुष्कळ सारख्याच कड्यांचे आणि दुर्बल अवयवांचे जे क-निष्ट जातीचे आन्युलोस त्यांमध्यें जो भेद दिसतो, तो ह्या कनिष्ट प्राण्यांत मुख्य ज्ञानतंतुगुच्छ नसतात एव-ढाच दिसत नाहीं, तर त्यांच्या ठिकाणीं संरक्षण कर-ण्याचीं व हल्ला करण्याचीं साधनेंहि चांगलीं उत्पन्न झालेलीं नसतात. उच्च जातींमध्यें मागच्या कड्या ज्या-प्रमाणें पुढच्या कड्यांतील ज्ञानतंतुगुच्छाच्या धोर-णानें जास्त जास्त वागूं लागतात, त्याप्रमाणें पुढच्या भागाला असे कांहीं अवयव उत्पन्न होतात कीं, ते मा-गच्या एकंदर कड्यांचें भक्ष्य व शत्रू यांशीं जे व्यवहार चालतात ते चालले असतां त्यांचें ते रक्षण करितात; आणि ज्ञानतंतुविषयक रचनांचें मुख्य मेंदूशीं हें जें बंधन [illegible]न्न होतें तें त्या बाह्य अवयवांच्या सहकार्यानेंच [illegible]उत्थाप[illegible] राजकीय बाबतींत श्रेष्ठ सत्ता जी एका मुख्या-[illegible]धि[illegible]हातीं जाते ती अशाच रीतीनें जाते. जोंपर्यंत ल-

हान नाईक आपापसांतील तंट्यामुळेंच मोठ्या नायकाच्या कह्यांत राहत असतात, तोंपर्यंत त्याचा अधिकार डळमळीतच असतो; पण ज्या मानानें लहान-मोठे सर्व नाईक बाह्य शत्रूंशीं एकजुटीनें वागूं लागतील, त्या मानानें मुख्य नायकाचा अधिकार स्थिर होत जातो. फ्रेंचांशीं जर्मन संस्थानांची तीस पसतीस वर्षांपूर्वीं जी मोठी लढाई झाली, त्यावेळीं प्रशियाचा राजा सगळ्या संस्थानांचा बादशाह कसा बनून गेला, हें ध्यानांत आणतां वरील सत्याचें स्पष्टीकरण चांगलें होणार आहे.

संयुक्त समूहानें बाह्य क्रिया एकत्र मिळून केल्यानें अंतर्व्यवस्थेसाठीं संयुक्त शासनाची उत्पत्ति कशी होते, हें ध्यानांत आणावयास राष्ट्र व सैन्य हीं दोन्ही प्रथम एकत्र असतात हें लक्षांत आणावें. प्रत्येक प्राथमिक टोळींत जशीं सर्व माणसें लढाऊ असतात त्याप्रमाणें सुधारणेच्या पहिल्या पहिल्या पायऱ्या चढून जात असतां फौज म्हणजे गुलाम वजा करून बाकी सर्व वयांत आलेल्या लोकांचा एक जमावच असतो; म्हणजे, राजकीय अधिकार चालविणारे जे लोक तेच सर्व लढवय्येहि असतात. म्हणजे काय, तर, सैन्य म्हणजे युद्धास उठलेलें राष्ट्र, आणि राष्ट्र म्हणजे स्वस्थ बसलेलें सैन्य, अशी स्थिति असते. म्हणून जे लोक गांवीं असतां स्थानिक शास्ते असतात, आणि एका मुख्य पुढाऱ्याच्या धोरणानें सामान्य शत्रूशीं लढत असतां आपल्या अंकितांच्या जमावांचे अग्रणी असतात, ते राजकीय कामांत श्रेष्ठ अधिकाऱ्याच्या धोरणानें वागणारे कनिष्ठ अधिकारी बनतात; आणि श्रेष्ठाच्या कह्यांत राह-

ण्याची संवय ते जितकी जितकी शांततेच्या वेळीं कायम ठेवूं लागतील, तितकी तितकी लढाईच्या वेळीं उत्पन्न झालेली लष्करी व्यवस्था शांततेच्या वेळीं राजकीय व्यवस्था म्हणून कायम होऊं लागते.

परंतु मुख्यत्वेंकरून आपणास एथें गोष्ट ध्यानांत आणावयाची ती ही कीं, संयुक्त सामाजिकसमूह बनत असतां जी संयुक्त शासनपद्धति उत्पन्न होत जाते, त्या पद्धतीमध्यें पूर्वीं जे स्वतंत्र स्थानिक शास्ते होते ते परतंत्र स्थानिक शास्ते बनतात, आणि मुख्य शास्त्याचे ते हाताखालचे प्रतिनिधी बनतात; ज्याप्रमाणें वर सांगितलेले स्थानिक ज्ञानतंतुपुंज मस्तकांतील मेंदूचे अंकित बनून त्याचे धोरणानें वागूं लागतात.

४१. एक श्रेष्ठ शासनकेंद्र आणि दुसरें त्याचें अंकित शासनकेंद्र अशा रीतीची जी ही संयुक्तशासनपद्धति बनते, तिच्याबरोबर प्राणी आणि समाज ह्या दोघांमध्यींहि मुख्य केंद्राचा आकार आणि संमिश्रता हीं वाढत जात असतात.

प्राण्यामध्यें माहिती मिळवून देणारीं इंद्रियें आणि त्यांच्या धोरणानें वागणारे अवयव ह्यांची वाढ होत जाऊन, त्यांच्या सहकार्यानें भक्ष्य पकडण्याचें आणि शत्रूपासून पळून जाण्याचें काम जसजसें ज्यास्त चांगलें होत जाईल, तसतशी निरनिराळ्या प्रकारची माहिती जेथें आणावयाची, आणि जेथून चलनेंद्रियांना योग्य हालचाली करण्याबद्दल हुकूम सुटावयाचे, असें एक मुख्य स्थान उत्पन्न झालें पाहिजे; आणि ज्या मानानें इंद्रियें व अवयव यांचें उत्क्रमण वाढत जाईल त्या मा-

नानें हळूहळू ज्यास्त विविध होणाऱ्या माहितीचा उपयोग करणारा, आणि जास्त जास्त जुळलेल्या अशा संयुक्त हालचाली करविणारा हा जो मुख्य केंद्र, त्याला भिन्न भिन्न असे जास्त जास्त भाग उत्पन्न झाले पाहिजेत, आणि त्याचा एकंदर आकारहि वाढत गेला पाहिजे. अन्यूलोस ह्या प्राण्याच्या पोटकोटीकडून जसें वर जावें, तसा दृष्टिविषयक, श्रोतृविषयक, वगैरे बाह्य ठसे घेणाऱ्या ज्ञानतंतुपुंजांचा, आणि मुख्य पाय, पंजे, वगैरेना आपल्या कह्यांत ठेवणाऱ्या ज्ञानतंतुपुंजांचा, एकंदर समूह वाढत गेलेला दृष्टीस पडतो. आणि त्याप्रमाणेंच मणक्याच्या अगदीं हलक्या प्रतीच्या प्राण्यामध्यें स्थानिक पुंज असलेली बहुतेक सारखी ज्ञानतंतूंची दोरी दिसत असून, आणि तिच्यावर तावा ठेवण्यास मुख्य मेंदू मुळींच नसून, त्या प्राण्याकडून जसें वर जावें तशी शेवटीं आपणास अशी दोरी दृष्टीस पडते कीं, ती कनिष्ट केंद्रांच्या संकलित अशा संघाला जोडलेली असते, आणि त्यांच्यांतून उत्पन्न होणारे जे कांहीं वरिष्ट केंद्र त्यांचे हुकूम ह्या कनिष्ट केंद्रांच्या द्वारा सुटत असतात. समाजामध्येंहि असेंच होतें कीं, जी राजकीय संस्था सर्वांत श्रेष्ठ बनते तिला ज्यास्त व्यापार करण्यासाठीं ज्यास्त भाग उत्पन्न होऊन तिचा आकार व संमिश्रता हीं वाढत जातात. मुख्यांच्या मुख्याला अधिकार चालविण्यासाठीं मदतनिसांची जरूरी लागूं लागते. तो आपल्या सभोंवती कांहीं माहिती देणारे, कांहीं सल्लामसलत देणारे, आणि कांहीं त्याचे हुकूम बजावणारे, असे

लोक गोळा करूं लागतो. म्हणजे तो एकटाच अधिकारी नाहींसा होऊन अनेक अधिकाऱ्यांच्या संघाचा तो मधला गड्डा होऊन बसतो. ह्या संयुक्तीभवनव्यापारांत अस्थिरापासून स्थिराकडे प्रवृत्ति असलेल्या अनेक पायऱ्या दृष्टीस पडतात. सांडविच बेटांत राजा व सुभेदार ह्या प्रत्येकाच्या हाताखालीं अनेक नाईक असून ते त्यांचे हुकूम बजावीत असतात. ताहितियन राजाला सल्लामसलत देण्यास कांहीं नाईक असून एक मुख्य प्रधानहि होता; सामोआमध्येंहि प्रत्येक गांवनायकाचा एक मुख्य मंत्री असे. साध्या स्वताच्या अधिकारापासून गुमास्त्यांच्या द्वारा अधिकार चालविण्याची ही जी सरणी उत्पन्न होते, तिच्या अनेक पायऱ्या आफ्रिकेंत आपल्या दृष्टीस पडतात. बेचुआनामधील बीटज़ुआन लोकांचा राजा आपले हुकूम आपणच अमलांत आणीत असतो; ते इतके कीं शिक्षा दिलेल्या गुन्हेगारास फांशीहि तो स्वताच देत असतो. माटजापिन म्हणून याच देशांतील दुसरी एक जात आहे, तिच्यावरील राजाबद्दल लिकेन्स्टिन असेंच सांगतो. आणि ह्याच जातींतील बाचापिन म्हणून जें एक संस्थान आहे, तेथील राजाच्या भावाचें काम हें असतें कीं, जरूर लागेल तेथें राजाचे हुकूम नेऊन पोंचवावे, व ते अमलांत आणवावे. कूसा लोकांवर राजा व सुभेदार यांचा अंमल असून प्रत्येक सुभेदाराचे सल्लामसलतगार आहेत; आणि सर्व गांवच्या नायकांचें मिळून राजाचें कौंसिल बनलेलें आहे. झुलू लोकांचा राजा दोन निवडक शिपायांची मदत राज्य चालविण्याच्या

कामीं घेतो, आणि हे लढवय्येच देशांतील मुख्य न्यायाधीश होत. आफ्रिकेंतील मोठमोठाल्या राष्ट्रांत राज्य करणाऱ्या केंद्राचा आकार व संमिश्रता वाढविणारीं शेपटें पुष्कळ दिसतात. डेहामीमध्यें राजाला मदतनीस दोन मुख्य प्रधान व दुसरे अनेक कामगार असून शिवाय दोन न्यायाधीश आहेत, व त्यांपैकीं एक नेहमीं राजापाशींच असतो, व तो "जें जें कांहीं होईल तें तें राजास कळवीत असतो"; आणि बर्टन असें म्हणतो कीं, "प्रत्येक कामदाराच्या हाताखालीं एक दुय्यम असून त्याचें काम बातमी काढण्याचें असतें; राजा जरी न्याय करण्याच्या कामीं मदत करीत असतो, आणि त्याचे मांग चुकले म्हणजे शिरच्छेद कसे करावे हें जरी स्वतः तो त्यांस शिकवितो, तरी हीं कामें त्याच्या गुमास्त्यांच्या हातांत आतां बहुधा जात आहेत"; ज्याप्रमाणें वर वर्णिलेल्या संयुक्त ज्ञानतंतुरचनांमध्यें कांहीं केंद्र असे असतात कीं, त्यांस बाहेरची बातमी पोंचविली जाते, आणि कांहीं असे असतात कीं त्यांमधून ठरलेल्या गोष्टी अमलांत येत असतात. सुधारलेल्या राष्ट्रांतून असल्याच वाढी कशा होत गेल्या आहेत, इंग्लंदामध्येंच "विजेता" विल्यम ह्यानें जस्टिसियर नांवाचा एक अधिकारी नेमून त्याच्या हातीं कायदा व पैका ह्यांचें मुख्य काम कसें दिलें, आणि त्याच्या हाताखालीं फडणिसादि सेक्रेटरी कसे नेमिले, हळू हळू जस्टिसियरचा मुख्य प्रधान कसा बनला, आणि त्याच्या हाताखालच्या लोकांचें वरिष्ठ कोर्ट कसें बनलें, आणि ते न्याय व पैका यांचीं कामें करून कायदे सुधा-

रण्याचींहि कामें कसे करूं लागले, आणि अशा रीतीनें कारभारीवर्गाची आकारवृद्धि व संमिश्रतावृद्धि कशी झाली, ह्या गोष्टी एथें सविस्तर सांगण्याचें प्रयोजन नाहीं. त्यासंबंधानें इतकेंच ध्यानांत ठेवावयाचें कीं, मुख्य शासनकेंद्र मोठा होत असतां त्याचे विशिष्ट व्यापार करणारे भाग ज्यास्त होऊन तो ज्यास्त ज्यास्त संकीर्णस्वरूप होत जातो. आणि ज्याप्रमाणें ज्ञानतंतुविषयक उत्क्रमणामध्यें हुकूम देणाऱ्या व ते अमलांत आणणाऱ्या केंद्रांची किंवा पुंजांची संकीर्णता विशिष्ट प्रमाणानें वाढल्यावर विचार करणारे केंद्र उत्पन्न होऊं लागतात, आणि ते प्रथम कनिष्ट असून पुढें सर्वांत श्रेष्ठ बनतात; त्याप्रमाणें राजकीय किंवा कोणत्याहि उत्क्रमणामध्यें राजकीय कृत्यांच्या दूरवरच्या परिणामांचे विचार करणाऱ्या ज्या सभा असतात, त्या मुख्य शासनकेंद्राचीं लहानशीं शेंपटें म्हणून सुरू होऊन शेवटीं सर्वांहून जास्त महत्त्वाच्या बनतात. आतां हें उघडच आहे कीं, दोन्ही ठिकाणीं हे उच्चतम शासनकेंद्र सारखेच व्यापार करीत असतात. जसा माणसामध्यें डोक्यांतील मेंदू त्याच्या सामान्य वर्तनाला दिशा दाखविण्यामध्यें आणि मुख्यत्वेंकरून पुढील वर्तनाला दिशा पाहून देण्यामध्यें गुंतलेला असून, शरीराच्या सामान्य हालचाली आणि धोपट धंदे ह्यांना दिशा दाखविण्याचें काम आपल्यापेक्षां कमी प्रतीच्या, अधिक सरल, आणि जुन्या अशा केंद्रांकडे सोंपवीत असतो; त्याप्रमाणेंच राष्ट्रांतील विचार करणारी सभा निरनिराळ्या कारभारीवर्गांकडून होणाऱ्या धोपट कामांकडे लक्ष न देतां, राष्ट्राच्या

व्यापक गरजा आणि कायमचीं हितें ह्यांच्या संबंधेंच विचार करण्यांत गुंतलेली असते. आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, ह्या दोन्ही ठिकाणीं हे मुख्य केंद्र प्रत्यक्ष माहिती मिविळणारे नसतात, किंवा हुकूम सोडणारेहि नसतात; तर आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या गुमास्त्यांकडून माहिती मिळवून तिच्यावरून काय करावयाचें तें ठरवीत असतात, आणि दुसऱ्या कमी प्रतीच्या अधिकाऱ्यांकडून आपले ठराव अमलांत आणवीत असतात. मुख्य मेंदू हा इंद्रियज्ञान किंवा अवयवांच्या हालचाली ह्यांचा केंद्र नसतो; तर ज्ञानेंद्रियविषयक केंद्रांनीं आणिलेल्या माहितीचा उपयोग करणें हें त्याचें कर्तव्य असतें, आणि चलनविषयक केंद्रांनीं काय क्रिया करावयाच्या हें ठरविण्याचा त्याचा उद्देश असतो. त्याचप्रमाणें पक्कदशेस आलेली कायदे करणारी सभा स्वतः माहिती मिळविण्यास जरी असमर्थ नसते, तरी मुख्यत्वेंकरून अर्ज, वर्तमानपत्रें, कमिट्या व कमिशनें ह्यांचे रिपोर्ट, आणि निरनिराळ्या खात्यांचे मुख्य अधिकारी ह्यांनीं दिलेली माहिती, ह्यांच्याच धोरणानें ती विशेषतः चालत असते; आणि तिनें केलेले ठराव ती स्वतः अमलांत आणीत नसून हलक्या प्रतीचे न्यायखात्यांतील, दिवाणी खात्यांतील, वगैरे अधिकारी ह्यांच्या द्वारा बजावीत असते.

आणखी एक सहचारी गोष्टीस एथें उल्लेख करतां येईल. व्यक्तिविषयक व समाजविषयक मुख्य नियामक केंद्रांचें उत्क्रमण चाललें असतां, त्यांच्यापेक्षां जुने जे भाग असतात त्यांच्या क्रिया पहिल्यापेक्षां ज्यास्त

यंत्रवत् होऊं लागतात. साध्या ज्ञानतंतुपुंजांत ठसे घे-णाऱ्या व स्नायूंस हालविणाऱ्या दोन्ही प्रकारच्या बारीक दोऱ्या असून, तो पुंज कोणाच्या मदतीशिवाय व कोणाच्या बंधनाशिवाय ठसे घेऊन हुकूम सोडीत असतो; पण जेव्हां त्याच्या भोंवतीं दुसरे तंतुपुंज उत्पन्न होऊन त्यांपैकीं कांहीं निरनिराळे बाह्य ठसे आणूं लागतात, आणि दुसरे निरानिराळ्या क्रियांचे हुकूम अवयवांना नेऊन पोंहोचवूं लागतात, तेव्हां तो तंतुपुंज ह्यांच्यावर अवलंबी होतो, आणि कांहीं अंशीं पहिल्यांनीं आणिलेल्या माहितीस दुसऱ्यांच्या क्रियांच्या हुकमांचें स्वरूप देणारा गुमास्ता बनतो. आणि हे अंगभूत ज्ञानतंतु जसजसे वाढत जातील, आणि त्यांनीं मूलपुंजास पाठविलेले ठसे संख्या व वैविध्य ह्या बाबतींत वाढत जाऊन क्रियादर्शक केंद्रांतून जा-णाऱ्या हुकमांची संख्या जसजशी वाढत जाईल, तस-तसा हा मूलपुंज यंत्रवत् ठसे घेऊन योग्य क्रियां-चे हुकूम सोडण्याचें द्वार बनून जातें. उदाहरणार्थ, मणक्याच्या जीवांच्या तीन पायऱ्यांचा विचार करा. पहिल्या पायरीच्या प्राण्यांमध्यें पाठीच्या कण्यांतून जाणारी तेवढी ज्ञानतंतूची दोरी ( spinal ccrd) असून ती बहुतेक समस्वरूप असते, आणि तिच्या क्रमिक भागांस ज्ञान आंत आणणारे व चलनवलन कर-णारे ज्ञानतंतु जोडलेले असून ते शरीराच्या क्रमिक भा-गांची गरज पुरवीत असतात. सारांश, ह्या ठिकाणीं ही कण्यांतील दोरी मुख्य शास्ती असते. आतां ह्याच्या पेक्षां अंमळ वरच्या दर्जाच्या मणक्याच्या प्राण्यांमध्यें जें ज्ञा-

नतंतुजाल दिसतें त्यांतील मेडचूला ऑब्लँगेटा (medulla oblongata) हा कण्यांतील दोरीचा डोक्यांत गेलेला भाग, व त्या दोरीच्या अग्रभागाचा बाहेरून ठसे आणणारा ज्ञानतंतुगुच्छ, हे ठसे घेण्याच्या कामीं आपले आंग जास्त घालूं लागतात, व त्या ठशांस अनुसरून त्याच दोरीच्या मागच्या भागाच्या द्वारा अवयवांस हुकूम सुटूं लागतात; अशा रीतीनें कण्यांतील दोरीचें महत्त्व कमी होऊन तिचें कार्य यंत्रवत् व्हावयास लागूं लागतें; म्हणजे, बाहेरून ठसे आणणारे गुच्छ हे ह्या ठिकाणीं मुख्य शास्ते झालेले दृष्टीस पडतात. आणि पुढें ज्यास्त उत्क्रमण होऊन "सेरेब्रम" "सेरेबेलम" (cerebrum, & cerebellum) हे डोक्यांतील मेंदूचे पुढचे व मागचे भाग उत्पन्न हातात. तेव्हां ठसे घेणारे तंतुगुच्छ व त्यांस जोडलेले चलनवलन करणारे तंतुपुंज, हे केवळ ठसे घेणारे व हुकूम नेणारे दूत बनून पुढचे मागचे मेंदू श्रेष्ठ होतात. राजे, प्रधानमंडळें, आणि कायदे करणाऱ्या सभा यांचें असेंच होतें. मूळच्या राजकीय मुख्याचे व्यापार वाढून तो जसजसे आपल्या सभोंवतीं मुनीम जमवूं लागतो, आणि जसजसे ते राजाकडे माहिती आणून देऊन त्याचे हुकूम बजावूं लागतात, तसतसा तो ह्या मुनीमांच्या हातांत ज्यास्त ज्यास्त जाऊं लागतो, म्हणजे काय, तर, हे हेर व मंत्री त्याच्या बदल बऱ्याच अंशीं हुकूम ठरवूं लागतात, आणि कारभारी त्याच्या हुकमांत फेरबदल करूं लागतात. तात्पर्य, मूळच्या शास्त्याच्या द्वारा प्रधानमंडळच राज्य करूं लागतें. ह्याच्या नंतरच्या पायरीवर कायदे करणाऱ्या सभा

उत्पन्न होऊन प्रधानमंडळें त्यांच्याच धोरणानें वागूं लागतात; म्हणजे, त्या सभांतील प्रबल पक्षांच्या आधारावरच त्यांस प्रधानकीच्या जागा मिळाल्या असल्यामुळें, प्रधान म्हणजे त्या प्रबल पक्षांचे हुकूम बजावणारे गुमास्तेच बनतात. आणि त्याप्रमाणें प्रधानांचें विचार करण्याचें काम कमी होऊन हुकूम बजावण्याचें काम वाढत असतां, राजा तर केवळ यंत्रवतच बनूं लागतो. म्हणजे, राजाचे व्यापार कमिशनच्या द्वारा व्हावयास लागतात; राजाची संभाषणें प्रधान तयार करूं लागतात, व त्याच्या ऐवजीं पार्लमेंटापुढें वाचूनहि दाखवूं लागतात, आणि कायद्यास राजाची संमति घेणें म्हणजे एक केवळ फार्सच होऊन जातो. हें सत्य जसें इंग्लंदच्या अर्वाचीन इतिहासांत दृष्टीस पडतें, तसें प्राचीन आथीनियन लोकांच्याहि राजकीय, न्यायविषयक, व कारभारसंबंधी संस्थांची वाढ चालली असतां दिसत होतें: म्हणजे, तेथील जुने अधिकारी जरी कायम राहिले होते, तरी ते नव्या अधिकारीवर्गाचे अंकित बनून पहिल्या मानानें धोपट कामेंच तेवढीं त्यांच्या हातीं राहूं लागलीं होतीं.

४२. आतां नियामक इंद्रियसमूहांच्या सामान्य रचना आणि त्यांचे जे मुख्य नियमनकेंद्र त्यांच्या रचना ह्यांच्यावरून नजर काढून, हें नियमन चालविण्याचीं जीं साधनें त्यांजवर ती लाविली पाहिजे. कारण, व्यक्तिरूप किंवा समाजरूप समुच्चयाच्या कृत्यांस व्यवस्थित स्वरूप देण्यास केवळ नियामककेंद्र असला पाहिजे

एवढेंच नाहीं, तर ह्या केंद्रास समुच्चयाच्या निरनिराळ्या भागांवर आपली अंमल चालविण्यास संक्रमणसाधनेंहि असलीं पाहिजेत.

उच्चतर उच्चतर प्राण्यांकडे पाहत गेलें असतां, ज्यांच्यामध्यें हीं साधनें मुळींच उत्पन्न झालेलीं नाहींत अशा प्राण्यांपासून तों ज्यांच्यांत तीं पूर्णपणें उत्पन्न झालेलीं आहेत त्यांपर्यंत अशा प्रकारचे सर्व नमुने आपल्या दृष्टीस पडतात. स्पंज, थालासिकोली ( Thallassicolloe ) इत्यादि हलक्या प्रतीच्या प्राणिसमुच्चयांमध्यें शास्तें किंवा व्यवस्थापककेंद्र कोणत्याहि प्रकारचे नसून, त्यांच्या भागांभागांना त्यांचीं शासनें संक्रान्त करण्याचींहि साधनें मुळींच नसतात; आणि त्यामुळें बाह्यक्रियेला विरोध करण्यास त्या भागांची सहक्रिया कधीं होत नाहीं. हैड्रोझोआ ( जलचर सूक्ष्मजंतु ) व आक्टिनोझोआ ( पोंवळ्याचे वगैरे किडे ) ह्या प्राणिवर्गांना दृश्य व्यवस्थापककेंद्र नसूनहि, शरीराच्या निरनिराळ्या भागांचे ठिकाणीं अणुविषयक फेरफारांची संक्रान्ति होऊन त्यांच्यांत हळूहळू व्यवस्था लागत असतातः उदाहरणार्थ, त्यांच्या केंसांसारख्या तोंडावरील अवयवांस जोराचा स्पर्श झाल्यास सर्व शरीराचें आकुंचन होतें, आणि पोषकद्रव्याशीं त्या अवयवांचा संयोग झाल्यास ते हळूहळू त्याच्या सभोंवती आवळूं लागतात. ह्या ठिकाणीं भागांमध्यें कांहींतरी प्रभावाचें संक्रमण होऊन ते भाग सगळ्याच्या हितासाठीं मंद व दुर्बल अशी सहक्रिया करितात असें म्हणतां येईल. दगडावर किंवा समुद्राच्या तळीं खरपुटीसारखे वाढणारे जे पॉलीझोआ नामक

प्राणी आहेत त्यांच्यामध्यें ज्ञानतंतूच्या तातोळ्या स्पष्ट रीत्या उत्पन्न झालेल्या दृष्टीस पडतात, व त्यांजमधून प्रेरणेची संक्रान्ति झटदिशीं होत असते. म्हणून त्यांच्या ठिकाणीं एकाएकीं होणाऱ्या बाह्य क्रियांचा समाचार घेण्यास त्याच्या भागांचें सहकारित्व वरच्यापेक्षां ज्यास्त जलद उत्पन्न होतें. आणि तातोळ्यांची संख्या जशी वाढत जाईल व त्यांचे एकेमेकांशीं संबंध चांगले जुळले जातील, त्या मानानें ज्या नानाविध व्यवस्था पक्क झालेले ज्ञानतंतुकेंद्र घालून देत असतात, त्यांची शक्यता उत्पन्न होते. सामाजिक उत्क्रमणांत असल्याच पायऱ्या आहेत हें स्पष्टच आहे. ज्या प्रदेशांत राजकीय व्यवस्था नसून लोकांचे पुंज इकडे तिकडे विस्कलित पसरलेले असतात, त्या ठिकाणीं शत्रू आल्याची बातमी माणसों माणसीं संक्रान्त होत असल्यामुळें सर्व प्रांतभर पसरण्यास वेळ लागतो; आणि बातमी पोंचविण्याचीं व व्यवस्था करण्याचीं दोन्ही साधनें नसल्यामुळें शत्रूपासून स्वसंरक्षण करण्यास त्या लोकांच्या हातून सहकार्य होत नाहीं. पण स्वसंरक्षणासाठीं एकी बनवण्यापासून जी राजकीय व्यवस्था उत्पन्न होत असते तिच्याबरोबर दूरच्या दोस्तांच्या क्रियांवर वजन पाडण्याचेंहि सामर्थ्य उत्पन्न होत असतें. फ्यूजियन लोक देखील बातमी पसरविण्यासाठीं उंचवट्यांवरून मोठाले विस्तव पेटवीत असतात. तानीस लोकांप्रमाणें तास्मेनियन लोकहि असलेच विस्तव पेटवीत; आणि निरनिराळ्या भागांमध्यें अशा प्रकारचें अर्धवट सहकारित्व उत्पन्न करण्याची सरणी इतर असुधारलेल्या जातींतूनहि दृ-

ष्टीस पडते. जसजसें पुढें जावें तसतसें स्वसंरक्षण व परातिक्रम ह्यांसाठीं नानाप्रकारचे जास्त स्पष्ट समुदाय होत असलेले दृष्टीस पडूं लागून दूतांचीहि योजना झालेली आढळून येऊं लागते. उदाहरणार्थ, फिजियन लोकांमध्यें माणसास बातम्या व हुकूम देऊन पाठवीत असतात, आणि स्मरणार्थ कांहीं खुणांचा उपयोग ते करीत असतात. न्यूझीलंदर लोक लढाईच्या वेळीं भोंपळ्यांवर खुणा करून कधींकधीं दूरवरच्या टोळ्यांस बातम्या पाठवीत असत. प्राचीन अमेरिकेंतील पुढें गेलेल्या राष्ट्रांतहि हीच सरणी दृष्टीस पडे. उदाहरणार्थ, मेक्सिकन लोकांचे दूत सहा सहा मैलांच्या मजलांवर धांवत जात असत, आणि अशा रीतीतें तीनशें मैलांवर एका दिवसांत बातमी पोंचवीत, असें म्हणतात; आणि पेरूव्हियन लोकांमध्यें बंडाच्यावेळीं विस्तव व धूर ह्यांच्या खुणा असून शिवाय असलेच धांवते दूतहि त्यांच्यांत असत. पर्शियन लोकांत हे बातमी पोंचविणारे हेर घोड्यावरून जात असत. सारांश, प्रथम जी बातमी माणसोमाणशीं हळूहळू संक्रान्त होत असते, ती पुढें गेलेल्या समाजांत ठरीव रस्त्यांनीं ज्यास्त जलद जाऊं लागते; आणि तेणेंकरून लोकजमाव जलद व व्यवस्थित रीतीनें होण्याची शक्यता उत्पन्न होते. शिवाय ध्यानांत ठेवावयाची गोष्ट ही कीं, शासनपद्धतीच्या इतर भागाप्रमाणें ह्या भागाचीहि मूल उत्पत्ति, प्रतिकूल समाजांविरुद्ध जी एकजूट करावी लागते, तिच्या आवश्यकतेवरून होत असते. ज्याप्रमाणें अर्वाचीन काळीं स्काटलंदांतील हैलंदर लोकांतील टोळ्यांमध्यें जलद धांवणारा दूत हातांत

पेटलेला क्रूस घेऊन सर्वांस सशस्त्र होण्याची वर्दी पोंचवीत-असे, तसे प्राचीनकाळीं इंग्लिशलोकांमध्यें निरोप जे मुख्यत्वेंकरून खेळत असत ते राजे व त्यांचे गुमास्ते ह्यांजमध्यें खेळत असत, आणि ते बहुधा लष्करी कामांबद्दल असत. एरवीचे निरोप फारच मंद रीतीनें जात असत, आणि लष्करी निरोप तरी रस्ते वाईट असल्यामुळें फार जलद जात असत असें नाहीं. हा मंदपणा बरेच वर्षेपर्यंत कायम होता. इलिझाबेथ राणी मेल्याची बातमी सर्व इंग्लंदभर पसरावयास कित्येक महिने लागले; आणि पुढें क्रामवेलच्या वेळींहि जवळजवळ अशीच स्थिति होती. बरें, अशा वेळीं निरनिराळ्या भागांचें सहकारित्व उत्पन्न होण्यास जीं कारणें व्हावीं लागतात त्यांचा प्रसार मंदरीत्या होतो एवढेंच नाहीं; तर तीं कारणें त्या वेळीं अल्प असून बहुतेक समस्वरूप असतात; आणि पुढें तीं पुष्कळ व विविधरूपहि होतात. उदाहरणार्थ, एका अंमलदाराकडून दुसऱ्याकडे एका निरोप्यानें एकच राजकीय किंवा लष्करी निरोप पोंचविण्याच्या ऐवजीं अनेक पोस्टाचे शिपाई अनेक प्रकारचीं पत्रें अनेक ठिकाणीं व दिवसांतून अनेक वेळां पोंचवूं लागतात, आणि त्यांस साध्या व आगीच्या गाड्या यांची मदत होते. पुढें ज्यास्त पक्कतेस पावलेलीं अशीं आणखीं दोन साधनें प्रचारांत येतात. उदाहरणार्थ, इंग्लंदांत सुशिक्षित लोकांमध्यें पत्रें बरेच वरचेवर खेळूं लागलीं तेव्हां त्यापासून पुढें बातमीपत्राची उत्पत्ति झाली: हें बातमीचें पत्र म्हणजे कांहीं अंशीं छापील असा एक कागदाचा ताव असून तो एकादी महत्त्वाची गोष्ट घडली म्हणजे छापून

काढीत असत, आणि त्यावर नेहमीचें पत्र लिहिण्यास थोडी कोरी जागा असे. ह्यापासूनच पुढें कोरा भाग गाळून, आणि कधींविधींच्या ऐवजीं नियमित कालानें निघून, वर्तमानपत्राची उत्पत्ति झाली. आणि तें वर्तमानपत्र आतां आकारानें, बाहुल्यानें, विविधत्वानें आणि पौनःपुन्यानें, सर्वच तऱ्हांनीं वृद्धिंगत झालेलें आहे; आणि त्यामुळें बातमीच्या पूर्वीं ज्या दुर्बल व मंद लाटा दीर्घ व अनियमित कालावधीनें निघत असत, त्यांच्या ऐवजीं आतां बलिष्ट, नियमित व जलद अशा वर्तमानवीची फुटत असून त्यांच्या योगानें राष्ट्रांतील लाखों लोकांना दिवसांतून दोनदां, तीनदां, व चारदां, सर्व प्रकारच्या उत्तेजनपर व नैराश्यजनक अशा बातम्या मिळून तदनुसार त्यांच्या वर्तनांत योग्य असे फेरबदल झटझट होत आहेत. शेवटीं ह्याच्यापेक्षांहि फार जलद अशा बातम्या पोंहोंचूं लागतात, व तेणेंकरून सामाजिक, राजकीय, लष्करी, व्यापारविषयक, अशा अनेक कृत्यांचें योग्य नियमन होऊं लागतें. प्रथम उंच डोलकाठ्यांच्या योगानें खुणा करून दूर बातमी पोंचविण्याची चाल उत्पन्न होऊन, पुढें तिचें विजेच्या तारायंत्रांत पर्यवसान होतें; व त्याच्या योगानें सर्व दिशांनीं सर्व प्रकारच्या बातम्या अत्यन्त जलद जाऊं लागतात. शिवाय बातमी पोंचविण्याच्या ह्या नवीन रचनांमुळें समाजशरीर वियुक्त असूनीह त्यास संयुक्त अशीं जीं व्यक्तिशरीरें त्यांच्या इतकी, किंवा त्याहूनहि ज्यास्त योग्यतेचें स्वरूप धारण करण्याची, शक्ति आली आहे. समाजघटकांचे समुच्चय जरी वियुक्तस्वरूप असतात, तथापि

व्यक्तींमध्यें ज्ञानतंतूंच्या द्वारा जें प्रेरणासंक्रमण होतें, तें त्या घटकांमध्यें भाषेच्या द्वारा होत असतें हें पूर्वी एकदां ( कलम १० यांत ) सांगितलेंच आहे. पण समाज हा जर खराखुराच एक विस्तीर्ण देह असता, तर त्यांतून ज्ञानतंतूंच्या द्वारा एका भागांतून दुसऱ्या भागीं जितक्या जलद बातम्या किंवा प्रेरणा गेल्या असत्या, त्यापेक्षां समाजदेहांतून तारायंत्राच्या द्वारा ज्यास्त जलद बातम्या पसरतात. तार घेणें व देणें ह्यांना लागलेला वेळ धरून लंदन व एडिंबरो ह्यांचे दरम्यान बातमी जाण्यास जो वेळ लागतो तो त्या दोन शहरांमधील माणसांचे देह ज्ञानतंतूंनीं बद्ध असते, तर एकास दुसऱ्याचें मनोगत समजण्यास जितका वेळ लागता, त्याच्या एकचतुर्थांशच आहे. शिवाय हीहि गोष्ट आपण विसरतां कामा नये कीं, दोन्ही शरीरांच्या गरजांमध्यें सादृश्य असल्यामुळें बातमी पोंचविण्याच्या मार्गांमध्येंहि सादृश्य उत्पन्न झालेलें आहे. मोठमोठ्या सामाजिक केंद्रांतून अनेक तारांचीं जुडगीं बाहेर पडत असतात, आणि त्या जसजशा पुढें जातील, तसतसे त्यांतून लहान लहान जुडग्यांचे अनेक फांटे निघत असतात; आणि ह्या फांट्यांतून आणखी बारीक फांटे निघत असतात; प्राणिशरीरांमध्यें ज्ञानतंतूंचीं जुडगीं मेंदूंतून बाहेर पडून जसजशीं बाहेर त्वचेकडे येऊं लागतील, तसतसे त्यांनाहि असेच दुय्यम व तिय्यम फांटे फुटलेले आढळून येतात. शिवाय दुसरें एक साम्य असें दृष्टीस पडतें कीं, मुख्य केंद्रानजीक बातमी पाठविण्याचे हे मार्ग आगगाडीचा रस्ता व इतर रस्ते ह्या दळणवळणाच्या

मुख्य मार्गांच्या बाजूबाजूनेंच जात असतात, पण त्यांना जसे फांटे फुटत जातील, तशी ह्यांची त्यांची संगत सुटत जाते; त्याप्रमाणेंच मणक्याच्या प्राण्याच्या शरीराच्या मध्यभागीं ज्ञानतंतूंचीं मुख्य जुडगीं मुख्य रुधिरवाहिन्यांच्या बाजूबाजूनें जात असतात, पण त्वचेकडे जसें यावें तशी त्या दोघांची संगत कायम राहिलेली दिसत नाहीं. शिवाय दोन्ही ठिकाणीं ह्या दोहोंची नित्यसंगतहि सदृश्य ठिकाणींच दिसते; कारण शरीरांत रुधिराभिसरणाचें नियमन करण्यासाठीं प्रत्येक रुधिरवाहिनीबरोबर जसा एकेक ज्ञानतंतु गेलेला असतो, तशी प्रत्येक आगगाडीच्या मार्गाच्या बाजूनें एक तार सारखी गेलेली असते, व गाडीच्या व्यापाराचें एकंदर कमजास्त धोरण त्या तारेच्या बोलांवरच अवलंबून असतें.

शिवाय ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, दोन्ही ठिकाणीं हे बातमीमार्ग संरक्षक आवरणांनीं आच्छादित असतात. ह्या दोन ठिकाणीं जाणाऱ्या अणुविषयक लाटा जरी अगदीं विसदृश आहेत, तरी त्या विशिष्ट मार्गांनीं जाव्या हें दोन्ही ठिकाणीं आवश्यक आहे. आतां हवेंतून जाणाऱ्या तारांच्या संबंधानें हें संरक्षण जरी निराळ्या तऱ्हेनें केलें जातें, तरी जमिनींतून जाणाऱ्या तारांच्या संबंधानें तें एका अर्थी ज्ञानतंतूंच्या तातोळ्यांच्या सारखेंच असतें. ज्या अनेक तारांचें मिळून जुडगें बनलेलें असतें, त्यांतील प्रत्येकीला विद्युत्प्रवाहप्रतिबंधक आवरण घालून ती इतरांपासून पृथक केलेली असते; ज्याप्रमाणें एकाच भागांतून बाजूबाजूनें जाणारे ज्ञानतंतु त्यांच्या सभोंवतालच्या

पातळ पापुद्र्यांनीं एकमेकांपासून वियुक्त केलेले असतात.

ह्यावरून सामान्य सिद्धान्त असा निघतो कीं, सजीव शरीरांप्रमाणें समाजामध्यें निरनिराळ्या भागांचें परस्परावलंबित्व जसें वाढत जाईल, तसतसा त्यांच्यांतील नियामक इंद्रियसमूह जास्त जास्त स्वकार्यक्षम होत जावा लागतो; आणि तसा तो होण्यास शासनकेंद्र परिपक्क व्हावे लागतात इतकेंच नाहीं, तर त्यांचे प्रभाव सर्व शरीरभर पसरण्याचीं जीं साधनें तींहि परिपक्क व्हावीं लागतात. आणि आपल्या असेंहि दृष्टीस पडतें कीं, हें नियमन बरोबर होण्यास सेंद्रिय उत्क्रान्तींत जशीं बातमी पोंचविण्याचीं साधनें जास्त जास्त योग्य होत जातात, तशीं सामाजिक उत्क्रान्तींतहि होत जातात.

४३. आणखी एक विलक्षण व महत्त्वाचें साम्य ह्या दोघांमध्यें दृष्टीस पडतें. दोन्ही ठिकाणीं नियामक इंद्रियसमूहाचें उत्क्रमण चाललें असतां त्याचे दोन विभाग होतात, आणि शेवटीं कांहीं अंशीं स्वतंत्र असा तिसरा एक समूह उत्पन्न होतो; आणि ह्या समूहांच्या विभिन्नीकरणांचीं कारणेंहि दोन्ही ठिकाणीं सारखींच असतात.

मागच्या प्रकरणांतून ज्याचीं पुष्कळ उदाहरणें गेलीं आहेत असा इंद्रियोत्क्रमणाचा सामान्य नियम असा आहे कीं, व्यापार भेद म्हटले कीं तेथें रचनाभेद आलेच; व्यापारभेद जसजसे ठळक होत जातील, तसतसे रचनाभेदहि जास्त जास्त स्पष्ट होतात; ह्या तत्त्वास अनुसरून प्रथम उत्पन्न झालेल्या मुख्य इंद्रियसमूहामध्यें त्याच तत्त्वास अनुसरून दुय्यम भेद उत्पन्न होत असतात.

सारांश, व्यक्तिविषयक किंवा सामाजिक शरीरांत नियमनव्यापाराचे जर फार भिन्न असे दोन विभाग झाले, तर नियामक साधनांचेहि तसेच फार भिन्न असे दोन भाग झाले पाहिजेत, आणि ते आपापले व्यापार बऱ्याच स्वतंत्र रीतीनें चालवीत असले पाहिजेत; आणि तसे ते चालवितातहि.

चांगल्या वाढलेल्या प्राण्याचे ठिकाणीं मुख्य विभाग दिसतो तो परिस्थितीशीं व्यवहार करणारा बाह्येंद्रियसमूह आणि पोषणव्यापार चालविणारा अंतरिंद्रियसमूह ह्यांच्यामधील होय. चांगली परस्पर मदत होण्याकरितां ह्या एकंदर बाह्य व अंतिरिंद्रियांच्या व्यापारांमध्यें परस्परांशीं जुळणी असली पाहिजे इतकेंच नाहीं, तर प्रत्येक प्रकारच्या इंद्रियांच्या व्यापारांचीहि एकमेकांशीं जुळणी असली पाहिजे. भक्ष्य धरण्यास व शत्रूपासून पळण्यास प्रत्येक अवयवांचीं हाडें व स्नायु यांनीं एकत्र योग्य हालचाली केल्या पाहिजेत, सर्व अवयवांचेंहि योग्य सहकारित्व असलें पाहिजे; म्हणजे, स्पर्श, दृष्टि, व श्रवण या इंद्रियांना प्राप्त झालेल्या ठशांनुरूप त्या सर्वांचें वर्तन झालें पाहिजे आणि ज्ञानविषयक व क्रियाविषयक अशा त्या अनेक इंद्रियांच्या अनेक क्रियांचा समेट जमण्यास मोठी व संमिश्र अशी ज्ञानतंतूंचीहि एक सरणी उत्पन्न झालेली पाहिजे. पोषक इंद्रियांच्या क्रियामध्येंहि अशाच तत्त्वावर समेट उत्पन्न झाला पाहिजे. चावलेलें अन्न गळ्यांत गेलें असतां तें जर गिळलें गेलें नाहीं, तर पचनक्रिया सुद्धां होऊं शकणार नाहीं. पुढें पक्काशयांत अन्न गेल्यावर पोटाचीं आकुंचनें तेवढीं

उत्पन्न होऊन त्यांत मिसळावयाचे रस जर उत्पन्न होणार नाहींत, किंवा पाचक रसोत्पत्ति होऊन आकुंचनें उत्पन्न होणार नाहींत, तरी पचनक्रियेस विघ्न येईल. तद्वतच, आंतड्यास जोडलेल्या रसवाहिन्या जर आपापले रस पाहिजेत तितके उत्पन्न करणार नाहींत, किंवा अयोग्य वेळीं करतील, किंवा अयोग्य प्रमाणांनीं करतील, तर पचन अर्धवट होईल; आणि एकंदर व्यापार बनून येण्यास एकदम व क्रमानें ज्या अनेक गौण क्रिया व्हाव्या लागतात त्यांचेंहि असेंच आहे. म्हणून योग्य बातम्या पोंचवून योग्य उत्क्षोभ व बंधनें उत्पन्न करण्यास आणि अशा रीतीनें सर्वांचें सहकारित्व संभाळण्यास समर्थ अशी ज्ञानतंतुविषयक रचना उत्पन्न झाली पाहिजे. आतां हीं दोन प्रकारचीं सहकार्यें किती परस्परविभिन्न आहेत तीं पहा. बाह्य क्रियांत फेरबदल फार जलद व्हावे लागतात. शीघ्र हालचाली, एकदम दिशा बदलणें, एकदम थांबणें, इत्यादिकांची त्या ठिकाणीं जरूरी असते. अंगाचा समतोल संभाळण्यास, उडी मारण्यास, झडप टाकण्यास, अनेक स्नायूंचीं आकुंचनें अगदीं बरोबर झालीं पाहिजेत; कारण ह्या ठिकाणीं अनेक शक्त्यांशीं अनेक व अनेकविध व्यवहार करावे लागत असतात. शिवाय, तेच तेच संकीर्ण क्रियासमुदाय पुनःपुनः करण्याचा प्रसंग फारच क्वचित् येतो; कारण तीच तीच परिस्थिति पुनःपुनः फारच क्वचित् येत असते. आणखी असें कीं, जेव्हांतेव्हांच्याच गरजा भागवावयाच्या असतात असें नाहीं, तर कमज्यास्त दूरवरच्या भविष्यकाळच्या गरजांची देखील तरतूद करावयाची असते. अंतर्व्यवस्थेमध्यें अशा प्रकारचें

कांहीं एक नसतें. प्रत्येक जेवणानंतर त्याच त्याच क्रिया करावयाच्या असतात; व खाल्लेल्या अन्नाचा संचय, त्यांतील सत्त्व, आणि तें कमजास्त चावलें असेल तें प्रमाण, ह्यांच्या मानानें त्यांमध्यें काय तो फरक होत असतो. योग्य अशा क्रिया जलद, विशिष्ट, किंवा तंतोतंत मुळींच कराव्या लागत नाहींत; तर त्यांच्यामध्यें स्थूलप्रमाण व सामान्यव्यवस्था असल्या म्हणजे चालतें; कारण त्या क्रिया प्रारंभ, संचय, किंवा शेवट या बाबतींत तंतोतंत नसतात. म्हणून पोषक इंद्रियांसाठीं पुष्कळ अंशीं विभिन्न असें नियामक यंत्रजाल उत्पन्न होत असतें, व तें शेवटीं बाकीच्या जालापासून वस्तुतः पृथक् होऊन जातें. पचनेंद्रियें व रुधिरवाहिन्या यांस जोडणारें जें ज्ञानतंतुजाल, ज्यास "सिंपथेटिक् सिस्टिम" ( sympathetic system ) असें इंग्रजींत म्हणतात, तें प्रारंभीं कण्यांतील व डोक्यांतील मेंदूचे जालापासून उत्पन्न झालेलें असो,वा नसो,तें चांगल्या वाढलेल्या मणक्याच्या प्राण्यांत वस्तुतः त्या जालापासून पृथक् असतें. वरिष्ठ जाल (हें डोक्यांतील जालाचें नांव ) स्नायुरूप रचनांना हालवून खर्चाचा मुख्य भाग करीत असल्यामुळें, त्याचा ह्या जालावर जरी सतत प्रभाव चालत असतो, व ह्याचा जरी त्या जालावर चालत असतो, तरी दोघांचे व्यापार पृथक् पृथकच चाललेले असतात. त्यांचा एकमेकांवर जो प्रभाव चालतो तो सामान्य मागण्या व सामान्य नियंत्रणें ह्यांच्याच संबंधानें असतो. हृत्कमल व फुःपुसें ह्यांचें पोषक इंद्रियें व खर्चिक इंद्रियें ( चलनवलन करणारीं इंद्रियें ) यांच्याशीं सहकार्य होणें अगदीं अनिवार्यच

असल्यामुळें त्यांच्यावर मात्र वरिष्ट ज्ञानतंतुजाल व कनिष्ठ ज्ञानतंतुजाल ( सिंपथेटिक सिस्टिम ) यांचा विभक्त अंमल चालतो. बाह्य क्रियासाठीं जितका रक्ताचा पुरवठा पाहिजे असेल त्यामानानें वरिष्ट जाल हृत्कमलाचा उत्क्षोभ करीत असून, जेवणानंतर पचनासाठीं रक्ताच्या पुरवठ्याची जरूर लागली म्हणजे कनिष्ठ जालहि त्याचा उत्क्षोभ करीत असतें. आणि फुःपुसांचें प्रसरण कांहीं अंशीं बाह्येंद्रियसमूहांतील छातीच्या स्नायूंनीं होत असल्यामुळें, त्यांचीं चलनवलनें जरी बऱ्याच अंशीं वरिष्ट मेंदूवर अवलंबून असतात, तरी पोषक इंद्रियें स्वव्यापार करीत असलीं म्हणजे कनिष्ठ मेंदूहि त्यांचा (फुःपुसांचा) उत्क्षोभ करीत असतो. आणि ह्या सापेक्षतः नित्य अशा ज्या जीवविषयक क्रिया आहेत, त्यांचा कल नेहमीं बदलणाऱ्या बाह्य क्रियांचें जें ज्ञानतंतूपासून नियंत्रण होत असतें, त्यापासून भिन्न अशा नियंत्रणाखालीं जाण्याचा असतो हें दाखविण्यासाठीं एथें आपण असें सांगूं कीं, हृत्कमल व फुःपुसें ह्यांच्यावर चालणारे वरिष्ट मेंदूचें प्रभाव त्याच्या श्रेष्ठ नियामक प्रभावांहून पुष्कळ अंशीं भिन्न असतात; म्हणजे ते मुख्यत्वेंकरून प्रतिक्रियारूप व अज्ञात असे असतात. इच्छाव्यापारास हृदयाचें उडणें कमजास्त करतां येत नाहीं; आणि त्या व्यापारानें फुःपुसांची क्रिया जरी कांहीं वेळ कमजास्त करतां येते, तरी नेहमींच्या श्वासोच्छ्वासाच्या हालचाली अशा रीतीनें बदलतां येत नाहींत, तर निद्रा व जागृति ह्या अवस्थांत त्या स्वयंनिश्चितच असतात. शिवाय असें ध्यानांत ठेवावयाचें कीं, अत्युच्च किंवा मणक्याच्यां

प्राणिवर्गासंबंधानें हा जो ठळक भेद सांगितला, तो आन्युलोस वर्गाच्या उच्चतर जातींतहि दिसून येतो. कीटकांचीं देखील रुधिराभिसरण व पाचन ह्या संबंधांचीं ज्ञानतंतुजालें बाह्य क्रियांची व्यवस्था लावून देणाऱ्या जालांहून वस्तुतः भिन्न असतात. आणि अशा रीतीनें आपल्या असें नजरेस येतें कीं, प्राण्यांमध्यें व्यापारदृष्ट्या भिन्न अशा ज्या दोन पृथक् नियामक सरणी उत्पन्न होतात, त्या उच्चतर उत्क्रमणाच्या सहचारिणी असतात.

सामाजिक शरीरांच्या उत्क्रमणामध्यें अशाच प्रकारच्या कर्तव्यभेदावरून अशाच प्रकारचे रचनाभेद उत्पन्न होतात. नियामक इंद्रियसमूह हलक्या प्राण्याप्रमाणें हलक्या समाजांत एकेरा असून उच्च प्राण्याप्रमाणें उच्च समाजांत दुहेरा बनतो; आणि हे दोन समूह जरी नेहमीं एकमेकांत कमजास्तपणा उत्पन्न करीत असतात, तरी ते आपापले अंमल वस्तुतःस्वतंत्र रीत्याच चालवीत असतात.

इतर समाजांशीं होणाऱ्या झगड्यांत जय येण्यास चपळाई, जूट, आणि परिस्थिति बदलत जाईल त्याप्रमाणें वर्तन बदलण्याची क्षमता, हीं अंगीं असावीं लागतात. शत्रूच्या हालचालींची बातमी जलद पोंचवितां आली पाहिजे, विशिष्ट ठिकाणीं सैन्यें लवकर नेतां आलीं पाहिजेत; योग्य प्रकारचे जिन्नस योग्य प्रमाणावर पुरवितां आले पाहिजेत; लष्करी हालचाली अनुरूप अशा करतां आल्या पाहिजेत; आणि ह्या सर्व गोष्टी साधण्यास कोणी मुख्य शासनकेंद्र असून त्याच्या आज्ञा ताबडतोब पाळल्या गेल्या पाहिजेत. पोषण चालविणाऱ्या रचनांची गोष्ट ह्याहून अगदीं भिन्न असते.

त्यांच्या क्रियांमध्यें जरी कधीं कधीं, फेरबदल करावा लागत असतो, तरी त्यांच्या सामान्य क्रिया वरच्या मानानें समस्वरूप असतात, निरनिराळ्या जातींचीं खाद्यें जीं उत्पन्न करावीं लागत असतात त्यांच्यावरची मागणी फार अल्प मर्यादांच्या आंतच कमजास्त होत असते; वस्त्रांबद्दलच्याहि मागण्या बहुतेक नित्यच असतात, आणि त्यांच्या प्रमाणांत एकाएकीं बदल होत नसून हळू हळूच होत असतो. तात्पर्य, ह्या बद्दल कराव्या लागणाऱ्या व्यवस्थांस चपळाई, वैशेष्य, आणि तंतोतंतपणा यांची आवश्यकता नसते. म्हणून ह्यांना अन्य प्रकारची नियामक सरणी लागत असते. पोषक रचनासमूह उत्क्रान्त होत जाईल तसाच हा रचनासमूह उत्क्रान्त होत असतो. तो कसा वाढत जातो तें पाहूं या.

प्रारंभीं प्रारंभीं लोकांचे धंदे अशा प्रकारचे असतात कीं, त्यावेळीं संरक्षक क्रिया व पोषक क्रिया ह्यांच्यामध्यें विभागच करतां येत नाहीं, कारण त्या दोन्ही पुष्कळ अंशीं सारख्याच असतात. मणुन लोकांत कुटुंबें पारध एकत्र मिळून करीत, आणि सांपडेल तें सारखें वांटून घेत; ह्यावरून असें दिसतें कीं सर्वांच्या फायद्यासाठीं जनावरांशीं केलेली ही लढाई त्याच हेतूनें माणसांशीं केलेल्या लढाईशीं इतकी सदृश असे कीं, दोन्ही सार्वजनिक कृत्येंच असत. त्याचप्रमाणें कोमांची लोकांत टोळीच्या गुरांचें संरक्षण लष्करी संरक्षणाच्याच धोरणावरच चाललेलें असतें; आणि ज्या अर्थीं शत्रूंपासून गुरांचें सरंक्षण करण्याच्या ह्या कामीं सर्वांचें हित त्यांच्या स्वताच्या रक्षणाच्या कामांतील हितासारखेंच अ-

सतें, त्या अर्थी दोन्ही प्रकारचीं शासनेंहि एकच असतात. शिवाय कोणत्याहि प्रकारचा शास्ता असलेल्या साध्या टोळ्यांत कांहीं जो अधिकार वसत असेल, तो आवांक्याच्या संबंधानें अमर्यादित असून इतर क्रियांप्रमाणें उद्यमविषयक क्रियांवरहि चालत असतो. गुलामां ऐवजीं जर केवळ बायकाच असतील, किंवा जर एकादा दासवर्ग असेल, तर जे श्रेष्ठ माणूस बाह्य हल्ले व संरक्षण हीं करीत असतील, तेच त्या श्रम करणारांवरहि स्वतःच देखरेख करीत असतात; आणि ज्या ठिकाणीं हातीं बरीच सत्ता असलेला एक मुख्य नाईक उत्पन्न झाला असेल, तेथें तो लढाईतच अग्रणीत्व पत्करितो असें नाहीं, तर शांततेच्या वेळीं रोजच्या कामावरहि तोच नजर ठेवितो. गोण्ड, नाग, भिल, मिष्मी, कालमक, व पुष्कळ अन्य साध्या टोळ्यांमध्यें राजकीय व उद्यमविषयक शासनांचें हें ऐक्य दृष्टीस पडतें. कांहींसा भेद उत्पन्न होईल इतकी अंशतः प्रगति झाल्यानें ह्या दोहोंचें स्पष्ट विभिन्नीकरण होत नाहीं. उदाहरणार्थ, कुकी लोकांत राजा लोकांच्या श्रमावर आपला हक्क सांगून त्यांचें नियमन करीत असतो, एका खेड्यांतून दुसऱ्या खेड्यांत वस्ती नेण्याच्या कामावर नजर ठेवितो, आणि नव्या ठिकाणीं प्रत्येक कुटुंबानें किती जमीन साफ करावयाची ह्याची वांटणी करून देतो; सांताळ लोकांत नाईक हा लोकांच्या उद्योगधंद्यावर अर्धवट नजर ठेवीत असतो; आणि खोंड लोकांत तोच मुख्य व्यापारी असतो. पॉलिनिशियामध्यें अशीच स्थिति दृष्टीस पडते. न्यूझीलंदांतील नाईक शेतकी व घरें बां-

धणें ह्या कामांवर नजर ठेवीत असतात; सांडविच बेटवाल्यांमध्यें मार्कीट असून तेथील जिनसांचे दर नाईक ठरवीत असतात; टाँगामध्यें व्यापारावर नायकाचीच देखरेख असते; आणि काडायन लोक तांदळाची किंमत ठरवीत असतात. तद्वतच सेलिबीस बेटांत कामाचे दिवस राजाधिकारीच ठरवीत असतात, आणि घांट वाजली म्हणजे लोक कामावर जातात; तद्वतच पूर्व आफ्रिकेमध्यें पेरणी व कापणी ह्यांच्या वेळा नाईक ठरवितो; आणि आंतील नीग्रो लोकांत बाजाराची व्यवस्था नायकांच्याच सांगीप्रमाणें होत असते. अमेरिकेंत प्राचीन काळीं अशीच स्थिति होती, व हल्लींहि कांहीं ठिकाणीं आहे. दुसऱ्या कांहीं समाजांत, व विशेषतः बऱ्याच पुढें सरसावलेल्या समाजांत, राजकीय व धर्मविषयक शासनांच्या ह्या संयोगांत कांहीं फेरबदल झालेला दृष्टीस पडतो. अधिकारी समूह एरवीं पूर्वींसारखाच असून दुप्पट झालेला दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ, साकरन डायाक लोकांत दुसऱ्या दोन नायकांखेरीज एक व्यापारी नाईक असतो. डाहोमन लोकांत व्हिड्डा एथें एक व्यापारी नाईक आहे; आणि फीजी बेटांतहि सामाजिक व्यवस्था बरीच पुढें गेलेली असून तेथें एक उद्यमविषयक मुख्य आहे. नंतरच्या पायरीवर व्यापारी मुख्याला कडक देखरेख ठेवणाऱ्या सरकारी अंमलदाराचें स्वरूप येतें. प्राचीन ग्वाटिमालामध्यें एक सरकारी हपीसर बाजारनिरख ठरवीत असे; आणि मेक्सिकोमध्यें जमीन पेरल्याशिवाय राहूं नये असा बंदोबस्त एक अधिकारी करीत असे. यूरोपियन समाजांनाहि अस-

त्याच पायऱ्यांवरून जावें लागलें आहे. दहाव्या शतकापर्यंत फ्रान्सांतील प्रत्येक संस्थानांत अर्धवट बांधलेले असे कामकरी व कारागीर असत, त्यांच्यावर सरकारी अधिकारी असून त्यांना खाणें व सामानसुमान ह्या रूपांनीं वेतन देत असत. अकरा व चवदा या शतकांच्या दरम्यान धर्मसंस्थानांतील व इतर जमीनदार ह्यांपासून माल उत्पन्न करणें व तो विकणें ह्याबद्दल परवाने विकत घ्यावे लागत असत. पुढें सगळ्या देशाचा एक राजा बनला, तेव्हां श्रम करण्याचा हक्क हा राजाचा समजला जाऊन, तो तो हक्क विकूं लागला, व त्याची प्रजा तो विकत घेऊं लागली. आणि पुढें १७८९ सालची महाक्रान्ति होईतोंपर्यंत अमक्यानें अमका धंदा करावा, अमुक रीतीनें करावा, अमुक पदार्थ उत्पन्न करावे, इत्यादि हुकूम सोडण्याऱ्या अधिकाऱ्यांचा त्या देशांत सर्वत्र सुळसुळाट असे. तेव्हांपासून ही ढवळाढवळ फार कमी होऊन उद्योगांना राष्ट्राच्या जरूरीप्रमाणें निरनिराळें स्वरूप येत गेलें आहे. प्राचीन इंग्लंडांतहि राजकीय अधिकारी व धंद्यांचे अधिकारी हे एकच असत. विक्रया व विनियम ह्या गोष्टी सरकारी अंमलदारांच्या देखत कराव्या लागत. शेतकींचे व कळाकुसरीचे नमुने कायद्यानें ठरविलेले असत. जिनसांचे व मजुरीचे दर वगैरे ठरविणारीं स्थानिक कौन्सिलें सोळाव्या शतकापर्यंत तेथें होतीं. पण नंतर हे कायदे मोडत चालले, व्याजाबद्दलचीं बंधनें नष्ट झालीं, आणि व्यापाराकरितां जुटी करण्याची मोकळीक जास्त जास्त मिळूं लागली.

आतां ज्या प्रारंभीच्या स्थितींत मूळ अशा उद्योग-

संस्थांवर मुख्य नायकाचा अंमल असतो ती स्थिति, आणि ज्या पुढच्या स्थितींत त्यांच्यावर अर्धवट रीत्या पृथक् असा राजकीय अंमल चालू असतो ती स्थिति, ह्या दोन स्थितींशीं हल्लींच्या उद्योगधंद्यास प्राबल्य आलेल्या स्थितीची तुलना करून पाहूं लागलें तर असें दृष्टीस पडतें कीं, उद्योगधंद्याचें नियंत्रण हल्लीं वस्तुतः स्वतंत्रच आहे. हल्लीं सरकार मालाच्या किंमती ठरवीत नाहीं, किंवा माल उत्पन्न करण्याच्या पद्धतीहि घालून देत नाहीं. कांहीं धंद्यांबद्दल परवाने घ्यावे लागतात एवढी गोष्ट वजा करतां, लोकांस पाहिजे ते उद्योग करतां येतात, व पाहिजे तेथें माल विकतां येतो, व विकत घेतां येतो. किती जिन्नस पिकवावयाचा किंवा तयार करावयाचा ह्यावर हल्लीं कायद्याचें बंधन नाहीं. धंद्यांत सुधारणा करण्याबद्दल हल्लीं सक्ती नाहीं, किंवा माल तयार करण्याच्या वाईट पद्धतीबद्दल मनाई नाहीं; तर माणसांस उत्तम वाटेल त्याप्रमाणें धंदे करण्याची मोकळीक असून, कायदा त्यांस केलेले करार पुरे करण्याची तेवढी सक्ती करितो, व शेजाऱ्यांच्या हक्कांचें अतिक्रमण करण्याची मनाई करितो. तर मग लोकांच्या उद्यमविषयक चळवळी व राष्ट्राच्या गरजा ह्यांचा मेळ हल्लीं कोणत्या रीतीनें बसतो? तो बातमीच्या द्वारा बसतो; व ती बातमी निरनिराळ्या लोकांनीं तयार केलेल्या जिनसांच्या किंमती उतरून व चढून त्यांच्या द्वारा मिळते; त्याप्रमाणें ते माल कमजास्त तयार करूं लागतात, आणि लढाईची बातमी लागली म्हणजे सर्वच माल जास्त तयार करूं लागतात,

कारण तेव्हां खपहि पुष्कळ होऊं लागतो. मुख्य मुख्य शहरांतून देवघेवीवरून धान्य व गुरेंढोरें, कापसाचें व लोंकरीचें कापड, धातू व कोळसे, इत्यादिकांच्या किंमती ठरून मागणी व पुरवठा ह्यांच्यांत काय काय फरक होत आहेत हें व्यापाऱ्यांस कळतें; आणि त्यांच्या देवघेवीची बातमी वर्तमानपत्रद्वारा पसरल्यामुळें प्रत्येक ठिकाणाला आपला विशेष व्यापार कमजास्त करतां येतो. शिवाय, निरनिराळ्या प्रांतांतील उद्योगधंद्यांचें त्यांतील मुख्य शहरांचे द्वारा कांहीं अंशीं नियंत्रण होत असून, पुनः राजधानीच्या ठिकाणीं त्यांचे गुमास्ते व वखारी असतात; आणि तेथें मुख्य बाजार व देवघेव होत असते, आणि तेथें सध्यांच्या व पुढील सर्व प्रकारच्या मागण्यांचा असा कांहीं सामान्य आढावा निघत असतो कीं, त्यावरून सर्व उद्योगधंद्यांच्या चळवळींमध्यें योग्य समतोल उत्पन्न होत असतो. म्हणजे काय, तर, राजकीय नियमनसरणीखेरीज उद्यमविषयक नियमनसरणी ह्या ठिकाणीं उत्पन्न झालेली दिसते, व ती आपली व्यवस्था स्वतंत्रपणें संभाळीत असते; म्हणजे, तो एकप्रकारचा स्वतंत्र ज्ञानतंतुपुंजच असतो.

आधींच उल्लेखिल्याप्रमाणें दोन्ही ठिकाणीं कांहीं अंशीं ह्या दोन सरण्यांपासून भिन्न अशी एक तिसरी नियामकसरणी उत्पन्न होत असते. गरजांना अनुरूप अशी व्यापारांची एकदम मेळणी बसण्यास ज्या ठिकाणीं चळवळी उत्पन्न झाल्या असतील, त्या ठिकाणीं जरूर त्या मालाचे पुरवठे झटझट नेतां आले पाहिजेत. व्यक्तिविषयक किंवा समाजविषयक शरीरांतील एकाद्या इंद्रियास

एकदम मोठ्या प्रमाणावर व्यापार करण्याचा प्रसंग आला असतां, विभाजक प्रवाहांचा जो नेहमींचा संथ ओघ असतो त्याच्याच द्वारा जर पोषणार्थ किंवा पदार्थोत्पादनार्थ द्रव्यांचा पुरवठा होत राहील, तर त्याचा तो व्यापार लवकरच मंदावेल. वाढलेल्या मागणीस अनुसरून त्यास स्वव्यापार करतां येण्यास त्याच्या कृतींत खर्चीं पडणाऱ्या द्रव्याचा त्यास विशेष पुरवठा झाला पाहिजे–म्हणजे व्यापार करण्याच्या अगोदर त्यास "पतीवर द्रव्य" मिळालें पाहिजे. व्यक्तिदेहामध्यें रक्तवाहिन्यांच्या ताणाचें नियंत्रण करणारें जें ज्ञानतंतुजाल असतें त्याच्या द्वारा ही गोष्ट साध्य होत असते. ह्या जालाचे तंतु सर्व शरीरभर रक्तवाहिन्यांसमवेत पसरलेले असतात, व त्यांस उत्तेजन मिळेल त्याप्रमाणें ते त्या वाहिन्यांस ताणीत किंवा आंवळीत असतात. ह्यासंबंधानें लडविग् व लोव्हेन ह्या शास्त्रज्ञांनीं शोधून काढिलेला सामान्य नियम असा आहे कीं, जेव्हां बाह्य ठसे घेणारे ज्ञानतंतु शरीराचा एकादा भाग विशेष चळवळ करूं लागल्याबरोबर आंत त्याबद्दलचा ठसा पाठवून देतात, तेव्हां त्या भागाला त्यांतील रक्तवाहिनीनियामक ज्ञानतंतूंच्या द्वारा एकप्रकारचा प्रभाव परत मिळत असतो, व तेणेंकरून त्यांतील सूक्ष्म रक्तवाहिन्या एकदम प्रसरण पावतात; आणि त्याबरोबरच सर्व निष्क्रिय भागांतील रक्तवाहिनीनियामक ज्ञानतंतूंतून असा एक प्रभाव पाठविला जातो कीं, तेणेंकरून त्या वाहिन्या अंमळ आकुंचन पावतातः अशा रीतीनें नको असेल तेथें रक्ताचा पुरवठा कमी होऊं लागतो, अशासाठीं कीं पाहिजे

असेल तेथें तो जास्त व्हावा. समाजदेहांत हें नियमन व्यांका व भांडवल कर्जाऊ देणाऱ्या इतर संस्था ह्या करीत असतात. जेव्हां एकादा स्थानिक धंदा त्यानें उत्पन्न केलेल्या जिनसांचा विशेष खप होऊं लागल्या-मुळें एकदम तेजीला येतो, तेव्हां तो प्रथम स्थानिक पेढ्यांवर मागणी करितो, व त्या पेढ्याहि ती चळवळ योग्य आहे असें पाहून त्याला पैशाचा पुरवठा ज्यास्त सढळ हातानें करूं लागतात, आणि पुढें त्या धंद्याला आणखी तेजी आली म्हणजे, ती बातमी राजधानीच्या ठिकाणीं पोंहोचून तेथील पेढीवाले स्थानिक पेढ्यांच्या द्वारा त्या धंद्याला आणखी पैशाचा पुरवठा करूं लागतात, आणि अशा रीतीनें त्या ठिकाणीं जाणाऱ्या मालाच्या व माणसांच्या प्रवाहांना भरती येते. इकडे भांडवलाची ही स्थानिक मागणी पुरी करण्याकरितां अशा रीतीनें तेजीस न आलेले दुसरे धंदे ह्या धंद्याइतकें चांगलें व्याज देण्यास असमर्थ असल्यामुळें, त्यांस भांडवलाचे पुरवठे कमी होऊं लागतातः म्हणजे, त्यांच्या-कडे चाललेला द्रव्यप्रवाह अंमळ आकुंचन पावतो.

आतां हें लक्षांत ठेवावयाचें कीं, ही जी तिसरी नियामक सरणी आहे ती एका ठिकाणीं रुधिराभिसरण-नियामक ज्ञानतंतुरूप व दुसऱ्या ठिकाणीं द्रव्यरूप असून, ती वस्तुतः स्वतंत्र असते. अशा प्रकारचा पुरावा सांपडतो कीं, जसे स्थानिक द्रव्यविषयक केंद्र असतात, तसे स्थानिक रुधिराभिसरणनियामक ज्ञानतंतुकेंद्र असतात; आणि प्रत्येक ठिकाणीं एक मुख्य केंद्र असून तो ज्या इतर नियामक केंद्रांत गुरफटून गेलेला असे-

ल, त्यांपासून पृथक् म्हणून ओळखण्यास पंचाईत पडते, तरी त्याचा व्यापार स्वतंत्रच असतो. आमच्या बाह्यकृतींचें नियमन करणाऱ्या मुख्य नियामक सरणीशीं जरी तो बांधलेला असला, तरी त्या सरणीचा त्याजवर अंमल नसतो. एके ठिकाणीं इच्छाव्यापारानें हे रक्ताचे स्थानिक पुरवठे कमजास्त करतां येत नाहींत; आणि दुसऱ्या ठिकाणीं पूर्वीं जरी भांडवलाच्या हालचालींत कायदे धांदल उत्पन्न करीत, तरी हल्लीं ते त्याच्या वाटेस जात नाहींत: इतकेंच नव्हे, तर, मुख्य मेंदू व अवयव हे जसे रुधिराभिसरणनियामक केंद्रांचे गिऱ्हाईक असतात, तद्वतच सरकार व त्याच्या हाताखालच्या सर्व संस्था, ह्या ब्यांकांच्या गिऱ्हाईकच असतात. बरें, जी शासनपद्धति व्यक्तीच्या किंवा समाजाच्या पोषक इंद्रियांचें नियमन करिते, तिचा हा रुधिरभिसरणशास्ता एक भाग असतो असेंहि नाहीं. पोटांतील इंद्रियांना रक्त जें मिळतें तें रुधिरवाहिन्यांवर अंमल करणाऱ्या ह्या ज्ञानतंतुकेंद्रांच्या परवानगीनें मिळतें, बाह्यइंद्रियें जर जास्त श्रम करावयास लागतील तर आंतल्या इंद्रियांचा पुरवठा कापिला जातो; आणि त्याचप्रमाणें उद्यमविषयक संस्थांनाहि स्वतःच भांडवलाचा प्रवाह इकडे किंवा तिकडे नेतां येत नाहीं, तर ब्यांकांना त्यांच्याबद्दल जी कांहीं बातमी पोंहोचेल, तिच्या द्वारा तें काम त्यांस अप्रत्यक्षरीत्या करावें लागतें.

४४. एवंच दोन्ही प्रकारचे देह उत्क्रान्त होत जातील तसतसें त्यांच्या भागांचें परस्परावलंबित्व जें वाढत जातें, त्याच्या योगानें आणखी कांहीं साटश्यें त्या

दोघांमध्यें उत्पन्न होतात. परस्परसहाय्यकारी भागांच्या क्रियांचा जम बसविणाऱ्या साधनांव्यतिरिक्त त्यांचें सहकार्य दोन्ही ठिकाणीं अशक्यच असल्यामुळें, त्या व्यक्तिशरीराप्रमाणें समाजशरीरामध्येंहि एक नियामक इंद्रियसमूह उत्पन्न होतो; आणि निरनिराळ्या इंद्रियसमूहांचें जसें उत्क्रमण होत जाईल तसा हा समूहहि आपल्यांतच विभिन्नीकरण पावत जातो.

प्रारंभापासून अत्यन्त जरूरीचें सहकारित्व म्हटलें म्हणजे सभोंवतालचे शत्रू व भक्ष्य ह्यांच्याशीं व्यवहार करण्यास जें लागतें तें होय. म्हणून व्यक्तीमध्यें व समाजामध्यें पहिला जो नियामक केंद्र उत्पन्न होतो तो ह्या सहकार्याला साधन म्हणून उत्पन्न होतो; आणि ह्या सहकारित्वाचें चापल्य वाढत जाईल, तशी त्या केंद्राची वाढ ज्यास्त ज्यास्त होत जाते. साध्या समूहांच्या संकलनानें संयुक्तसमूह बनत असल्यामुळें दोन्ही ठिकाणीं श्रेष्ट नियामक केंद्र आणि गौण नियामक केंद्र उत्पन्न होतात, आणि श्रेष्ट केंद्र मोठे व्हावयास लागून संमिश्रहि बनूं लागतात. एकीकडे दुहेऱ्या व तिहेऱ्या रीतीनें संयुक्त झालेल्या समूहांमध्यें संमिश्रता व श्रेष्ठ गौणभाव ह्यांच्या आणखी वाढी दिसत असतां, दुसरीकडे त्यांच्यामध्यें जासुदी साधनांचीहि वाढ झालेली दिसून येऊं लागते, ती इतकी कीं सरते शेवटीं तीं क्षणांत बातमी पोंचविणारीं व क्षणांत हूकुम सोडणारीं बनून जातात.

बाह्य क्रिया चालविणाऱ्या इंद्रियांचें नियमन करणाऱ्या ह्या मुख्य नियामक इंद्रियसमूहाच्या जोडीस, उत्क्रमण चाललें असतां, दोन्ही ठिकाणीं, पोषणव्या-

पार चालविणाऱ्या अंतरिंद्रियांच्या नियमनासाठीं आणखी एक नियामक समूह उत्पन्न होतो; तो हळूहळू स्वतंत्र बनतो. सहजच तो पहिल्याच्या मागून उत्पन्न होतो. पोषकद्रव्यांचा पूर्णपणें उपयोग होणें हें कमी जरूरीचें असल्यामुळें, आणि त्यासाठीं लागणारी व्यवस्था वरच्या मानानें साधी असल्यामुळें, त्याचीं नियामक साधनें, भक्ष्य पकडणें व शत्रूपासून संरक्षण करणें ह्या कामीं लागलेल्या साधनांपेक्षां कमी जलदीनें वाढत असतात.

आणि तिसरा जो विभाजक इंद्रियसमूह तो जरी अर्थात् दुसऱ्या दोहोंच्या मागून उत्पन्न होत असतो, तरी त्यांची बरीच वाढ होण्यास तो अवश्यक असल्यामुळें, शेवटीं त्याला स्वतंत्र असें तिसरें नियामकजाल प्राप्त होतें.

---

# प्रकरण दहावें

## समाजप्रकार व समाजघटना

४५. व्यक्तिशरीरें व समाजशरीरें ह्यांच्या निरनिराळ्या पूर्व कारणांवर नजर फेंकल्यास दुसऱ्यांचें पहिल्यांसारखें स्पष्ट वर्गीकरण कां करतां येत नाहीं हें ध्यानांत येतें. हजारों पिढ्या विशिष्ट जातीचा वनस्पति किंवा प्राणी ह्याचें वस्तुतः एकच प्रकारचें जीवित चाललेलें असतें; आणि त्याच्या एकामागून एक अशा रीतीनें उत्पन्न होणाऱ्या घटकांना पूर्वजसंपादित योग्यस्वरूपें वंशपरंपरेनें प्राप्त होत असतात. पूर्वी सदृशस्वरूप असलेले प्राणी जेव्हां परिस्थिति बदलल्यामुळें भिन्नस्वरूप होतात, तेव्हां वंशजांमध्यें वाढत जाणारे भेद मूळच्या ऐक्यतेस वरवरच झांकीत असतात, व त्यामुळें अनेक उपजातींची मिळून एक जात ओळखण्यास व बनविण्यास कठीण पडत नाहीं. तद्वतच त्याच्याहि अगोदर उत्पन्न झालेले भेद त्यांच्या योगानें जातींचे प्रकार ( orders ) आणि प्रकारांचे वर्ग ( classes ) बनविण्यासहि पंचाईत पडत नाहीं. समाजांचें ह्याहून निराळें आहे. प्राथमिक माणसांचे जमावांत विभाग व पोटविभाग होऊन त्यांच्यामध्यें सारख्याच रीतीनें जीवित घालविणाऱ्या लहान अशा सामाजिक समुदायांच्या अनेक पिढ्या हलक्या प्रतीच्या रचना वंशपरंपरेनें पुनःपुनः धारण करतां-

ना दृष्टीस पडतात हें खरें आहे. पण उच्चतर सामाजिक समूहांमध्यें त्यांच्या निरनिराळ्या नमुन्यांची वृद्धि ह्यापेक्षां फारच कमी निश्चित रीतींनीं होत असते. जरी वसाहतींचा कल मूळ समाजांप्रमाणें बनण्याकडे असतो, तरी मूळ समाज इतके लवचीक ( सहज बदलणारे ) असतात, आणि वसाहतींवर त्यांच्या नव्या वसतिस्थानांचा प्रभाव एवढा मोठा असतो कीं, त्या दोहोंमध्यें रचनाभेद उत्पन्न होणें अनिवार्यच असतें. एकापासून दुसरा अशा रीतीनें उत्पन्न झालेल्या अनेक समाजांच्या परस्परसदृश जीवितक्रमांमध्यें स्थापन झालेल्या निश्चित व्यवस्थांच्या अभावीं पूर्ण वर्गीकरणांत अंतर्भूत होणाऱ्या स्पष्ट भेदांची होणारी उत्पत्ति व्हावयाची नाहीं.

तथापि दोन प्रकारचे मूल भेद समाजांमध्यें दृष्टीस पडतात; त्यांच्या आधारानें आपणास समाजांचें स्वाभाविकरीत्या वर्गीकरण करतां येणार आहे. प्रथम त्यांच्या घटनेच्या पायरीप्रमाणें सरल, संयुक्त, दुप्पट संयुक्त, व तिप्पट संयुक्त, असा त्यांचा आपणास विभाग करतां येईल; आणि पुनः, मुख्यत्वेंकरून युद्धशील आणि मुख्यत्वेंकरून उद्यमशील, असा कमी विशिष्ट रीतीनें त्यांचा विभाग करतां येईल. युद्धशील म्हणजे ज्यांच्याठिकाणीं हल्ला व संरक्षण ह्याबद्दलची व्यवस्था फारच जाड्या प्रमाणावर उत्पन्न झालेली आहे, आणि उद्यमशील म्हणजे ज्यांच्यामध्यें पोषणव्यवस्था फारच मोठ्या प्रमाणावर बनलेली आहे.

४६. अगोदर हें आपल्या नजरेस आलेंच आहे कीं,

सामाजिक उत्क्रमणास अल्प असे सरलसमूह बनून सुरवात होते; हे लहान समूह एकत्र होऊन त्यांहून बरेच मोठमोठाले समूह बनून अशा तऱ्हेनें तिची पुढची पायरी उत्पन्न होते; आणि ह्या मोठाल्या समूहांचें चांगलें संकलन झाल्यावर त्यांचें इतर तसल्याच समूहांशीं एकीकरण होऊन त्यांच्याहून मोठाले समूह बनतात. म्हणून आपल्या वर्गीकरणास पहिल्या किंवा सरलतम समूहापासून सुरवात झाली पाहिजे.

सरलसमाज कशास म्हणावें हें सर्वच ठिकाणीं अगदीं निश्चितपणें सांगतां येणार नाहीं; कारण उत्क्रमण पावणाऱ्या सामान्यतः सर्वच वस्तूंप्रमाणें समाजामध्यें सांक्रमिक पायऱ्या आढळून येत असल्यामुळें त्यांचे तंतोतंत विभाग करतां येत नाहींत. एकाद्या समुदायाचे संख्येनें वाढत जाणारे घटक ज्या अर्थीं हळूहळू पसरत व दूरीभूत होत असतात, त्या अर्थीं त्यांचे नवे बनणारे समुदाय केव्हां स्पष्टरीत्या पृथक् झाले म्हणून म्हणावें, हें सांगणें नेहमींच सोपें नसतें. एकादा समुदाय जर एकाद्या नापीक प्रदेशांत रहात असला, तर एकाच पूर्वजांचे वंशजांत, त्यांतील कुटुंबें बहुतेकांशीं जवळचींच नातलग असतांनाच, निरनिराळ्या ठिकाणीं रहावयास जाणें भाग पडतें; बरें तोच प्रदेश जर सुपीक असेल, तर तींच कुटुंबें वाढून बरींच दूरचीं नातलग बनेतोंपर्यंतहि त्यांचे संघ एकत्र राहूं शकतात. हे संघ हळूहळू पसरत जाऊन एकाच बंधनानें एकत्र झालेले असतात, व तें बंधन हळूहळूच दुर्बल होत जातें. हळूहळू अगदीं निराळ्या किंवा दूरच्या आप्त अशा पूर्वजांपासून उत्पन्न

झालेले गुलाम त्या समुदायांत येऊन पहिली भानगड उत्पन्न होते; आणि ह्या गुलामांस जरी राजकीय दृष्ट्या समाजघटक म्हणतां येत नाहीं, तरी समाजशास्त्राच्या दृष्टीनें त्यांस तसें समजलेंच पाहिजे. तद्वतच एकादी दुसरीं टोळी ह्या समुदायावर स्वारी करून जेव्हां तेथील प्रबल वर्ग होऊन बसते, तेव्हांहि अशाच प्रकारची संमिश्रता उत्पन्न होते. म्हणून आपणास असेंच केलें पाहिजे कीं, जो समाज एकेरा क्रियावान् गोळा बनलेला असून दुसऱ्या एकाद्या समाजाच्या कह्यांत नसेल, आणि ज्याचे भाग कांहीं सार्वजनिक कामासाठीं, नियामक केंद्राच्या धोरणानें किंवा त्याच्या अभावीं, एकजुटीनें वागत असतील किंवा सहकार्य करीत असतील, त्यास सरलसमाज म्हणावयाचें. पुढील कोष्टकामध्यें असल्या सरल समाजांचे होतील तितके स्पष्ट असे विभाग व पोटविभाग दिले आहेत.

## सरल समाजः—

| | |
|---|---|
| नायकविहीन. | **भटकणारेः**– ( पारधी ) फ्यूजियन लोक, कांहीं आस्ट्रेलियन लोक, रान-वेड्डा लोक, बुशमेन, चिपांग लोक, व नेपाळचे कुसुंदा लोक.<br>**अर्धवट स्थाईकः**–बहुतेक एस्किमो लोक.<br>**स्थाईकः**–आराफूरा लोक, वरच्या सारावाक नदीवरचे स्थलचर डायाक लोक. |
| कधीं कधीं नाईक असलेले. | **भटकणारेः**– ( पारधी ) कांहीं आट्रेलियन लोक व टास्मेनियन लोक. |

अर्धवट स्थाईकः– कांहीं क्यारिब लोक.
स्थाईकः–वरच्या रायोनीग्रो नदीवरील कांहीं वापी लोक.

अनिश्चित व अस्थिर नाईक असलेले.

भटकणारेः– ( पारधी ) आंदामानीज लोक, आबिपोन, स्नेक ( साप ) लोक, चिपिवायन लोक व कांहीं बिडुइन लोक.
अर्धवट स्थाईकः–कांहीं एस्किमो, चिनूक, हल्लींचे चिपोनाज् लोक, कांहीं कामस्‌चाडेल लोक, गांव वेड्डा-लोक, बोडो व ढिमाल लोक.
स्थाईकः–ग्वायनामधील लोक, मण्डन लोक, कोरोऍडो लोक, न्यूगिनी मधील लोक, तानीज्, वेतिअन्, डायाक, टोडा, नाग लोक, क्यारेन्स् व सांथाळ लोक.

स्थिर नाईक असलेले.

भटकणारेः–माहीत नाहींत.
अर्धवट स्थाईकः–कांहीं क्यारिब लोक, पाटागोनियन लोक, न्यूकालिडोनियन लोक, व काफर लोक.
स्थाईकः–ग्वाराणी लोक व पेव्लो लोक.

ह्या रानटी समाजांचा विचार करतां जे समाज जरी असंयुक्त ह्या दृष्टीनें परस्परसदृश आहेत, तरी आकार व रचना ह्यांनीं भिन्न आहेत, त्यांच्यामध्यें कांहीं सामान्य सहचारी विशेष दृष्टीस पडतात. ज्यांच्यामध्यें राजकीय व्यवस्था मुळींच नाहीं, किंवा फार अनिश्चित आहे, अशा समूहांमध्यें ज्या लहान भटकणाऱ्या टोळ्या रानांतून, किंवा नापीक प्रदेशांतून, किंवा समुद्रकांठानें थोडथोड्या सांपडणाऱ्या रानटी अन्नावर राहतात, त्या कनिष्ठ होत. ज्या ठिकाणीं लहान साधे समाज

झालेले गुलाम त्या समुदायांत येऊन पहिली भानगड उत्पन्न होते; आणि ह्या गुलामांस जरी राजकीय दृष्ट्या समाजघटक म्हणतां येत नाहीं, तरी समाजशास्त्राच्या दृष्टीनें त्यांस तसें समजलेंच पाहिजे. तद्वतच एकादी दुसरी टोळी ह्या समुदायावर स्वारी करून जेव्हां तेथील प्रबल वर्ग होऊन बसते, तेव्हांहि अशाच प्रकारची संमिश्रता उत्पन्न होते. म्हणून आपणास असेंच केलें पाहिजे कीं, जो समाज एकेरा क्रियावान् गोळा बनलेला असून दुसऱ्या एकाद्या समाजाच्या कक्षांत नसेल, आणि ज्याचे भाग कांहीं सार्वजनिक कामासाठीं, नियामक केंद्राच्या धोरणानें किंवा त्याच्या अभावीं, एकजुटीनें वागत असतील किंवा सहकार्य करीत असतील, त्यास सरलसमाज म्हणावयाचें. पुढील कोष्टकामध्यें असल्या सरल समाजांचे होतील तितके स्पष्ट असे विभाग व पोटविभाग दिले आहेत.

**सरल समाजः—**

नायकविहीन.

**भटकणारेः**– ( पारधी ) फ्यूजियन लोक, कांहीं आस्ट्रेलियन लोक, रान-वेड्डा लोक, बुशमेन, चिपांग लोक, व नेपाळचे कुसुंदा लोक.

**अर्धवट स्थाईकः**–बहुतेक एस्किमो लोक.

**स्थाईकः**–आराफूरा लोक, वरच्या सारावाक नदीवरचे स्थलचर डायाक लोक.

कधी कधीं नाईक असलेले.

**भटकणारेः**– ( पारधी ) कांहीं आट्रेलियन लोक व टास्मेनियन लोक.

**अर्धवट स्थाईक**:- कांहीं क्यारिब लोक.
**स्थाईक**:-वरच्या रायोनीग्रो नदीवरील कांहीं वापी लोक.

अनिश्चित व अस्थिर नाईक असलेले.

**भटकणारे**:- ( पारधी ) आंदामानीज लोक, आबिपोन, स्नेक ( साप ) लोक, चिपिवायन लोक व कांहीं बिडुइन लोक.
**अर्धवट स्थाईक**:-कांहीं एस्किमो, चिनूक, हल्लींचे चिपोनाज् लोक, कांहीं कामस्चाडेल लोक, गांव वेड्डा-लोक, बोडो व ढिमाल लोक.
**स्थाईक**:-ग्वायनामधील लोक, मण्डन लोक, कोरोऍडो लोक, न्यूगिनी मधील लोक, तानीज़, वेतिअन्, डायाक, टोडा, नाग लोक, क्यारेन्स् व सांथाळ लोक.

स्थिर नाईक असलेले.

**भटकणारे**:-माहीत नाहींत.
**अर्धवट स्थाईक**:-कांहीं क्यारिब लोक, पाटागोनियन लोक, न्यूकालिडोनियन लोक, व काफर लोक.
**स्थाईक**:-ग्वाराणी लोक व पेव्लो लोक.

ह्या रानटी समाजांचा विचार करतां जे समाज जरी असंयुक्त ह्या दृष्टीनें परस्परसदृश आहेत, तरी आकार व रचना ह्यांनीं भिन्न आहेत, त्यांच्यामध्यें कांहीं सामान्य सहचारी विशेष दृष्टीस पडतात. ज्यांच्यामध्यें राजकीय व्यवस्था मुळींच नाहीं, किंवा फार अनिश्चित आहे, अशा समूहांमध्यें ज्या लहान भटकणाऱ्या टोळ्या रानांतून, किंवा नापीक प्रदेशांतून, किंवा समुद्रकांठानें थोडथोड्या सांपडणाऱ्या रानटी अन्नावर राहतात, त्या कनिष्ठ होत. ज्या ठिकाणीं लहान साधे समाज

स्थाईक असूनहि नायकाशिवाय राहतात, त्या ठिकाणीं नेहमीं शांततेनें राहण्यासारखी त्यांची परिस्थिति असते म्हणून राहतात. वरील कोष्टकावरून वरून खालीं नजर फेंकीत आलें असतां असें अनुमान करण्यास जागा दिसते कीं, पारधी जीवित जाऊन धनगरी जीवित प्राप्त होणें, आणि तें जाऊन शेतकरी जीवित प्राप्त होणें, हे फेरबदल लोकवस्तीची वाढ, आणि राजकीय व्यवस्थेची, उद्यमसंस्थांची, आणि कलांची वृद्धि, यांस अनुकूल असतात; जरी या कारणांवरून हे परिणाम प्रत्यक्षच उत्पन्न होत नाहींत.

**संयुक्त समाजः—**

कधीं कधीं नाईक असलेले.

**भटकणारेः**–(धनगरी) कांहीं बेडुइन लोक.
**अर्धवट स्थाईकः**–तावीज् लोक.
**स्थाईकः**–माहीत नाहींत.

अस्थिर नाईक असलेले

**भटकणारेः**–( पारधी ) डाकोटा, ( पारधी व धनगरी ) कोमांची, ( धनगरी ) कालमक.
**अर्धवट स्थाईकः**–ऑस्टियाक, बलूची, कूकी, भिल्ल, कांगोमधील लोक, ( दुबार संयुक्त होत असलेले ), पांचव्या शतकापूर्वीचे टयूटन लोक.
**स्थाईकः**–गतकालीन चिपिवाज् लोक, क्रीक लोक, मुंद्रकूस, तुपी, खोंड, न्यूगिनीमधील कांहीं लोक, सुमात्रामधील लोक, मालागासी लोक ( परवांपर्यंतचे ), किनाऱ्यावरील नीग्रो लोक, कांहीं आबिसीनियन लोक, होमर कवीनें वर्णिलेले ग्रीक लोक, इंग्लंदांतील प्राचीन सप्त राज्यें, पांचव्या

शतकांतील टयूटन लोक, दहाव्या शतकांतील जमीनदारांवरील लोक.

स्थिर नाईक असलेले.

**भटकणारे**:– ( धनगरी ) किरगीज लोक.

**अर्धवट स्थाईक**:--बेचुआना लोक, व झूलू लोक.

**स्थाईक**:--वापी ( प्रथम सांपडले तेव्हांचे ), फिजियन लोक, न्यूझीलंदर लोक, सांडविच बेटवाले ( कूक प्रवासी तेथें गेला तेव्हांचे ), जाव्हा बेटवाले, हाटेंटाट, डाहोमी व आशांटी येथील लोक, कांही आबिसिनियन लोक, प्राचीन-यूकाटनमधील लोक, न्यूग्रानाडामधील लोक, हांडूरासमधील लोक, कांहीं चिब्चा लोक, कांहीं शहरवासी आरब लोक.

वर दिलेल्या दुसऱ्या कोष्टकामध्यें ज्या समाजांचीं नांवें दिलीं आहेत ते थोड्या अंशीं, पुष्कळ अंशीं किंवा सर्वांशीं, अशा स्थितीप्रत पोंहोचलेले आहेत कीं त्या स्थितींत त्यांजमध्यें सरलसमुदायांचे जे नाईक आहेत ते एका श्रेष्ट नायकाच्या आधीन झालेले आहेत. त्या ठिकाणीं ज्या नायकाच्या स्थिरपणास किंवा अस्थिरपणास उल्लेख केलेला आहे तो नाईक संयुक्तसमुदायाचा होय, घटकसमुदायापैकीं एकाद्याचा नव्हे. आतां हें उघडच आहे कीं, पूर्वींची अस्थाईक स्थिति जाऊन जशी पूर्णस्थाईक स्थिति येत जाईल, तशी या संयुक्तनायकाची स्थिरता ज्यास्तज्यास्त ठळक होत जाते. कारण जोंपर्यंत लोक भटकणारे असतील तोंपर्यंत निरनिराळ्या समुदायांचे मुख्य एका सामान्य मुख्याचे अंकित रहाणें दुरापास्त असतें.

असल्या संयुक्त समाजांत बरीचशी व्यवस्था जरी नेहमींच उत्पन्न झालेली असते असें नाहीं, तरी ही संयुक्तता असली व्यवस्था उत्पन्न होण्यास अनुकूल असते. पूर्णपणें स्थिर झालेल्या संयुक्तसमाजांत बहुधा चार, पांच, किंवा सहा, एकमेकांपासून स्पष्टपणें भिन्न असे वर्ग झालेले असतात; धर्मविषयक संस्था स्थापन झालेल्या असतात; सामान्य व स्थानिक श्रमविभाग बरेच उत्पन्न झाले आहेत अशा उद्यमविषयक रचना उत्पन्न झालेल्या असतात. बरींच टिकाऊ अशीं घरें बऱ्याचशा मोठ्या ठिकाणीं एकत्र झालेलीं दृष्टीस पडतात; आणि सामान्यतः सर्व प्रकारच्या जीवितसाधनांमध्यें सुधारणा दिसत असते.

ह्याच्या पुढल्या कोष्टकांत हे संयुक्तसमुदाय पुनः संयुक्त होऊन बनलेले, किंवा ज्या समाजांत वरच्या कोष्टकांत दिलेलीं अनेक सरकारें त्यांच्याहून श्रेष्ट सरकाराचीं अंकित झालेलीं आहेत, अशा समाजांचीं नांवें दिलेलीं आहेत. पहिली लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं हे सर्व दुहेरे संयुक्तसमाज पूर्णपणें स्थाईक झालेले आहेत. त्यांच्यांत वरच्यापेक्षां अधिक संकलनाबरोबर, सर्वत्र नाहीं तरी पुष्कळ ठिकाणीं, वरच्याहून जास्त विवृद्ध व कडक अशी राज्यव्यवस्था उत्पन्न झालेली दृष्टीस पडते. शिवाय ह्या दुहेऱ्या संयुक्तसमाजांमध्यें जेथें राजकीय मुख्याचा अधिकार पूर्णपणें स्थिर झालेला असेल तेथें बहुधा विवृद्ध झालेल्या धर्मसंस्थाहि दृष्टीस पडतात. श्रमविभागाच्या योगानें उद्योगसंस्था एकीकडे जास्त संकीर्ण झाल्या म्हणजे पुष्कळ ठिकाणीं त्यांस ज्ञातीची घटना प्राप्त होते. अशा ठि-

काणीं कमजास्त प्रमाणानें रूढीस प्रत्यक्ष कायद्याचें स्वरूप आलेलें असतें; आणि धर्मविधी निश्चित, कडक, व संमिश्र झालेले असतात; शहरें व रस्ते सर्वत्र दृष्टीस पडतात; आणि ज्ञान व कला यांची बरीच वृद्धि झालेली आढळून येते.

## दुहेरे संयुक्त समाजः—

| | |
|---|---|
| कधीं कधीं नाईक असलेले. | **अर्धवट स्थाईकः**–माहीत नाहींत. |
| | **स्थाईकः**–सामोअन लोक. |
| अस्थिर नाईक असलेले. | **अर्धवट स्थाईकः**–माहीत नाहींत. |
| | **स्थाईकः**– ताहितियन, टांगन, ( कधीं कधीं ) जाव्हन, ( बंदुका वापरावयास लागल्यापासून ) फिजियन, ( अलीकडे ) मालागासी, आर्थानियन लोकांचें प्राचीन राज्य, स्पार्टन लोकांचें प्राचीन राज्य, सहाव्या शतकापासून नवव्याशतकापर्यंत टयूटन लोकांचीं राज्यें, तेराव्या शतकांतील फ्रान्सांतील मोठाल्या जमीनदाऱ्या. |
| स्थिर नाईक असलेले. | **अर्धवट स्थाईकः**–माहीत नाहींत. |
| | **स्थाईकः**–इरोक्काइस, आरॉकेनियन, ( कूकच्या वेळापासून ) सांडविचबेटवाले, प्राचीन व्हेरापाज व बोगोटामधील लोक, ग्वाटिमालामधील लोक, प्राचीन पेरुव्हियन लोक, वाहाबी ( आरब जातीचे ), ओमान ( आरब जातीचे ), प्राचीन इजिप्शन राष्ट्र, व दहाव्या शतकानंतरचें इंग्लिश राष्ट्र. |

आतां मोठालीं सुधारलेलीं राष्ट्रें सांगावयाचीं राहिलीं; त्यांस कोष्टकांत घालण्याची जरूरी नाहीं, कारण

तीं बहुतेक " तिहेरी संयुक्त " ह्या एकाच सदराखालीं मोडतात. प्राचीन मेक्सिको, प्राचीन आसीनियन राज्य, प्राचीन इजिप्शन राज्य, प्राचीन रोमन साम्राज्य, आणि आधुनिक ग्रेटब्रिटन, फ्रान्स, जर्मनी, इटाली, रशिया, हीं राष्ट्रें ह्या पायरीस पोंहोचलेलीं होतीं किंवा आहेत, व कांहीं बाबतींत त्याच्या पुढेंहि गेलेलीं आहेत, असें म्हणतां येईल. त्यांचे जर निरनिराळे वर्ग बनवावयाचेच असतील तर ते त्यांच्या सरकारांच्या स्थिरतेसंबंधानेंच कदाचित् बनवतां येतील; ही स्थिरता राजकीय या शब्दाच्या सामान्य अर्थीं नव्हे, तर ह्या मोठाल्या समुदायाचे ते श्रेष्ट केंद्र या दृष्टीनें समजावयाची. अशा दृष्टीनें पाहतां बहुतेक प्राचीन राष्ट्रें अस्थिर म्हणून म्हटलीं पाहिजेत; आणि अर्वाचीन राष्ट्रांपैकीं इटालीचें राज्य व जर्मन साम्राज्य ह्यांची परीक्षा कालावधीनें होणार आहे. ( हें वाक्य वीसपंचवीस वर्षांपूर्वीं लिहिलेलें आहे, व तेव्हांपासून जर्मन साम्राज्याला कितीतरी स्थिरता आलेली आहे. )

आधीं सुचविल्याप्राणें हें वर्गीकरण अगदीं तंतोतंत न समजतां जवळ जवळ यथार्थ म्हणून समजलें पाहिजे. कांहीं ठिकाणीं प्रवाशांनीं व इतरांनीं दिलेले आधार अपुरे असतात; कांहीं ठिकाणीं त्यांनीं केलेलीं वर्णनें परस्परविरुद्ध असतात; कांहीं ठिकाणीं समाजघटना इतकी सांक्रमिक असते कीं, विशिष्ट समाजास दोन सदरांपैकीं कोणत्या सदरांत घालावें हें सांगणें कठीण असतें. एका ठिकाणीं एकादें कुळ किंवा बंधुवर्ग ह्यास एक स्थानिक समाज म्हणून म्हणतां येतें; आणि

दुसऱ्या ठिकाणीं जवळच्या किंवा दूरच्या नातलगांचे हे समूह दुसऱ्या असल्याच समूहांशीं इतके मिसळून गेलेले असतात कीं, ते वस्तुतः एकाच समाजाचे भाग बनलेले असतात. आतां हें उघडच आहे कीं असल्या अनेक समाजांचा बनलेला जो असलाच संयोग असतो, तो जास्तजास्त संयुक्तपणाच्या पायऱ्या चढून जात असतां, त्यास एक समजावयाचें किंवा अनेक समजावयाचें ह्याबद्दल कधीं कधीं शंका उत्पन्न होते. आणि मोठाल्या सामाजिकसमुदायांप्रमाणें, ज्याठिकाणीं एकामागून एक विजय झालेले असतील, त्यांपासून संयोग बनलेले असतील, नंतर वियोग झालेले असतील, आणि पुनः निराळ्या रीतीनें संयोग बनलेले असतील, त्याठिकाणीं पूर्वींच्या रचनारेषा इतक्या अंधक किंवा नष्ट होऊन गेलेल्या असतात कीं, शेवटच्या संयुक्तसमाजास कोणत्या सदरांत घालावें ह्याची पंचाईत पडते.

परंतु समाजोत्क्रमणाच्या संबंधानें वरील विवेचनावरून कांहीं असे सामान्यसिद्धान्त निष्पन्न होतात कीं, त्यांचें आपणास मुकाट्यानें ग्रहण करण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, समाजांस संयोगीभवन व पुनःसंयोगीभवन ह्याच्या पायऱ्यांवरून क्रमाक्रमानेंच जावें लागतें. कोणतीहि टोळी निवळ वाढीनें राष्ट्र कधीं बनत नाहीं; आणि अगदीं लहान समाजाच्या प्रत्यक्ष एकीकरणानें कोणताहि मोठा समाज बनत नाहीं. सरलसमूहाच्या पुढच्या पायरीवरील समाज म्हटला म्हणजे, आकारानें फार मोठा नाहीं असा संयुक्तसमूह होय. भागांच्या ज्या परस्परावलंबित्वामुळें तो कार्यकर असा एक गोळा बनतो तें

परस्परावलंबित्व दळणवळणाचे मार्ग व सहकारी क्रियेचीं साधनें ह्यांची कांहीं वाढ झाल्याशिवाय उत्पन्न व्हावयाचें नाहीं; आणि ही गोष्ट विस्तीर्णप्रदेशावर साध्य होण्यापूर्वीं ती लहानशा प्रदेशावर साध्य झाली पाहिजे. लढाईच्या वेळीं एका नायकाच्या अधिकाराखालीं घटकसमूहांनीं सहकार्य केल्यानें जेव्हां एकादा संयुक्तसमाज संकलित होतो, जेव्हां एकसमयावच्छेदेंकरून त्यांतील सामाजिकवर्ग व उद्योग ह्यांचें कांहींसें विभिन्नीकरण होऊन जातें, आणि त्या मानानेंच जेव्हां त्यांतील कलांचीहि वृद्धि होऊन जाते, तेव्हां त्या सर्व गोष्टी जास्त चांगलें सहकार्य उत्पन्न होण्यास अनुकूल असल्यामुळें, संयुक्तसमाज वस्तुतः एकरूपच बनून जातो. तसल्याच प्रकारचे दुसरे समाज असल्या मोठ्या गोळ्यामधून जें क्रियांचें समैक्य होत असतें त्यास आवश्यक अशा पायरीस प्रत्येकीं पोंहोचले असल्यामुळें, त्यांजपासून पुढें लढाईत विजय किंवा ऐक्य होऊन दुहेरे संयुक्तसमाज बनून जातात. ह्या समाजांचें जेव्हां संकलन बनतें तेव्हां त्याला योग्य अशी त्यांच्या संघटनेंत आणखी सुधारणा उत्पन्न होते; तसल्या संघटनेस असल्या समाजांत अवकाश सांपडतो, व त्या संघघटनेमुळेंच असला समाज शक्य होतो; आणि ह्या संघटनेंत नियामक, विभाजक, आणि उद्यमविषयक संस्थांची संमिश्रता पूर्वीपेक्षां वाढलेली असते; पुढच्या ह्याच्या पायरीवर, असल्याच क्रमानें, ह्याच्याहूनहि जास्त संमिश्र रचना असलेले व ह्याच्याहूनहि जास्त मोठे असे समुदाय बनून येतात. ह्याच क्रमानें समाजोत्क्रमण वाढत गेलेलें

आहे, आणि ह्याच क्रमानें तें वाढत जाणें शक्य आहे. वर्गीकरणांत कितीहि अपूर्णपणा किंवा असंबद्धभाव असले तरी ते पुढील सामान्य गोष्टींस झांकून टाकीत नाहींत:— एक, असल्या निरनिराळ्या पायऱ्यांनीं संघटना पावलेले समाज प्रत्यक्ष आहेत; दुसरी, एकाच पायरीवरील समाजांच्या रचनांत सामान्य सादृश्य दृष्टीस पडतें; आणि तिसरी, ते वर दाखविलेल्या क्रमानें उत्पन्न होतात.

४७. आतां आपण समाजांत विशेषेंकरून दिसणाऱ्या चळवळींमधील वैसदृश्यांच्या आधारावर आणि त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या संघटनावैसदृश्यांच्या आधारावर जें वर्गीकरण करतां येतें त्याचा विचार करूं. अशा रीतीनें उत्पन्न होणारे दोन मुख्यतः परस्परभिन्न समाज प्रकार म्हटले म्हणजे युद्धशील व उद्यमशील हे होत.

आतां हें निःसंशय खरें आहे कीं, ह्या दोहोंचें निश्चित पृथःकरण करतां येत नाहीं. एस्किमोसारखे कांहीं सरलसमूह हल्ला कोणी करणार नाहीं अशा ठिकाणीं रहात असतात. म्हणून तेवढे वजा करतां बाकी सर्व सरल व संयुक्तसमाज कधीं कधीं किंवा बहुतकरून इतर समाजांशीं विरोध करीत असतात; आणि त्यामुळें आधींच सांगितल्याप्रमाणें त्यांचा कल हल्ला व संरक्षण ह्यासंबंधाच्या क्रिया करण्यास योग्य अशा रचना उत्क्रान्त करण्याकडे असतो. बरें हें चाललें असतां पोषणाची अवश्यकता असतेच; म्हणून तें साधण्यासाठीं अल्प किंवा निश्चित अशी व्यवस्था नेहमीं असतेच. पण व्यक्तिदेहाप्रमाणें समाजदेहांत हे दोन इंद्रियसमूह अगदीं प्राथमिक देहाव्यतिरिक्त इतर सर्व ठिकाणीं जरी साहचर्यें-

करून दिसत असतात, तथापि त्यांचीं जीं परस्परांशीं प्रमाणें तीं फारच बदलत असतात. कांहीं ठिकाणीं बाह्य क्रिया चालविणाऱ्या रचना बऱ्याच मोठ्या प्रमाणावर बनलेल्या असतात; पोषकसमूह त्यांच्याच फायद्यासाठीं वसत असतो; आणि तेथील चळवळी युद्धविषयक असतात. इतर ठिकाणीं पोषण चालविणाऱ्या रचनांचें प्राबल्य असतें. हल्ला व संरक्षण एतद्विषयक रचना त्यांच्या रक्षणासाठींच राखलेल्या असतात; आणि तेथील चळवळी उद्यमविषयक असतात. ज्या युद्धप्रिय टोळ्या मुख्यत्वेंकरून पारधीवर उपजीविका करून शत्रूशीं व्यवहार करण्यास योग्य अशा साधनांचा उपजीविकासाधन मिळविण्याच्या कामीं उपयोग करितात, आणि ज्यांच्या पोषकरचनांत त्यांच्या गुलाम ज्या बायका त्याच दृष्टीस पडतात, अशा टोळ्या एका टोंकास दृष्टीस पडतात; आणि दुसऱ्या टोंकांकडे अद्यापि पुरे उत्क्रान्त न झालेले असे समाज दृष्टीस पडतात; त्यांच्याठिकाणीं शेतकरी, कारागिरी, व व्यापारी संस्था हेच समाजाचे मुख्य भाग असतात, आणि त्याला बाह्यशत्रु नसल्यामुळें संरक्षण व अतिक्रमण ह्यांचीं साधनें मुळींच नसतात किंवा नांवाचीं असतात. ज्या समाजांचा आपणास विचार करणें आहे ते सर्व जरी सांक्रमिक आहेत तरी त्यांजमध्यें बाह्य व अंतरिंद्रियसमूहाचें अनुक्रमें प्राबल्य असलेल्या अशा ह्या दोन परस्परविरुद्ध नमुन्यांचे वैशेषिक गुणधर्म स्पष्टपणें दृग्गोचर होतात.

असो. अशा रीतीनें ह्या दोन नमुन्यांचा परस्परविरोध-

दृष्टीनें एथवर विचार झाला; आतां त्यांतील प्रत्येकाचा स्वतंत्ररीत्या विचार करूं.

४८. पूर्वीं दाखविल्याप्रमाणें युद्धशील समाजप्रकार त्यास म्हणतात कीं ज्यामध्यें सैन्य म्हणजे चाल करून निघालेलें राष्ट्र असतें, आणि राष्ट्र म्हणजे स्थिरावलेलें सैन्य असतें; आणि म्हणून अशा समाजाला सैन्य व राष्ट्र यांना सामान्य अशी रचना प्राप्त होत असते. सामान्य सामाजिक व्यवस्था आणि ही लष्करी व्यवस्था ह्यांच्यामधील साम्याचें बारीक रीतीनें अवलोकन केल्यानें असल्या समाजप्रकाराचें स्वरूप आपल्या ध्यानांत अत्यन्त स्पष्टरीतीनें येणार आहे.

याच्या अगोदर आपणास पुष्कळ पुरावा सांपडला आहे कीं कोणताहि लढाऊ माणसांचा जमाव म्हटला कीं केंद्रीभूत अधिकार हें त्याचें मुख्य लक्षण असतें; मग तो जमाव म्हणजे रानट्यांची टोळी असो, किंवा लुटारूंची टोळी असो, किंवा शिपायांची टोळी असो. आणि लढाईमध्यें आवश्यक असा जो केंद्रस्थ अधिकार तोच शांततेच्या वेळच्या सरकारचा मुख्य गुणधर्म बनून जातो. रानटी लोकांमध्यें लष्करी मुख्य तोच राजकीय मुख्य बनण्याचा फार कल असतो ( व वैदू तेवढाच ह्या कामीं त्याचा प्रतिस्पर्धी असतो. ); आणि जिंकणाऱ्या रानटी जातीमध्यें राजकीय नायकी कायमची बनून जाते. अर्धवट सुधारलेल्या समाजांतून विजेता सेनापति आणि स्वेच्छाचारी राजा हे एकच असतात; आणि सुधारलेल्या समाजांतून बराच काळपर्यंत ते एकच राहतात. ज्या ठिकाणीं एकाच जातीमध्यें नेहमींच्या

चळवळींत अगदीं भेद असून सरकारस्वरूपांतहि तसाच भेद असतो, त्या ठिकाणीं हा संबंध चांगला दृष्टीस पड-तो. उदाहरणार्थ, काफर जातीच्या टोळ्यांतील मुख्य पुरुषरूपी नायकाचे अधिकार फारसे नाहींत; पण त्यां-च्याचपैकीं झूलू नांवाचा जो एक विभाग विजेता झालेला आहे, त्यांचा राजा पूर्ण स्वेच्छाचारी आहे. पुढें सरसा-वलेल्या रानट्यांमध्यें फिजियन लोकांमध्येंहि नेहमींची लढाई व स्वेच्छाचारी अंमल ह्यांची ही सांगड दिसून येते; म्हणजे, त्यांच्यामध्यें प्रजेचें जीवित व वित्त ह्यां-च्यावर त्यांच्या राजाचा किंवा नायकाचा पूर्ण अधिकार असतो. आफ्रिकेंतील लढाऊ राष्ट्रें आशान्टी व डेहामी, ह्यांच्यामध्येंहि असेंच आहे हें अगोदर सांगितलेंच आहे. तद्वतच प्राचीन मेक्सिकन लोकांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे लढाईचा असून, त्यांच्यांतील हक्कदार राजपुत्र युद्धांत नांव मिळवूनच राजा बनत असे; त्याचे अधिकार फार मोठे असत, व तें राज्य विजयांनीं जसें वाढत गेलें तसा त्याचा अंमल जास्तच कडक होत चालला. तद्वतच पेरूव्हियन लोकांमधील जी अगदीं ज-लाल राज्यव्यवस्था तिची स्थापना इन्का लोकांचे विजय वाढत असतांच झालेली होती. आणि जुन्या जगांतील प्राची-न राष्ट्रांत जो हा संबंध इतका पुष्कळ दिसत होता, तोच प्राचीन अमेरिकेंतहि असलेला पाहून त्याचें कारण जात हें नव्हें हें स्पष्ट होतें. मुख्य सेनापति जसा सर्व सै-न्यावर स्वेच्छाचारी अंमल चालवितो, तसाच त्याचे हा-ताखालचे सेनापति आपल्या हाताखालच्या अंमलदारावर चालवितात; व ते अंमलदार आपल्या शिपायांवर चाल-

वितात; सारांश, सर्वजण आपल्या वरिष्ठांचे गुलाम असतात, व आपल्या कनिष्ठांचे सुलतान असतात. हीच रचना ह्याबरोबरच दृष्टीस पडणाऱ्या सामाजिक व्यवस्थांमध्यें दिसून येते. एकंदर समाजामध्यें असेच पदवीभेद असतात, आणि प्रत्येक पदवीचे लोक वरच्या पदवीच्या लोकांना अगदीं नमून असतात. पुढें सरसावलेल्या रानट्यांत युद्धशील नमुना वृद्धिंगत झाल्याचें जें उदाहरण अगोदर दिलें आहे, त्याच समाजांत हीहि गोष्ट दिसून येते. फिजियन लोकांत राजापासून गुलामापर्यंत अगदीं परस्परभिन्न असे सहा वर्ग आहेत. तद्वतच मादागास्कर बेटांत अलीकडे लढाईमुळें स्वेच्छाचारी अमलाची स्थापना झाली असून अशाच पुष्कळ ज्ञाती व वर्ग आहेत. सर्व प्रकारचा रक्तस्राव करण्याची ज्यांस इतकी हौस, असे जे डाहोमन लोक त्यांच्यामध्यें सैन्य किंवा राष्ट्र ( कारण त्यांच्यांत दोन्ही बहुतेक एकच आहेत ), ह्यांपैकीं पुरुष व स्त्रिया या दोघांचेहि दोन मुख्य पक्ष किंवा वर्ग आहेत असें बर्टन म्हणतो; आणखी सर्व वर्गांचे लोक कायद्यानें राजाचे गुलाम आहेत. आशान्टीमध्यें देखील राजा मेला म्हणजे सर्व कामगारांस मरावें लागत असून तेथें एकंदर स्थिति अशीच आहे. प्राचीन काळीं पर्शियन लोकांत निरनिराळ्या वर्गांमध्यें ठळक भेद असत. लढाऊ जो प्राचीन मेक्सिको देश तेथेंहि असेंच असे: सरदारांचे तीन वर्ग असून व शिवाय वैश्यवर्ग असून, गुलामांपर्यंत तीन शेतकरी वर्गहि असत, व ते असेच वरिष्ठाधीन असत. पेरूदेशांतहि इन्काच्या खालीं सरदारांचे वर्ग असत, व ते एकमेकांवर वरचढ असत.

शिवाय लोकांचे दहा, पन्नास, शंभर, हजार, असे विभाग असून त्यांपैकीं प्रत्येकावर एकेक अंमलदार असे, आणि प्रत्येक दहा हजारांवर इन्काजातीचा एक सुभेदार असे; अशा रीतीनें त्यांच्यांतील राजकीय अंमल अगदीं लष्करी अंमलाच्या धर्तीवर असे. पंचवीस तीस वर्षांपूर्वीं जपानची स्थितिहि अशीच असे. जुन्या जगांतील प्राचीन युद्धशील राष्ट्रांत इतकी संकीर्ण नाहीं तरी अशाच सामान्य नमुन्यावर स्थिति असे हें सांगावयास नको; आणि यूरोपांत मध्ययुगांतहि असल्याच रचना असत, कारण त्यावेळीं फ्रान्सासारख्या मोठ्या राष्ट्रांत राजाच्या हाताखालीं जमीनदार सरदारांचे कित्येक वर्ग असत; ते सरदार वरिष्ठांची प्रजा असून कनिष्ठांचे राजे असत; आणि अगदीं कनिष्ठांच्या खालीं शेतगुलाम असत. ह्यावरून युद्धशील राष्ट्रामध्यें लष्करी वर्गाप्रमाणें अगदीं भिन्नभिन्न सामाजिकवर्ग कसे असतात हें स्पष्ट दिसतें. ह्या लौकिक किंवा ऐहिक सरकाराबरोबर तसल्याच नमुन्याचें लोकोत्तर किंवा पारलौकिक सरकारहि येत असतें. म्हणजे, देवलोकांतील सत्त्वांमध्यें माणसांसारखेच उच्चनीच वर्ग असतात अशी असल्या समाजांतील लोकांची समजूत असते इतकेंच नाहीं, तर त्यांच्या धर्मसंस्थांचेंहि स्वरूप लष्करी नमुन्याचेंच असतें. जीवाला जीव घेण्याचें जें कर्तव्य रानटी लोक अत्यन्त पवित्र म्हणून समजत असतात तें, जसा युद्धशील नमुना उत्क्रान्त होत जाईल तसें एक प्रमुखकर्तव्य म्हणून कायमच राहतें. मुख्य नायकास असला सूड घ्यावयास न सांपडल्यास, मरतांना आपल्या वंशजांस तो घेण्यावि-

षयीं हुकूम देऊन ठेवीत असतो; त्याच्या आज्ञा पाळल्यानें त्याचें भूत तृप्त होत असतें; म्हणून त्याच्या शत्रूस मारणें हें अत्युच्च कृत्य होऊन बसतें; ती त्याची आज्ञा पुरी केल्याबद्दल शत्रूपासून हिरावून आणिलेलीं विजयचिन्हें त्याच्या थडग्यापाशीं नेऊन ठेवितात; आणि दंतकथा हळूहळू वाढत जाऊन तो देव बनतो, व त्याच्यापुढें रक्तस्रावपूर्वक बळी देऊं लागतात. ह्याबद्दल सर्वत्र पुरावा सांपडतो. फिजियन लोक लढाईत मारलेल्या शत्रूंचीं प्रेतें शिजविण्यापूर्वीं युद्धदेवास अर्पण करितात. डेहामीमध्यें स्त्रियादेखील लढाईचें काम करितात इतका युद्धशील स्वभाव त्या लोकांत वृद्धिंगत झाला असून तेथें राजा आपल्या मृत पित्यास बहुधा दररोज नरबळी देत असतो; आणि लढाईच्या वेळीं थडग्यांवर रक्तसिंचन करून गतराजांची मदत मागत असतो. मेक्सिकन लोकांचा युद्धदेव मूळचा जेता असून सर्वांत अत्यंत पूज्य असे, व त्याच्या मूर्तीस नरमांस भरवीत असत; व त्यास बळींचा पुरवठा करण्यासाठींच लढाई करीत असत. तद्वतच पेरूदेशांत नरयज्ञ नेहमींचे असून बंदिवान् केलेल्या माणसांस इन्कांचा बाप जो सूर्य त्याला बली देत. आशियाखंडांतील युद्धशील समाज अशाच रीतीनें, उत्क्रान्त देवतांचें अशाच क्रूर विधींनीं संतर्पण कसें करीत ह्याचें केवळ दिग्दर्शन करणें बस्स होणार आहे. त्यांच्या पुराणांतून देवांना नेहमीं विजेते म्हटलेलें आढळतें; बलिष्ट, संहारक, सूड घेणारा, लढायांचा देव, सैन्याचा देव, युद्धाचा माणूस, इत्यादि विशेषणें त्यांस दिलेलीं आढळतात. आसीरियन लोकांच्या

कोरलेल्या लेखांवरून असें दिसतें कीं, त्यांच्या इच्छेवरून म्हणून युद्धांना सुरवात करीत असत; आणि इतरत्र असें लिहिलेलें आढळतें कीं, त्यांच्याच हुकमावरून म्हणून लोकांचा फन्नाच्याफन्ना उडवीत असत. युद्धशील समाजामध्यें राजकीय सरकाराप्रमाणें धर्मविषयक सरकारहि लष्करी नमुन्याचें कसें असतें हें अलीकडील व बऱ्याचशा बदलेल्याहि तसल्या समाजांत दृष्टीस पडतें; कारण शिपाई जसा सेनापतीचे हुकूम अक्षरशः पाळितो, तसे देवाचे माणसानें पाळणें ह्यास अत्युत्तम सद्गुण अद्यापि समजतात, आणि त्याचा आज्ञाभंग केल्यास सतत यमयातना सोसाव्या लागतील म्हणून भीति घालितात. धर्माबरोबरच धर्मविषयक संस्थांचें जें जाल उत्पन्न होतें त्याचीहि गोष्ट अशीच असते. जेथें जेथें सामान्यतः लष्करी नमुना चांगलाच वृद्धिंगत झाला असेल तेथें तेथें राजकीय मुख्य व धर्मविषयक मुख्य हे एकच असतात; देव झालेल्या पूर्वजांचा वंशज जो वर्तमान राजा तोच त्याचा मुख्य संतर्पणकर्ता असतो. पेरूमध्यें असेंच होतें, आणि मेक्सिकोमध्यें राजाचा दुसरा मुलगा हा मुख्य धर्मोपाध्याय असे. इजिप्शन लोकांच्या भिंतीवरील चित्रांतून राजे बळी देताहेत असें दाखविलेलें आहे, व आसिरियामध्येंहि असेंच आहे. हीब्रच्यू लोकांच्या दंतकथा व बाबिलोयन लोकांचे लेख हीं दोन्ही उपाध्याय-राजांविषयीं आपल्यास सांगतात. लीडियामध्येंहि तसेंच होतें; क्रीसस हा राजा असून धर्मोपाध्यायहि होता. स्पार्टामध्यें देखील राजे लष्करी मुख्य असून धर्मगुरुहि असत;

आणि ह्या मूळ संबंधाची खूण रोममध्यें दृष्टीस पडे. लष्करी खात्याप्रमाणेंच धर्मखात्यांतहि वरिष्ठ-कनिष्ट प्रकार उत्पन्न झालेला नेहमीं आढळून येतो. फिजियन लोकांत वंशपरंपरेचे उपाध्ये असून त्यांचें वरिष्ठ-कनिष्ठ जाल बनलेलें आहे. ताहितीमध्यें मुख्य उपाध्याय वारंवार राजकीय घराण्यांतीलच असून प्रत्येक समाजवर्गाचे आनुवंशिक उपाध्याय असत. प्राचीन मेक्सिकोंत निरनिराळ्या देवांचे उपाध्ये निरनिराळ्या दर्जाचे असत, व प्रत्येक उपाध्यायवर्गामध्यें तीन पोटभेद असत; आणि प्राचीन पेरूमध्यें राजकीय मुख्य धर्मगुरूशिवाय विजेत्या जातीचे दुसरे धर्मोपाध्याय कनिष्ट उपाध्यांच्या अनेक वर्गावर मुख्य नेमिलेले असत. जुन्या जगांतील प्राचीन व अर्वाचीन लढवय्या समाजामध्यें अशाच प्रकारचे उच्चनीच धर्मोपाध्यायसमूह दिसून येतात. समाजाचा नमुना जोंपावेतों प्राधान्येंकरून युद्धशील राहील तोंपावेतों तत्त्वतः असल्याच प्रकारचें सरकार एकंदर पोषकजालामध्येंहि दिसून येत असतें. ज्या साध्या समाजामध्यें गुलामवर्ग लष्करीवर्गाला सर्व खाण्यापिण्याचे पदार्थ पुरवीत असतात तेथून सुरवात करतां आपल्या नजरेस अगोदर असें आलेंच आहे कीं, उत्क्रमणाच्या त्याच्या पुढील पायऱ्यांवर समाजाचा जो उद्यमशील भाग तो तत्त्वतः कायमचा कमिसारियाटच (सैन्यास खाणें पिणें वगैरे पुरविणारें खातें) असतो; म्हणजे तो वर्ग सरकारी लष्करी संस्थांच्या गरजा पुरविण्यासाठींच अस्तित्वांत आलेला असतो, आणि त्या वर्गानें उत्पन्न केलेल्या जिनसांपैकीं निर्वाहापुरतेच जिन्नस त्यास शि-

लक राहत असतात. म्हणून असल्या समाजाच्या चळवळींचें नियमन करणारें जेव्हां राजकीय संस्थाजाल वाढत जातें, तेव्हां कायमचें कामिसारियाट या नात्यानें जो लष्करी अंमल त्याच्यावर स्वाभाविकरीत्याच उत्पन्न झालेला असतो, त्याचीच वृद्धि सर्व समाजभर होऊन जाते. ह्याचें अगदीं आत्यन्तिक उदाहरण प्राचीन पेरूव्हिन लोकांत दिसत असे; कारण त्यांच्यांत राजकीय व लष्करी सरकारें एकच असून प्रत्येक ठिकाणच्या प्रत्येक वर्गानें कसलीं व किती कामें करावीं हें कायद्यांनीं ठरविलेलें असे, व सरकारी अधिकारी ते कायदे अमलांत आणीत असत; त्यांच्यामध्यें कायद्यानें मुलें आणि आंधळे व लुले यांच्यावर कामाची सक्ती असून काम न केल्यास त्यांस प्रसिद्धपणें शिक्षा करीत असत; सारांश, उद्योगधंद्यांतील लोकांना लष्करी कायदा लावीत असत. पुरातन जपानी लोकांतील पद्धतीहि मुळांत तत्त्वतः लष्करी असून तिचा उद्योगधंद्यांत पूर्ण प्रवेश झालेला असे. लहान व मोठ्या वस्तू–घरें, तारवें व चटया देखील–कशा कराव्या, हें कायद्यानें सांगितलेलें असे. मादागास्करमधील लढाऊ राज्यव्यवस्थेप्रमाणें सुतार, लोहार, वगैरे लोक सरकारी नोकर समजले जातात, आणि कोणीं आपला धंदा किंवा ठिकाण बदलल्यास त्यास देहान्त शिक्षा होते. हीं जीं नमुनेदार उदाहरणें दिलीं त्यांवरून त्यांच्या बुडीं असलेलें तत्त्व ध्यानांत येईल. केवळ उद्योगधंदाच नव्हे, तर एकंदर जीवितहि, लढाऊ समाजांत असल्याच कडक शिक्षणाच्या आधीन असतें. जपानची जुनी शासनप-

द्धति कांहीं वर्षांमागें मोडण्याच्या पूर्वीं तेथें व्यापारी व इतर प्रत्येक वर्गावर खाण्यापिण्यासंबंधाचेहि कायदे लादलेले असत; ते इतके कीं प्रांताच्या सुभेदारास कायद्यानें सांगितल्यावेळीं उठावें, जेवावें, बाहेर जावें, लोकांच्या भेटी घ्याव्या, व निजावयास जावें लागत असे. प्राचीन पेरूमध्यें हपीसर लोक घरांची बारीक तपासणी करीत, आणि नवराबायको गृहव्यवस्था अगदीं कायद्याबरहुकूम ठेवितात किंवा नाहींत, व मुलांस योग्य वळण लावितात किंवा नाहींत हें पहात, आणि त्याप्रमाणें घरधन्यांस शिक्षा किंवा बक्षिशी देत. प्राचीन इजिप्शन लोकांत प्रत्येक माणसास कांहीं कालाकालानें नांव, गांव, व धंदा हीं स्थानिक अधिकाऱ्यांस कळवावीं लागत. स्पार्टामध्येंहि हल्ला व संरक्षण ह्यासाठींच मुद्दाम बनवलेल्या समाजाचें उदाहरण दृष्टीस पडत असून, तेथें नागरिकांच्या सर्व खाजगी वर्तनावर सरकारचा डोळा असे, आणि गुप्तहेर व प्रसिद्ध न्यायाधीश ह्यांच्या द्वारा तो ठेविला जाई. वरच्यापेक्षां ज्यास्त आलीकडील काळांत युद्धशील समाजांतून ह्यासंबंधानें जरी इतके कडक कायदे दृष्टीस पडत नाहींत, तरी खाणें व पोषाक ह्याविषयींचे कायदे, जाण्यायेण्यासंबंधाचे प्रतिबंध, आणि कांहीं खेळांबद्दल मनाई व इतरांबद्दल सक्ती, ह्यांची आठवण करतां, त्यांत व ह्यांत तत्त्व सारखेंच दिसतें हें ध्यानांत येणार आहे. आणि हल्लीं देखील फ्रान्साप्रमाणें ज्या देशांत युद्धविषयक चळवळींमुळें लष्करी खातें फार जोरांत ठेवलेलें दिसतें त्याठिकाणीं वर्तमानपत्रांचें जबरदस्तीनें नियंत्रण करणें व सभा भरविण्यास मनाई करणें,

शिक्षण लष्करी व्यवस्थेप्रमाणें एका नमुन्याचें देणें, ललितकलांचा कारभार सरकारानें पाहणें, इत्यादि गोष्टींवरून लष्करी नियंत्रणाच्या फांद्या सर्वत्र कशा पसरतात हें चांगलें व्यक्त होतें. आणि आतां शेवटीं सरकार आणि व्यक्ति ह्यांच्यामधील संबंधाबद्दलची कल्पना आणि आनुषंगिक मनोभाव ह्यांच्याविषयीं विचार करूं. ज्या ह्या घटनेच्या योगानें एक समाज इतर समाजांविरुद्ध संयुक्तक्रिया करण्यास समर्थ होतो, त्याच्या मुळीं असा समज असतो कीं, समाजाचे घटक हे सगळ्या समाजाच्या फायद्यासाठीं असतात, आणि सगळा समाज घटकांच्या फायद्यासाठीं नसतो. ज्याप्रमाणें सैन्यामध्यें शिपायाचें स्वातंत्र्य नाकबूल करून त्याचें कर्तव्य तेवढें प्रपादिलें जातें, तद्वतच लष्करी नमुन्याच्या समाजांत घटकाच्या व्यक्तींचे हक्कांस कोणी न विचारतां समाजहक्कांचें तेवढें देव्हारें करीत असतात. अधिकाऱ्यांस पूर्णपणें लवून राहणें हा मोठा सद्गुण समजतात, व त्यांना विरोध करणें हा महापराध गणला जातो. दुसऱ्या अपराधांबद्दल कदाचित् कानाडोळा होईल, पण राजद्रोह म्हणजे अक्षम्य अपराध समजला जातो. फिजियन लोकांत राजनिष्ठा इतकी कडक आहे कीं, एकादा माणूस स्वत: डोकें उडवून घेण्यास उघडा होऊन पुढें येतो, आणि म्हणतो, राजा म्हणेल तसें झालेंच पाहिजे; डाहोमन लोकांत अत्यन्त मोठाले अधिकारी देखील राजाचे गुलाम असतात, आणि त्याच्या मरणोत्तर त्याच्या बायका सर्वांस त्याच्यामागून जातां यावें म्हणून एकमेकींस ठार करितात; पेरूव्हियन लोकांत मोठा इन्का मेला म्ह-

णजे परलोकीं त्याची सेवा करण्याकरितां त्याचे लाडके नोकर व बायका ह्यांस त्याच्याबरोबर जिवंत पुरीत; प्राचीन पर्शियन लोकांत राजानें आपल्या मुलास अगदीं विनाकारण मारलेला पाहून त्याचा बाप म्हणाला, वा: काय उत्तम नेम राजेसाहेब धरितात! तद्वतच, त्यांच्यामध्यें राजानें कोणास सोडग्यानें मारिलें म्हणजे सरकारस्वारीची आपल्याकडे नजर गेली यांतच तो माणूस अत्यन्त आनंद मानी. ह्या सर्व लोकांच्या मनोभावांचा विचार करतां असें स्पष्ट दिसतें कीं, राजाच्या विरुद्ध व्यक्तीचे हक्क प्रतिपादण्याचा मनोभाव असल्या प्रकारच्या समाजांत बहुतेक मुळींच नसतो.

एवंच लष्करी घटनेमध्यें सर्वत्र जो वैशेषिक असलेला गुणधर्म दृष्टीस पडतो तो हा कीं, त्याच्या घटकांवर निरनिराळ्या संयुक्तक्रिया करण्याविषयीं सक्ती होत असते. ज्याप्रमाणें शिपाई आपल्या हापिसरच्या इच्छेचा बंदा बनतो, तद्वतच समाजघटक खाजगी व सार्वजनिक सर्व कामांत सरकारच्या इच्छेचा बंदा बनतो. म्हणजे, ज्या सहकार्यानें लष्करी समाजाचें जीवित राखिलें जातें, तें सहकार्य जबरदस्तीचें असतें. तात्पर्य, असल्या समाजांत सभोंवतालच्या वैरी समाजांशीं व्यवहार करण्यास योग्य अशी समाजघटना असून ती केंद्रीभूत नियंत्रणसरणीखालीं असते, व त्या समाजाचे सर्व भाग त्या सरणीच्या पूर्ण अंकितअसतात; ज्याप्रमाणें व्यक्तिशरीरामध्यें बाह्येंद्रियें मुख्य मेंदूच्या पूर्ण कह्यांत राहतात.

४९. उद्यमशील समाजाचे विशेष गुणधर्म काढण्यास जे आधार सांपडतात ते अपूर्ण असून घोंटाळ्याचे

आहेत. इतर समाजांशीं कमजास्त नित्य विरोध असणें ही गोष्ट बहुतेक सर्व ठिकाणीं व सर्वकाळ प्रत्येक समाजास लागू असल्यामुळें संरक्षण व अतिक्रमण ह्यांस योग्य अशी सामाजिक घटना बहुतेक सर्वत्र दृष्टीस पडते, आणि एरवीं केवळ समाजपोषणासाठीं जी घटना उत्पन्न होत असते तीस ती झांकून टाकते. म्हणून असल्या समाजाची जी कल्पना बांधावयाची ती जे कांहीं थोडे सरल समाज नेहमीं शांतिशील असतात त्यांचे ठिकाणीं, आणि जे पुढें सरसावलेले संयुक्तसमाज पूर्वी नेहमीं युद्धशील असून हल्लीं हळूहळू कमी युद्धशील बनले आहेत त्यांचे ठिकाणीं, जें कांहीं दिसतें त्यावरून बनविली पाहिजे.

नायकविहीन जे आराफूरा लोक एकमेकांशीं शांततेनें व बंधुप्रेमानें वागत असतात त्यांचा उल्लेख अगोदरच आलेला आहे. त्यांच्याविषयीं असें सांगतात कीं, ते मालमत्तेवरचा व्यक्तिहक्क पूर्णपणें मानितात, आणि पूर्वजांच्या चालीरीतींस अनुसरून त्यांच्यांतील वडील माणसें जे ठराव करतील त्यापलीकडे त्यांस अधिकार लागत नाहीं. तात्पर्य, त्या लोकांमध्यें परस्परांचे हक्क व मागण्या ह्यांची ओळख उत्पन्न झाली आहे, आणि अत्यन्त अनुभवी लोकांचें त्यांच्यामध्यें मुकाट्यानें बनलेलें जें प्रतिनिधिसत्ताक सरकार त्याला ते स्वेच्छेनें मानितात. तोडा लोक शांततेनें राहत असून त्यांच्यांतील तंटे पंचांमार्फत तुटत असतात. गोड्या स्वभावाचे जे बोडो व ढिमाल लोक त्यांच्यांत लष्करी व्यवस्था मुळींच नसून त्यांची सामाजिक स्थिति तत्त्वतः स्वतंत्र

अशी आहे. त्यांचे नाईक अधिकारविहीन असून त्यांच्यांत गुलाम किंवा नोकर मुळींच नाहींत. पण रान कापून नवीं शेतें तयार करणें व घरें बांधणें ह्या कामीं ते एकमेकांस मदत करितात: तात्पर्य, त्यांच्यांत श्रमविनिमय स्वखुशीनें होत असतो. तद्वतच मिश्मी लोक शांत, निरुपद्रवी व युद्धपराङ्मुख असे वर्णिलेले असून, ते कधीं कधीं स्वसंरक्षणार्थ एकत्र मिळत असतात, व त्यांच्यांत राजकीय व्यवस्था बहुतेक मुळींच दृष्टीस पडत नाहीं. त्यांचे ग्रामसमाज केवळ नामधारी नायकांखालीं असून ते सर्वसामान्य असा नाईक कोणासच मानीत नाहींत, व त्यांच्यांतील कारभार लोकसत्ताक आहे. म्हणजे त्यांच्यांतील गुन्ह्यांचा निवाडा एक सभा करीत असते. अशा नमुन्याचे समाज लष्करी स्वरूप धारण न करतां उत्क्रान्त होऊन मोठे झाले असें फारच क्वचित् प्रसंगीं घडतें; कारण आपल्या दृष्टीस आधीं हें पडलेंच आहे कीं, साध्या समूहांचे संयुक्तसमूह बनणें ही गोष्ट लढाईपासून होत असते, आणि युद्ध चालू राहिल्यास त्यापासून केंद्रीभूत सत्ता व तदनुषंगिक जुलमी संस्था ह्यांची उत्पत्ति होते. तथापि प्यूब्लो लोक उद्योगी व शांतिशील असे शेतकरी असून ते आपलीं दोनदोन हजार लोकवस्तीचीं विलक्षण गांवें किंवा संयुक्तगृहें अशा रीतीनें बांधितात कीं, त्यांत रानटी लोकांस प्रवेश मिळत नाहीं; कोणी त्यांच्यावर स्वारी केल्याशिवाय ते कधीं लढत नाहींत; आणि असें असून त्यांच्यांत लोकसत्ताक राज्यव्यवस्था आहे, आणि त्यांच्यांतील सुभेदार व त्यांचे कौन्सिलर ह्यांची निवड-

णूक दरवर्षी लोक करीत असतात. सामोआचेंहि उदाहरण कांहीं अंशीं अशा प्रकारचें आहे; कारण तो समाज संयुक्त असून तेथें हल्लीं युद्धविषयक चळवळ फारशी दिसत नाहीं, व त्यास उद्योगशील नमुन्याचें स्वरूप येत असतां त्याच्यांतील राजकीय नियंत्रण कमी होत गेलेलें आहे. त्या ठिकाणचे नायक व मुख्य कांहींसे आनुवंशिक व कांहींसे लोकनियुक्त असून त्यांच्यावर कारभाराची जबाबदारी असते; म्हणजे त्यांच्यांत गांवपार्लमेंतें व प्रांतपार्लमेंतें आहेत. शिवाय त्यांच्यांत राजकीय संस्थाजालापासून पृथक् असें बरेंचसें वाढलेलें पोषकसंस्थाजाल आहे; म्हणजे त्यांच्यांतील धंदेवाल्याचे हाताखालीं कंत्राटी शिष्य असून ते रोजमुऱ्यावर नोकर लावीत असतात, व त्यांस वेतन देत असतात; आणि हा रोजमुरा जेव्हां अपुरा असेल तेव्हां त्यांच्यात कामकरी सभांच्या आधारावर संपहि होत असतात. आतां ह्यांच्याहून ज्यास्त उत्क्रान्त समाजांचा विचार करतां, प्रथम ही गोष्ट ध्यानांत येते कीं, जोंपर्यंत असल्या समाजांत औद्योगिक-सरकार राजकीय सरकारापासून भिन्न झालेलें नसेल, तोंपर्यंत त्यांच्यांत औद्योगिक चळवळ बरीच असूनहि उद्योगशील नमुन्याचे जे वैशेषिक गुण ते ठळक होत जात नाहींत. उदाहरणार्थ, फिनीशियामध्यें बाह्यदेशचा घाऊक व्यापार बहुतेकांशीं सरकार, राजे आणि सरदार ह्यांचे ताब्यांत असे. इझिकेल हा टायर्सच्या राजाबद्दल असें वर्णन करितो कीं, तो शहाणा असा व्यापारी राजा असून मौल्यवान् धातूंच्या खाणी शोधून काढीत

असतो, त्या खणून आपली संपत्ति वाढवितो, आणि व्यापार करून त्या संपत्तींत आणखी भर घालितो. आतां हें उघडच आहे कीं, ज्या ठिकाणीं राजकीय व लष्करी मुख्य हेच स्वतः औद्योगिक संस्थाजालाचे मुख्य झाले आहेत, त्या ठिकाणीं त्या जालाचे वैशेषिक गुण-धर्म दृग्गोचर होण्यास प्रतिबंध होतो. औद्योगिक चळवळ आणि स्वतंत्र संस्था ह्यांच्यामधील संबंधाच्या संबंधानें प्राचीन समाजांचीं उदाहरणें पाहूं लागल्यास आथेन्सची एकदम आठवण होते; आणि इतर ग्रीक संस्थानांच्या मानानें पाहतां हा संबंध त्याच्या ठिकाणीं बराच स्पष्ट दिसत होता. सोलनच्या कालापर्यंत हीं सर्व संस्थानें, सरदार-वर्ग किंवा स्वेच्छाचारी राजे ह्यांच्या अमलाखालीं होतीं. त्यांच्यापैकीं ज्या संस्थानांमध्यें उद्योगधंद्याचा तिटकारा असून लढाईस विशेषमान असे, त्यांच्या ठिकाणीं हा राजकीय नमुना दृष्टीस पडे. पण आथेन्समध्यें उद्योगधंद्यास त्या मानानें बराच मान असून सोलननें त्यांस उत्तेजन दिलें, आणि बाहेरून आलेल्या कारागिरांस एथें आश्रय मिळूंलागला. त्यामुळें ग्रीसच्या इतर भागांत न दिसणारें असें औद्योगिक संस्थाजाल तेथें दिसूं लागलें, आणि त्याबरोबर इतरत्र न दिसणाऱ्या अशा लोकसत्ताक संस्थांची तेथें वृद्धि झाली. आतां ह्यांच्याहून अलीकडील काळाचा विचार करतां, प्राधान्येंकरून औद्योगिक अशी सामाजिकरचना आणि कमी जबरीचा अंमल ह्यांच्यामधील संबंध जर्मनींतील स्वतंत्र शहरें, डचांचें लोकसत्ताक पुढें ज्यापासून उत्पन्न झालें तीं हालंदांतील शहरें, आणि विशेषतः इंग्लंद

देश, इंग्लिश लोकांच्या वसाहती, आणि युनैटेडस्टेट्स्, ह्यांच्या ठिकाणीं दिसून येतो. यूरोपांतील जास्त युद्धशील अशा इतर देशांपेक्षां इंग्लंदच्या इतर देशांशीं लढाया कमी झाल्या असून जास्त अंतरावर झालेल्या आहेत, आणि त्याप्रमाणेंच शेतकी, कारखाने आणि व्यापार ह्यां हि जास्त वृद्धि होऊन त्यांबरोबर स्वतंत्र संस्थांचीहि वृ तेथें जास्त झालेली आहे. उद्योगवृद्धि व स्वातंत्र्यवृ ह्यांचा कार्यकारणसंबंध आहे हें समजण्यासाठीं आ वी एक गोष्ट अशी लक्षांत आणावी कीं, ज्या प्रदे त जास्त राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळी उत्पन्न झा ल्या आहेत, ते सर्व प्राधान्येंकरून औद्योगिक प्रदेश हेत; आणि गांवढळ प्रदेशांतून सतत व्यापार व्यवहार कमी असल्यामुळें, त्यांच्या ठिकाणीं प्राचीनतर शासन ना व त्यास योग्य असे मनोभाव व विचार जास्त ाळपर्यंत राहिलेले आहेत. धार्मिक सरकाराच्या स्वरूपामध्येंहि असलींच रूपान्तरें होतात. जेथें औद्योगिक चळवळी व संस्था उत्क्रान्त होतात, तेथें नियामक सरणीची ही शाखा युद्धशील नमुन्याच्या सरकाराप्रमाणें कडक धर्मसंस्थांच्या रूपानें न राहतां मृदु होत जाते, आणि तिचा प्रकारहि भिन्न होऊन जातो. कारण अशा ठिकाणीं मनोभाव व संस्था दोन्ही सईल होत जातात, आणि राजकीय हक्कांच्या स्थापनेबरोबर धर्मसंबंधी कामांत ज्याला त्याला स्वतांच्या मताप्रमाणें वागण्याची मुभा मिळूं लागते. सारांश, जबरीनें अशा ठिकाणीं सर्वांवर लादलेल्या एका धर्ममताच्या ऐवजीं आपखुषीनें स्वीकार-

लेल्या अनेक धर्ममतांची उत्पत्ति होते; आणि अशा रीतीनें नेहमीं वाढत जाणारे धर्मपंथ ह्यांच्यावरील स्वेच्छाचारी धर्माधिकाऱ्यांचा अंमल निघून जाऊन ते कमजास्त स्वसत्ताक अंमल आपणावर करूं लागतात. म्हणजे काय, तर, जबरीनें लादलेलें लष्करी ऐकमत्य जाऊन स्वेच्छेनें पत्करलेलें नानाविधमत-बाहुल्य उत्पन्न होतें. जें औद्योगिकजाल अशा रीतीनें इतर सर्वांवर आपला पगडा बसवितें, त्याच्यामध्येंहि स्वतः असेंच रचनान्तर होत जातें. धंदेवाला ज्यावेळीं गुलामांस कामास लावितो त्या मूलस्थितींतून संक्रमण होऊन मजुरांस हळूहळू जास्त स्वातंत्र्य यावयास लागतें, आणि शेवटीं मजूर व मालक, क्रेते व विक्रेते, सर्व स्वतंत्र होऊन जातात; आणि सर्वांस संघ जमवून लोकसत्ताक तत्त्वांवर स्वतांची व्यवस्था करण्याचें अप्रतिबंध सामर्थ्य प्राप्त होतें. निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी करण्याकरितां स्थापन केलेल्या राजकीय सभांप्रमाणें मजुरांचे संप व मालकांचे प्रतिसंप ह्यांच्यामध्यें लोकनियुक्तशासनतत्त्व स्थापन झालेलें स्पष्ट दिसतें; आणि खाणी चालविणें, पेढ्या स्थापन करणें, आगगाड्यांचें मार्ग तयार करणें, आणि इतर प्रकारचे मोठमोठाले व्यापार करणें, ह्यासाठीं ज्या संयुक्त मंडळ्या उत्पन्न होतात त्या ह्याच तत्त्वावर होत. शिवाय, ज्याप्रमाणें लष्करी नमुन्यामध्यें विशिष्ट शासनपद्धति सर्व प्रकारच्या लहानसहान सामाजिक चळवळींतून पसरून जाते, तशी ह्या ठिकाणीं औद्योगिक शासनसरणी सर्वत्र पसरते. मग लोकनियुक्त तत्त्वावर चालणाऱ्या व

स्वेच्छेनें बनलेल्या नागरिक संघांच्या द्वारा अनेक प्रकारच्या गोष्टी सिद्ध होऊं लागतात. नंतर अशा प्रकारची व्यवस्था करण्याची प्रवृत्ति लोकांमध्यें इतकी भिनून जाते कीं, कोणतीहि गोष्ट करावयाची झाली कीं मंडळी बनवावयाची व तिचा कारभार नियुक्त कमिटी व नियुक्त अध्यक्ष ह्यांच्या द्वारा करावयाचा, असा प्रघात पडून जातो; उदाहरणार्थ, अनेक प्रकारच्या धर्मार्थसंस्था, विद्यासंस्था, पुस्तकालयें, करमणुकीच्या मंडळ्या, आणि विशिष्ट कला किंवा शास्त्रें ह्यांच्या उत्तेजनार्थ स्थापन झालेल्या सभा, इत्यादिकांची व्यवस्था अशा नमुन्यावर चालू लागते. आणि हे वैशेषिक गुणधर्म उत्पन्न झाले म्हणजे नागरिक व सरकार ह्यांच्या संबंधाविषयींचे मनोभाव व विचार लढवय्या नमुन्याच्या वेळच्या कल्पनांच्या अगदीं उलट होऊन जातात. कारभार चालविणाऱ्या माणसाची आज्ञा नेहमीं शिरसावंद्य समजली पाहिजे ह्या मताच्या ऐवजीं असें मत उत्पन्न होतें कीं, नागरिकांची इच्छा ही सर्वांत श्रेष्ठ होय आणि राज्यकारभार पाहणारा हा केवळ ती इच्छा अमलांत आणण्यासाठीं अस्तित्वांत आलेला अंमलदार होय. नियामक सत्तेची पदवी अशा रीतीनें गौण झाली म्हणजे तिचा आवांकाहि मर्यादित होऊन जातो. मुख्य कारभाऱ्याचा अधिकार सर्व प्रकारच्या कृत्यांवर तसाच राहण्याच्या ऐवजीं पुष्कळ प्रकारच्या कृत्यांवरून तो निघून जातो. खाणें, लेणें, खेळणें, इत्यादि गोष्टींवरील त्याचा अधिकार लोक नाकबूल करूं लागतात; तद्वतच माल उत्पन्न करण्याच्या पद्धति किंवा उदीम-व्यापार ह्यांच्या-

वर त्यास कोणी सत्ता चालवूं देत नाहीं. इतकेंच होतें असें नाहीं; तर स्वेच्छाचारी सरकारास प्रतिबंध करणें आणि मर्यादित सरकाराच्याहि अतिक्रमांस अडथळा करणें, हें नागरिकांचें कर्तव्य होऊन बसतें. शिवाय बहुमतानें नेमिलेल्या कायदे-मंडळानें कांहीं प्रकारच्या कामांत हात घातल्यास त्यांस न जुमानण्याची प्रवृत्ति न्यून मताच्या लोकांमध्यें उत्पन्न होते; आणि ज्या कायद्यांचा ते अन्यायाचे निषेध म्हणून करितात, ते त्यांच्या त्या विरोधामुळें कालेंकालेंकरून रद्द होऊन जातात. राजकीयविषयक कल्पना आणि तदनुषंगिक मनोभाव ह्यांच्यामध्यें असा हा फेरबदल झाला म्हणजे त्याबरोबर असा एक स्पष्ट किंवा गर्भित समज उत्पन्न होतो कीं, सामाजिकसमूहाच्या संयुक्त कृतींचा उद्देश व्यक्तींना आपलीं जीवितें समाधानकारक रीतीनें चालवितां येतील अशा परिस्थिति कायम ठेवण्याचा असावा.

ज्या ह्या सार्वत्रिक गुणविशेषांनीं औद्योगिकनमुना युद्धशील नमुन्यापासून भिन्नता पावतो ते गुणविशेष औद्योगिक चळवळीसाठीं निरनिराळ्या माणसांमध्यें उत्पन्न होणाऱ्या परस्परसंबंधापासून उत्पन्न होतात. आणि हे संबंध युद्धविषयक चळवळीपासून उत्पन्न होणाऱ्या संबंधाहून अगदीं भिन्न असतात. सर्व प्रकारचे व्यापारविषयक व्यवहार—मग ते मालक व मजूर यांमधील असोत किंव माल विकत घेणारे व देणारे यांजमधील असोत, किंवा वकील वगैरे धंदेवाले व त्यांचीं कुळें यांजमधील असोत-ते सर्व अप्रातिबंधक विनिमयानें होत असतात. 'क' च्या धंद्यापासून 'ख' ला जो फायदा होतो त्याबद्दल

'ख' तितकाच फायदा 'क' ला देण्यास कबूल होतो आणि तो फायदा त्यानें उत्पन्न केलेल्या कांहीं पदार्थांच्या रूपानें देतां न आल्यास उद्योग करून मिळविलेल्या द्रव्याच्या रूपानें देतो. ह्या व्यवहारामध्यें एकमेकांची एकमेकांनीं कामें करणें हें जुलमाचें नसतें, आणि कोणीहि कोणाचा अंकित नसतो, म्हणून हा संबंध जसजशा औद्योगिक चळवळी जास्त जास्त महत्त्वाच्या होत जातील, तसतसा सर्व समाजभर जास्त जास्त प्रबल होत जातो. ह्या संबंधाचा लोकांच्या विचारांवर व मनोभावांवर दररोज प्रभाव चालत असल्यामुळें आणि स्वताचे हक्क प्रतिपादणें व इतरांचे कबूल करणें हें शिक्षण दररोज सर्वांस मिळत असल्यामुळें त्याच्या योगानें व्यक्तींच्या मानसिक घटना व संवयी अशा कांहीं बनतात कीं, तेणेंकरून समाजरचनांस त्यांना योग्य असें स्वरूप येत जातें. सारांश, व्यापाराच्या प्रत्येक व्यवहारांत जें व्यक्तिस्वातंत्र्य अंतर्भूत होत असतें त्यानेंच विशिष्ट असा व्यक्ति-नमुना बनून जातो, व समाजाच्या विविध चळवळी ज्या सहकार्यानें होत असतात तें सहकार्य स्वैच्छिक बनून जातें. आणि ज्या वृद्धिंगत झालेल्या बोधक इंद्रियजालामुळें समाजशरीरास औद्योगिक नमुन्याचें स्वरूप प्राप्त झालें असेल त्या जालाला, एकीकडे, प्राण्याच्या वृद्धिंगत पोषक इंद्रियजालाप्रमाणें प्रसृत किंवा अकेंद्रीभूत असें नियामक इंद्रियजाल प्राप्त होत असतां, दुसरीकडे मूळचें नियामक इंद्रियजालहि कमी कमी केंद्रीभूत होत जातें, कारण त्याचें प्रतिनिधिरूप अधिकार जास्त जास्त लोकवर्गांपासून प्राप्त होऊं लागतात.

५०. ह्या दोन सामाजिक नमुन्यांचे अत्यन्त महत्त्वाचे गुणधर्म, पूर्वस्थिति आणि सद्यःपरिस्थिति ह्यांनीं पुष्कळ ठिकाणीं झांकलेले असतात. प्रत्येक समाजाची पूर्वस्थिति व सद्यःस्थिति हीं प्रत्येक अन्य समाजाच्या त्या त्या स्थितीहून कमजास्त प्रमाणानें भिन्न आहेत; म्हणून ह्या परस्परविरुद्ध नमुन्यांपैकीं ह्या किंवा त्या नमुन्याच्या ज्या विशिष्ट रचना असतील त्यांच्या उत्पत्तीस प्रत्येक उदाहरणामध्यें विशिष्ट रीतीनें उत्तेजन मिळत असतें, किंवा अडथळा येत असतो, किंवा भिन्नता येत असते. असें होण्यास अनेक गोष्टी कारण होत असतात. त्या कोणत्या तें आतां पाहूं.

ज्याचा इतिहास सांपडत नाहीं अशा फार फार प्राचीन काळीं जेव्हां माणसें निरनिराळ्या प्रदेशांवर पसरूं लागलीं, व माणसाच्या निरनिराळ्या उपजातींचें विभिन्नीकरण होऊं लागलें, तेव्हांपासून प्रत्येक जातीची फार खोल अशी विशिष्ट स्वभावघटना बनलेली आहे; ही घटना बदलणें फार कठिण असल्यामुळें, कोणत्या तरी नमुन्याचा स्वीकार करण्याची जी प्रवृत्ति ती प्रत्येक उदाहरणांत भिन्न भिन्न झाली पाहिजे.

सद्यःकालाला लगत अशी जी पूर्व जीवितसरणी व सामाजिकघटना त्यांचा समाजावर होणारा प्रभाव ही दुसरी गोष्ट होय. ज्या समाजाचें आपण निरीक्षण करीत असूं त्या समाजामध्यें, भिन्न परिस्थिति असलेल्या पूर्वजांच्या समाजांतील अवनतीस लागलेल्या कांहीं संस्था व संवयी बहुधा असतातच; आणि त्यामुळें नं-

तरच्या परिस्थितीचे परिणाम कमजास्त प्रमाणानें विपरीतस्वरूप होतातच.

शिवाय, आकार, जमीन, हवा, प्राणी, वनस्पति, इत्यादिकांसंबंधानें प्रत्येक देशाचे जे विशेष असतात त्यांचा समाजाच्या युद्धविषयक व उद्यमाविषयक चळवळीवर कांहीं ना कांहीं तरी परिणाम होत असतो; आणि त्यांपैकीं प्रत्येकाच्या योगानें समाजाच्या विशिष्ट नमुन्याला कांहीं विशिष्ट रीतीनें उत्तेजन किंवा अडथळा येत असतो.

ह्याशिवाय सभोंवतालच्या समाजांच्या ज्या विशिष्ट घटना व व्यवसाय असतील त्यांच्या योगानें विशिष्ट संकीर्णता उत्पन्न होतातच. कारण त्यांवर हल्ला करण्यासाठीं लागणाऱ्या क्रियेचा जोम जरी एकच असला, तरी ती क्रिया कोणत्या प्रकारची असावयाची हें विरुद्ध क्रियेच्या स्वरूपावर अवलंबून असतें; आणि म्हणून त्या क्रियेचे समाजघटनेवर होणारे उलट परिणाम विरोध्याच्या स्वरूपघटनेप्रमाणें भिन्न भिन्न होत असतात. शिवाय शेजारच्या समाजांचें प्रत्यक्ष अनुकरण करणें ह्या गोष्टीचेंहि कांहीं महत्त्व असतेंच.

समाजघटनेंत संमिश्रता उत्पन्न करणारें आणखी एक कारण सांगावयाचें राहिलें; तें कदाचित् वर सांगितलेल्या कारणांपेक्षांहि जास्त महत्त्वाचें आहे; त्याच्यावरून पुष्कळवेळां समाज-नमुना युद्धशील बनणें हें बऱ्याच अंशीं निश्चित होत असतें. तें कारण अर्थात् विजयामुळें किंवा अन्यरीतीनें जातींचें होणारें जें मिश्रण तें होय. समाजविषयक घटना असें त्यास नांव देऊन त्या-

चा पृथक् विचार केल्यास वावगें होणार नाहीं; मात्र ही घटना राजकीय समजावयाची नाहीं, तर समाजसमूह बनवणारे जे व्यक्तिरूपी घटक त्यांची सामान्यतः समस्वरूपता किंवा विविधस्वरूपता ह्या संबंधाची जी समाजघटना ती ती होय.

५१. ज्या अर्थीं समाजसमूहाचें स्वरूप कांहीं अंशीं सभोंवतालच्या परिस्थितीवर अवलंबून असून, इतर अंशीं त्याच्या घटकांच्या स्वभाववैशिष्ट्यावर अवलंबून असतें, त्या अर्थीं ज्या ठिकाणीं घटकांचे स्वभाव, निरनिराळे असतील, त्या ठिकाणीं त्या निरनिराळ्या दोन किंवा अधिक प्रकारच्या स्वभावांतील भिन्नपणाचा जोम, आणि त्यांच्यांतील सारखवटपणाचा जोम यांच्यावर समाजस्वरूप बऱ्याच अंशीं अवलंबून रहात असतें. म्हणजे, ज्या दोन किंवा अधिक निरनिराळ्या जातींचा मिळून समाज बनला असेल, त्या अगदीं भिन्न जाती आहेत किंवा जवळच्या जवळच्या आहेत, आणि त्या एकमेकींत मिसळतात किंवा पृथक् पृथक् राहतात हे प्रश्न फार महत्त्वाचे आहेत.

आतां हें उघडच आहे कीं, जर एकाद्या प्रदेशांत विजेत्या जातीनें सारखें राज्य करून तिच्या सर्व सामाजिक घटनेमध्यें लष्करी तऱ्हेची नियामकसरणी चांगली स्थापन केली असेल, आणि कित्येक पिढ्यांच्या पिढ्या जबरदस्तीनें सहकार्य करण्याची संवय तेथील समाजघटकांस लाविली असेल, आणि, शिवाय, अधिकाऱ्यांच्या आज्ञा कशाहि असल्या तरी अगदीं मुकाट्यानें मानणें हेंच धर्माचें सांगणें आहे असें तेथील ध-

र्माधिकारी लोकांस शिकवीत असतील, आणि विशेषतः त्या देशांत, चीन देशाप्रमाणें प्रत्येक माणसाचें शिक्षण सरकारी नमुन्याबरहुकूम होत असून त्यांनीं घालून दिलेल्या कर्तव्यदिशेबद्दल शंका काढणें म्हणजे मोठा धर्मलंडपणा समजला जात असेल, तर, अशा देशांत इतर कारणांनीं समाजघटनेंत फारसा फरक होणें अशक्यच असतें. सर्व सेंद्रियघटनेचा असा नियमच आहे कीं, ती जशी पक्क होत जाईल तसा तिच्यांतील लवचीकपणा अधिकाधिक निघून जातो. म्हणून, जेथें अपूर्णता राहिली असून त्यामुळें किंवा त्याबरोबर लवचीकपणाहि शिल्लक राहिला असेल, तेथें समाजाच्या नमुन्यास प्रारंभींचें लष्करी स्वरूप टाकून देऊन, औद्योगिक चळवळींनीं प्राप्त होणारें स्वरूप धारण करणें शक्य असतें. मुख्यत्वेंकरून, जेथें जेते व जित ह्या दोन जाती भिन्न भिन्न स्वभावाच्या असून एकमेकांशीं मिसळत नसतील, त्या ठिकाणीं त्यांचें सहकार्य व्हावयाचें तें जबरीच्या शासनपद्धतीनेंच झालें पाहिजे. म्हणजे काय तर, जिंकणारी जात जी लष्करीपद्धति घालून देते ती सर्वसमाजभर पसरते. प्राचीन पेरू देशांत ह्याचें आत्यन्तिक उदाहरण दृष्टीस पडे, आणि हल्लींचें टर्कीचें साम्राज्य त्याच प्रकारचें आहे.अशा ह्या प्रकारच्या समाजघटना, त्यामध्यें निरनिराळ्या रचना करितील अशा योग्यतेच्या जाती एकत्र वास करीत असून त्या अस्थिरसमतोलाच्या स्थितींत असतात. म्हणून त्यांस कोणताही जरा बराचसा धक्का बसल्यास ती व्यवस्था उलटून पडते; आणि त्या दोन जातींची प्रवृत्ति एकच नसल्यामुळें

ती व्यवस्था बनून येणें किंबहुना अशक्यच असतें, निदान कठीण तरी जातें. ज्या ठिकाणीं जेते व जित फार भिन्न असूनहि मोठ्या प्रमाणावर एकमेकांत लग्नें करूं लागतात, त्या ठिकाणींहि असलाच परिणाम अन्य तऱ्हेनें उत्पन्न होतो. निरनिराळे सामाजिक नमुने अनुसरण्याच्या ज्या परस्परविरुद्ध प्रवृत्ती, त्या असल्या उदाहरणांत निरनिराळ्या व्यक्तींच्या ऐवजीं, एकाच व्यक्तीच्या ठिकाणीं असतात. अशा प्रकारचा भेसळीचा माणूस एका प्रकारच्या संस्थांना योग्य असे कल एका प्रकारच्या पूर्वजांपासून धारण करून, दुसऱ्या प्रकारच्या संस्थांना योग्य असे कल दुसऱ्या प्रकारच्या पूर्वजांपासून घेत असतो आणि त्यामुळें त्यांपैकीं कोणत्याहि प्रकारच्या संस्थांना तो अयोग्य बनतो. ही व्यक्ति अशी असते कीं, तिचा स्वभाव कोणत्याहि सामाजिक नमुन्याच्या सांच्यांत बनलेला नसतो, आणि त्या माणसास त्याच्या इतर स्वजातीयांप्रमाणें कोणताहि सामाजिक नमुना उत्क्रान्त करतां येत नाहीं. अर्वाचीन मेक्सिको आणि दक्षिण अमेरिकेंतील लोकसत्ताक राज्यें ह्यांमध्यें एकसारख्या राज्यक्रान्त्या होत असतात त्यांवरून हें स्पष्ट दिसतें.

ज्या ठिकाणीं पुष्कळ अंशीं परस्परविरुद्धस्वभावाच्या जाती कमजास्त प्रमाणानें मिश्रित झाल्या असतील, किंवा अल्पच मिश्रण पावल्या असून एकाच सरकाराखालीं शेजारशेजारच्या प्रदेशांतून राहत असतील, त्या ठिकाणीं तें सरकार जबरदस्तीची पद्धति कायम ठेवील तोंपर्यंत त्यांच्यांत समतोल राहत असतो, आणि ती पद्धति सैलावली म्हणजे लागलाच तो डळमळूं लागतो.

उदाहरणार्थ, स्पेन देशांत सेल्टिक, गॉथिक, मूरिश, व ल्यूइश, इतके लोक अर्धवट मिसळलेले व अर्धवट विशिष्ट-स्थानबद्ध झालेले असल्यामुळें ही स्थिति दिसून येते.

तथापि एकत्र राहणाऱ्या निरनिराळ्या जातींत अल्प भेद असल्यास ते त्यांस फायदेशीर होतात. कित्येक उदाहरणांवरून असें दिसतें कीं, बऱ्याच अंशीं परस्परसंबद्ध अशा जातींच्या लोकांच्या बनलेल्या समाजांत सरतेशेवटीं जितांशीं जेते मिसळून गेल्यामुळें असला समाज उन्नति पावण्यास फार योग्य असा बनतो. त्यांच्या मिश्रणानें जो समाज उत्पन्न होतो त्याचे मुख्य गुणविशेष त्या दोघांच्या स्वभावांचीं जीं परस्पर-सदृश अंगें त्यांच्याप्रमाणें बनलेले असून, त्यांच्या स्वभावांतील जे भेद त्यांच्यामुळें ते लहानसहान बाबतींतहि परस्परभिन्न राहतात, आणि अशा रीतीनें नवीन कारणांनीं उत्पन्न झालेल्या नव्या व्यवस्था घेण्यास त्यांच्यांत सामर्थ्य शिल्लक राहतें: म्हणजे साधारण प्रतीचा जो लवचीकपणा त्याच्या योगानें त्यांच्यांत रचनाभेद उत्पन्न होऊन विविधरूपता वृद्धिंगत होते. ह्याचें एक उदाहरण हीब्रयू लोकांत दृष्टीस पडे. ते जरी आपली जात फार शुद्ध आहे अशी शेखी मिरवीत, तरी नाइल नदीच्या पूर्वेकडील प्रदेशांतील पुष्कळ सेमिटिक जातींच्या मिश्रणानें ते बनलेले होते, आणि ते भटकत असतां व पुढें पालेस्टाईन प्रांत जिंकल्यावरहि त्यांच्याशीं सदृश अशा जाती त्यांच्यांत मिसळतच होत्या. ह्याचें दुसरें उदाहरण आथीनियन लोक होत. त्यांची प्रगति होण्यास पूर्वकारण असें झालें होतें कीं, इतर ग्रीक संस्थानांतून पुष्कळ लो-

क येऊन ते तेथील ग्रीक लोकांशीं मिसळून गेले होते. रोमन लोकांच्या सुधारणेची पहिली चढती पायरी लागण्याच्या पूर्वीं साबिनी, साबेली, आणि साम्नाइट ह्या अन्य आर्य जातींशीं त्यांचें विजयानें मिश्रण झालेलें होतें. इंग्लंद देशांतहि आर्य जातींचे, व विशेषतः स्कान्डिनेव्हियन शाखेचे, अनेक लोक येऊन राहिल्यामुळें तेथेंहि तीच गोष्ट दिसून येते; म्हणजे, एकाच सामाजिक पद्धतीचें अनुकरण करतील इतक्या परस्परसदृश, पण समाजघटना एकदम घट्ट बनविणार नाहींत इतक्या परस्परभिन्न, अशा जातींच्या मिश्रणानें काय होतें हें तेथें चांगलें दिसतें.

ज्या ठिकाणीं इतकीं कारणें कार्य करीत आहेत त्या ठिकाणीं, अमक्या कारणाचें अमकें कार्य, असा पृथक्पणा खात्रीपूर्वक करतां येणार नाहीं ही गोष्ट कबूल करून, आणि समाजविषयक घटनांबद्दल वर जीं अनुमानें बसविलीं आहेत ते केवळ संभव आहेत एवढें सांगून, आतां, जीवांच्या घटनांबद्दल जीं कांहीं अनुमानें निघतात त्यांच्याशीं ह्या अनुमानांचें साम्य आहे ही गोष्ट स्पष्ट करून दाखवूं या. बऱ्याच अंशीं भिन्न अशा जातींच्या दोन जीवांच्या संयोगापासून संतति कधींहि उत्पन्न व्हावयाची नाहीं. सजीव बीज उत्पन्न करण्यास त्यांनीं पुरविलेलीं जीं सेंद्रियघटक द्रव्यें त्यांचें नवीन जीवाची उत्पत्ति होईल असें सहकार्य होऊं शकत नाहीं. संख्यावृद्धि करीत असतां प्रत्येक प्रकारचे घटक आपला आपला घटनाविषयक नमुना उत्पन्न करण्याची खटपट करीत असतात, आणि म्हणून त्यांचा पक्का विरोध

असल्यास कोणताच नमुना उत्पन्न होत नाहीं. आतां हे दोन जीव जर वरच्यापेक्षां कमी भिन्न असतील, उदाहरणार्थ एकाच जातींपैकीं असून केवळ भिन्नभिन्न उपजातींचे असतील, तर त्यांच्या सेंद्रिय घटकांची ज्या दोन घटना उत्पन्न करण्याची खटपट असणार त्या बऱ्याच अंशीं परस्परसदृश असल्यामुळें, त्यांचें सहकार्य होऊन त्या दोघांच्या मधला असा जीव उत्पन्न होऊं शकतो. परंतु हा जीव जरी सामान्य व्यवहार करूं शकतो, तरी सर्वांत उशीरां उत्क्रान्त होणारे जे त्याचे भाग ते अपूर्ण राहतात; म्हणजे काय, तर, संतत्युत्पादन करण्याचें सामर्थ्य त्याच्यांत येत नाहीं; उदाहरणार्थ, खेचर. आतां निरनिराळ्या उपजातींपैकीं जर दूरदूरच्या पोट-उपजातींचा संयोग झाला, तर उत्पन्न झालेला जीव वांझ नसतो; पण पुष्कळ गोष्टींवरून असा सिद्धान्त निघतो कीं, त्याच्या पुढच्या पिढ्या वांझ निपजतात; म्हणजे काय, तर, संयुक्त घटनांचें जें परस्परविरोधी कार्य तें जरी लवकर दृष्टोत्पत्तीस येत नाहीं तरी उशीरां येतेंच. आतां दूरदूरच्या पोट-उपजातींच्या ऐवजीं जर बऱ्याचशा जवळजवळच्या पोट-उपजातींचा संयोग झाला, तर कायमची प्रजोत्पादनक्षम अशी वीण उत्पन्न होते; आणि अशा ठिकाणीं त्या दोन प्रकारच्या सेंद्रियघटनांमधील अल्प भेदांमुळें त्यांच्या सहकार्यास प्रतिबंध होत नाहीं इतकेंच नाहीं, तर उलट, तेणेंकरून लवचीकपणा आणि इतरत्र न दिसणारी जोराची वाढ हीं त्यांच्यांत विशेष दृष्टीस पडतात.

ह्या ठिकाणीं, तर मग, वर दर्शविलेल्या सिद्धान्ताशीं समान्तर असा सिद्धान्त दृष्टीस पडतो; वरील सि-

द्धान्त हा कीं भेसळ समाज अपूर्णपणें मिश्र असतात; म्हणजे पूर्णपणें स्थिर असे आकार त्यांस प्राप्त होऊं शकत नाहींत; पण जे समाज जवळजवळच्या संबद्ध अशा पोट-उपजातींच्या मिश्रणापासून उत्क्रान्त झालेले असतील त्यांस स्थिररचना धारण करतां येतात, आणि त्यांच्या ठिकाणीं फायदेशीर असा लवचीकपणा दृष्टीस पडत असतो.

५२. सारांश, आपणास समाजांचें वर्गीकरण दोन तऱ्हांनीं करतां येतें, आणि समाजविषयक चमत्कारांची उपपत्ति लावतांना त्या दोन्ही तऱ्हा ध्यानांत घ्याव्या लागतात.

पहिलें वर्गीकरण, त्यांच्या कमजास्त संकलनाच्या मानानें, सरल, संयुक्त, दुबार संयुक्त, आणि तिबार संयुक्त, असें होत असतें; आणि घटनेच्या ह्या वरवरच्या पायऱ्या जसजशा उत्पन्न होत जातील, तसतशी उत्क्रमणाचीहि पायरी वाढत जाऊन सामान्य व विशेष विविधस्वरूपता वृद्धिंगत होत जाते.

समाजांतील मोठ्या इंद्रियजालांपैकीं जें प्रबल असेल त्यावरून होणारें जें वर्गीकरण तें ह्याच्यापेक्षां बरेंच कमी निश्चित असतें. ज्यांच्यामध्यें विभिन्नीकरणें मुळींच दिसत नाहींत असे अत्यन्त हलके समाज खेरीज करतां, " प्रत्येक समाजांत पोषण चालविण्याकरितां आणि इतर समाजांशीं विरोध करण्याकरितां योग्य अशा रचना असतात " ह्या नियमास फारच थोडे अपवाद दृष्टीस पडतात. आणि ह्या दोन रचनांतील परस्परप्रमाणें ज्याअर्थीं अनेकविध असण्याचा संभव आहे त्याअर्थीं त्यां-

च्या सापेक्ष वाढीवरून कोणतेंच निश्चित वर्गीकरण बांधतां येत नाहीं. तथापि त्यांपैकीं एकाच्या प्राबल्यानें विशिष्ट असा जो युद्धशील नमुना तो जबरदस्तीच्या सहकार्याच्या तत्त्वावर बनवलेला असल्यामुळें, आणि उद्यमविशिष्ट नमुना स्वैच्छिक सहकार्याच्या तत्त्वावर बनवलेला असल्यामुळें, हे दोन नमुने आत्यन्तिक स्वरूपास पोहोंचले म्हणजे अगदीं परस्परविरुद्ध असतात; आणि त्यांच्या गुणविशेषांमधील जे भेद आहेत तोच समाजशास्त्राचा एक अत्यन्त महत्त्वाचा विषय होय.

हें योग्यस्थान असतें तर, पुढें बहुधा उत्पन्न होण्याचा संभव असलेल्या एका समाजनमुन्याचें थोडें वर्णन केलें असतें; तो नमुना हल्लीं उद्यमविशिष्ट नमुना युद्धविशिष्टापासून जितका भिन्न आहे तितकाच उद्यमविशिष्टापासून भिन्न असेल; त्याच्यामध्यें पोषकेंद्रियजाल हल्लींपेक्षां फारच ज्यास्त वृद्धिंगत झालेलें असून उद्योगानें उत्पन्न होणाऱ्या चिजांचा उपयोग लष्करी खातें संभाळण्यासाठीं किंवा द्रव्यविषयकप्राबल्यप्राप्तिसाठीं त्या समाजांत होणार नाहीं, तर त्यांचा विनियोग ह्यांपेक्षां उच्चतर गोष्टी करण्याकडे करील. व्यक्ती समाजाच्या फायद्यासाठीं असतात हा समज बदलून, समाज व्यक्तींच्या फायद्यासाठीं असतो हा समज उत्पन्न होणें, ह्यावरून जसा युद्धविशिष्ट व उद्यमविशिष्ट ह्या नमुन्यांमधील भेद हल्लीं दिसत असतो, तसा उद्यमविशिष्ट नमुना, व त्यापासून बहुधा उत्क्रान्त होणारा पुढील नमुना ह्यांमधील भेद, जीवित कामासाठीं होय हा समज

जाऊन, काम जीवितासाठीं होय हा समज उत्पन्न झाल्यानें व्यक्त होणार आहे. पण एथें आपणास पूर्वी होऊन गेलेल्या व सध्यां अस्तित्वांत असलेल्या समाजांवरून निघणाऱ्या सिद्धान्तांचा विचार कर्तव्य आहे, आणि म्हणून पुढें कदाचित् उत्पन्न होणाऱ्या समाजाबद्दल तर्क करीत बसतां येत नाहीं. त्याबद्दल इतकेंच सांगणें बस्स दिसतें कीं, बुद्धिविषयक व सौन्दर्यविषयक शिक्षणासाठीं, आणि प्रत्यक्ष जीवितपोषण न करतां केवळ संतोष उत्पन्न करणाऱ्या इतर तसल्याच चळवळींसाठीं, संस्था आणि साधनें ह्यांची जी वृद्धि होत आहे ती भावी समाजनमुन्याची दर्शक होय.

असो. हा जो जातां जातां मध्येंच नवा विचार काढिला त्याजवरून परत प्रस्तुत विषयाकडे वळतां असें दिसतें कीं, वर केलेल्या दोन वर्गीकरणांच्या मिश्रणांनीं होणारे जे घोंटाळे त्यांमध्यें परस्परापासून फार भिन्न किंवा अल्प भिन्न अशा जातींच्या संयोगांनीं होणाऱ्या घोटाळ्यांची भर पडते; कारण असल्या जाती एके ठिकाणीं एकमेकींत मुळींच मिसळत नाहींत, अन्यत्र अंशतः मिसळतात, आणि अन्यत्र सर्वांशीं मिसळतात. समाजघटनांच्या ह्या ज्या निरनिराळ्या जाती त्यांबद्दल असें म्हणण्यास आपणास बराच आधार सांपडतो कीं, त्यांपैकीं भेसळ ही जात वस्तुतः अस्थिर असल्यामुळें जबरदस्तीचें सहकार्य ह्या तत्त्वावरच तीस व्यवास्थित स्थिरस्वरूप देतां येतें; कारण स्वभावतः बरेच परस्परविरुद्ध असे घटक स्वेच्छेनें सहकार्य करूं शकत नाहींत. बरें, ह्याच्या उलट, ज्या जातीचे घटक सादृश्यविशिष्ट असतील ती

वरच्या मानानें स्थिर असते; आणि परिस्थिति योग्य असल्यास तीस उत्क्रमणानें उद्यमविशिष्ट नमुन्याचें स्वरूप येऊं शकतें; आणि त्या सादृश्यांत जर अल्पभेदांची भर पडलेली असेल तर ही गोष्ट विशेषतः घडून येते.

---

# प्रकरण अकरावें

## समाजरूपान्तरें

५३. गत प्रकरणांत प्रतिपादिलेल्या सामान्य तत्त्वाचा ताळा समाजाच्या चळवळींत होणाऱ्या फेरबदलांबरोबर समाजाच्या रचनांत जे फेरबदल होतात त्यांवरून आपणांस मिळतो; आणि ह्या ठिकाणींहि समाजशरीरें आणि व्यक्तिशरीरें ह्यांच्यामध्यें साम्यें दृग्गोचर होतात. दोन्ही ठिकाणीं भटकणारें जीवित जाऊन स्थाईक जीवित प्राप्त होणें ह्या फेरबदलावरून रूपान्तर उत्पन्न होत असतें; दोन्ही ठिकाणीं आंतर किंवा पोषक इंद्रियजालाचा मुख्यत्वेंकरून उपयोग करणाऱ्या जीविताच्या ऐवजीं बाह्य किंवा खर्चिक इंद्रियसमूहाचा उपयोग करणाऱ्या जीविताची प्राप्ति झाली म्हणजे त्यावरूनहि रूपान्तर होत असतें; आणि दोन्ही ठिकाणीं ह्याच्या उलटहि रूपान्तर होत असतें.

कड्यांच्या व मऊ अंगाच्या दोन्ही प्रकारच्या पुष्कळ बिनमणक्याच्या प्राण्यांच्या पोरांना प्रारंभीं असल्या कांहीं पायऱ्यांवरून जावें लागत असतें कीं, त्या वेळीं तीं पुष्कळ हालचाल करीत असतात. पुढें लवकरच तीं योग्य अशा वसतिस्थानामध्यें स्थाईक होतात, त्यांचीं चलनेंद्रियें व दुसरीं मार्गदर्शक साधनें खुंटूं लागतात, परिस्थितींत सांपडेल तें खाद्य ओढून घेतां येण्यास योग्य

अशीं नवीं इंद्रियें उत्पन्न होतात, आणि पोषकेंद्रिय-जालाची वाढ जलद होऊन जाते. कीटकवर्गामध्यें घुल्याची अवस्था जाऊन पंखाच्या किड्याची अवस्था प्राप्त होणें हें रूपान्तर वरच्या उलट आहे. जिच्या सभोंवतीं अन्न पसरलेलें आहे अशी भावी माशी किंवा कसर बहुतेक केवळ आपलीं पोषक इंद्रियें तेवढींच वृद्धिंगत करिते; तिला केवळ बीजभूत अवयव असतात किंवा मुळींच नसतात; आणि त्या मानानें अपूर्ण अशीं ज्ञानेंद्रियें असतात. अतिशय पुष्कळ वाढल्यानंतर व बरेंच लवचीक द्रव्य गोळा केल्यानंतर ती आपलीं बाह्येंद्रियें व त्यांना योग्य असें नियामक उलगडूं लागते, व तिचीं पोषक इंद्रियें लहान होऊं लागतात; आणि अशा रीतीनें सभोंवतालच्या वस्तूंशीं व जीवांशीं चपळपणानें व्यवहार करण्यास ती आपणास योग्य करून घेते.

ह्या दोन परस्परविरुद्ध रूपान्तरास सारखेंच लागू असून एथें आपणास ज्याशीं कर्तव्य आहे तें सत्य हें कीं, बाह्य क्रिया व अंतःक्रिया ह्या दोन्ही करणारीं जीं निरनिराळीं दोन रचनाजालें तीं एकंदर समूह जशा प्रकारचें जीवित भोगीत असेल, त्याप्रमाणें प्रत्येकीं वाढतात किंवा सुकत जातात.

५४. रूपान्तरें कशीं उत्पन्न होतात हें पाहण्यापूर्वीं त्यांस अडथळे कसे येतात हें पाहूं. ज्या ठिकाणीं सदृश जीवित उपभोगणाऱ्या अनेक पूर्वजसमाजांपासून एकादी विशिष्ट रचना एकाद्या समाजास वंशपरंपरेनें प्राप्त झालेली नसेल, त्या ठिकाणीं त्या समाजाचीं रूपान्तरें

कांहीं नियमित रीतीनें व क्रमानें होऊं शकत नाहींत: कारण सभोंवतालच्या प्रभावाचे परिणाम वंशपरंपरेनें प्राप्त झालेल्या प्रवृत्तींच्या परिणामांहून जास्त प्रबल असतात. बरें, ज्या ठिकाणीं एकापासून दुसरा अशा क्रमानें समाज उत्पन्न झालेले असून, त्यांचे आयुःक्रम सारखेच झालेले असतात, त्या ठिकाणीं जो समाजनमुना उत्पन्न होतो त्याचें वर्धन, पूर्णावस्था, व उतरती कळा, हें चक्र इतकें ठरीव झालेलें असतें कीं, तेणेंकरून त्याचें रूपान्तर होण्यास प्रतिबंध उत्पन्न होतो.

सामान्यतः सर्वच असुधारलेल्या टोळ्या हें ह्याचें उदाहरण होय. परिस्थिति बदलली तरी आपल्या सामाजिक हालचाली व रचना बदलण्याची प्रवृत्ति त्यांच्यामध्यें बहुतेक मुळींच दिसत नाहीं, तर नव्या स्थितीस अनुरूप असें वर्तन करण्यापेक्षां मरून जाणेंच त्यांस जास्त पसंत वाटतें. माणसांच्या उच्चतर उपजातींचें देखील असेंच होतें; उदाहरणार्थ, आरब लोकांच्या भटकणाऱ्या टोळ्या. हल्लींच्या बेडुइन लोकांकडे पाहतां त्यांचें समाजस्वरूप असें दिसतें कीं, सभोंवतालच्या सुधारणांशीं संबंध येऊनहि ते आज तीन हजार किंवा जास्त वर्षे वस्तुतः आहेत तसेच राहिले आहेत; आणि असाहि पुरावा सांपडतो कीं कांहीं सेमाइट लोकांमध्यें प्राचीन काळीं देखील भटकणाऱ्या टोळीचा नमुना इतका मुरून गेलेला होता कीं, त्यास धर्मरूपहि आलेलें होतें. उदाहरणार्थ, त्यांच्या धर्मांत अशी एक आज्ञा आढळते कीं, तुम्ही घरें बांधूं नका, धान्य पेरूं नका, किंवा द्राक्षवेलहि लावूं व जवळ ठेवूं नका, तर नेहमीं तंबूंतून रहा.

भटकण्याची स्थिति जाऊन स्थाईक स्थिति उत्पन्न होण्यास, मूळच्या सामाजिक नमुन्यासच चिकटून राहिल्यानें जसा प्रतिबंध होतो तसा अन्य कारणांनींहि होतो. उदाहरणार्थ, आराकान प्रांतांतील कुलाडाइन नदीवरचे डोंगरी लोक, खेड्यासभोंवतालच्या जमिनी वर्षास एकेक अशा रीतीनें पेरून सगळ्या खलास झाल्या, म्हणजे तेथून उठून दुसरीकडे रहावयास जातात, अशा रीतीनें प्रत्येक तिसऱ्या वर्षीं बहुधा ते स्थानान्तर करितात; आणि ह्या स्थानान्तरावरून ते कालगणनाहि करीत असतात; उदाहरणार्थ, अमुक अमुक गोष्ट अमक्या अमक्या स्थानान्तराच्या वेळीं घडली म्हणून म्हणतात. आतां हें उघडच आहे कीं, अशा प्रकारची ही चाल कांहीं अंशीं आनुवंशिक रीतीनें प्राप्त झालेल्या चळवळ्या स्वभावामुळें उत्पन्न झालेली असून कांहीं अंशीं शेतकीच्या अर्धवट स्थितीमुळेंहि उत्पन्न झाली असली पाहिजे. भटकणें व स्थाईक राहणें ह्यांच्यामधली जी ही स्थिति ती आफ्रिका खंडांत अगदीं सामान्य आहे. कोणी असें म्हटलेलें आहे कीं, " आफ्रिका खंडांत समाज ही वनस्पति मुळीसारखी आहे; तिला वट्ट किंवा टिकाऊ असें खोड मुळींच नाहीं; तिची वाढ फार असून तिचा नाशहि तेव्हांच होतो, आणि प्रत्येक वर्षीं ती जाळून टाकिली तरी तिची उत्पत्ति कमी होत नाहीं. " विषुववृत्तावरील आफ्रिकन लोक आपल्या गांवांचीं स्थानें नेहमीं बदलीत असतात असें रीड सांगतो. बेचुआना लोकांबद्दल टॉमसन असें म्हणतो कीं, त्यांचीं शहरें बहुधा इतकीं मोठीं असतात कीं, त्यांच्यांत कित्येक हजा-

रांची वस्ती असते; तरी अरब लोकांच्या छावणीप्रमाणें त्यांस त्यांचा नाईक हवे तेव्हां हलवूं शकतो. यूरोपांत प्राचीनकाळीं अशीच स्थिति होती. प्रत्येक टोळींतील कुटुंबें व लहान वस्त्या आपल्या देशांतील एका भागांतून दुसऱ्या भागीं स्थानान्तर करीत असत. एवंच उत्तर अमेरिकेंतील इंदियन लोकांप्रमाणें पारध करून राहणाऱ्या हंगामी खेड्यापासून स्थाईक शेतकी करून राहण्याच्या स्थितीपर्यंत जें संक्रमण होतें तें फार हळूहळू होतें; आणि पूर्वींची राहण्याची सरणी वरचेवर पुन्हा ग्रहण केली जात असल्यामुळें, ती कायमची टाकून देण्याचें कार्य फार मंद रीतीनें होत असतें.

म्हणून सामाजिक चळवळींत फेरबदल होऊन घडून येणाऱ्या सामाजिक रूपान्तरांचा विचार करतांना, फेरबदल होण्यास वंशपरंपरया प्राप्त झालेल्या सामाजिक नमुन्यानें आणिलेले प्रत्यवाय, आणि जुनी परिस्थिति कांहीं अंशीं कायम राहिल्यामुळें उत्पन्न झालेले प्रत्यवाय, हे दोन्ही ध्यानांत आणिले पाहिजेत. शिवाय, पूर्वपरिस्थितीचा जर पुनः जोर झाला, तर पुनः पूर्व नमुन्याप्रत पिछेहाट होते हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे.

५५. ह्या ठिकाणीं आपणास विशेष महत्त्वाचीं रूपान्तरें म्हटलीं म्हणजे, युद्धविशिष्ट नमुन्यास उद्यमविशिष्टाचें, व उद्यमविशिष्टास युद्धविशिष्टाचें रूप येणें, हीं होत. आणि उद्यमविशिष्ट नमुना थोड्याशा उदाहरणांत अर्धवट पक्क झाला असतां, देशादेशांच्या भांडणांनीं त्याची पिछेहाट होऊन त्यास परत युद्धविशिष्ट स्वरूप कसें येतें, ही गोष्ट विशेषेंकरून लक्षांत आणिली पाहिजे.

ह्या दोन नमुन्यांची तुलना करीत असतां आपल्या असें लक्षांत आलेंच आहे कीं, युद्धविषयक चळवळींना आवश्यक जें जबरदस्तीचें सहकार्य, तें उद्यमविषयक चळवळींना अवश्य लागणाऱ्या स्वैच्छिक सहकार्यापासून भिन्न असतें; आणखी आपल्या लक्षांत असेंहि आलें कीं, युद्धविशिष्ट नमुन्याला योग्य अशी जी जुलमी शासनपद्धति ती जेथें अगदींच घट्ट झाली नसेल, तेथें युद्धापासून प्रतिबंध न होतां उद्योगधंदा भरभराटीस येऊं लागला, म्हणजे त्या स्थितीस योग्य अशी जी जुलमी शासनपद्धति तिचा अंकुर दिसूं लागतो. सन १८१५ सालीं नेपोलियनचा पाडाव झाल्यापासून यूरोपांत राजकीय स्वातंत्र्याची जी वृद्धि झाली ती ह्याचें एक उदाहरण होय. नॉर्वे देशांतहि ह्या सत्याचें उदाहरण दृष्टीस पडतें, कारण तेथें युद्धाचा अभाव व राजकीय स्वातंत्र्याची वृद्धि हीं एकत्र दृष्टीस पडतात. पण एथें आपणास विशेषतः लक्षांत आणावयाची गोष्ट ही कीं, युद्धविषयक संवयी पुनः लागल्यास युद्धविशिष्ट नमुना पुनः उत्पन्न होतो.

प्राचीन इतिहासांत ह्या गोष्टीचीं उदाहरणें कशीं सांपडतात, युद्धाच्या प्रतिक्रियारूप प्रभावांमुळें वाढीस लागलेल्या डच लोकांच्या लोकसत्ताकाची दोनदां पिछेहाट होऊन एकछत्री सत्तेची उत्पत्ति कशी झाली, इंग्लंदांत ऑलिव्हर क्रामवेलच्या कारकीर्दींतील लढायांमुळें पुनः राजसत्ता कशी स्थापन झाली, आणि तद्वतच जयामागून जय मिळत गेल्यामुळें पहिल्या फ्रेंच लोकसत्ताकास पुनः लष्करी जुलमाचें स्वरूप कसें आलें, ह्या

गोष्टींचा विशेष विचार न करतां त्याच्याहि आलीकडे ह्यासंबंधानें काय स्थिति झालेली दृष्टीस पडते ह्याचा विचार केल्यास पुरे होणार आहे. सन १८७०–७१ सालीं फ्रान्साशीं झालेल्या युद्धामुळें जर्मनीमध्यें विशेषतः केंद्रीभूत सत्तेची स्थापना कशी झाली, व तेणेंकरून जास्त जुलूम कसा होऊं लागला, हें बिस्मार्कनें धर्माधिकाऱ्यांशीं केलेल्या वर्तनावरून स्पष्ट दिसतें; तद्वतच बाह्यसंरक्षण व अंतर्व्यवस्था ह्या दोन्ही गोष्टी साधण्यासाठीं फौजेकरितां जो खर्च करावा लागतो त्यास पार्लेमेंताची संमति लागूं नये, हें जें जर्मन सेनापति माल्टके याचें मत त्यावरूनहि तीच गोष्ट व्यक्त होते; आणि जर्मनीमध्यें आगगाड्यांवर सरकारचा अधिकार जास्त करण्याकरितां जे कायदे केलेले आहेत ते त्याच धोरणावर बनलेले आहेत. फ्रान्सामध्येंहि जो मुख्य शिपाई तोच मुख्य अधिकारी झालेला अद्यापि दृष्टीस पडतच आहे; तद्वतच, लढाईच्या वेळीं उत्पन्न झालेली वेढ्याची स्थिति त्या देशाच्या पुष्कळ भागांत अद्यापि दृष्टीस पडते; आणि नांवाच्या स्वतंत्र सरकारानें स्वातंत्र्यावरील पुष्कळ बंधनें कायम ठेविलेलीं दृष्टीस पडतात. तद्वतच इंग्लंदामध्येंहि ह्याच स्थितीचीं फारच स्पष्ट उदाहरणें दृष्टीस पडतात; कारण यूरोपांतील इतर देशांपेक्षां तेथें उद्यमविशिष्ट नमुन्याची वाढ जास्त झालेली असल्यामुळें पिछेहाटीसहि अर्थात् तेथें ज्यास्त जागा आहे. ( मूळ पुस्तक पंचवीस तीस वर्षांपूर्वीं लिहिलेलें आहे. )

हे फेरबदल लढाया व लढायांबद्दल तयाऱ्या ह्या

दोहोंच्या योगानें उत्पन्न झालेले आहेत. कारण १८५१ सालीं लुई नेपोलियन गादीवर बसल्यानंतर क्रिमियांतील युद्ध झालें, पुढें शिपायांच्या बंडामुळें युद्ध झालें, पुढें चीनचें युद्ध झालें, पुढें आशान्टी, आबिसिनीया, अफगाणिस्थान, झुलूलाण्ड, ईजिप्त इत्यादि ठिकाणीं युद्धें झालीं. शिवाय, बाह्यदेशीं लष्करी खात्यास व युद्धानुकूल मनोवृत्तीस पुनः जोर आल्यामुळें इंग्लंदांतहि आला आहे. व्यक्तींप्रमाणें राष्ट्रांच्या ठिकाणींहि एकानें हल्ल्याचा उपक्रम केला कीं दुसरा संरक्षणाची तयारी करितो ही गोष्ट उघडच आहे. म्हणून इंग्लंदांत अलीकडे फौज व आरमार, किल्ले, व्हालंटीयर लोक, कायमच्या छावण्या, पावसाळ्यांत कवायती, आणि राष्ट्रांत सर्वत्र लष्करी ठाणीं बांधणें, ह्यांच्यावरील खर्च वाढत चालला आहे.

युद्धविशिष्ट नमुन्याप्रत जी ही पिछेहाट झाली आहे तिच्या गुणविशेषांपैकीं पहिला गुणविशेष म्हटला म्हणजे लुटारूपणाच्या चळवळी हा होय. संरक्षणाच्या उद्देशानें तयार केलेली व्यवस्था अतिक्रमाच्याहि कामीं उपयोगी पडण्यासारखी असल्यामुळें त्याचा उपक्रम करण्याकडे तिचा नेहमीं कल असतो. आथेन्समध्यें परशत्रूला टक्कर देण्यासाठीं जें सैन्य व आरमार प्रथम तयार झालें तें जसें मागून स्वतःच इतरांवर हल्ले करूं लागलें, ज्याप्रमाणें फ्रान्सांत परकीयाच्या हल्ल्यांस विरोध करण्यासाठीं बनविलेली विजयी सेना स्वतःच इतर देशांवर हल्ले करूं लागली, तशी हल्लीं इंग्लंदची स्थिति आहे. चीन देशांत काय, हिंदुस्थानांत काय, आफ्रिकेंत काय, पालिनिशियांत काय, व इंदियन आर्किपेलेगोंत काय, अ-

तिक्रम करणारास कारणें हीं नेहमीं सांपडत असतातच; आणि त्यांचा उपयोग इंग्लंदचें साम्राज्य वाढविण्याकडे होत असतोः साधल्यास शक्तीचा खर्च केल्याविना, व जरूर पडल्यास शक्तीचा खर्च करूनहि. फीजी बेटें निरुपायास्तव स्वाधीन झालीं तेव्हां तीं काबीज केल्यानंतर आतां सामोआ बेट काबीज करण्याचा बेत चालला आहे. तहाच्या कलमाखालीं असलेला मुलूख दुसऱ्या एका मुलखा ऐवजीं घेऊन व त्या तहास एकीकडे झुगारून त्याचें प्रतिपादन केल्याबद्दल आह्मी आशान्टीशीं लढाईस जातों. शेरब्रोमध्यें तद्देशीय नायकांशीं आह्मी केलेल्या तहांवरून तेथें अव्यवस्था झाली पाहून ती मोडण्यासाठीं आह्मी तेथें शिपाई पाठवितों,आणि लवकरच असें म्हणावयास लागूं कीं, आपला अंमल तेथें फैलावणें हें आवश्यक झालें आहे. पेराकमध्येंहि असेंच झालें आहे. सल्लामसलत देण्याकरितां पाठविलेला रेसिदेंत हुकूम सोडूं लागतो; तेथील मुख्यांनीं पसंत केलेल्या माणसाच्या ऐवजीं दुसऱ्या एका अगदीं मऊ माणसास सुलतान म्हणून नेमितो; लोकांमध्यें विरोधप्रवृत्ति उत्पन्न करून त्या सबबीवर जबरदस्तीचा उपयोग करितो; सरकारी अधिकार बळकावणें आवश्यक समजतो; त्याचा जाहीरनामा तेथील एका माणसानें फाडून टाकिल्यामुळें रेसिदेंताचा चाकर त्याचा जीव घेतो; त्यामुळें रेसिदेंत ठार होतो; त्यावरून, नेटिव्ह मेला त्याबद्दल कांहींच न बोलतां, रेसिदेंत मेला म्हणून जो तो सूड घेण्याविषयीं ओरडा सुरू करितो, आणि लष्करी स्वारी जाऊन तेथें ब्रिटिश अमलाची स्थापना करिते. आपल्या मुलखाच्या

पाहणीस विरोध करणाऱ्या क्यारेन लोकांच्या टोळ्यांस मारण्याच्या कामीं असो, किंवा इंग्रजप्रवासी पाहिजे तेथें घुसडण्यास मुक्त आहे ह्या तत्त्वाच्या अनुरोधानें त्याच्या मरणाबद्दल कोणावर तरी सूड उगविण्यासाठीं चिनी लोकांवर केलेल्या मागणीच्या कामीं असो, सर्वत्र इंग्रजांस तंट्यांस कारणें सांपडून त्यामुळें मुलूखप्राप्ति होत असते. कामन्स सभेंत व वर्तमानपत्रांत हाच बाणा दृष्टीस पडतो. सुवेझचा कालवा विकत घेण्याच्या संबंधानें झालेल्या वादविवादांत, इंग्लिश मुख्य प्रधान, कदाचित् ईजिप्त देश खालसा करावा लागेल ह्या गोष्टीस उद्देशून म्हणाला कीं, इंग्लिश लोकांस आपलें साम्राज्य कायम राखण्याची इच्छा असल्यामुळें तें वाढलें तरी ते घाबरणार नाहींत; आणि ह्या त्याच्या भाषणास टाळ्या मिळाल्या. आणि नुक्तेच, डेहामी देशाचा नायनाट करण्याचा हा समय आहे असें आग्रहपूर्वक सुचवून ख्रिस्ती धर्माची बडबड करणाऱ्या एका साप्ताहिकानें असें उद्गार काढिले आहेत कीं, आपण व्हिड्डा घेऊं या; मग रानट्यांस तें कसें तें परत घेऊं दे.

आणि आतां फौजांचीहि पुनर्वृद्धि व लुटारूपणाच्या बाण्याची पुनरावृत्ति ह्यांचें अवलोकन केल्यावर ज्याशीं आपला एथें विशेष संबंध आहे ती गोष्ट ध्यानांत आणूं या; ती ही कीं इंग्लंदच्या एकंदर संस्थांत लष्करी नमुन्याचें सामान्यतः पुनरुज्जीवन झालेलें दृष्टीस पडतें; कारण तेथें केंद्रीभूत अधिकार आणि जुलमी नियमन यांची वृद्धि झालेली आढळून येते. ही गोष्ट खुद्द सरकारी खातेमांडणींतच प्रथमदर्शनीं दृष्टोत्पत्तीस येऊं

लागली आहे; उदाहरणार्थ, हिंदुस्थान सरकारच्या अधिकाराचें स्टेटसेक्रेटरीच्या द्वारा एकदम आकुंचन केलें आहे; आणि कौंटींचे कारभार करणाऱ्या कमिट्या आपल्या ओझ्याचा कांहीं भाग सगळ्या राष्ट्रावर लादण्याच्या हेतूनें आपले अधिकार सोडून देत आहेत. सर्वत्र दिवाणी अधिकाऱ्यांची सत्ता लष्करी अंमलदार बळकावीत आहेत. लंदन पोलीस व प्रांतांतील पोलीस ह्यांचे मुख्य अधिकारी लष्करी अंमलदार नेमू लागले आहेत. म्युनिसिपालिट्या व कलाभुवनें ह्यांचेहि अधिकारी तेच दिसतात; रेलवेइन्स्पेक्टरहि तेच आहेत, आणि कांहीं म्युनिसिपालिट्यांतून तर बारीकसारीक कामांवरून त्यांस लावूं लागले आहेत. ह्या सर्व गोष्टींचा साहजिक परिणाम असा होत आहे कीं, व्यक्तींच्या हक्कांकडे कमी लक्ष देणें, आणि अधिकाराचें प्रतिपादन जास्त जोरानें करणें, असें एकंदर कारभारास सामान्य स्वरूप येत आहे. स्पर्शजन्य रोगांबद्दल जे कायदे झाले आहेत त्यांच्यामध्येंहि हेंच धोरण दृष्टीस पडतें. ते कायदे लष्कर व आरमार ह्या खात्यांतून निघालेले असून कायदेशीर राज्यपद्धतीनुसार जें व्यक्तिस्वातंत्र्य असावयाचें त्यास त्यांनीं धाब्यावर बसविलें आहे, आणि स्थानिक अधिकाऱ्यांस न विचारतां मुख्य पोलिसाकडून त्यांची अंमलबजावणी होत आहे. सार्वजनिक स्वच्छता व आरोग्य ह्यांच्या संबंधानें आज पुष्कळ वर्षें जे हुकूम सुटत आहेत त्यांचेंहि धोरण असेंच आहे; व त्यांचा परिणाम असा झाला आहे कीं, शेंकडों प्रांतांवर डाक्टर अधिकारी नेमिले असून त्यांचा कांहीं पगार मुख्य सरकार

देत असल्यामुळें त्याचा त्यांजवर अंमल चालतो. खुद्द वैद्यकीच्या खात्यांतहि अशीच क्रान्ति उडाली आहे; कारण हल्लीं स्वतंत्र संस्थांनीं दिलेल्या वैद्यकी पदव्या ओळखीत नाहींसे झाले आहेत, व सगळ्यांना एकाच परीक्षासत्राखालीं ओढितात. तद्वतच, गरीबांच्या कायद्याची बजावणी जास्त केंद्रीभूत होत आहे, व स्थानिक पंचांचे अधिकार लोकल गव्हर्मेंट बोर्डाकडून नियंत्रित होत आहेत. शिवाय, लंदनमधील मुख्य अधिकारी ह्याप्रमाणें प्रांतिक अधिकाऱ्यांचे अधिकार बळकावीत असतां, प्रांतिक अधिकारी व्यापारी कंपन्यांचे हक्क बळकावीत आहेत. कित्येक शहरांतून म्युनिसिपालिट्यांनीं पाण्याच्या तोट्या व धुराचे दिवे हीं पुरविण्याचीं कामें पटकाविलीं आहेत; आणि हल्लीं असा बूट निघाला आहे ( व तो एका लष्करी खात्याच्या अभिमान्यानें काढिला आहे हें त्यांत विशेष आहे ) कीं, लंदनमध्येंहि तसेंच करावें. इतकेंच नव्हे, तर ह्या सार्वजनिक संस्था बांधकामहि करूं लागल्या आहेत. कायद्यानें ठरविलेल्या किंमतीप्रमाणें लहान घरांचा पुरवठा करण्याचें काम सामान्य व्यापाऱ्यांस गैरफायदेशीर झाल्यामुळें, ते आतां प्रांतिक शहरांतून म्युनिसिपालिट्या आपल्या अंगावर घेणार आहेत; आणि लंदनमध्यें हालबर्न पेठेंतील पट्टी देणाऱ्यांनीं गरीबांकरितां घरें बांधण्याच्या कामीं अमुक खर्च करावा असें बोर्डानें ठरविलें असतां, सेक्रेटरी ऑफ स्टेट येतो आणि म्हणतो कीं, त्यांनीं जास्त खर्च केला पाहिजे. इंग्लंदांतील तारखातें प्रथम खाजगी रीतीनें बनलें असून हल्लीं तें सरकारी झालें आहे ह्याचाहि अर्थ तोच

आहे. आणि सरकारानें आगगाड्या विकत घ्याव्या म्हणून जी सूचना पुढें आली आहे, तिचाहि अर्थ उद्यमसंस्था कमी करून सरकारी संस्था वाढवाव्या हा आहे; आणि हा बूट सध्यां अंमळ मागें पडला आहे ह्याचें कारण एवढेंच कीं, तारा विकत घेतल्यामुळें सरकारचें मोठें नुकसान झालेंले आहे. हल्लीं हें खूळ किती माजलें आहे हें, लोकांचें वर्तन सुधारण्यासाठीं; कायदा करण्याचा जो घाट घाटत आहे त्यावरून स्पष्ट दिसत आहे. मद्यपानास अडथळे उत्पन्न करून लोकांस नियमित करण्याचा विचार चालला आहे म्हणजे कांहीं जिन्नस त्यांस पूर्वींप्रमाणें पाहिजे तसे विकतां किंवा विकत घेतां यावयाचे नाहींत. उद्यमविशिष्ट नमुन्याचें मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजे नागरिकांनीं एकमेकांना केलेल्या लहान-मोठ्या दुखापतींविषयीं विनखर्चाच्या उपयांची तजवीज जलद करावयाची; पण हें तत्त्व अमलांत आणण्याच्या ऐवजीं पाहणी करून ह्या दुखापती बंद करण्याची खटपट कायदे करणारे करीत आहेत. खाणी, कारखानें, जहाजें, खाणावळी, रोटीवाल्यांचीं दुकानें, इतकेंच नव्हे तर खाजगी घरांतील शौचकूप, एथपर्यंत काय व्यवस्था करावयाच्या हें कायद्यांनीं ठरवून अंमलदार त्या कायद्यांची बजावणी करीत आहेत. दूध, तूप वगैरे जिनसांत जी भेसळ होते ती योग्य शिक्षा त्वरित व खात्रीपूर्वक करून बंद करण्याच्या ऐवजीं, त्या जिनसांच्या परीक्षा करणारे सार्वजनिक अधिकारी नेमून ती बंद करण्याची खटपट चालली आहे. स्वैच्छिक सहकार्याचें तत्त्व म्हटलें म्हणजे निढळच्या

घामानें मिळविलेल्या पैशानें ज्यानें त्यानें वाटेल तें सुखसाधन विकत घ्यावें. पण तें तत्त्व एकीकडे झुगारून देऊन सार्वजनिक खर्चानें सर्व लोकांना फुकट वाचनालयें, फुकट प्रदर्शनसंग्रह, इत्यादिकांचा पुरवठा करण्याचें घाटत आहे; ह्याचा अर्थ जास्त योग्य माणसांनीं सांठविलेल्या पैशांतून कमी योग्य माणसांची सोय करावयाची असा आहे. नागरिकांवरील सरकारच्या अधिकारास निश्चित अशी मर्यादा कांहींच नाहीं, हें जें लष्करी नमुन्याचें गृहीत तत्त्व त्याचा हल्लीं मुकाट्यानें स्वीकार केला असून, सरकारविचार कधीं चुकावयाचा नाहीं हें जें त्या नमुन्याला शोभणारें दुसरें तत्त्व, त्याचाहि स्वीकार जो तो बेलाशक करीत आहे. शारीरिक कल्याण व मानसिक कल्याण हीं, सरकारच्या योग्यतेबद्दल किंचितहि शंका मनांत न आणतां त्याच्या स्वाधीन केलीं जात आहेत. मानलेल्या पारलौकिक कल्याणासाठीं म्हणून जे अधिकारी आपलीं मतें लोकांवर जबरीनें लादीत होते त्यांच्याशीं ( पोप व त्यांचे हाताखालील अधिकारी यांशीं ) कित्येक शतकें झगडा करून त्यांस पदच्युत केल्यानंतर, हल्लीं इंग्लिशलोक मानलेल्या ऐहिक कल्याणासाठीं म्हणून दुसऱ्या एका अधिकारी-वर्गाची, त्याचें शिक्षण लोकांवर लादण्याकरितां, प्रार्थना करीत आहेत. पोपाचें म्हणणें कधीं चुकीचें असावयाचें नाहीं ह्या समजुतीवर जी जबरी धर्मशिक्षणाच्या कामीं न्याय्य म्हणून समजली जात असे ती जबरी, पार्लमेंताचें म्हणणें कधीं चुकावयाचें नाहीं ह्या समजुतीवर, लौकिक शिक्षणाच्या कामीं हल्लीं न्याय्य समजली जात आहे; आणि अशा रीतीनें,

कोणीं विरोध केल्यास त्यास तुरुंगांत टाकण्याच्या! धमकीवर ज्यांतील विषय वाईट, ज्याची तऱ्हा वाईट, व ज्याचा क्रम वाईट, अशा प्रकारच्या शिक्षणाची योजना होत आहे.

लष्करी नमुन्याच्या रचनेप्रत कांहीं अंशीं पिछेहाट होऊन, त्याबरोबर जबरीच्या सामाजिक पद्धतीप्रत जी ही कांहीं पिछेहाट झाली आहे, तिजबरोबर लोकांचे मनोभावहि तदनुसार बदललेच आहेत. व्यक्तिस्वातंत्र्याविरुद्ध सरकारचा अंमल वाढविणें हें टोरी मताचें तत्त्व आहे, आणि सरकारच्या अमलविरुद्ध व्यक्तिस्वातंत्र्य वाढविणें हें लिबरलमताचें तत्त्व आहे. पण पूर्वींच्या शांततेच्या समयीं, ज्या ( लिबरल ) पक्षानें, धर्मविषयक अन्याय्य प्रतिबंध काढून टाकून, अप्रतिबंध व्यापाराची स्थापना करून, आणि वर्तमानपत्रांच्या मार्गातील अडचणी दूर करून, व्यक्तिस्वातंत्र्याची वृद्धि केली, तोच पक्ष, ही पिछेहाट सुरू झाल्यापासून, व्यक्तिस्वातंत्र्य कमी करणारीं सरकारी खातीं वाढविण्याच्या कामीं विरुद्ध ( टोरी ) पक्षावर जणूं काय ताण करूं पाहत आहे. स्वतंत्र राज्यव्यवस्थेच्या तत्त्वांची अवहेलना किती चालली आहे, आणि युद्धविषयक क्रियांनीं वाढविल्या जाणाऱ्या मनोभावांपासून ह्या स्थित्यन्तराची उत्पत्ति प्रत्यक्ष रीत्या कशी होते, हें सुवेझच्या कालव्याच्या संबंधानें जी एकंदर भानगड झाली तिजवरून अगदीं स्पष्टरीतीनें ध्यानांत येतें. किंमतीचा विचार एकीकडे ठेविला तरी ज्या गोष्टीमुळें राष्ट्रास फार मोठ्या भानगडींत पडावें लागलें, अशी ही गोष्ट प्रधानमंडळानें

अशा रीतीनें उरकून घेतली कीं, पार्लमेंतास ती उलटण्याचा खरा अधिकार राहिलाच नाहीं; असें असून, ह्या असल्या कृतीबद्दल प्रधानांस जी शिव्यांची लाखोली मिळावयाची, ती स्तुतींची मिळाली. त्या वेळीं, अशा रीतीनें आह्मीं लष्करी कारण साधून घेतलें ही जी सबब प्रधानांनीं पुढें आणिली, ती सर्वांनीं मुकाट्यानें ऐकून घेतली. परातिक्रम व स्वसंरक्षण हीं कृत्यें ज्याच्या धोरणानें चालतात त्या सूत्रधारी केंद्राच्या त्वरित कृतीमुळें, अशा रीतीनें पार्लमेंतास धाब्यावर बसविणें व लोकांचा स्वराज्याधिकार घटकाभर एकीकडे गुंडाळून ठेवणें, आह्मांस भाग पडलें, असेंहि प्रधानांकडून सांगण्यांत आलें. आणि जिंकून घेतलेल्या मुलखावरील आपला ताबा कायम ठेवण्याकरितां असें करावें लागलें हें म्हणणें सामान्य जनास खरें वाटून त्यांनीं ह्या लष्करी अंमलाच्या दिशेस झालेल्या पिछेहाटीबद्दल प्रधानमंडळास क्षमा केली इतकेंच नव्हे तर त्याबद्दल मोठा आनंद मानिला.

५६. आतां हें उघडच आहे कीं, दोन उदाहरणांत कधींहि परस्परसदृश नसणाऱ्या विशिष्ट कारणांनीं सामाजिक रूपान्तरांस प्रत्येक ठिकाणीं घोंटाळ्याचें स्वरूप येत असतें व त्यामुळें तीं उमगण्यास कठीण पडतें. ज्या ठिकाणीं झपाट्याची वाढ होत असेल त्या ठिकाणीं नमुन्यांत बदल झाल्यामुळें होणाऱ्या रचनाभेदांचा आणि एकंदर गोळ्याची वृद्धि होत असतां होणाऱ्या रचनाभेदांचा घोंटाळा होत असतो. शिवाय, पोषणेंद्रियजाल व बाह्यक्रिया करणारें इंद्रियजाल हीं दोन महाजालें जेव्हां एकसमयावच्छेदेंकरून उत्क्रान्त होत अस-

तात, तेव्हां कोणती गोष्ट कोणत्या कारणामुळें होत आहे हें सांगण्याची पंचाईत पडते. उदाहरणार्थ, इंग्लंदची स्थिति अगदीं अशी आहे. बाह्य क्रियेसाठीं झालेल्या ह्यांतील रचनांच्या ज्या पुनर्वृद्धीचें निरूपण एथवर आपण केलें ती, आणि तिजबरोबर तिला योग्य अशा ज्या सामाजिक पद्धतीप्रत त्या राष्ट्राची पिछेहाट झाली आहे ती, ह्या दोन्ही होत असतां पोषक इंद्रियें आणि तदनुषंगिक समाजस्थिति ह्यांची वाढ बंद राहिली आहे असें नाहीं. म्हणून वर सांगितलेल्या फेरबदलांच्या विरुद्ध असे कांहीं फेरबदल त्या राष्ट्रांत उत्पन्न झाले आहेत. अधिकाऱ्यांना नत होणें हें जिचें मुख्य तत्त्व आहे अशा प्रकारची धर्माधिकारी–सत्तेची पुनर्जागृति युद्धशीलतेस अनुरूप अशी एकीकडे झाली असतां, दुसरीकडे धर्मसंस्थेंतील पक्षांची वृद्धि, धर्माच्या बाबतींत व्यक्तिमताचें अधिकाधिक प्रतिपादन, आणि विधिविषयक कडक नियमांचें शैथिल्य,ह्या गोष्टी विरुद्ध हालचालीस अनुरूप अशाच होत आहेत. लष्करी नियमैक्य उत्पन्न करणाऱ्या शिक्षणव्यवस्था पार्लमेंताच्या प्रत्येक नव्या कायद्यानें एकीकडे जास्त जास्त यंत्रवत् होत असतां दुसरीकडे सार्वजनिक शाळा व विश्वविद्यालयें यांतील जुन्या व्यवस्था जास्त लवचीक व कमी समस्वरूप होत आहेत. स्वैच्छिक सहकार्याच्या तत्त्वांच्या अगदीं विरुद्ध रीतीनें—कामकरी वर्गाच्या स्वातंत्र्यांत एकीकडे हात घातला जात असतां,उद्यमविषयक उत्क्रमणानें ज्या अनिर्बंधव्यापारसरणीचें वर्धन झालें आहे ती उलथून पाडण्याच्या खटपटीस अद्यापि [ २५, ३० वर्षांपूर्वीं ] कोणी लागलेला

नाहीं. ह्या सगळ्याचा तात्पर्यार्थ असा दिसतो कीं जुन्या जबरीच्या नियमनपद्धतीचा दाब जेथें असह्य झाला असेल तेथें जरी ती काढून टाकिली आहे, तरी जेथें तो दाब जाणवत नाहीं तेथें तिची पुनर्वृद्धि चाललीच आहे.

शिवाय, ज्या प्रकारच्या रूपान्तरांचा आपण एथें विचार करीत आहों तीं उमगून काढण्याचें काम, आगगाड्या व तारायंत्रें यांच्या योगानें एकदम झालेल्या अत्यन्त मोठ्या रूपान्तरामुळें जास्त कठिण झालें आहे. समाजशरीर हें, मंदरुधिराभिसरणयुक्त आणि अंकुररूपज्ञानतंतुविशिष्ट अशा थंड रक्ताच्या प्राण्याच्या स्थितींतून निघून, चांगलीं रक्तवहनेंद्रियें व वाढलेलें ज्ञानतंतुजाल ज्यास उत्पन्न झालें आहे अशा गरम रक्ताच्या प्राण्याच्या पायरीप्रत एका पिढींत जाऊन पोंहोचलें आहे. सध्याच्या इंग्रज लोकांच्या पिढीमध्यें संवयी, समज व मनोभाव ह्यांच्या संबंधानें जी एवढी क्रान्ति झालेली दिसते, तीस इतर कारणांपेक्षां हेंच जास्त कारण झालेलें आहे. आतां हें उघडच आहे कीं, विभाजक व संदेशक बातम्या व हुकूम पोहोंचविणाऱ्या रचनांचें हें जें झपाट्यानें उत्क्रमण झालें आहे, तेणेंकरून उद्यमविषयक संस्था आणि युद्धविषयक संस्था ह्या दोहोंच्याहि वाढीस मदत झालेली आहे.एकीकडे उत्पादक हालचाली जास्त सुलभ रीतीनें व्हावयास लागल्या असून,दुसरीकडे अतिक्रम व स्वसंरक्षण हीं कामें होण्यास जशा प्रकारचा समाजनमुना असावा लागतो त्यांत विशेषतः दिसणाऱ्या केंद्रीभूत अधिकाराची वृद्धि होत आहे.

पण खरी स्थिति झांकून टाकणाऱ्या असल्या संमिश्र-

ता जरी उत्पन्न झाल्या आहेत, तरी सन १८१९ ते ५० ह्या काळाची १८५० ते सद्यःकाल (१८८०-८५) ह्या कालाशीं जर तुलना करून पाहूं लागलों, तर ही गोष्ट आपल्या ध्यानांत खचीत येईल कीं, सैन्यें जशीं वाढत चाललीं आहेत, तंटे जसे जास्त वारंवार होऊं लागले आहेत, आणि युद्धविषयक मनोभावाची जशी पुनर्जागृति होत चालली आहे, तशी जबरीच्या नियमनांचीहि वृद्धि होत चालली आहे. मतदानाच्या रूपानें व्यक्तिस्वातंत्र्याची जरी नांवाची वाढ झालेली आहे, तरी वास्तविक रीत्या पुष्कळ तऱ्हांनीं तें स्वातंत्र्य कमी झालें आहे; यास एक कारण सारखे जास्त होणारे अधिकारी जीं बंधनें अमलांत आणीत आहेत तीं होय, व दुसरें कारण, पूर्वीं जे फायदे प्रत्येकजण आपल्यासाठीं प्राप्त करून घेत असे, ते त्याच्यासाठीं किंवा त्याच्या खर्चानें इतरांसाठीं मिळविण्याकरितां त्याच्याकडून जबरीनें पैसा घेतला जात आहे हें होय.

एवंच, निरनिराळ्या समाज-नमुन्यांची तुलना करतां जीं सत्यें आपल्या दृष्टीस पडतात, त्यांच्याशीं जुळणारीं सत्यें, त्यांचा लागेल तितका मागमोस लावतां, रूपान्तरामध्येंहि दृष्टीस पडतात. व्यक्तिदेहाप्रमाणेंच समाजदेहामध्येंहि इंद्रियरचना त्या देहाच्या चळवळीस योग्य अशा बनत असतात. दोन्ही ठिकाणीं, चळवळींची सरणी मुळापासून बदलावी अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यास, रचनास्वरूपहि हळूहळू मुळापासून बदलून जातें; आणि दोन्ही ठिकाणीं, जुन्या चळवळींचें पुनर्ग्रहण झाल्यास जुन्या नमुन्याप्रत पुनः पिछेहाट होते.

# प्रकरण बारावें

## उपसंहार

५७. व्यक्तिशरीर व समाजशरीर ह्यांच्यांतील साम्यांचें अवलोकन ज्यानें विशेषतः केलें असेल तो आणखीहि कितीतरी साम्यें त्या दोहोंमध्यें दाखवूं शकेल. उदाहरणार्थ, घटना जशी पूर्णत्वास पावत जाईल तशी तिची बदलण्याची शक्ति कमी होत जाते व तिची वाढ खुंटते, ह्या सामान्य सिद्धान्ताचीं तो उदाहरणें देऊं शकेल. पूर्ण वाढलेला प्राणी, त्याचीं सर्व अंगें बनून जाऊन, ज्या शक्तींनीं त्याच्या निरनिराळ्या भागांचे विशेष आकार उत्क्रान्त झाले असतील त्या शक्तीच्या संचयाच्या जोरावर आपल्यांत जास्त फेरबदल होऊं देत नाहीं; आणि पूर्ण वाढलेला समाजहि तसेंच करितो. दोन्ही ठिकाणीं सरतेशेवटीं ताठरपणा ( लवचीकपणाच्या उलट ) उत्पन्न होतो. पूर्ण विकासाची वेळ जशी येत जाईल तसें प्राण्याचें प्रत्येक इंद्रिय आणि समाजांतील प्रत्येक संस्था जास्त जास्त सुसंबद्ध व निश्चितस्वरूप होत जाते; आणि त्यामुळें आकारवृद्धीस किंवा नव्या परिस्थितीस आवश्यक असे जे फेरबदल त्यांस जास्त अडथळा उत्पन्न होऊं लागतो.

नंतर त्याला ह्या गोष्टीबद्दल विशेष विवेचन करतां येईल कीं, व्यक्तिदेहाप्रमाणेंच समाजदेहामध्येंहि विशिष्ट

नमुन्यास योग्य अशा रचनांची पूर्ण उत्क्रान्ति झाली म्हणजे, नंतर लवकरच त्या देहास उतरती कळा लागते. आतां ह्याबद्दल त्यास समाधानकारक पुरावा देतां येणार नाहीं हें खरें आहे; कारण प्राचीन समाजाच्या चळवळी वस्तुतः युद्धशील असल्यामुळें पराजयाच्या योगानें ते मोडून जाऊन त्यांच्यांत रूपान्तरचक्रें पुरीं होण्यास अवधि सांपडत नसे; आणि अर्वाचीन समाजांचीं रूपान्तरचक्रें अद्यापि पुरीं व्हावयाचीं आहेत. पण अर्वाचीन समाजांचे जे गौणभाग आहेत त्यांच्या ठिकाणीं त्यास ह्याबद्दल पुरावा सांपडेल, आणि प्रारंभीं प्रारंभीं स्थानिक वाढीचा सामान्य वाढीशीं जेव्हां घोंटाळा उडालेला नव्हता तेव्हांच्या संबंधानें विशेषतःच सांपडेल. उदाहरणार्थ, त्याला असें दाखवितां येईल कीं, जुनीं जीं स्थानिक स्वराज्याचीं शहरें होतीं त्यांमध्यें निरनिराळ्या धंदेवाल्यांचे जमाव व त्यांचे नियम हे दिवसेंदिवस जास्त जास्त कडक होत गेल्यामुळें हळूहळू त्यांचा ऱ्हास होत गेला, व ज्या शहरांतून असे विशिष्ट हक्कदार धंदेवाले नव्हते व स्वतंत्रता जास्त होती तीं शहरें भरभराटीस येऊं लागलीं. म्हणजे काय, तर, ताठर झालेली जी जुनी रचना तिचा व्यापार नव्या लवचीक रचनेनें बळकावून घेतला. सार्वजनिक किंवा खाजगी अशा प्रत्येक संस्थेच्या संबंधानें तो असें दाखवूं शकेल कीं रूळी व बारीक सारीक नियम यांची जी तिजमध्यें सारखी वृद्धि होते, त्यांच्या योगानें त्याच्या क्रिया जरी सद्यःकालास योग्य अशा होऊं लागतात, तरी भविष्यकाळास त्या अयोग्य

बनतात. आणि यावरून प्रत्येक सगळ्या समाजाच्या संबंधानें तो असें अनुमान काढूं शकेल कीं, त्यांतील व्यवस्था जशा वर्तमान परिस्थितीस अगदीं जुळून जाणाऱ्या बनून जातील, तसें भविष्यकालच्या परिस्थितीस योग्य असें स्वरूप धारण करण्याचें त्याचें सामर्थ्य नष्ट होत जातें: आणि त्यामुळें असला समाज कोणी तरी त्याजवर जबरीचा अतिक्रम करून नष्ट होतो, किंवा तसें न झाल्यास नव्या नव्या व अतएव जास्त लवचीक अशा समाजांशीं प्रतिस्पर्धा करण्यास असमर्थ होत्साता तो उतरत्या कळेस लागतो.

तो जर चांगलाच धीट असला तर सरतेशेवटीं असेंहि दाखवील कीं, पुनरुत्पादनविषयक ज्या सरण्या आहेत त्याहि दोन्ही ठिकाणीं सदृशच आहेत. प्राथमिक किंवा रानटी समाज बहुधा दुभांगून वाढत असतात, पण कधीं कधीं विजयाच्या योगानें त्यांचे समूह एकत्रहि होत असतात; आणि नंतर लवकरच पुनः दुभांगत असतात. म्हणून ह्या बाबतींत असल्या समाजांत व अत्यन्त हलक्या प्रतीच्या प्राण्यांत साम्य दृष्टीस पडतें; कारण ते प्राणी जरी नेहमीं दुभांगून वाढत असतात तरी कधीं कधीं प्राणिशास्त्रज्ञ ज्यास सूक्ष्म पिशव्यांचा संधि ( conjugation of cells ) म्हणतात त्याच्या रूपानें ते पुनः एकवट होऊनहि जातात. नंतर त्यास असें दाखवितां येईल कीं, प्राणि व समाज ह्या दोघांचेहि वरच्यापेक्षां जास्त मोठे व स्थाईक असे जे नमुने आहेत, त्यांची संख्यावृद्धि बीजाच्या फांकणीनें होत असते. स्थाईक समाज ज्याप्रमाणें वसाहत करणारांचे जमाव दूरदेशीं पाठ-

वून देतात, त्याप्रमाणें स्थाईक जीव वयांत आले म्हणजे ते ज्या घटकांचे बनलेले असतील तसले घटकसमूह आपल्यांतून दूर फेंकीत असतात, व तेथें ते स्थाईक होऊन त्यांच्यासारखेच जीव बनतात. आणि त्यास असेंहि म्हणतां येईल कीं, एका जीवापासून निघालेल्या बीजसमूहाचा तसल्याच दुसऱ्या जीवापासून निघालेल्या बीजसमूहाशीं संयोग होणें हें जसें नवीन प्राण्याचें जोमाचें उत्क्रमण होण्यास आवश्यक किंवा फायद्याचें असतें, तद्वत् एका समाजांतून आलेल्या वसाहतकारांचें तसल्याच दुसऱ्या समाजांतून आलेल्या वसाहतकारांशीं संमिश्रण होणें हें, ज्या जुन्या समाजांतून हे मिश्रघटक आले असतील त्यांच्यापेक्षां ज्यास्त लवचीक अशा नव्या समाजाचें उत्क्रमण होण्यास, आवश्यक नसलें तरी फायदेशीर असतें.

पण असल्या ह्या धिट्टाईच्या विचारांचें स्वीकरण न करतां गत प्रकरणांतून हें सादृश्य ( जीव व समाज ह्यांजमधील ) जितकें सिद्ध झालें आहे तितकेंच आपण घेऊन चालूं.

५८. ह्या सादृश्याच्या योगानें, कांहीं तत्त्ववेत्त्यांनीं निरूपिलेली आणि लोकांच्या बोलण्यांतहि गर्भित असलेली एक कल्पना इतकी कांहीं बरोबर ठरते कीं, तितकी ती बरोबर असेल हें अगोदर कोणाच्या लक्षांत आलें नसतें. आतां ह्या कल्पनेच्या संबंधानें सहजच असें होऊन गेलेलें आहे कीं, प्रथम प्रथम तिला ओबडधोबड रूपें येत गेलीं. त्यांपैकीं कांहीं रूपांचा एथें विचार करूं या.

प्लेटोच्या “ रिपब्लिक ” किंवा “ लोकसत्ताक ” नामक पुस्तकांत, हल्लीं देखील जी गोष्ट लोक पुरतेपणीं ओळखत नाहींत अशा एका गोष्टीचें विधान केलेलें आहे; ती ही कीं, जशीं माणसें असतील तशीं राष्ट्रें असतात; तीं मनुष्यस्वभावांतून उत्पन्न होत असतात. हें विधान केल्यावर प्लेटोनें साक्रेटिसाच्या तोंडीं असें वाक्य घातलें आहे कीं, “ म्हणून राष्ट्राच्या घटना जर पांच असतील तर माणसाच्या मनांच्या वृत्तीहि पांच असतील. ” आतां वरच्या सिद्धान्तापासून हा उपसिद्धान्त काढणें हें चुकीचें आहे हें उघडच आहे. पुढें असें म्हटलें आहे कीं, श्रमविभाग असणें हें समाजास जरूरीचें आहे; पण असला श्रमविभाग आपोआपच उत्पन्न होतो असें म्हणण्याच्या ऐवजीं तो स्थापन करावा लागतो, असें पुढें म्हटलें आहे. सारांश, ह्या सर्व विवेचनांत अशी कल्पना दिसते कीं, समाजास कृत्रिमरीत्या असें किंवा असें पाहिजे तें स्वरूप देतां येतें, आणि ही कल्पना अर्थात् अद्यापिहि दृष्टीस पडणाऱ्या तसल्याच इतर कल्पनांसारखी आहे. शिवाय प्लेटोच्या ग्रंथांत असाहि समज आढळून येतो कीं, राष्ट्रघटना जशी व्यक्तींच्या स्वभावांवर अवलंबून असते, तसे मनुष्यस्वभाव राष्ट्रघटनेवर अवलंबून असतात. पण व्यक्ति व राष्ट्र ह्यांमधील साम्याच्या स्वरूपाबद्दल प्लेटोचें मत चुकीचें होतें ही गोष्ट, माणसाची बुद्धि, राग, व इच्छा ह्यांची राष्ट्रांतील सल्लामसलतगार, मदतनीस आणि व्यापारी ह्यांशीं जी तुलना त्यानें केली आहे, तिजवरून विशेषच व्यक्त होते. म्हणजे, श-

रीरघटनेच्या परस्परावलंबी भागांशीं समाजघटनेचे परस्परावलंबी भाग सदृश आहेत असें तो समजत नाहीं, तर त्या भागांना साह्य करणाऱ्या ज्या मानसिक शक्ती त्यांच्याशीं ते सदृश आहेत असें तो समजतो.

आतां प्रसिद्ध इंग्लिश तत्त्ववेत्ता जो हॉबीस त्याची एतद्विषयक कल्पना एका बाबतींत मात्र ह्याच्यापेक्षां जास्त सयुक्तिक दिसते. प्लेटोप्रमाणें तोहि समाजघटना ही स्वाभाविक आहे असें न समजतां कृत्रिम आहे असें समजतो; कारण सरकार-संस्था समाजाचें एकमत होऊन प्रथम उत्पन्न झाल्या, व त्यावरूनच राजास अबाधित अधिकार प्राप्त झाला, अशी क्लृप्ति त्यानें आपल्या ग्रंथांत पुढें आणिलेली आहे. त्याची ह्या साम्याबद्दलची कल्पना त्याच्या शब्दांनीं उत्तम रीतीनें व्यक्त होते. तो म्हणतो:—“ सामान्य धन (Common usalth) किंवा राष्ट्र असें ज्या विशाल जीवास म्हणतात तो केवळ कृत्रिम माणूस असतो; कारण स्वाभाविक माणसापेक्षां तो जास्त उंच व जास्त बलवान् असतो, व सामान्य माणसाच्या रक्षणासाठीं व बचावासाठींच त्याची योजना केलेली असते. त्याच्यामध्यें राजाधिकार हा कृत्रिम आत्मा असून तो सगळ्या शरीरास जीवित व चलवलन देत असतो; म्याजिस्ट्रेट व इतर न्यायाधिकारी हे त्याचे कृत्रिम सांधे आहेत. बक्षीस व शिक्षा ह्यांनीं प्रत्येक साधन व अवयव राजाधिकारस्थानास बांधला जाऊन स्वकर्तव्य करण्यास तत्पर होत असल्यामुळें ते सांधे व अवयव ह्या शरीरांतील ज्ञानतंतु आहेत; कारण ज्ञानतंतु स्वाभाविक शरीरांत हेंच काम करीत असतात.”

ह्या ठिकाणीं केलेली तुलना मुख्यत्वेंकरून शरीर व समाज ह्या दोघांच्या घटनांमध्यें असल्यामुळें प्लेटोच्या तुलनेपेक्षां ती कमी अयुक्तिक आहे; कारण प्लेटोची तुलना एकाची रचना व दुसऱ्याचे व्यापार ह्यांच्यामध्यें आहे. पण हॉबीसनें सांगितलेलीं विशिष्ट साम्यें चुकीचीं आहेत, आणि प्लेटोच्याप्रमाणें ह्याचें सामान्य साम्यहि चुकलेलें आहे; कारण तें साम्य समाजघटना व मनुष्यघटना ह्यांच्यामध्यें दाखविलेलें आहे; व हें साम्य अर्थात् फारच विशिष्ट आहे. तें समाज व सामान्य जीव ह्यांच्यामध्यें पाहिजे होतें. फ्रेंच तत्त्वज्ञ कॉम्टे हा हॉबीसच्या नंतरचा असल्यामुळें, व त्याच्या वेळीं जीवशास्त्रज्ञांनीं जीवघटनेचीं तत्त्वें कांहीं अंशीं ओळखून काढिलेलीं असल्यामुळें, समाजरचना कृत्रिम नसून समाज स्वाभाविकरीत्या वाढतात हें त्यानें ओळखिलें होतें, व म्हणून ह्या चुका त्याच्या हातून झाल्या नाहींत; आणि समाजदेहाची कोणत्याहि एकाद्या विशिष्ट देहाशीं तुलना न करतां समाज व प्राणी ह्यांचीं घटनातत्त्वें सारखींच आहेत, असें त्यानें म्हटलें. समाजप्रगतीची प्रत्येक पुढची पायरी मागच्या सर्व पायऱ्यांपासून उत्पन्न झालेली आहे असें तो समजे; आणि त्याच्या हेंहि लक्षांत आलें होतें कीं, रचनांचें उत्क्रमण सामान्याकडून विशिष्टाकडे होत असतें. तथापि संस्था ह्या कृत्रिम व्यवस्था आहेत ही जी मूळची खोटी कल्पना तिच्यांतून तो पूर्णपणें सुटलेला नव्हता; कारण त्याच्याच इतर मतांशीं असंबद्ध अशा रीतीनें तो असें मानीत असे कीं, "विधायक तत्त्वमीमांसा" (Positive Philosophy) या त्याच्या पुस्तकांत

निरुपिलेल्या तत्त्वांस अनुसरून समाजांची पुनर्घटना एकदम करतां येणें शक्य आहे.

एथें पुनः एकदा स्पष्ट सांगतो कीं, भागांचें जें परस्परावलंबित्व समाज व जीव ह्या दोहोंमध्यें सारखें दृष्टीस पडतें त्यावरून उत्पन्न झालेल्या साम्यांखेरीज दुसरीं साम्यें त्या दोहोंमध्यें मुळींच नाहींत. गत प्रकरणांतून सामाजिक रचना व व्यापार ह्यांच्या मानवी शरीराच्या रचना व व्यापार ह्यांच्याशीं जरी कांहीं तुलना केलेल्या आहेत, तरी एकंदर रचना व व्यापार ह्यांची मानवी रचना व व्यापार हीं परिचित अशीं उदाहरणें आहेत म्हणूनच केल्या आहेत. समाजदेह हा संयुक्ताऐवजीं वियुक्त, समप्रमाणाऐवजीं विषमप्रमाण, आणि संविज्ञानाच्या एका केंद्राच्या ऐवजीं ज्याचे सर्वच घटक संविज्ञानयुक्त आहेत असा, असल्यामुळें त्याची प्राणिकोटींतील किंवा वनस्पतिकोटींतील कोणत्याहि विशिष्ट नमुन्यांशीं तुलना करतां येत नाहीं. सगळ्याच्या फायद्यासाठीं घटकांनीं सहकार्य करावें ही गोष्ट प्रत्येक प्राण्यांत दिसत असल्यामुळें, तितक्या पुरते सर्व जातींचे प्राणी परस्परसदृश आहेत; आणि हा गुण त्यांच्यामध्यें सामान्य असून समाजामध्येंहि तो सामान्य आहे. शिवाय विशिष्ट जीवांमध्यें सहकार्याच्या प्रमाणावरून उत्क्रमणाचें प्रमाण ठरत असतें; आणि हें सामान्य सत्य समाजांच्या संबंधानेंहि खरें दिसतें. ह्याशिवाय जास्त जास्त सहकार्य करण्यासाठीं प्रत्येक प्रकारच्या प्राण्यांमध्यें स्थानान्तर करणें व एकमेकांवर प्रभाव चालविणें एतदर्थ साधनें आढळून येतात; आणि ह्या सामान्य गुणविशे-

षासारखाच गुणविशेष प्रत्येक प्रकारच्या समाजामध्येंहि दृष्टीस पडतो. समाज व जीव ह्यांमध्यें जीं साम्यें आहेत म्हणून आह्मी म्हणतों तीं हींच होत: म्हणजे, घटनेचीं जीं मुख्य तत्त्वें आहेत तीं दोहोंमध्यें सदृश आहेत एवढेंच साम्य आह्मीं प्रतिपादिलेलें आहे.

५९. पण व्यक्तिविषयक घटना व समाजविषयक घटना ह्यांच्यामध्यें सांगितलेलीं हीं साम्यें आतां आपण टाकून देऊं या. समाजशास्त्रविषयक अनुमानांची सुसंबद्ध अशी इमारत उभारतां यावी म्हणूनच आह्मी एथवर विस्तृत रीतीनें निरूपिलेल्या सादृश्यांचा परांचीच्या ऐवजीं उपयोग केलेला आहे. आतां आपण ही परांची काढून घेऊं या. कारण आतां आमची इमारत तिच्याशिवाय उभी राहूं शकेल.

आपल्या असें नजरेस आलें कीं समाज हे वाढणारे समूह आहेत; त्यांच्या निरनिराळ्या नमुन्यामध्यें निरनिराळ्या प्रमाणांवर ह्या वाढी होत असतात; लहान आकारांच्या नमुन्यांचें एकीभवन व पुनरेकीभवन होऊन जास्त जास्त आकारांचे नमुने क्रमाक्रमानें उत्पन्न होत असतात. आणि मोठालीं सुधारलेलीं राष्ट्रें जीं बनलेलीं आहेत तीं अशा एकीभवनानें झालेली वाढ, व मधल्या मधल्या फटी भरल्या जाऊन झालेली वाढ, अशा सरणीनें बनलेलीं आहेत.

समाजांच्या आकारवृद्धीबरोबर रचनावृद्धिहि होत जाते. प्राथमिक टोळ्यांमध्यें भागांचे स्पष्ट भेद दिसत नसतात. त्यांची वाढ होऊन जाती बनल्या म्हणजे त्यांच्यामध्यें कांहीं वैसदृश्यें बहुधा उत्पन्न होतात; व हीं

शक्ती व धंदे ह्या दोहोंमध्येंहि उत्पन्न होतात. जातींचे संयोग होतील तसे हे भेद वाढत जातात, व ते नियमनविषयक किंवा सरकारविषयक आणि उद्यमविषयक दोन्ही प्रकारचे असतात; सगळ्याच समाजामध्यें उच्चनीच वर्ग उत्पन्न होतात, आणि देशाच्या निरनिराळ्या भागांमध्यें निरनिराळे धंदे-उद्योग उत्पन्न होऊनहि भेदोत्पत्ति होते. संयुक्तीभवन जसें वाढत जाईल तशी ही भेदसंख्याहि वाढत जाते. ह्या भेदांची प्रगति सामान्याकडून विशिष्टाकडे होत असते. राज्य करणारे व करून घेणारे असा ठळक भेद प्रथम उत्पन्न होतो; नंतर राज्य करणाऱ्यांमध्यें राजकीय शास्ते, धार्मिक अधिकारी, आणि लष्करी अंमलदार असे पोटभेद उत्पन्न होतात, आणि राज्य करून घेणारांमध्यें खाद्यपदार्थ उत्पन्न करणारे व कळाकुसराईचीं कामें करणारे, असे पोटभेद उत्पन्न होतात; नंतर ह्या पोटभेदांत आणखी बारीक भेद उत्पन्न होतात, आणि अशा रीतीनें भेदविशिष्टीकरण वाढत जातें.

आतां रचनाविषयक स्वरूपाकडून निघून व्यापारविषयक स्वरूपाकडे जातां असें दृष्टीस पडतें कीं, जोंपर्यंत समाजाच्या सर्व भागांच्या घटना व चळवळी सारख्याच असतील तोंपर्यंत त्यांच्यामध्यें परस्परावलंबित्व बहुतेक मुळींच नसतें, आणि सगळ्या समुदायाचा मिळून एकवटलेला असा सजीव गोळा क्वचितच बनलेला असतो. पण समाजाचे निरनिराळे भाग जसे निरनिराळे व्यापार करूं लागतील, तसतसे ते परस्परावलंबी होत जातात, व त्यामुळें एकास इजा झाल्यास

दुसऱ्याचेंहि नुकसान होऊं लागतें; तें इतकें कीं चांगल्या उत्क्रान्त झालेल्या समाजांतून एकाद्या भागांत कांहीं बिघाड झाल्यास सगळ्याच समाजाचा घोंटाळा उडतो. कोंवळ्या व वृद्धिंगत झालेल्या समाजांमधील हा भेद ह्या गोष्टीवरून उत्पन्न होतो कीं, निरनिराळ्या भागांचें व्यापारविशिष्टीकरण जसें वाढत जाईल तशी प्रत्येक भागाची इतर भागांचे व्यापार करण्याची अक्षमता वाढत जाते.

प्रत्येक समाजाच्या इंद्रियजालघटनेस जी सुरवात होते ती, सभोंवतालच्या समाजांशीं बहुधा शत्रुत्वाचे संबंध ठेवणारा जो भाग आणि जीवनाचे जरूरीचे पदार्थ उत्पन्न करणारा भाग, ह्या दोहोंमध्यें भेद उत्पन्न होऊन होते; आणि समाजवृद्धीच्या पहिल्या पहिल्या पायऱ्या आक्रमीत असतां ह्याच दोन भागांचा सर्व समाज बनलेला असतो. शेवटीं ह्या दोहोंच्या मधला, असा एक तिसरा विभाग उत्पन्न होतो, व त्याचा उपयोग भागाभागांचे ठायीं प्रभावसंक्रान्ति करण्याच्या कामीं होतो. आणि पुढच्या सर्व पायऱ्या आक्रमीत असतां मूळच्या दोन रचनाजालांचें उत्क्रमण होणें हें, ह्या तिसऱ्या जालाच्या उत्क्रमणावर अवलंबून राहतें.

सगळ्या समाजाच्या पोषकेंद्रियजालाचें स्वरूप जरी त्याच्या सेंद्रिय व निरिंद्रिय परिस्थितीच्या स्वरूपावर अवलंबून असतें, तरी ह्या जालाचे निरनिराळे भाग स्थानिक परिस्थितीस अनुसरून भिन्नभिन्न स्वरूपें धारण करीत असतात; आणि प्राथमिक उद्योग धंदे ह्याप्रमाणें विशिष्टस्थानबद्ध व विशिष्टस्वरूप बनले म्हणजे त्याच तत्त्वास अनुसरून त्यांच्यावर अवलंबून असणारे

असे दुय्यम धंदे उत्पन्न होतात. पुनः समाज जसे संयुक्त व पुनःसंयुक्त होत जातील, आणि पोषकजाल वाढत जाईल, तसे प्रत्येक प्रकारच्या धंद्यांत गुंतलेले जे भाग पूर्वी दूर दूर फेंकलेले असतील, ते अत्यन्त अनुकूल अशा स्थानीं एकत्र होऊं लागतात; आणि अशा रीतीनें विशिष्टस्थानबद्ध झालेले उद्योगधंदे पूर्वीच्या विभागमर्यादांस न जुमानतां पाहिजे तसे वाढतात; शासनविषयक रचनांत व ह्या रचनांत जो भेद आहे तो हाच होय.

निरनिराळे समूह एकत्र होऊन आकारवृद्धि झाली म्हणजे संरक्षण व अतिक्रम ह्यांच्या संबंधाच्या क्रिया करण्यासाठीं आणि जिनसांची अदलाबदल करण्यासाठीं दळणवळणाच्या साधनांची आवश्यकता उत्पन्न होते. प्रथम अर्धवट माग, नंतर पायवाटा, नंतर ओबडधोबड रस्ते, आणि मागाहून बांधीव रस्ते, अशी या साधनांची उत्पत्ति होत जाते; आणि अशा रीतीनें दळणवळण जसें सुलभ होत जाईल, तसा प्रत्यक्ष विनिमय नाहींसा होऊन उदीम-व्यापार करणारा एक निराळा वर्गच बनूं लागतो; आणि नंतर त्या वर्गांतून ठोकळ व किरकोळ व्यापार करणाऱ्यांचें संकीर्णजाल उत्क्रान्त होतें. ह्या व्यापारी मंडळीकडून मालाची जी हालचाल होत असते ती प्रथम कांहीं ठिकाणाहून पुष्कळ पुष्कळ अवधीनें मंदरीत्या माल जाणें व येणें अशा रीतीनें होत असून, पुढें तीस तालबद्ध, नियमित व झपाट्याच्या प्रवाहांचें स्वरूप येतें; आणि ठिकठिकाणीं पाठविलेले पोषण-पदार्थ प्रथम जे अल्पसंख्याक व कसे तरी तयार

केलेले असे असतात, ते पुढें बहुसंख्याक व सुबक रीतीनें तयार केलेले असे बनतात. माल पाठविण्याचें काम ज्यास्त ज्यास्त चांगल्या रीतीनें जसजसें होत जाईल, व जिनसांचें वैविध्य जसें जसें वाढत जाईल, तसतसा प्रत्येक भागाला स्वव्यापार ज्यास्त ज्यास्त चांगल्या रीतीनें करतां यावयास लागून त्याबरोबरच सर्व भागांचें परस्परावलंबित्वहि वाढत जातें.

पोषकेंद्रियजाल सेंद्रिय व निरिंद्रिय पस्थितीशीं संघटन पावून उत्क्रान्त होत असतें, पण नियामक केंद्रियजाल सभोवतालच्या समाजांशीं अतिक्रमरूप व संरक्षणरूप संघर्षणानें उत्क्रान्त होत असतें; मूळच्या मुख्यविहीन समूहांत अल्पकालिक लढाईपासून हंगामी मुख्याची उत्पत्ति होत असते; दीर्घकालीन लढाईपासून कायमच्या मुख्याची उत्पत्ति होते; आणि हळूहळू लष्करी नियंत्रणापासून नागरिक नियंत्रण उत्पन्न होतें. लढाई सारखी चालू असली म्हणजे निरनिराळ्या भगांच्या क्रियांचें एकीकरण झटपट होणें जरूर असल्यामुळें, त्यासाठीं, कोणाच्या तरी कह्यांत राहणें ह्या गोष्टीची अवश्यकता उत्पन्न होते. ज्या समाजांत कोणी कोणाच्या कह्यांत रहात नसेल ते नष्ट होतात, व ज्यांच्यांत असा ताबा चालत असेल ते कायम राहतात; आणि अशा रीतीनें अशा समाजांची उत्पत्ति होते कीं, ज्यांच्या ठिकाणीं ही कोणास तरी नमून वागण्याची संवय लढाईच्या वेळीं उत्पन्न होऊन व शांततेच्या वेळीं जिवंत राहून, कोणत्या तरी प्रकारच्या सरकाराप्रत कायमची विनम्रता उत्पन्न करिते. अशा रीतीनें उत्क्रान्त झालेली जी कें-

द्रीभूत शासनसरणी तीच काय ती प्रथम प्रथम एक-टीच अस्तित्वांत असते. पण ज्या मोठ्या समाजांतून उद्योगसंस्थांसच विशेष महत्त्व आलेलें असेल, त्यांच्या-ठिकाणीं त्या संस्थांसाठीं अकेंद्रीभूत किंवा बहुजनप्रसृत अशी दुसरी एक शासनसरणी उत्पन्न होते, आणि ही सरणी प्रथम सर्वथैव पहिलीच्या कह्यांत असून शेवटीं ती वस्तुतः स्वतंत्र बनते. शेवटीं विभाजक रचनासाठीं देखील एक स्वतंत्र नियमनसरणी उत्पन्न होते.

समाजांत प्रथमतः सरल, संयुक्त, दुबार संयुक्त, व त्रिवार संयुक्त, असा वर्गविभाग होत असतो; आणि नीचतमापासून उच्चतमाकडे जी संक्रान्ति होते ती ह्या पायऱ्यांवरून होते. समाजांचा, आणखी एका पण कमी निश्चित रीतीनें, युद्धशील व उद्यमशील असा विभाग करतां येतो; त्यांपैकीं पहिला नमुना पक्वस्वरूपीं जबरीच्या सहकार्याच्या तत्त्वावर बनलेला आढळून येतो, व दुसरा त्याच स्वरूपीं स्वैच्छिक सहकार्याच्या तत्त्वावर बनलेला दिसतो. पहिल्याच्या ठिकाणीं स्वेच्छा-चारी असा मुख्य अधिकारी असतो इतकेंच नाहीं तर त्या ठिकाणीं लोकांच्या खाजगी वर्तनावर राजकीय सर-काराचा अनिर्बंध ताबा असतो; आणि दुसऱ्यामध्यें लो-कसत्ताक किंवा प्रतिनिधिस्थित अशी मुख्य सत्ता असते इतकेंच नाहीं, तर व्यक्तिवर्तनावर राजकीय अंमल फार अल्प असतो.

शेवटीं आपणास असें सत्य आढळून आलें कीं, प्र-बल अशा सामाजिक चळवळींपासून रूपान्तराची आप्ति होते. ज्या ठिकाणीं फेरबदल अगदीं बंद करून टा-

कील इतका लष्करी नमुना ताठर झाला नसेल, व उद्योगसंस्था बऱ्याच वाढल्या असतील, त्या ठिकाणीं त्या नमुन्यामध्यें एरवीं दिसणारीं जीं जबरीचीं नियंत्रणें तीं कमी होऊं लागतात, व तद्विषयक रचना दुर्बल होऊं लागतात. उलट पक्षीं, जेथें उद्योगसंस्थाजाल पुष्कळच वाढलें असून वरच्यापेक्षां ज्यास्त स्वतंत्र समाजसंस्था स्थापन झाल्या असतील, त्या ठिकाणीं युद्धविषयक चळवळी पुनः सुरू झाल्यास समाजाची लष्करी नमुन्याप्रत पिछेहाट होते.

६०. आणि आतां ह्या सामान्य पाहणीपासून एकंदर काय निष्पन्न होते तें सांगून, तेणेंकरून पुढच्या विवेचनाप्रत आपली कितपत तयारी झाली आहे हें पाहूं या.

ज्या पुष्कळ गोष्टींचा एथवर आपण विचार केला त्या सर्वांवरून असें सिद्ध होतें कीं, समाजोत्क्रान्ति हा एकंदर उत्क्रांतीचा एक भाग आहे. उत्क्रांत होणाऱ्या एकंदर समुदायांप्रमाणें समाजांमध्यें संकलन दिसून येतें, व तें सामान्य गोळ्याची वृद्धि होणें, आणि अनेक गोळ्यांचा संधि व पुनःसंधि होणें, ह्या दोन्ही स्वरूपीं दिसून येतें. समस्वरूप जाऊन विविधस्वरूप प्राप्त होणें ह्या गोष्टीचीं समाजोत्क्रमणांत पुष्कळच उदाहरणें आढळून येतात; कारण सर्व भागीं सदृश अशा साध्या टोळीपासूनच रचनाविषयक व व्यापारविषयक वैसदृश्यपूर्ण अशा सुधारलेल्या राष्ट्राची उत्क्रांति होत असते. संकलीभवन व विविधजातीयत्व वाढत जाईल तशी सुसंबद्धताहि वाढत जाते. भटकणारा समुदाय फांकणारा, विभागणारा, व कोणत्याहि बंधनानीं न ए-

कवटलेला, असा दृष्टीस पडतो; एक बनेलली जात एकाद्या प्रबल मनुष्याच्या कह्यांत राहिल्यामुळें तिचे भाग ज्यास्त सुसंबद्ध झालेले आढळून येतात; निरनिराळ्या जातींचे संघ एकाद्या मुख्य व गौण नायकांच्या हाताखालीं जालरूपानें एकत्र होतात; आणि असें होतां होतां शेवटीं हजार किंवा अधिक वर्षें एकत्र राहील इतकें मजबूत बनलेलें असें सुधारलेलें राष्ट्र उत्पन्न होतें. सुसंबद्धतेबरोबर निश्चितपणाहि वाढत जातो. समाजघटन प्रथम अनिश्चित असतें; पण प्रगति होत जाईल तशा समाजांत स्थाईक व्यवस्था उत्पन्न होऊन त्या हळूहळू जास्त रेखलेल्या होऊं लागतात; रूढींना कायद्यांचें स्वरूप येऊन ते जसे कायम होऊन जातील, तशा त्यांच्या निरनिराळ्या कृतींप्रत योजनाहि जास्त जास्त विशिष्ट होऊन जातात; आणि सर्वच संस्था प्रथम एकत्र गोंधळलेल्या असून त्यांच्यांतील घटकरचना हळूहळू जशा एकमेकींपासून जास्त जास्त स्पष्टरीत्या भिन्न होत जातील, तशा त्याहि एकमेकींपासून पृथक् होत जातात. एवंच समाजोत्क्रमणांत उत्क्रान्तीच्या सूत्राची सर्व रीतींनीं पूर्तता होते. म्हणजे, जास्त जास्त मोठा आकार आणि अधिकाधिक सुसंबद्धता, विविधस्वरूपता, व निश्चितता, ह्याकडे समाजाची प्रगति होत जाते.

ह्या सामान्य सत्यांव्यतिरिक्त कित्येक विशेष सत्येंहि वरील पाहणींत आपल्या नजरेस पडलीं आहेत. वरच्या वरच्या पायऱ्यांवरील समाजांच्या तुलनांवरून त्यांच्या वाढी, रचना, आणि व्यापार ह्यांच्याबद्दलच्या तद्वतच, ज्या पोषक, विभाजक व नियामक रचनाजालांचे ते

बननलेले असतात त्यांबद्दलच्या, तद्वतच ह्या रचनांचे सभोवतालच्या स्थितीशीं आणि त्यामुळें उत्पन्न झालेल्या प्रमुख अशा सामाजिक चळवळींशीं जे संबंध त्यांबद्दलच्या, आणि ह्या चळवळींत फेरबदल झाल्यामुळें नमुन्यांचीं झालेलीं जीं रूपान्तरें त्यांबद्दलच्या कांहीं अत्यन्त महत्त्वाच्या गोष्टी व्यक्त झाल्या आहेत. अशा रीतीनें निष्पन्न झालेल्या अनुभवजन्य अनुमानांवरून असें दिसतें कीं, सामाजिक चमत्कारांत समकालीन अस्तित्व व क्रमिक अस्तित्व असा सामान्य क्रम असतो, आणि त्यामुळें कांहीं अंशीं तरी विचारजन्यअनुमानघटित शास्त्रांचें सामाजिक चमत्कारांस स्वरूप देतां येईल असें दिसतें.

एवंच, सामान्य उत्क्रान्तीच्या नियमाच्या धोरणानें, व त्यास अनुसरून आतांपर्यंत बसविलेल्या अनुभवमूलक अनुमानांच्या धोरणानें, सामाजिक चमत्कारांच्या संघटनेचा विचार करण्याची आतां आपली तयारी झाली आहे. म्हणून कुटुंबाच्या उत्क्रमणामध्यें अगोचर होणारे जे अत्यन्त सरल असे चमत्कार त्यांचा आपण प्रथमारंभीं विचार करूं.

# प्रकरण पहिलें

## उपजातिसंरक्षण

१. सामाजिक संबंधांच्या उत्पत्तीचा विचार केल्याशिवाय त्यांचें पूर्ण ज्ञान जसें व्हावयाचें नाहीं, तसेंच गृह्यविषयक संबंधांचा विचार केल्याशिवाय त्यांचेंहि पूर्ण ज्ञान व्हावयाचें नाहीं. आणि गृहसंबंधांचें पूर्ण ज्ञान होण्याकरितां, मानवजातीच्या इतिहासाचें मागें मागें अवलोकन करून जेवढी आपली मजल जाईल, त्याच्याहि मागें आपणास गेलें पाहिजे.

प्रत्येक उपजातीविषयीं हें खरें आहे कीं, त्यांतील ज्या व्यक्ती मरतील त्यांच्याबद्दल नव्या उत्पन्न झाल्या पाहिजेत; नाहीं तर सगळीच उपजाति मरून जाईल. तद्वतच हीहि गोष्ट तितकीच स्पष्ट आहे कीं, एकाद्या उपजातींत मृत्यूचें प्रमाण जर मोठें असेल तर जननप्रमाण मोठेंच असलें पाहिजे, व पहिलें प्रमाण लहान असलें तर दुसरें प्रमाणहि लहान असलें पाहिजे. जनन व मृत्यु ह्यांमधील हें प्रमाण जसें इतर प्रत्येक प्राणिजातीला आवश्यक आहे, तसें मानवजातीलाहि आवश्यक आहे. म्हणून मानवी प्राण्यांचे ठिकाणीं दिसणाऱ्या गोष्टी स्पष्ट रीतीनें समजण्यास, एकंदर सजीव प्राण्यांचे ठिकाणीं दिसणाऱ्या गोष्टींचा विचार केला पाहिजे.

२. उपजातीचें सतत जीवित असणें हा उद्देश इतर

सर्व उद्देशांहून प्रधान आहे, कारण उपजातीच नष्ट झाली तर बाकीचे सर्व उद्देशहि त्याबरोबर नष्ट होतात; तेव्हां ही गोष्ट ध्यानांत धरून हा हेतु साधण्याच्या अनेक साधनांचा आपण विचार करूं या. पिढ्यानुपिढ्या तरुणांची योग्य अशी संस्था उत्पन्न व्हावी ही आवश्यक गोष्ट अनेक निरनिराळ्या मार्गांनीं साधतां येण्यासारखी असते; आणि त्यासाठीं अस्तित्वांत असलेले उपजातिघटक व त्यांच्या मागोमाग बनणारे उपजातिघटक ह्यांचें हिताहित अनेक प्रमाणांनीं कमी महत्त्वाचें समजावें लागत असतें.

हलक्या प्राण्यांमध्यें सभोवतालच्या जीवितसंहारक चळवळींशीं टक्कर देण्याची शक्ति अल्पच असल्यामुळें, आणि संततीचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य तर त्याच्याहून कमी असल्यामुळें, त्यांच्या जाती कायम राहण्यास वयांत आलेल्या व्यक्तींनीं फारच पुष्कळ प्राण्यांचीं बीजें उत्पन्न करावीं लागतात; असें कीं तीं बीजें संरक्षणविरहित व आश्रयविहीन असूनहि त्यांच्यांतील एक किंवा दोन संहारापासून निभावावीं. आतां हें उघडच आहे कीं जनकांच्या जीवघटक पदार्थांपैकीं बीजोत्पत्तींत जितका ज्यास्त खर्च होईल ( आणि पुष्कळ वेळां त्यापैकीं बहुतेक अशा रीतीनें खर्चीं पडत असतो ), तितका त्यांच्या स्वताच्या जीविताकडे लावण्यास अल्पतर भाग शिलक राहणार.

प्रत्येक बीजाबरोबर कांहीं तरी पोषकद्रव्य ठेवावें लागत असतें, असें कीं तें जीवनकलह स्वतः करावयास लागण्याच्या पूर्वीं त्याच्या वाढीस तें द्रव्य उपयोगीं

पडावें. आतां जनकानें खर्च केलेल्या विशिष्ट द्रव्यसंचयापासून त्या द्रव्याचा प्रत्येकीं अल्पसंचय घेतलेलीं पुष्कळ बीजें उत्पन्न होतात, किंवा जास्त द्रव्यसंचय धारण केलेलीं कमी बीजें उत्पन्न होतात. म्हणून लहानांच्या मृत्युसंख्येच्या प्रमाणांतून अनेक भेद उत्पन्न होतात. एके ठिकाणीं लाखों सूक्ष्म अंडीं निष्काळजीपणानें घातलेलीं असलीं तर त्यांतील बहुतेक उबण्याच्या पूर्वींच नष्ट होतात. शिलक राहिलेल्यांपैकीं बरींच अंडीं खाद्य मिळविण्याचीं व शत्रूस टाळण्याचीं अंगीं सामर्थ्यें अत्यल्प असल्यामुळें उबलीं गेल्यानंतर लवकरच मरतात किंवा शत्रूच्या भक्ष्यस्थानीं पडतात; एवंच बराच काळपर्यंत टिकाव धरून फारच थोडीं शिल्लक राहतात. उलट पक्षीं, विशिष्ट उपजातीची परिस्थिति जेव्हां अशी असते कीं, अंडीं कमी असून प्रत्येकाच्या वांटणीस पोषकद्रव्य जास्त येत असतें, तेव्हां त्यांच्यांतून बाहेर पडलेलीं पोरें जास्त चांगलीं पोसून बाहेर पडल्यामुळें तीं जास्त काळ टिकाव धरितात. म्हणजे वयांत येण्यापूर्वीं पुष्कळांचा संहार झाल्याविना ती उपजाति कायम राहूं शकते.

उपजातिसंरक्षणाचीं हीं जीं अनेक कारणें त्यांमध्यें सर्वप्रकारचे भेद दिसून येतात. कोठें कोठें लाखों बीजांपैकीं एकच जीव शिल्लक राहून तोहि बहुधा तितकींच अंडीं उत्पन्न करण्याच्या कामीं स्वताचा जीव खर्चीं घालितो. अशा ठिकाणीं उपजातिसंरक्षण त्या उपजातींतील लहान व मोठ्या दोन्ही प्रकारच्या जीवांस अत्यंत खर्च पडून होतें असें म्हटलें पाहिजे.

किंवा कोठें कोठें असें आढळतें कीं वयांत आलेला जीव अनेक बीजांच्या उत्पादनामध्यें आपल्या घटकद्रव्याचा अल्प भाग खर्च करून, बरेच दिवस उपभोग घेतो; अशा ठिकाणीं उपजातिसंरक्षणार्थ जो कांहीं खर्च होतो तो पोरें पुष्कळ मरावीं ह्या रूपानेंच होतो. कोठें कोठें वयांत आलेला जीव आपलें बहुतेक सर्व घटकद्रव्य खर्चीं घालून थोडकींच अंडीं उत्पन्न करितो, व त्यामुळें त्यांना पोषकद्रव्याचा पुरवठा चांगला होऊन त्यांच्यामध्यें मृत्युसंख्या कमी होते. अशा ठिकाणीं, उपजातिसंरक्षणाचा मोठ्यांवर खर्च जास्त पडतो व लहानांवर कमी पडतो असें म्हटलें पाहिजे.

३. एवंच एका अर्थीं उपजातीचें कल्याण जरी तिच्यांतील व्यक्तींच्या कल्याणावर अवलंबून असतें, तरी तें दुसऱ्या अर्थीं तिच्यांतील व्यक्तींच्या हिताच्या उलट असतें; आणि शिवाय व्यक्तींना करावा लागणारा खर्च वाढलेल्यांवर व कोंवळ्यांवर निरनिराळ्या प्रमाणांनीं पडत असतो.

व्यक्तिजीवन व संतत्युत्पादन ह्यांच्यामधील ह्या विरोधाचा सामान्यस्वरूपीं विचार स्पेन्सर साहेबांनीं "जीवशास्त्राचीं तत्त्वें" ह्या आपल्या ग्रंथद्वयांत सविस्तर केला आहे. एथें त्या विरोधाच्या कांहीं विशेष स्वरूपांशींच आपणास कर्तव्य आहे. तीं स्पष्टपणें ध्यानांत येणें महत्त्वाचें आहे; म्हणून आतां त्यांच्याकडे आपण जास्त बारीक दृष्टीनें पाहूं.

---

# प्रकरण दुसरें

## उपजाति, जनक, व संतति, ह्यांचीं भिन्नभिन्न हिताहितें

४. अत्यंत सूक्ष्म असे जे प्रोटोझोआ नामक जंतू आहेत त्यांचें आपोआप दुभांगून जीवसंख्यावर्धन होणें सारखें चाललें असतें. थोडेसे तास स्वतंत्र अस्तित्वाचा उपभोग घेतल्यावर त्यांच्यांतील प्रत्येक जंतूचा दोन नवे जंतू उत्पन्न करण्याच्या कामीं संहार होत असतो; आणि तेहि प्रत्येकीं वाढून त्याच कृतीचें अवलंबन करितात. आणि शिवाय, काळाकाळानें, ह्या संतत्युत्पादनामध्यें होणाऱ्या संहाराला ह्याच्यापेक्षां जास्त आत्यन्तिक स्वरूप येत असतें. जंतु कांहीं वेळ स्वस्थ राहिल्यानंतर त्याचें सर्वच शरीर फुटून त्यांतून अनेक बीजें बाहेर पडतात, आणि अशा रीतीनें नव्या पिढीची उत्पत्ति होते. एवंच ह्या ठिकाणीं जनकाचें जीवित अत्यन्त अल्पकालिक असून संतत्युत्पादनामध्यें त्याचा सर्वांशीं विलय होऊन जातो. ह्याच्या वरच्या दर्जाच्या प्राणिसमूहांमध्यें जनकशरीराचें अशा रीतीनें प्रत्यक्ष रूपान्तर होऊन संततिशरीरें उत्पन्न होण्याची ही क्रिया भिन्नभिन्न तऱ्हांची दृष्टीस पडते; पण ती वरच्यापेक्षां ज्यास्त कालावधीनें होत असते. सीलेंटरेटा ह्या वर्गापैकीं कांहीं मेडयूसी नामक जंतूम-

ध्यें जनकाचें किंवा अर्धवट जनकाचें पॉलिपसदृश जें शरीर त्याची कांहीं विशिष्ट वाढ झाली म्हणजे त्याचे तुकडे तुकडे पडून ते बशांच्या राशीप्रमाणें दिसूं लागतात, व त्यांपैकीं प्रत्येक तुकडा क्रमाक्रमानें सुटा होऊन स्वतंत्ररीत्या पोहूं लागतो, व स्वतंत्र मेडयूसा बनतो. पण ह्या व अशाच तऱ्हेचीं चक्रवत् होणाऱ्या संतत्युत्पादनाचीं जीं हीं उदाहरणें आहेत, त्यांसंबंधानें असें म्हणतां येईल कीं, मेडयूसा हा जंतु ज्या अर्थीं तरुणावस्था पावत असतो, त्या अर्थीं लिंगविहीन अशा व्यक्तीचा ह्या अर्धवट वाढलेल्या लिंगयुक्त व्यक्ती उत्पन्न करण्यांत विलय होत असतो. दुसऱ्या जीवाच्या शरीरामध्यें राहणारे, चपट्या किंवा वाटोळ्या जंतांसारखे एन्टोझोआ नामक जे जंतू आहेत, त्यांच्यापैकीं कांहींमध्यें हीच गोष्ट निराळ्या रीतीनें साध्य होत असते. ह्या वर्गापैकीं सर्केरिया नामक जंतु डोकें, अवयव, व पोषक पऱ्हळ प्राप्त होईल इतका उत्क्रांत झाला म्हणजे आपल्या अंतर्द्रव्याचें रूपान्तर करून वस्तुतः आपल्यासारखे छोटे जंतु आपल्या शरीरांत उत्पन्न करितो; आणि सरतेशेवटीं फुटून जाऊन त्यांस आपापले मार्ग क्रमण्यास मुक्त करितो. अखेरीस अशा रीतीनें दोनतीन पिढ्यांची उत्पत्ति झाली म्हणजे त्याच्या पूर्ण व्यक्ती बनून जातात.

लांब वातीसारख्या चपट्या जंतांमध्यें जनकाच्या शरीराचा विलय होऊनच जरी पोरांची उत्पत्ति होत असते, तरी त्यांमध्यें ती सरणी भिन्न तऱ्हेची आहे. टेपवर्म नांवाच्या ह्या जंतांचीं निरनिराळीं कडीं असतात, व प्रत्येक कड्यास तरुण व पृथक् अशा अवस्थेंत प्रोग्लाटिस (proglottis)

असें म्हणतात; त्या स्थितींत त्याच्या ठिकाणीं अगदीं मंद अशी हालचाल दिसत असते, व तीच कायती तो सजीव आहे, ह्याची खूण त्यावेळीं असते. पूर्वीच्या जंतानें घातलेल्या लाखों अंड्यांपैकीं एका अंड्यापासून त्याची उत्पत्ति झालेली असते; आणि तें कडें स्वतः स्वतंत्र व्यक्ति बनण्याच्या समयीं असंख्य अंड्यांचें केवळ वसतिस्थानच असतें. अवयवरहित, ज्ञानेंद्रियरहित, आणि पोषकेंद्रियरहितहि, असें तें असल्यामुळें त्याचें जीवित वनस्पतीच्या जीविताहून अल्पच्च प्रमाणावर जास्त दर्जाचें असतें, आणि त्याच्यांतील अंड्यांचे गोळे योग्य वाढले कीं लागलेंच तें मरून जातें. उपजातीच्या हितापुढें तरुण व वयांत आलेले ह्या दोघांचेंहि हित अगदीं गौण ठरलें जावें, हें ह्या गोष्टीचें आत्यन्तिक उदाहरण होय.

आतां ह्याच्यापेक्षां उच्चतर नमुन्यांकडे चढून जाऊन "सांध्याचे जीव" ह्या वर्गांतील कांहीं उदाहरणें आपण घेऊं. या परोपजीवि कवचीच्या जंतूमध्यें लर्निआ (Lernea) सारख्या पुष्कळ जातींचे जंतु प्रारंभीं थोडा काळपर्यंत अशा अवस्थेंत असतात कीं, त्यावेळीं ते पाण्यांत इकडे तिकडे पोहत असतात. नंतर मग असला जंतु बहुधा मरून जातो; पण एकाद्या माशाच्या अंगास जर तितक्या अवधींत चिकटण्याचें त्यास साधलें, तर त्याचे अवयव व इंद्रियें हीं नष्ट होतात, आणि तो माशापासून पोषकद्रव्य ओढून घेण्यापलीकडे कांहीं एक न करतां अंडीं भरलेल्या मोठाल्या पिशव्या उत्पन्न करूं लागतो. ह्या पिशव्या त्याच्या कुशींतून कळ्यांसारख्या बाहेर पडून हळूहळू त्याच्या शरीराच्या आकारापेक्षां

त्यांचा आकार फारच मोठा होऊन जातो; म्हणजे काय, तर, असंख्य अंडीं उत्पन्न करण्याच्या कामीं जनकाचें जीवित नष्ट होऊन जातें. किड्यांमध्येंहि निराळ्या तऱ्हेनें असल्या प्रकारची स्थिति उत्पन्न झालेली दृष्टीस पडते. उदाहरणार्थ किरमिजी रंग ज्याच्यापासून उत्पन्न होतो अशा कोचिनील नामक किड्याची मादी ज्या क्याक्टस नांवाच्या कांटेरी झाडावर असते, त्यावरून इकडे तिकडे सरपटत जाणें व त्यांतील रस चोखून घेणें ह्यापेक्षां जास्त दर्जाचें जीवित तिच्या ठिकाणीं नसतें; पुढें ती वयांत येऊं लागली म्हणजे तिच्या ठिकाणीं अंड्यांचे समुदाय उत्पन्न होऊं लागतात, व शेवटीं त्यांनीं तिचा अंतर्भाग भरून जातो; आणि हळू हळू तीं अंडीं तिच्यांतील द्रव्य जसें ओढून घेतील तशी ती मरते, आणि आपल्या शरीराचें कवच हें त्यांच्यासाठीं संरक्षक आच्छादन म्हणून मागें ठेविते; आणि तीं अंडीं त्यातून निघालीं म्हणजे त्यांपैकीं एक निभावलें तर नव्याणव शत्रूंच्या भक्ष्यस्थानीं पडतात. ह्याच्यापेक्षां वरिष्ठ दर्जाच्या किड्यांमध्यें पोरांचा संहार जरी इतकाच होत असतो, तरी मोठ्यांचा कमी होतो. असल्या किड्यांस प्रथम सुरवंटाची अवस्था येत असून त्या स्थितींत त्यांचें जीवितचापल्य जरी पुढच्या मानानें अल्पच असतें व मृत्युमान फार मोठें असतें, तरी शंभरांपैकीं जो एक जगेल त्यास मोठ्या चापल्याचें प्रौढ वय प्राप्त होतें. पण हें वय अल्प असतें; कधीं कधीं त्याची मुदत कांहीं दिवस पावेतोंच असते; आणि अंडीं घातल्यानंतर तो कीटक लागलाच मरतो.

मणक्याच्या प्राण्यामध्यें आपणास जरूर तेवढीं ह्या सत्याचीं आणखीं उदाहरणें आपल्या नजरेस येतात. ह्या प्राणिवर्गामध्यें उपजातिसंरक्षणासाठीं पितृजीविताचा प्रत्यक्ष संहार फारच क्वचित् होतो. कॉडलिव्हर तेल ज्याच्यापासून काढितात तो कॉड प्राणी दहा लाखांवर अंडीं घालितो; आणि इतकीं अंडीं घालूनहि त्यांतून निभावून, तितकींच अंडीं वर्षानुवर्ष घालीत राहतो; पण अशा रीतीनें जनकाचें जीवित जरी कायम राहतें, तरी त्याच्या संततीपैकीं नऊ लाख नव्याणव हजारांपेक्षां ज्यास्त पोरांचीं जीवितें प्रौढवयांत येत असतां असतांच नष्ट होतात. ह्या वर्गापैकीं ह्याच्या वरच्या दर्जाच्या नमुन्यांमध्यें अंड्यांची उत्पत्ति ह्या मानानें कमी होत असून त्यांची तरतूद ज्यास्त चांगली होत असल्यामुळें उपजातीच्या हितासाठीं नव्या पिढीचा संहार फार कमी प्रमाणावर होतो; आणि अशाच कारणामुळें ह्याच्या वरच्या दर्जाचे जे जलस्थलचर प्राणी त्यांच्यामध्यें हा संहार फारच कमी दृष्टीस पडतो. आतां पक्षिवर्गाकडे पाहतां आपल्यास असें आढळून येतें कीं, त्यांच्याठिकाणीं उपजातिसंरक्षणार्थ जनक व संतति ह्यांस ह्याच्यापेक्षांहि कमी घस सोसावी लागते. त्यांच्या पोरांचें संगोपन इतकें चांगलें होत असतें कीं, त्यांना प्रत्येकीं जीं वरच्या मानानें अगदीं थोडीं पोरें होतात त्यांतील बहुतेक वाढतात; आणि त्यांच्यापैकीं कोठें अर्धीं, व कोठें पाव, संतत्युत्पादनाच्या पायरीप्रत जाऊन पोंहोचतात. शिवाय, पोरांचें वर्धन चाललें असतां त्यांच्या जीवितासाठीं जनकांचीं जीवितें कधीं कधीं

च व कांहीं अशींच खर्ची पडत असतात. आणि शिवाय पोरें होण्याचे जे निरनिराळे ऋतू त्यांच्या दरम्यान त्यांस पुष्कळ दिवस असे सांपडतात कीं, त्यावेळीं पोरांचा बैदा त्यांचे मागें मुळींच नसल्यामुळें त्यांस आपलीं जीवितें अगदीं स्वताच्या फायद्यासाठीं घालवितां येतात. आतां मणक्याच्या प्राण्यांपैकीं अत्यन्त उच्च वर्ग जो स्तनवत् प्राण्यांचा त्यामध्यें एकंदरींत पाहतां उपजाति, जनक, आणि जन्य ह्यांच्या हितामधील हा विरोध आणखीहि कमी झालेला दृष्टीस पडतो; आणि त्या वर्गांतील उपवर्गांमध्येंहि नीचतर नमुन्याकडून उच्चतर नमुन्याकडे जसें जावें, तशी ही गोष्ट जास्त जास्त प्रमाणावर दृष्टीस पडते. उंदरासारख्या कुरतुडणाऱ्या प्राण्यांपैकीं अगदीं छोटा प्राणी थोड्याच महिन्यांत प्रौढ वयांत येतो; आणि मोठाल्या विणी वरचेवर घालून लवकर मरतो. त्यांच्यांतील मादीस अगदीं प्रथम तेवढें थोडे दिवसपर्यंत आपल्यासाठींच म्हणून राहतां येतें, आणि संतत्युत्पादनाचें वय निघून जाण्याच्या अगोदरच ती बहुधा मरते: म्हणजे काय, तर, संततीच्या दगदगींतून मोकळा असा आयुष्याचा उपभोग तीस सांपडत नाहीं. आतां दुसऱ्या टोंकाकडे पाहतां ह्यासंबंधानें अगदीं भिन्न प्रकार दिसून येतो. हत्तीच्या छाव्याचीं पहिलीं वीस किंवा तीस वर्षें त्याची स्वताची वाढ व चपळाई यांत सर्वस्वीं जातात. हत्तीच्या मादीस पोरें थोडीं व फार फार अंतरानें होत असल्यामुळें संततिजननाची घींस तिला एकंदरींत बेताचीच सोसावी लागते. आणि पोरें होण्याचें वय निघून गेल्यानंतर पुढें हत्तीण किती जगते हें जरी

नक्की माहीत नाहीं, तरी त्यानंतर पोषण व स्वसंरक्षण करण्याची तिची शक्ति ज्या अर्थी कमी झालेली नसते, त्या अर्थी ती नंतर बरींच वर्षे जगत असेल असें अनुमान निघतें; आणि नरावर तर संतत्युत्पादनाची घीस एकंदर आयुष्यांत फारच अल्प पडते.

५. उपजातिजीविताकरितां व्यक्तिजीविताचा होणारा हा व्यय, उत्क्रमण चाललें असतां, आणखी एका तऱ्हेनें कमी होत जातो. हलक्या नमुन्याच्या प्राण्यांमध्यें संतत्युत्पादनाच्या कामीं व्यक्तीला घटकद्रव्यविषयक जितकी घस सोसावी लागेल, तितकी त्या व्यक्तीची वाढ व चळवळ हीं कमी होत असून त्याबद्दल तीस मोबदला कांहींच मिळत नसतो; पण जसजसें वरच्या दर्जाच्या प्राण्याकडे पहावें तसतसा आनंदरूपी मोबदला आईबापांस ज्यास्त ज्यास्त मिळालेला दृष्टीस पडतो.

ह्यासंबंधानें मणक्याच्या प्राण्यांपैकींच उदाहरणें घेतल्यास आपणास असें दिसतें कीं, बहुतेक मासे व जलस्थलचर (पाण्यांत व जमिनीबर दोन्ही ठिकाणीं राहणारे) प्राणी ह्यांनीं एकदां वीण घातली म्हणजे मग पुनः तिकडे ते ढुंकून पाहत नाहींत; ह्या ठिकाणीं पहिला शारीरिक खर्च फार दिसतो, आणि पुढें जर कांहीं खटपट दिसत नाहीं, तर त्याबरोबर होणारा आनंदहि दिसत नाहीं. पक्षी व स्तनवत् प्राणी ह्यांचें निराळें आहे. शिशुसंवर्धनाबद्दल आईबापांपैकीं एकावर किंवा दोहोंवर श्रमाचें ओझें बरेंच पडून तेणेंकरून जरी एका अर्थी त्याच्या किंवा त्यांच्या जीविताचें आकुंचन होतें, तरी दुसऱ्या अर्थी त्याचा विस्तार होतो; कारण ह्या प्राण्यां-

च्या जीवितास जरूर तें करण्याची योग्यता इतकी आलेली असते कीं, स्वोदरभरणासाठीं केलेले श्रम जसे त्यास आनंददायक होत असतात, तसे शिशुसंवर्धनाचेहि होत असतात.

ह्या उच्चतर मणक्याच्या प्राण्यांपैकीं जे कमअकलेचे प्राणी असतात ते थोड्या थोड्या अवधीनें पुष्कळ पोरें उत्पन्न करीत असून त्यांस लहानपणींच टाकून देत असतात; त्यांच्याकडून निघून जे ज्यास्त अकलेचे प्राणी ज्यास्त अवधीनें कमी पोरें उत्पन्न करून त्यांचें ज्यास्त कालपर्यंत लालनपालन करीत असतात, त्यांजकडे पाहिल्यास असें दिसतें कीं, ह्या रीतीनें शिशुमृत्युसंख्या जशी कमी होतजाईल तशी उपजातिसंरक्षणाची घीस कमी झालेली आढळून येते, आणि मनःसमाधान ज्यास्त झालेलें आढळून येतें.

६. ह्या ठिकाणीं, तर मग, आईबापांचे मुलांशीं व एकमेकांशीं जे संबंध असतात त्यांची प्रगति कशी होते हें समजण्याचीं निश्चित साधनें आपल्या दृष्टीस पडतात. प्राणी जसे ज्यास्त ज्यास्त उच्च होत जातील, तशी त्यांना उपजातिसंरक्षणार्थ व्यक्तिशः कमी घीस सोसावी लागते; आणि ह्यावरून गर्भितार्थ असा निघतो कीं, माणसाच्या उच्चतम नमुन्यामध्यें ही घीस सर्वांत कमी असते.

गृहसंस्थांचा विचार करतांना, सामान्यतः, त्यांच्यांशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध येतो त्यांच्याच कल्याणाचा तेवढा बहुधा विचार करीत असतात. पुरुष व स्त्रिया यांच्यामधील विशिष्ट संबंधांचा जो चांगुलपणा किंवा वाईटपणा त्याच्यासंबंधानें अशा रीतीनें बोलत अस-

तात कीं, जणूं काय हल्लींची जी वयांत आलेली पिढी तिच्यावर त्याचे जे परिणाम होतात तेवढ्यांचाच मुख्यत्वेंकरून विचार कर्तव्य आहे; आणि वाढत्या पिढीवरील परिणामांचा विचार केला म्हणजे पुढच्या पिढ्यांना काय परिणाम भोगावे लागतील ही गोष्ट बहुधा मुळींच ध्यानांत आणीत नाहींत. पण हा क्रम फिरविला पाहिजे हें आतां बायकांच्या लक्षांत आलेंच असेल.

ह्या किंवा त्या प्रकारच्या कुटुंबव्यवस्थांचा जो विचार करावयाचा तो, प्रथम, ज्या समाजसमुदायांत त्या असतील तो कायम राखण्याच्या कामीं त्या कितपत मदत करितात हें ध्यानांत आणून केला पाहिजे; कारण घटकव्यक्तींच्या संबंधानें प्रत्येक समाजसमुदाय हा उपजातीच्या ठिकाणीं असतो. मानवजाति जी टिकाव धरून राहते, ती त्या सगळ्या जातीच्या संबंधाच्या ज्या व्यवस्था त्यांच्यामुळें राहत नाहीं, तर तिच्यांतील जे निरनिराळे समाज त्यांच्या टिकावामुळें राहते; कारण त्या समाजांपैकीं प्रत्येक समाज इतर समाजांशीं आपलें अस्तित्व कायम राखण्यास झगडत असतो. आणि घटक समाजांच्या टिकावाच्या द्वाराच एकंदर मानवजाति कायम राखणें ही मुख्य गोष्ट साधावयाची असल्यामुळें, ज्या गृहव्यवस्था प्रत्येक समाजाच्या टिकावाला अत्यन्त अनुकूल असतील त्या मानानें अत्यंत योग्य समजल्या पाहिजेत.

समाजसंरक्षण प्रथम साधून नंतर साधावयाची अत्यन्त महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे जननापासून प्रौढवयापर्यंत निरोगी संततीची होईल तेवढी ज्यास्त संख्या वाढविणें ही होय. “ समाजसंरक्षण साधून ”

अशी जी अट घातली आहे ती आवश्यक आहे असें प्रथमदर्शनीं दिसत नाहीं, पण ती आवश्यक आहे अशाबद्दलचा पुरावा पुढें आपणास सांपडेल. समाज, आणि विशेषतः प्राथमिक समुदाय,हे त्यांच्यांतील लोकसंख्या हवी तशी वाढल्यानें नेहमीं भरभराटीसच येतात असें नाहीं; तर, उलट, कांहीं ठिकाणीं, तरुणांची मृत्युसंख्या वाढवून विशेष संहारापासून स्वताचा बचाव करीत असतात.

सामाजिकसमूहाचें हित आणि संततीचें हित, ह्यानंतर आईबापांचें हित येतें. म्हणून विवाहसंबंधाच्या ज्या प्रकारानें, ह्या वरच्या दोन गोष्टी साधून, वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांचीं जीवितें सर्वांत जास्त वृद्धिंगत होतील, व त्यांच्यावर शिशुसंवर्धनाचें ओझें कमींत कमी पडेल, तो प्रकार प्रत्येक ठिकाणीं उत्तम म्हणून समजलें पाहिजे.

आणि शेवटची गोष्ट साधावयाची म्हटली म्हणजे ही कीं, व्यक्तिजीविताचें असें वर्धन करावयाचें कीं, तेणेंकरून आईबापांचें वृद्ध वय, संततीकडे लांबलें जाऊन सुखाचें व्हावें, आणि तसें करण्यापासून संततीच्याहि सुखाची वृद्धि व्हावी.

हे सर्व सिद्धान्त एकत्र केले असतां त्यावरून असा उपसिद्धान्त निघतो कीं, समाज आणि त्याचे वृद्ध व तरुण घटक ह्यांच्या गरजांमध्यें उत्तम मेळ बसून, जनन व संतत्युत्पादनाचें वय या दोहोंच्या दरम्यान मृत्युसंख्या कमींत कमी झाली, आणि शिशुसंवर्धनाचें ओझें प्रौढांच्या जीवितावर कमींत कमी पडूं लागलें म्हणजे कुटुंबघटना उत्तम झाली म्हणून समजावें. हें ओझें

तीन मार्गांनीं कमी होत असतें: संतत्युत्पादनाच्या अगोदरचा काल वाढत जाणें हा पहिला मार्ग; होणाऱ्या मुलांची संख्या कमी होऊन त्यांची निगा करण्यापासून सुख जास्त होत जाणें हा दुसरा मार्ग; संतत्युत्पादन बंद झाल्यानंतरचा काल वाढत जाणें हा तिसरा मार्ग.

एकंदर प्राणिकोटीमधील स्त्रीपुरुषविषयक संबंध आणि जनकजन्यविषयक संबंध ह्यांचा विचार करितां त्यावरून कुटुंबविषयक ही जी उत्तमावस्था ध्यानांत येते, तीच मानवी प्रगतीच्या खालच्या पायऱ्या आणि वरच्या पायऱ्या यांची तुलना करतां आढळून येते. रानटी लोकांच्या टोळ्यांत पोरांची मृत्युसंख्या फार मोठी दिसते; म्हणजे त्यांच्यामध्यें कमजास्त प्रमाणानें पोरें मारून टाकण्याची चाल असते, किंवा, प्रतिकूल परिस्थितीमुळें पुष्कळ मुलें लहान वयांतच मरत असतात, किंवा ह्या दोन्ही गोष्टी होत असतात. शिवाय, ह्या हलक्या दर्जाच्या जातींमध्यें स्त्रीपुरुषें वयांत लवकर येऊन संतत्युत्पादनहि लवकरच करूं लागतात; म्हणजे काय, तर, त्या पहिल्या काळामध्यें व्यक्तिजीवित स्वताच्या कल्यासाठीं भोगतां येतें तो काळ त्यांच्यांत आंखूड असतो; आणि संतत्युत्पादन चालू राहील तोंपर्यंत त्याबद्दलचा कर स्त्रीपुरुषांवर, व विशेषतः स्त्रियांवर, फार पडतो, कारण त्यांस पोरें संभाळून शिवाय काबाडकष्टाचींहि कामें करावीं लागत असतातच. शिवाय स्त्रीपुरुषविषयक आणि जनकजन्यविषयक संबंधांपासून होणारीं सुखें सुधारलेल्या जातींप्रमाणें त्यांच्यांत उच्च जातीचीं नसतात, किंवा तितकीं दीर्घकालीनहि नसतात; आणि शिशुसंवर्धन आटोपल्यानंतरचा

कालहि त्यांच्यांत अल्प असतो, कारण पुष्कळ वेळां स्त्रीपुरुषें एकमेकांस मारून टाकितात, किंवा मुद्दाम एकमेकांस सोडून जातात; आणि असें नच झालें, तर मुलें त्यांची निगा कांहीं करीत नसल्यामुळें तीं लवकर क्षीण होऊन मरतात.

समाजप्रगतीच्या प्रत्येक पायरीवर गृहसंस्थांचें मोजमाप करण्याचें सापेक्ष व केवल अशीं दोन्हींहि साधनें अशा रीतीनें आपल्यास प्राप्त झालीं आहेत. आपणास ज्या संस्था ओंगळ वाटतात त्यांचा सापेक्षदृष्टचा आणि त्यांजबरोबर असणाऱ्या सामाजिक परिस्थितीच्या दृष्टचा विचार करतां, त्या संस्था त्या स्थानाला आणि काळाला योग्यच आहेत असें आपल्या लक्षांत येईल; आणि त्यांचा केवलदृष्टचा, म्हणजे व्यक्तिविषयक व राष्ट्रविषयक जे अत्यन्त प्रौढ झालेले नमुने त्यांच्या दृष्टीनें विचार करतां, त्या संस्था आपणास गर्ह्य वाटतील. कारण ह्या प्रास्ताविक निरीक्षणावरून ही गोष्ट उघड होते कीं, जे गृहसंबंध नीतिदृष्टचा अत्युच्च आहेत, तेच जीवशास्त्रदृष्टचा आणि समाजशास्त्रदृष्टचाहि अत्युच्चच आहेत.

---

# प्रकरण तिसरें

## स्त्रीपुरुषांचे प्राथमिक संबंध

७. गृहसंस्थांची हकीकत देण्याची सुरवात जातिसंरक्षणाच्या अत्यन्त व्यापक चमत्कारांचें निरीक्षण करून करावी ही गोष्ट बहुतेक वाचकांस चमत्कारिक वाटेल, पण हलक्या दर्जाच्या रानट्यांमध्यें स्त्रीपुरुषांचे संबंध वस्तुतः इतर प्राण्यांमधील संबंधासारखेच असतात, हें त्यांच्या नजरेस आणून दिलें म्हणजे, शुद्ध प्राणिशास्त्रदृष्ट्या ह्या विषयास आह्मीं सुरवात केली ती बरोबर केली, हें त्यांच्या लक्षांत येणार आहे.

कळप करून राहणाऱ्या स्तनवत् प्राण्यांपैकीं नर हे माद्या आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं बहुधा लढत असतात. चिपिवायन लोकांबद्दल हर्बर्ट साहेब असें म्हणतो कीं, ह्या लोकांमध्यें पहिल्यापासून अशी चाल आहे कीं "ज्या स्त्रीवर कांहीं पुरुषांची प्रीति बसली असेल तिच्यासाठीं एकमेकांशीं ते मारामारी करितात." हूपर असें म्हणतो कीं, गुलामजातीचा इंदियन दुसऱ्याच्या बायकोवर त्याचें मन गेल्यास त्याच्याशीं लढतो. बुशमेन लोकांत बलिष्ट माणूस कधीं कधीं दुबळ्याची बायको उपटून नेत असतो. नार्सिस पेल्टियर नांवाच्या माणसास क्विन्सलंदमधील आस्ट्रेलियन लोकांच्या एका टोळीनें बाऱ्याव्या वर्षापासून एकोणतिसाव्या वर्षापर्यंत अडकवून

ठेविलें होतें; तो त्यांच्याविषयीं असें सांगतो कीं, त्यांच्यांतील पुरुष एकादी स्त्री मिळविण्यासाठीं भाले घेऊन भांडतांना वरचेवर आढळतात. आणि डोग्रिब इंदियन लोकांबद्दल हकीकतीची गोळाबेरीज काढून सर **जॉन** लबक असें म्हणतो कीं, वस्तुतः त्यांच्यांत पुरुष हे स्त्रियांस आपल्या ताब्यांत घेण्यासाठीं काळविटांप्रमाणें एकमेकांशीं लढत असतात.

पण ही चाल पुरुषांमध्येंच तेवढी दृष्टीस पडते असें नाहीं. पेल्टीयर सांगतो कीं, वर सांगितलेल्या जातींत एका पुरुषाच्या दोनपासून पांचपर्यंत बायका असून त्या त्याच्यासाठीं एकमेकींशीं लढत असतात; ह्या लढाईत त्यांचीं हत्यारें सोंटे हीं असून, त्या रक्त येईपर्यंत त्यांनीं एकमेकींचीं कपाळें सडकीत असतात. आणि अशा रीतीनें दिसणारा जो हा स्त्रीस्वभावाचा विशेष, तो मिचेल साहेबानें सांगितलेल्या दुसऱ्या एका विशेषाशीं सदृशच आहे. तो असें सांगतो कीं, लढाईनंतर आस्ट्रेलियांतील रानटी लोकांमध्यें वरचेवर असें घडून येतें कीं, जिताच्या बायका आपखुशीनेंच जेत्याकडे जात असतातः सिंहीणहि दोन सिंहांमध्यें लढाई होत असतां मुकाट्यानें ती पहात राहून जेत्याकडे निघून जाते, त्याची ह्यावरून आठवण होते.

एवंच ज्या स्थितींत आपल्या समजुतीप्रमाणें कुटुंब ही संस्था अस्तित्वांत आलेली नसते, तेव्हांपासून आपल्यास सुरुवात केली पाहिजे. प्रथम माणसांचे विस्कळित समूह बनत असतात, त्यांत स्थापिलेली अशी व्यवस्था कांहींच नसतेः प्रत्येक गोष्ट अनिश्चित व अस्थिर अशी

असते. त्यांच्यामध्यें पुरुषापुरुषांचे परस्परसंबंध जसे अनिश्चित असतात, तसेच स्त्रीपुरुषांचेहि परस्परसंबंध अनिश्चित असतात. दोन्ही ठिकाणीं त्या त्या वेळचे मनोविकाराखेरीज त्यांस दुसरे कोणी मार्गदर्शक नसतात, आणि त्यांच्यावर परिणामाच्या भीतीखेरीज दुसऱ्या कशाचाहि आळाबंदा नसतो. म्हणून ज्या संस्था आपणास सामान्यतः स्वाभाविकशा वाटतात, त्यांनीं अनियंत्रित असे स्त्रीपुरुषांचे संबंध प्रारंभीं असत, असें दाखविणाऱ्या ज्या गोष्टी आहेत त्यांकडे आतां आपण नजर फेंकूं या.

८. स्पारमन साहेब असें म्हणतो कीं, बुशमेन व त्यांच्यांतील स्त्रिया यांच्यामध्यें त्यांचा करार आणि प्रत्यक्ष व्यवहार याखेरीज दुसरा कोणताच विवाहप्रकार दिसत नाहीं. कीटिंग आपणास असें सांगतो कीं, चिपिवाज लोकांमध्यें विवाहविधि मुळींच नाहीं. हॉल एस्किमोलोकांबद्दल, बँक्राफ्ट आल्यूटस् लोकांबद्दल, ब्रेट आरावाक लोकांबद्दल आणि टेनेंट व्हेड्डा लोकांबद्दल, असेंच म्हणतो. आणि खालच्या क्यालिफोर्नियांतील लोकांबद्दल बँक्राफ्ट असें म्हणतो कीं, त्यांच्यांत विवाहविधी मुळींच नसून त्यांच्या भाषेंत विवाहाला शब्दहि नाहीं. पशुपक्ष्यांप्रमाणें त्यांचीं जोडपीं आवडीनुसार बनत असतात.

ज्या ठिकाणीं कांहीं विधि आढळून येतो तेथें देखील, स्वैच्छिक किंवा जबरीच्या एकत्र राहण्यास आरंभ करण्याखेरीज दुसरें कांहीं एक बहुधा नसतें. पुष्कळ वेळां पुरुष स्त्रीस जबरीनें धरून आणीत असतो, म्हणजे तो तिला पकडीत असतो, आणि ही पकड पुरी झाली म्हणजे

लग्न पुरें होतें. कांहीं ठिकाणीं पुरुष व स्त्री एक विस्तव पेटवितात आणि त्याच्याशीं बसतात; कांहीं ठिकाणीं–उदाहरणार्थ टोडा लोकांमध्यें–नवरीनें घरांतील कांहीं अल्प काम केलें म्हणजे लग्न पुरें होतें; आणि दुसऱ्या कांहीं ठिकाणीं–उदाहरणार्थ न्यूगिनीमधील पोर्टडोरी लोकांमध्यें– वधू वरास कांहीं पानतंबाकू देते. नवाजो नामक लोकांत लग्न करावयाचें झालें म्हणजे वधुवरें एका हाऱ्याच्या समोरासमोर बसतात, आणि त्यांत ठेविलेल्या अन्नपाण्याचें ग्रहण करितात. ह्या साध्या विधीनें तीं नवराबायको बनतात. पूर्वींच्या रोमन लोकांतहि पोळी एकत्र खाल्ल्यानें लग्न पुरें होत असे. कांहीं तरी विधि करून एकत्र राहावयास लागणें हाच अगदीं मूळचा विवाहविधि असे असें यावरून स्पष्ट दिसतें; आणि त्यावरून असेंहि गर्भित होतें कीं, त्यापूर्वीं कांहींएक विधि न करतांच स्त्रीपुरुष एकत्र रहावयास लागत असत.

शिवाय, अशा रीतीनें झालेला गृहसंयोग इतका पोकळ असतो, आणि बहुधा इतका क्षणभंगुर असतो कीं, त्यास पूर्वींच्यापेक्षां पुढच्या पायरीवरचा असें कांहीं म्हणतां येत नाहीं. चिपिवायन लोकांत बायकोचा घटस्फोट करावयाचा म्हणजे इतकेंच करितात कीं, तिची चांगली कुंदी काढून तीस घराबाहेर घालवून देतात. पेरिक्युइ जातीचा ( कालिफोर्नियांतील ) माणूस वाटेल तितक्या बायका करितो, त्यांच्याकडून गुलामांसारखें काम घेतो, आणि त्यांच्यापैकीं एकादीचा कंटाळा आला म्हणजे तीस हाकलून लावितो. तद्वतच, तुपी लोकांमध्यें नवऱ्यास बायकोचा कंटाळा आला म्हणजे तो तिला टा-

करून देत असे, व पाहिजे तितक्या बायका करीत असे. कासिआ लोकांत घटस्फोट इतके वरचेवर होत असतात कीं, त्यांच्या संयोगास लग्न हें नांवच शोभत नाहीं. मलायो पालिनिश्यनसारखे पुढें गेलेले जे लोक त्यांच्यामध्यें देखील असल्या गोष्टी दृष्टीस पडतात. "न्यूझीलंद" नांवाच्या आपल्या ग्रंथांत टामसन लिहितो कीं, त्या बेटांत पुरुषांनीं बायकांस घराबाहेर काढिलें म्हणजे तोच घटस्फोट समजला जात असे; आणि ताहितीमध्यें नवराबायकोंपैकीं एकाच्या इच्छेवरून लग्नसंबंध मोडीत असत. एथें असेंहि सांगितलें पाहिजे कीं, हें बेपर्वाईनें लग्न मोडण्याचें कृत्य पुरुषच तेवढें करितात असें नाहीं. वर सांगितलेल्या कासिआ लोकांप्रमाणें ज्यांच्यामध्यें स्त्रियांच्या हातीं सत्ता असेल, तेथें स्त्रियाहि नवरे त्यांस नकोसे झाले म्हणजे बेलाशक घराबाहेर काढून लावितात; आणि निकाराग्वामधील कांहीं प्राचीन लोकांत असेंच होत असे.

ह्या सर्व गोष्टींवरून असें दिसून येतें कीं, राजकीय संबंधाप्रमाणें वैवाहिकसंबंधहि हळूहळूच उत्क्रान्त झालेले आहेत; आणि दुसरें असें दिसून येतें कीं, ज्या कल्पनांमुळें व मनोवृत्तींमुळें सुधारलेल्या लोकांत लग्नास पवित्रपणा आलेला आहे, त्या कल्पना व मनोवृत्ती पूर्वी अस्तित्वांत नव्हत्या.

९. सुधारलेल्या लोकांस ज्या चाली अत्यन्त ओंगळ वाटतात त्या रानटी समाजांत दृष्टीस पडतात, ह्यावरून देखील त्यांच्यांत ह्या कल्पनांचा आणि मनोवृत्तींचा अभाव असतो हेंच व्यक्त होतें.

असुधारलेल्या व अर्धवट सुधारलेल्या लोकांपैकीं अनेक लोक पाहुण्यांसाठीं तात्पुरत्या बायकांची तरतूद करून त्यांचें आदरातिथ्य करीत असतात. कुमाना लोकांबद्दल हेरेरा आपणास असें सांगतो कीं, त्यांच्यांतील बडे लोक पाहिजे तितक्या स्त्रिया बाळगीत असत, आणि त्यांच्यापैकीं अत्यन्त सुंदर असतील त्यांस घरीं आलेल्या पाहिजे त्या पाहुण्यास देत असत. रानटी लोक आपल्या बायकांस व मुलींस नेहमींच अशा देत असतात. अशा लोकांमध्यें एस्किमो, उत्तर व दक्षिण अमेरिकन इंडियन, पालिनिशयन, आस्ट्रेलियन, बेर्बेर, पूर्व व पश्चिम नीग्रो, आरब, आबिसिनियन, काफिर, मोंगल, टट्स्की, इत्यादि लोक मोडतात, असें सर जॉन लबक सांगतो. बुशमेनच्या बायकांबद्दल लिक्टेन्स्टिन असें सांगतो कीं, नवऱ्याच्या परवानगीनें बायको पाहिजे त्याच्याशीं जाते. ग्रीनलंदमधील एस्किमो लोकांबद्दल इजीड असें सांगतो कीं, त्यांच्यापैकीं जे मुळींच कांकू न करतां आनंदानें आपल्या स्नेह्यांस आपल्या बायका देतील, ते सर्वांत उत्तम व फारच उमद्या स्वभावाचे म्हणून समजले जातात.

तरुणींच्या पवित्राचरणाची कांहीं एक किंमत न मानून रानटी लोक असल्याच मनोवृत्तीचें प्रदर्शन व निदर्शन करितात. कांगो देशांतील बेंग्वेला प्रांतांत गरीब लोक आपल्या मुलींनीं व्यभिचारावर पैसे मिळवावे, म्हणून त्यांस लग्नापूर्वी इकडे तिकडे हिंडवितात. मेक्सिकन लोकांमध्यें अशीच चाल होती. ते लोक मुली लग्नाच्या झाल्या म्हणजे त्यांस हुंड्याचे पैसे मिळविण्यास पाठवीत असत,

आणि त्या लग्नाला पुरेशी रक्कम जमेतोंपर्यंत निर्लज्जपणानें देशभर भटकत असत. डेरियनच्या संयोगीभूमीवरील प्राचीन लोक व्यभिचार म्हणजे निंद्यकर्म आहे असें समजत नसत; त्यांच्यांतील सरदारांच्या बायकांस असें वाटे कीं, त्यांच्याजवळ कोणीं कांहींहि मागितलें असतां नाहीं म्हणणें म्हणजे सामान्य प्रतीच्या माणसासारखें वागणें होय. ही समजूत आण्डामानीज लोकांच्याच समजुतीसारखी दिसते; त्यांच्या जातींतील कोणत्याहि पुरुषानें सांगितलेल्या वैवाहिक हक्कास कोणत्याहि स्त्रीनें प्रतिरोध केल्यास, ती कडक शिक्षेस पात्र होत असे. नष्ट व विद्यमान अशा लोकांमध्यें वैवाहिक कल्पना अशाच विलक्षण दिसतात. हसान्ये नांवाच्या आरबांमध्यें आठवड्यांतून चार दिवसच लग्नसंबंध मानीत असून, त्यांबद्दल पेथेरिक असें म्हणतो कीं, लग्नाच्या पूर्वींचीं बोलणीं चाललीं असतां, मुलीची आई अशी बोली करून घेते कीं, आठवड्यांतून दोन दिवस माझी मुलगी बायकोच्या नात्यानें न वागतां पाहिजे तशी वागेल; बरें, नवऱ्यांच्याहि मनोवृत्ती या गोष्टीस अनुकूल अशाच बनलेल्या आहेत. तो बायकोस त्या दिवसांत तसें करूं देतो इतकेंच नाहीं, तर तिनें दुसऱ्या कोणाशीं त्या दिवसांत व्यवहार करणें म्हणजे आपल्या आवडीला मान देणें असें समजतो. कांहीं चिब्चा लोकांत असलीच मनोवृत्ति दिसत असे. आपल्या बायका लग्नापूर्वीं शुद्ध राहिलेल्या असाव्या ह्याबद्दल ते बेफिकीर असत इतकेंच नाहीं, तर त्या तशा राहिलेल्या असल्यास, त्यांना इतरांचें मन ओढून घेतां आलें नाहीं

म्हणून त्या दुर्दैवी व बिन नशीबाच्या होत असें ते समजत, व त्या भिकार समजून त्यांचा द्वेष करीत.

सुधारलेल्या लोकांमध्यें स्त्रीपुरुषव्यवहाराला बंधन घालणाऱ्या ज्या कल्पना व मनोवृत्ती असतात, त्यांची जरी रानट्यांमध्यें वाण असते, तरी त्यांच्यांत अगदीं विरुद्ध अशा कल्पना व मनोवृत्ती मोठ्या प्रमाणावर दृग्गोचर होत असतात. कोलम्बियामधील इंदियन लोक असें समजतात कीं, पैसे घेतल्याशिवाय बायको दुसऱ्यास देणें हें तिच्या कुळास अत्यंत लाजीरवाणें होय; आणि क्यालिफोर्नियांतील मोडाक लोकांत अशी समजूत आहे कीं ज्या बायकोबद्दल नवऱ्यास मुळींच किंमत पडलेली नाहीं तिचीं मुलें म्हणजे केवळ दासीपुत्र होत. बर्टनच्या “ आबीओकूटा ” नामक ग्रंथांत आपण असें वाचितों कीं, पूर्वेकडील लोकांस एकपत्नी–पद्धति फार भयंकर व ओंगळ वाटते, आणि झांबिझी नदीवरील नीग्रो लोकांच्या बायकांबद्दलहि लिव्हिंग्स्टन असें सांगतो कीं, इंग्लंदांत कोणी एकाहून ज्यास्त बायका करीत नाहीं हें ऐकून त्यांना मोठा विस्मय वाटला; आणि बेली एका काण्डियन लोकांतील नायकाबद्दल असें सांगतो कीं व्हेड्डा लोक एकपत्नी असतात म्हणून त्यानें त्यांची फार निर्भत्सना केली.

१०. नात्याचीं जीं नियंत्रणें सुधारलेले लोक मानितात, तीं पुष्कळ असुधारलेले व अर्धवट सुधारलेले लोक बहुतेक मुळींच मानीत नाहींत. स्त्रीपुरुषांचे संबंध हे उत्क्रमणानें बनलेले आहेत, आणि त्यांचें संरक्षण करणाऱ्या मनोवृत्ती हळूहळूच स्थापन झालेल्या

आहेत, ही गोष्ट ह्यावरून जास्त स्पष्टरीत्या दिसून येते.

आपण जे संबंध अत्यन्त दूष्य म्हणून समजतों, तसले संबंध रानट्यांत वारंवार आढळून येतात. चिपिवायन लोक कधीं कधीं आपल्या आईजवळहि जातात, आणि आपल्या मुली व बहिणी यांच्याशीं तर वरचेवर संबंध करितात; काडियाक लोकांबद्दल लांग्स्डार्फ असेंच म्हणतो. तद्वतच, तेनासरीममधील क्यारेन लोकांमध्यें, भाऊबहीण, बापमुलगी, ह्यांच्यांमध्यें वरचेवर लग्नें झालेलीं दृष्टीस पडतात. अमेरिका व एशिया यांच्यामधील जीं हीं उदाहरणें दिलीं त्यांच्या जोडीला आफ्रिकेंतील एक उदाहरण आतां देऊं. केप गान्झालव्हिस व गाबून एथील राजे आपलें कुळ शुद्ध ठेवण्यासाठीं आपल्या वयांत आलेल्या मुलींशीं लग्नें करितात, आणि त्यांच्या राण्या वडील मुलांशीं लग्नें करितात.

ह्यांच्यापेक्षां अंमळ कमी भयंकर असा दूष्य व्यवहार ह्यापेक्षांहि जास्त लोकांत दृष्टीस पडतो. चिचिमेका व पानुहिस ह्या रानटी लोकांत भावाबहीणींच्या लग्नास मनाई नसे. कालीमधील लोक आपल्या पुतणीशीं लग्न करीत, आणि त्यांच्यांतील कांहीं सरदार आपल्या बहिणींशीं लग्नें लावीत. न्यूस्पेन नामक प्रांतांत बहिणीशीं लग्नें केल्याचीं चारपांच उदाहरणें आढळून आलीं. पेरू देशांतील इन्का राजांनीं पहिल्यापासून असा कडक नियम घालून ठेविला होता कीं, राजाच्या वारसानें आपल्या अगदीं सख्या बहिणीशीं लग्न करावें. बालिनिशियामध्यें असेंच आहे. सांडविच बेटामधील राजकुळांतील लोकांत जवळजवळच्या आप्तांची, म्हणजे

बहीणभावांची देखील, लग्नें वारंवार होतात; आणि माला-गासी लोकांत अगदीं जवळचीं नातेवाईक एकमेकांशीं लग्नें करितात; तीं इतकीं कीं सावत्र बहीणभावंडें देखील नवराबायको होऊं शकतात. बरें ही स्थिति अमेरिकेंतीलच प्राचीन लोकांत दिसून येते असें नाहीं. एकाच आई-च्या मुलांनीं एकमेकांशीं विवाह करूं नये हा प्रतिबंध ईजिप्तमध्यें मानीत नसत, ही गोष्ट थीबीसमधील खोदीं-व चित्रांवरून स्पष्ट दिसते, व प्राचीन ग्रीक व रोमन ग्रंथकार त्या लोकांबद्दल असेंच सांगतात. खुद्द स्कान्डि-नेव्हियन लोकांत देखील असला निषिद्ध व्यवहार होत असे ह्याबद्दल लेखी पुरावा सांपडतो.

सुधारलेल्या लोकांत स्त्रीपुरुषव्यवहारवासनेला ज्या मनोवृत्तींचें बंधन असतें त्या स्वभावजन्य नाहींत, हें बेली साहेब व्हेड्डा लोकांबद्दल जी एक विलक्षण गोष्ट सांगतो तिजवरूनहि सिद्ध होतें. त्यांच्या रूढीप्रमाणें माणसानें आपल्या धाकट्या बहिणीशीं लग्न करणें अत्यन्त योग्य समजलें जातें; पण तेंच वडील बहिणीशीं किंवा चुलतीमावशीशीं करणें दूष्य समजलें जातें.

११. उपलब्ध पुराव्यावरून, समाजस्थितीची अगदीं रानटी स्वरूपें आणि स्त्रीपुरुषांचे अगदीं नीच संबंध ह्यांमध्यें जरी सामान्य साहचर्य आढळून येतें, तरी सामाजिक प्रगति आणि कौटुंबिक जीविताचे उच्चतर नमुने, ह्यांच्यामध्यें तसलें सामान्य साहचर्य दिसत नाहीं; तर अनेक अनियमित प्रकार आढळून येतात.

अत्यन्त हलक्या जातींपैकीं पुष्कळांमध्यें बिनटिकाऊ संयोग दृष्टीस पडतात; असें आहे तरी इतर पुष्कळ ह-

लक्या जातींपेक्षांहि हलके असे जे भिकार व्हेड्डा लोक त्यांचे स्त्रीपुरुषसंयोग फार टिकाऊ असतात. त्यांच्याविषयीं बेली साहेब लिहितो कीं, त्यांच्यांत घटस्फोट माहीतच नाहीं; व्हेड्डा लोकांत मीं असें म्हणतांना ऐकिलें आहे कीं, मृत्यूच कायतो नवरा व बायको ह्यांना वियुक्त करूं शकतो. आतां त्यांचेच शेजारी जे काण्डयन लोक ते जरी त्यांच्यापेक्षां इतर बाबतींत श्रेष्ठ आहेत, तरी ह्या बाबतींत त्यांच्याहून अगदीं नीच आहेत.

बरें, दूष्य संबंधांच्या कमी होण्याचें प्रमाण समाजोत्क्रमणाशीं नेहमीं सारखेंच असतें असें नाहीं. त्यांपैकीं जे अगदीं गर्ह्य प्रकार उत्तर अमेरिकेंतील कांहीं अत्यन्त नीच जातींत दृष्टीस पडतात, तसलेच बऱ्याच मोठ्या आकाराच्या कांहीं आफ्रिकेय राष्ट्रांतील राजकुळांतूनहि आढळून येतात; आणि त्यांच्यापेक्षां अंमळ कमी ओंगळ असे प्रकार जसे रानट्यांत आहेत, तसेच अर्धवट सुधारलेल्यांतहि आहेत.

एका बायकोला अनेक नवरे हा जो कौटुंबिक जिविताचा नमुना तो जरी कांहीं अगदीं नीच अशा रानटी जातीमध्यें दृष्टीस पडतो, तरी तो इतर जातींत दृष्टीस पडत नाहीं असें नाहीं; कारण सीलोन, मलबार, आणि तिबेट, या देशांतील जे त्या मानानें बरेच सुधारलेले लोक आहेत, त्यांच्यामध्यें तो दृष्टीस पडतो. आणि एका नवऱ्याला पुष्कळ बायका ही जी उलट व्यवस्था ती जरी रानट्यांमध्यें बहुतेक सर्वत्र आढळून येते, तरी ती अर्धवट सुधारलेल्यांतच शिल्लक राहिली आहे असें नाहीं, तर

बऱ्याच सुधारलेल्या गत व प्रस्तुत समाजामध्येंहि ती शिल्लक राहिलेली आढळून येते.

बरें, स्त्रीपुरुषव्यवहारविषयक सईलपणा आणि नैतिक व सामाजिक सामान्य नीचता ह्यांच्यामध्यें किंवा ह्यांच्या उलट स्थितीमध्यें स्पष्ट संबंध दिसतात असें नाहीं. आल्यूशन बेटांतील पुरुष व स्त्रिया यांच्यांतील संबंध अत्यन्त नीच असतात. तथापि हे बेटवाले, आपण पाहिले त्यांच्यांत अत्यंत शांतिप्रिय व निरुपद्रवी असे लोक आहेत, आणि प्रामाणिकपणामध्यें तर पृथ्वीवरील अत्यन्त सुधारलेल्या लोकांनींहि त्यांचा कित्ता गिरवावा असे ते आहेत, असें कूक म्हणतो. उलट पक्षीं, थिंलकीट लोक आपल्या बायकामुलांशीं जरी फार प्रेमळपणानें वागतात, आणि त्यांच्या बायका जरी विनयशील आणि शुद्धाचरणी अशा असतात, तरी ते लोक मोठे चोरटे, लबाड आणि अत्यन्त क्रूर आहेत असें त्यांच्याबद्दल वर्णन आढळतें; कारण ते लोक आपल्या कैद्यांस निष्कारण क्रौर्यानें वागवीत असून, आपल्या गुलामांस ठार करीत असतात. तद्वतच, बेचुआना लोक हे अत्यंत नीचतेस पावलेले आहेत म्हणून जरी सांगतात, कारण सत्याची त्यांस चाड नसते आणि खुनाबद्दल जरी त्यांस कांहीं वाटत नाहीं, तरी त्यांच्या बायका विनयशील असून बहुधा सदाचरणी असतात. ह्याच्यापेक्षां वरच्या पायऱ्यांवरील समाजांकडे पाहतां त्यांच्यांतहि असलाच विलक्षण प्रकार दिसून येतो. ताहितियन लोकांबद्दलची कूकनें दिलेली हकीकत वाचतां असें दिसतें कीं, ते कला व सामाजिक व्यवस्था ह्यांमध्यें बरेच पुढें गेलेले असून त्यांच्यामध्यें दयापर मनोवृत्तीहि

बऱ्याच अंशांनीं आढळून येत; तथापि स्त्रीपुरुषव्यवहाराच्या संबंधानें त्यांच्यांत कांहींएक मर्यादा नसे; उलट पक्षीं, विश्वासघातक आणि क्रूर असे जे फीजीयन लोक त्यांच्यांत ह्या व्यवहाराच्या संबंधानें फारच मर्यादा दृष्टीस पडते; त्यांच्या संबंधानें अर्स्किन असें सांगतो कीं, रानट्यांच्या दृष्टीनें पाहतां त्यांच्यामध्यें स्त्रीनीतीची ईयत्ता फार मोठी आहे.

शिवाय, कांहीं जातींत अशी स्थिति दिसते कीं, त्यांच्यांत कांहीं दिशांनीं स्त्रीपुरुषव्यवहाराला बंधनें असून कांहीं दिशांनीं ढिलाई असते. कॉन्यागा लोकांमध्यें लग्नानंतर जरी बायका पतिव्रताधर्म पाळितात, तरी लग्नापूर्वीं त्यांस स्वेच्छाचार करण्याची पूर्ण मोकळीक असते. कुमानामध्येंहि कुमारिका आपल्या कौमार्याबद्दल अगदीं बेपर्वा असून, विवाहित स्त्रिया मात्र पातिव्रत्य रक्षण करीत. आणि पेरुव्हियन लोकांबद्दल पीड्रो पिझारो असें म्हणतो कीं, त्यांच्यांत सामान्य लोकांच्या स्त्रिया सदाचारसंपन्न असत. लग्नापूर्वीं त्या चांगल्या रीतीनें राहतात किंवा वाईट रीतीनें राहतात ह्याबद्दल त्यांचे बाप पर्वा करीत नसत, आणि त्या सढळ रीतीनें वागल्यास तें दूष्यहि मानिलें जात नसे. चिब्चा लोकांत देखील लग्नापूर्वीं जरी दुराचरणास उत्तेजनच देत असत, तरी नंतर बायकांनीं स्वेच्छाचार करावा हें त्यांस खपत नसे.

सारांश, स्त्रीपुरुषव्यवहारसंबंधाची प्रगति आणि सामाजिक उत्क्रमणाची प्रगति ह्यांमध्यें नेहमीं सारखेंच प्रमाण असावें असें जरी आपणास सहजच वाटतें, तरी उपलब्ध पुराव्यावरून तसें अनुमान काढतां येत नाहीं.

१२. असें आहे तरी, एकंदर गोष्टींचा विचार करतां, असें लक्षांत येतें कीं, उच्चतर सामाजिक नमुन्यांकडे जशी प्रगति होत जाईल, तशी गृहसंस्थांच्या उच्चतर नमुन्याकडेच प्रगति होत जाते. आत्यन्तिक उदाहरणांची तुलना करतां हें निःसंशयपणें आढळून येतें. प्राथमिक माणसांच्या अगदीं हलक्या जमावांतून जशी राजकीय व्यवस्था कांहींच नसते, तशी कुटुंबव्यवस्थाहि नसते. म्हणजे, त्यांच्यामध्यें स्त्रीपुरुषांमधील संबंध आणि आईबापें व मुलें यांच्यामधील संबंध हे बहुतेकांशीं पशूंमधल्या संबंधांसारखेच असतात. उलट पक्षीं, सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतून निश्चित, सुसंबद्ध, आणि व्यवस्थेशीर अशा जशा सामाजिक घटना आढळून येतात, तशाच निश्चित, सुसंबद्ध, आणि व्यवस्थेशीर अशा गृहसंस्थाहि आढळून येतात. म्हणून, कोठें कोठें कांहीं अनियमित भाव आढळून आले, तरी एकंदरींत ह्या दोन प्रकारच्या घटनांचे सामान्यतः साहचर्यच दृग्गोचर होतें.

ही प्राथमिक पाहणी आतां पुरी करून कुटुंबघटनेचीं जीं उच्चतर उच्चतर स्वरूपें त्यांचा लागेल तितका मागमोस लाविला पाहिजे. त्यांपैकीं प्रत्येक स्वरूपाची उत्पत्ति समाजाच्या परिस्थितीवर अवलंबून असली पाहिजे हें उघडच आहे; कारण विशिष्ट स्थितींत, सामाजिक स्वसंरक्षणास अनुकूल असणें हेंच त्या स्वरूपाच्या उत्पत्तीचें मुख्य कारण असलें पाहिजे. अगदीं अनियमित असे जे स्त्रीपुरुषांचे संबंध तेथून सुरवात करतां, समाजाचा टिकाव लागण्यास ज्या रूढी अत्यन्त अनुकूल असतील त्याच प्रथम स्थापन झाल्या पाहिजेत;

आतां ही गोष्ट जाणून बुजून झाली असेल असें नाहीं, तर ज्या समाजांतील रूढी कमी अनुकूल असतील ते नष्ट झाले असले पाहिजेत.

पण स्त्रीपुरुषसंबंधांच्या निरनिराळ्या प्रकारांचा विचार करण्यापूर्वीं, एका पूर्व प्रश्नाचा विचार केला पाहिजे. तो हा कीं, विवाहित स्त्रीपुरुषें येतात कोठून? तीं एकाच जातीचीं असतात किंवा निरनिराळ्या जातींचीं असतात? किंवा कधीं कधीं एकाच जातींतील व कधीं कधीं भिन्न जातींतील असतात?

---

# प्रकरण चवथें

## ज्ञातिबाह्य विवाह व ज्ञातिगत विवाह

१३. " प्राथमिक विवाह " नामक आपल्या मनोरम पुस्तकांत म्याक्लेनान साहेबानें ह्या दोन प्रकारच्या विवाहपद्धतींचें वर्णन केलें आहे; एका पद्धतीप्रमाणें इतर जातींतील बायकांशीं लग्न करावें लागतें, व दुसऱ्या पद्धतीप्रमाणें स्वजातींतीलच मुली कराव्या लागतात. विवाहविधीमध्यें जो पकडण्याचा विधि होत असतो त्याचा अर्थ काय व त्याचें मूळ काय, या गोष्टीची चवकशी करीत असतां या गोष्टीकडे त्याचें प्रथम लक्ष गेलें. त्यावरून त्यानें कल्पना बसविली ती सामान्यतः याप्रमाणें होती.

अन्नाच्या कमतरतेमुळें पुष्कळ रानटी लोक आपल्या लहान मुलींस मारावयास लागले. कारण शूर पुरुष व पारधी यांची फार जरूरी असल्यामुळें निरोगी मुलगे लहानाचे मोठे करणें हें त्यांस फायद्याचें वाटत असे, पण मुली स्वताचें पोषण करण्यास मुलांइतक्या समर्थ नसल्यामुळें आणि सार्वजनिक हितास फारशी मदत करण्याचेंहि सामर्थ्य त्यांस नसल्यामुळें, त्यांस लहानाच्या मोठ्या करणें हें त्यांस अगत्याचें वाटत नसे.

एवढें सांगून नंतर म्याक्लेनन साहेब असें म्हणतो कीं, ह्या मुलींच्या संहारामुळें बायका दुर्मीळ होऊन ज्ञातींतल्या ज्ञातींत एकीनें अनेक नवरे करणें, आणि जातीबा-

हेरच्या स्त्रिया धरून आणणें, अशी चाल उत्पन्न झाली.

आपल्याच जातींतील मुली दुर्मीळ झाल्यामुळें आणि दुसऱ्या जातींतील मुली चोरून आणण्याचा प्रघात पडल्यामुळें, हळू हळू स्वजातींतील स्त्रियांशीं लग्न करणें गैर मानूं लागले, व इतर जातींतील स्त्रियांशीं लग्न करणें प्रशस्त मानूं लागले.

लोकांच्या बायका चोरण्याची चाल उत्पन्न झाल्यामुळें अशा बायकोस झालेलें विशिष्ट मूल कोणत्या नवऱ्याचें याचा संशय उत्पन्न होऊन बायकांकडून वंशावळीची गणना करण्याचा प्रघात सुरू झाला.

अशा रीतीनें जेव्हां बाह्य जातींतील मुली व बायका धरून आणून बायकांकडून वंशावळ गणूं लागले, तेव्हां पूर्वींच्या समस्वरूप जातीमध्यें विषमजातीयत्व उत्पन्न होऊं लागलें. म्हणजे, आईकडून दुसऱ्या जातीचीं म्हणून मानिलेलीं मुलें प्रत्येक जातींत उत्पन्न होऊं लागलीं. अशा रीतीनें ज्ञातिबाह्यविवाहाचा आणखी एक प्रकार उत्पन्न झाला. कारण, बायको दुसऱ्या जातींतून चोरून आणावी, आणि ती दुसऱ्या जातीची असावी, असे दोन समज उत्पन्न होऊन त्यांचा गोंधळ होऊन गेला; आणि मग दुसऱ्या जातीच्या बायकांच्या मुलींशीं विवाह करणें उक्त समजूं लागले. अशा रीतीनें दुसऱ्या जातीच्या बायका हिसकावून आणणें हा जो ज्ञातिबाह्य विवाहप्रकार त्याच्या ऐवजीं सर्वांशीं किंवा कांहीं अंशीं आडनांवावरून ज्या दुसऱ्या जातीच्या म्हणून वाटतील अशा, स्वजातींतल्याच बायका करणें, हा जो ज्ञातिबाह्य विवाहप्रकार तो सुरू झाला.

वर आपण सांगितलेंच कीं, पशुसदृश स्त्रीपुरुषसंबंधांपेक्षां उच्चतर संबंधाची उत्पत्ति कशी झाली हें सांगताना म्याकलेनन साहेब असें म्हणतो कीं, स्त्रियांच्या दुर्मिळतेमुळें जसा बाहेरून स्त्रिया चोरून आणण्याचा प्रचार सुरू झाला, तसाच जातींतल्या जातींत एका स्त्रीनें अनेक नवरे करण्याचाहि प्रघात सुरू झाला. त्यानंतर ह्या चालीच्या अनेक स्वरूपांचें वर्णन करून. आणि अनेक भावांची एकच बायको हें जें त्या चालीचें अत्युच्च स्वरूप त्यास उल्लेख करून, तो असें सांगतो कीं, ह्या वेळापासून स्त्रियांकडून वंशावळ गणण्याशिवाय पुरुषांकडूनहि ती गणूं लागले. कारण अनेक भावांपैकीं अमकाच अमक्या मुलाचा बाप हें जरी निश्चितपणें न समजलें, तरी तो मुलगा अमक्या कुळांतला हें तरी निश्चयेंकरून कळूं लागलें.

नंतर मग वडील भाऊ म्हणजे सर्वांत श्रेष्ठ ह्या समजुतीची स्थापना होऊन, आणि तो वडील असल्यामुळें विशिष्ट स्त्रीचें त्याच्याशीं प्रथम लग्न होऊन, त्यालाच मुलें होऊं लागल्यामुळें, सर्व मुलें त्याचींच, अशी कल्पना उत्पन्न झाली; म्हणजे, वडील भाऊ हा कुटुंबपिता ( Pater familias ) म्हणून बनून गेला, आणि अशा रीतीनें उत्पन्न झालेली जी ही सामान्य पितृकल्पना, ती पुरुषाकडून वंशावळ गणण्याची चाल पाडण्यास व स्त्रियांकडून गणावयाची कमी करण्यास एक कारण झाली.

काण्डयन व इतर कांहीं रानटी लोकांत नाईक एकपत्नी झाले आहेत, ही गोष्ट सांगून तिजवरून म्याकलेनन साहेब असें म्हणतो कीं, ह्या त्यांच्या प्रघाताचें इत-

रांनीं अनुकरण केलें असेल, व त्यावरून एक पत्नी व अनेक पत्न्या करण्याचे प्रघात सुरू झाले असावे. आणि त्यावरून सर्वांत वडील पुरुष कुटुंबांतील सर्वांचा व सर्व मालमत्तेचा धनी मानण्याचा प्रघात, पुरुषांकडून वंशगणनाचा प्रघात, आणि ज्ञातिसंस्थेची स्थापना, ह्या गोष्टी उत्पन्न झाल्या असाव्या, असेंहि तो म्हणतो.

**स्पेन्सर** साहेब म्हणतात, म्याक्लेनन साहेबाच्या कृतीची ही जी हकीकत दिली आहे ती जरी साधेल तितकी त्याच्याच शब्दांनीं दिली आहे, तरी ती त्यास सर्वच मान्य होईल असें नाहीं, कारण त्याच्या लिहिण्यांत पुष्कळ पूर्वापर विरोध आहेत. आतां ही गोष्ट निःसंशय आहे कीं, त्यानें सांगितलेल्या पुष्कळ गोष्टी खऱ्या आहेत. उदाहरणार्थ, बायका चोरण्याचा प्रघात कांहीं हलक्या जातींमध्यें अद्यापि चालू असून, हल्लीं उच्चतर बनलेल्या कांहीं जातींमध्यें पूर्वीं तो सुरू होता; आणि ज्या समाजांतून ती चाल नष्ट झाली आहे, तेथें देखील तद्दर्शक विधि अद्यापि सुरू आहे. तद्वतच, कांहीं अनेक रानटी जातींतून स्त्रियांकडूनच नातेसंबंध मोजीत असतात, आणि त्यामुळें आडनांव, पदवी, व मालमत्ता हीं सर्व स्त्रीवंशांतच जात असतात. तद्वतच हीहि गोष्ट खरी आहे कीं, जेथें जेथें बायका चोरण्याचा प्रघात होता किंवा आहे अशा बऱ्याच समाजांत एकाच आडनांवाच्या स्त्रीपुरुषांचा विवाह होत नाहीं, कारण त्यांचा मूळपुरुष एकच असला पाहिजे असें गृहीत धरितात. पण ह्या सर्व गोष्टी जरी खऱ्या आहेत तरी त्याची एकं-

दर कृति बरीच आक्षेपार्ह दिसते. त्या आक्षेपांपैकीं प्रथम बारीक आक्षेपांचा विचार करूं या.

१४. पहिला आक्षेप असा. एके ठिकाणीं तो म्हणतो कीं, ज्ञातिबाह्य विवाह आणि बायका धरून आणणें, ह्या गोष्टी प्रत्येक जातीनें सुधारणेच्या एका विशिष्ट पायरीवर नेहमींच केलेल्या आहेत; आणि दुसऱ्या ठिकाणी तो हेंहि कबूल करितो कीं ज्ञातिबाह्य विवाह करणाऱ्या जशा अनेक जाती आहेत तशाच ज्ञातींतल्या ज्ञातींतच लग्नें करणाऱ्याहि दुसऱ्या अनेक जाती आहेत. शिवाय तो असें म्हणतो कीं, ज्ञातींतल्या ज्ञातींत विवाह करण्याची चाल समाजसुधारणेच्या बऱ्याच पायऱ्या चढून गेल्यावर उत्पन्न होते. आतां हीं विधानें परस्परविरुद्ध आहेत ही गोष्ट उघडच आहे. शिवाय तो असें सांगतो कीं काकेशस पर्वत, सीरिया प्रांत, आणि हिंदुस्थानच्या ईशान्य मर्यादेवरील पहाड, यांमध्यें अशा अनेक जाती आहेत कीं त्या चेहरे, भाषा, इत्यादिकांवरून एकाच मूळ खुंटापासून उत्पन्न झालेल्या दिसत असून त्यांच्यांत ज्ञातिबाह्य व ज्ञात्यन्तर्गत, दोन्ही प्रकारच्या विवाहपद्धती दृष्टीस पडतात. ही गोष्ट त्याच्या कृतीच्या विरुद्धच आहे.

शिवाय तो असें म्हणतो कीं, रानटी लोक ज्ञातिबाह्य विवाह करीत ह्यास कारण एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांनीं एकमेकांशीं लग्नें करावीं ह्याविरुद्ध त्यांना जणूं काय मूळपासून उपजतबुद्धिच होती; आणि जातींतल्या बायका दुर्मीळ झाल्यामुळें ते बाहेरच्या बायका धरून आणूं लागले असेंहि तोच म्हणतो. शिवाय,

नात्याच्या स्त्रीपुरुषांचीं लग्नें लावून देण्यास प्रथम जर लोकांस प्रत्यवाय वाटत नव्हता (आणि हें म्हणणें बरोबर दिसतें) तर वरची उपजतबुद्धीची क्लृप्ति ही ह्या म्हणण्याच्या विरुद्ध दिसते.

शिवाय, अशा प्रकारची उपजतबुद्धि रानटी माणसांत एकवेळ होती ही क्लृप्तिहि बरोबर दिसत नाहीं. अगदीं मूळ माणसांच्या समूहांमध्यें लग्नाबद्दल कांहीं निश्चित नियम असतील हें संभवनीयच दिसत नाहीं. कोणतेंहि सामाजिक समूह उत्पन्न होण्याच्या अगोदरच स्त्रीपुरुष संयोग झाले असले पाहिजेत हें उघडच आहे. कोणतेंहि सामाजिक बंधन उत्पन्न होण्यापूर्वीं समाजास कांहीं अस्तित्व आलें असलें पाहिजे; आणि तें येण्यास अर्थात् कांहीं पिढ्या उत्पन्न झाल्या असल्याच पाहिजेत आणि त्या उत्पन्न होण्यास अनियमित स्त्रीपुरुषसंयोग झाले असलेच पाहिजेत.

आतां रानट्यांमध्यें लहानपणीं मुली मारण्याची चाल असल्यामुळें बायका दुर्मीळ होऊन त्या बाहेरून चोरून आणण्याची चाल उत्पन्न झाली, असें जें म्याकलेनन साहेब म्हणतो, तें कितपत सयुक्तिक आहे तें पाहूं. मुली लहानपणीं मारिल्या गेल्यामुळें स्त्रिया दुर्मीळ झाल्या ही गोष्ट प्रथमदर्शनीं सयुक्तिक दिसते; पण रानटी समाजांत त्याबरोबरच दुसरी एक गोष्ट होत असते ती विसरतां कामा नये. निरनिराळ्या रानटी टोळ्यांच्या नेहमीं लढाया होत असल्यामुळें त्यांच्यांतील पुरुषांचीहि नेहमीं खच्ची होत असते. त्यामुळें मुली लहानपणीं मारिल्यानें पुरुषांच्या संख्येपेक्षां स्त्रियांची संख्या कमी न

होतां फक्त फाजील होत नाहीं. ह्यावरून वरील कोटी किती शुष्क आहे हें तावडतोब दिसून येतें.

दुसरी गोष्ट अशी कीं, जेथें जेथें हल्लीं बायका चोरून आणण्याचा प्रघात सुरू आहे, तेथें तेथें एकानें अनेक बायका करण्याचाहि प्रघात सुरू आहे. उदाहरणार्थ, फ्यूजियन लोक आणि तास्मेनियन लोक हे दोन्ही स्त्रीचोर असून अनेकपत्नीहि आहेत. डाकोटा लोक व ब्राझीलियन लोक ह्यांचीहि स्थिति अशीच आहे. असें जर आहे तर बायकांच्या दुर्मीळतेमुळें स्त्रीचौर्य उत्पन्न झालें असें कसें म्हणावें ?

म्याकलेनन साहेबाच्या क्लृप्तीला आणखी एक गोष्ट विरुद्ध आहे. तो म्हणतो कीं, स्त्रियांच्या दुर्मीळतेमुळें जातींतल्या जातींत अनेक नवरे करण्याची व जातीबाहेरून स्त्रिया चोरून आणण्याची, अशा दोन चाली उत्पन्न झाल्या. पण स्त्रीचोर जातींतच अनेकभर्तृत्व विषेशेंकरून दृष्टीस पडतें असें नाहीं. उदाहरणार्थ, वर सांगितलेल्या तास्मेनियन, आस्ट्रेलियन, डाकोटा व ब्राझीलियन ह्या जातींत अनेकपतित्व आढळून येत नाहीं; आणि फ्यूजियन व कांहीं क्यारिब लोक ह्यांच्यामध्यें जरी तें आढळतें तरी अनेकपत्नित्वापेक्षां कमी आढळतें. उलट पक्षीं, एकमेकांच्या बायका न चोरतां शांततेनें राहणाऱ्याच कांहीं रानटी लोकांत ती चाल आढळून येते; उदाहरणार्थ, एस्किमो लोकांत आणि टोडा लोकांत,--ज्यास लढाई म्हणजे काय हें मुळींच ठाऊक नाहीं.

आणखी कांहीं बारीक बारीक आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, कोमांची, न्यूझीलंदर, ले-

प्चा व क्यालिफोर्नियन, ह्या लोकांत ज्ञातिबाह्य व ज्ञात्यन्तर्गत अशा दोन्ही प्रकारच्या विवाहपद्धती आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं, कांहीं लोकांत अनेक पती करण्याची व अनेक पत्न्या करण्याची अशा दोन्ही चाली आहेत;- उदाहरणार्थ, फ्यूजियन, एस्किमो, बारा, क्यारिब व हाटेंटाट ह्या लोकांत. तिसरी गोष्ट अशी कीं, कांहीं लोकांत ज्ञातिबाह्यविवाह असून लग्नांत स्त्रिया धरून आणण्याचा विधि नाहीं; उदाहरणार्थ, चिपिवाज व इरोक्वाइस लोकांत. पण हे आक्षेप एकीकडे ठेवून कांहीं महत्त्वाच्या आक्षेपांकडे आतां नजर देऊं.

१५. वर सांगितलेंच आहे कीं, मुलींस लहानपणीं मारिल्यामुळें बाहेरून स्त्रिया चोरून आणण्याची चाल उत्पन्न झाली, आणि प्रत्येक मानवजातींत सुधारणेच्या कांहीं विशिष्ट पायरीवर ती नेहमीं आढळून येते, असें म्याकलेनन साहेबाचें म्हणणें आहे. ह्याचा तात्पर्यार्थ असा निघतो कीं, जवळजवळच्या अनेक टोळ्या एकमेकांच्या बायका जबरीनें धरून नेत असत. पण असें जर असेल तर स्त्रियांची दुर्मीळता अशा रीतीनें कशी भरून यावी? प्रत्येक टोळींत जर पुरुषांपेक्षां स्त्रिया कमी असल्या, तर एकमेकांच्या स्त्रिया चोरल्यानें सर्वांस बायका कशा मिळाव्या? कारण असें केलें तरी मूळची दुर्मीळता कायमच राहणार; कारण एका टोळीला जितक्या बायका मिळणार तितक्या दुसरींतल्या कमी होणार. जर कांहीं टोळ्यांनीं इतरांच्या ज्यास्त बायका नेहमींच चोरिल्या तर ह्या इतर टोळ्या हळूहळू नष्ट होत जाणार; आणि बाकीच्या टोळ्यांनीं

जर तीच पद्धति कायम ठेविली, तर शेवटीं सर्वांत प्रबल तेवढी टोळी कायम राहून बाकी सर्व नष्ट होणार. मग तिनें कोठून बायका आणाव्या?

दुसरी गोष्ट अशी कीं, आपण कल्पिलेल्या जातिसमूहांपैकीं प्रत्येकांतील लोकांला जर स्वताच्या जातींतील बायका करण्याची मनाई असेल आणि बाहेरून बायका चोरून आणणें भाग असेल, तर त्याचा अर्थ असा होतो कीं, प्रत्येक जात लोकांकरितां बायका तयार करिते व आपल्यासाठीं मात्र तयार करीत नाहीं; म्हणजे काय, तर, प्रत्येक टोळी जरी आपल्यापैकीं बऱ्याच मुली मारिते, तरी कांहीं मुली लोकांकरितां मुद्दाम लहानाच्या मोठ्या करिते. पण ही गोष्ट खरोखरच असंभवनीय दिसते. जातींतल्या जातींत लग्न करण्याची जेथें सक्त मनाई असेल, तेथें मुली राखून ठेवणें हें निरुपयोगी ठरतें; केवळ निरुपयोगीच नव्हे तर हानिकारक दिसतें; कारण तेणेंकरून शेजारच्या भांडणाऱ्या टोळ्यांस बायका मिळून त्या टोळ्या ज्यास्त प्रबळ होतात.

ह्या सर्व विवेचनावरून असें उघड दिसतें कीं, ज्ञातिबाह्यविवाह करण्याची चाल एकाद्या जातिसमूहांपैकीं प्रत्येक जातींतच सक्तीची असण्याचा संभव दिसत नाहीं; तशी ती कांहींतच असूं शकेल.

१६. आपल्या ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणांत म्याक्लेनन साहेब असें म्हणतो कीं, ज्ञातिबाह्यविवाहाच्या संबंधानें मीं जी हकीकत दिली आहे तीच बरोबर ठरणार आहे. पण, स्पेन्सर साहेब म्हणतात, मूळ मनुष्यसमूह बहुधा एकमेकांचे शत्रू असतात ही गोष्ट खरी स-

मजून विचार करतां, एक नवीच क्लृप्ति निष्पन्न होणार आहे, आणि तिच्याविरुद्ध वरच्यासारखे आक्षेप घेतां येणार नाहींत.

रानटी लोकांत काय आणि सुधारलेल्या लोकांत काय, सर्वत्र आणि सर्व काळीं, पराजय झाला कीं त्याच्या मागून लूट आलीच. सहज नेतां येण्यासारखी जी जी मूल्यवान् वस्तु सांपडेल ती ती जेते नेत असतात. फ्यूजियन लोकांचे शत्र त्यांचे कुत्रे व हत्यारें हीं हिरावून नेत असतात. आफ्रिकेंतील धनगरांचीं गुरें ढोरें त्यांना जिंकणारे लुटारू लोक नेत असतात; आणि जे लोक ह्यांच्यापेक्षां ज्यास्त सुधारलेले असतात त्यांचे पैसे, दागिने, व इतर ज्या मूल्यवान् चिजा फार जड नसतील, त्या त्यांचे जेते नेत असतात. जिताला लुटण्याची जी ही पद्धति आहे तिचाच बायकांना नेणें हा एक भाग आहे. स्त्रिया ह्या बायका, रखेल्या, आणि मोलकरणी, अशा अनेक प्रकारीं उपयोगीं पडत असतात; म्हणून लढाईंत पुरुष मारिले म्हणजे त्यांच्या बायका इतर जंगम मिळकतीबरोबर नेत असतात. रानटी लोकांत सर्वत्र हीच गोष्ट दृष्टीस पडते. उदाहरणार्थ, सामोआ बेटांत जित लोकांपासून लुटलेल्या चिजांची वांटणी करतांना स्त्रियांस बायका करून नेतात. दुसऱ्या एका कांहीं रानट्यांस कांहीं यूरोपियन प्रवाशांनीं मारिलें असें ऐकून एक आस्ट्रेलियन म्हणाला, हे गोरेलोक किती मूर्ख आहेत! मग त्यांनीं त्यांच्या बायकांना कां नाहीं धरून आणिलें? आणि मार्टिर आग्लेरियस नांवाचा एक मिशनरी असें म्हणतो कीं, आपल्या वेळीं बायकांस खाणें हें नरभक्षक

क्यारिब लोक गैरशिस्त समजत असत; म्हणून आपण जशीं पोरें होण्यासाठीं कोंबडीं बाळगितों, तशा ते पोरें होण्यासाठीं धरलेल्या बायकांपैकीं तरण्या असतील त्या बाळगीत असत. अर्धवट सुधारलेल्या लोकांच्या पहिल्या पहिल्या दंतकथांवरून हीच गोष्ट व्यक्त होते. उदाहरणार्थ, ईलियड नामक ग्रंथांत असें सांगितलें आहे कीं, ग्रीक लोकांनीं जेव्हां ईशन नांवांचें पवित्र शहर लुटिलें, तेव्हां जी लूट आणिली त्यांत कांहीं स्त्रिया होत्या. आणि ह्यानंतरच्या व ज्यास्त सुधारलेल्या अशा काळींहि वस्तुतः असल्याच कृती जेत्यांनीं केलेल्या आहेत ह्याबद्दल प्रत्यक्ष उदाहरणें द्यावयास नको. सारांश प्रारंभापासून परवांपर्यंत स्त्रिया धरून नेणें ही लढाईपैकीं एक सामान्य गोष्ट बनून राहिलेली होती.

आणखी एक गोष्ट ध्यानांत धरावयाची ती ही कीं, लढाईत मिळालेल्या वस्तूंपैकीं कांहीं जशा चांगल्या म्हणून मोलाच्या समजतात, तशा दुसऱ्या कांहीं विजयचिन्हें म्हणून मोलाच्या समजतात. शौर्याच्या खुणा असतील त्या रानट्यांस विशेष मोलाच्या वाटत असतात. उदाहरणार्थ, उत्तरअमेरिकेंतील इंदियन माणूस शत्रूचें शिर कापून आणीत असतो, न्यूझीलंदर आपल्या शत्रूचें डोकें सुकवून ठेवीत असतो आणि मारलेल्या शत्रूच्या केंसाच्या आपल्या झग्यास झिळमिळ्या करीत असतो. लढाईत जय मिळविल्याची एक खूण जिंकलेल्या टोळींतील एकादी स्त्री धरून आणणें ही समजतात. कारण तिचे दोन उपयोग होतात, एक गुलाम म्हणून आणि एक विजयचिन्ह म्हणून. रानटीं लोकांत लढवय्यांस सह-

जच फार मान मिळतो, आणि लढवय्यामध्यें जे कांहीं पराक्रम करतील त्यांस जास्त मिळतो; म्हणून लढाईत मिळविलेली बायको हें समाजांत मोठा मान मिळण्याचें एक चांगलें साधन होतें. अर्थात्, जातींतल्या बायका ज्यांनीं केल्या आहेत, त्यांपेक्षां ज्यांनीं बाहेरून बायका आणिल्या असतील त्यांचे विवाह अधिक सन्माननीय समजात. ह्या गोष्टीचा काय परिणाम झाला पाहिजे तें पहा.

जी टोळी नेहमीं युद्धांत गुंतलेली नसेल किंवा नेहमीं जय मिळवीत नसेल अशा टोळींतील विवाहरूढीवर ह्या गोष्टीचा सांगण्यासारखा कांहींएक परिणाम होण्याचा संभव नाहीं. टोळींतील पुष्कळांनीं जर जातींतल्या बायका केल्या असतील, तर थोडक्या श्रेष्ठ लोकांनीं परकी बायका आणिल्या आहेत एवढ्यावरून जातींतल्याच बायका करण्याची चाल बदलावयाची नाहीं: कारण जातींतल्या बायका केलेल्या बहुजनास एकमेकांचा आधार असणार. पण जर ती टोळी लढाईत विजयी होऊन शेजारच्या टोळ्यांतल्या बायका वरचेवर धरून आणूं लागली, तर अशी कल्पना उत्पन्न होईल कीं, परकी बायका केलेले जे पुष्कळ लोक ते प्रतिष्ठित होत, आणि ज्यांनीं परकी बायका हीं विजयचिन्हें मिळवून आपलें शौर्य सिद्ध केलें नसेल ते अप्रतिष्ठित होत. सारांश परकीयांतली बायको नसणें म्हणजे भितरेपणाचा पुरावा असें समजलें जाऊं लागेल. म्हणून बाहेरच्या बायका मिळविण्याची महत्त्वाकांक्षा वाढूं लागेल; आणि असल्या बायका नसलेल्यांची संख्या जशी कमी होत जाईल, तसें तें लांछन जास्त जास्त ढळढळीत समजलें जाईल;

सरते शेवटीं अत्यन्त लढवय्या टोळ्यांतून असें ठरून जाईल कीं, बाहेरची बायको मिळविलीच पाहिजे; मग प्रत्यक्ष लढाई करून न मिळाली तर चोरून मारून.

लग्न करण्यास अंगीं शौर्य असणें हा एक आवश्यक गुण समजला जातो असें दाखविणाऱ्या कांहीं गोष्टी आहेत, त्यांवरून ह्या गोष्टीबद्दल जास्तच खात्री होईल. हर्ण्डन असें सांगतो कीं, माव्ही लोकांत तीव्र वेदना सोशिल्याशिवाय माणसास लग्न करतां येत नाहीं. आमेझोन नदीच्या आद्यभागावरील पासीस लोकांबद्दल बेट्स् असें सांगतो कीं, पूर्वीं त्यांच्यांतले तरुण लढाईत पराक्रम करून बायका मिळवीत असत. डायाक लोकांतहि लग्न करण्यापूर्वीं एकाद्या शत्रूचें शिर कापून आणून शौर्याचा दाखला द्यावा लागत असतो. अपाचीस लोकांमध्यें लढवय्ये लोक पराभव पावून आल्यास बायका त्यांच्यापासून तिरस्कारपूर्वक दूर होतात; त्यांस त्या भितरे किंवा अडाणी म्हणून निंदितात, आणि म्हणतात कीं, तुमच्यासारख्यांस बायका असणें शोभत नाहीं. लोकांत अशा प्रकारचे मनोभाव उत्पन्न झाले म्हणजे बाहेरून बायका चोरून आणणें हा एक परिणाम त्यांपासून उत्पन्न होईल हें उघड आहे; कारण शौर्य दाखवीपर्यंत ज्यास बायको मिळत नाहीं त्यानें जर दुसऱ्याची बायको चोरून आणिली, तर त्याचें काम भागणार आणि त्याबरोबर त्यास प्रतिष्ठाहि प्राप्त होणार. बायको मिळण्यास कांहीं तरी विजयचिन्ह मिळविणें ही जर कसोटीचीच गोष्ट समजूं लागले, तर प्रत्यक्ष चोरलेल्या बायकोपेक्षां ज्यास्त चांगलें असें दुसरें विजयचिन्ह

कोणतें ? ज्या ठिकाणीं टोळींतील पुष्कळ योद्धे चोरून आणलेल्या बायकांमुळें प्रतिष्ठेस पावलेले असतील, त्या ठिकाणीं बायको चोरून आणील तोच विवाह करण्यास योग्य असें वाटूं लागणें अगदीं साहजिक नाहीं काय ? अशा रीतीनें ज्ञातिबाह्य विवाहाच्या सक्त कायद्याची उत्पत्ति होऊं शकेल.

**स्पेन्सर** साहेब म्हणतात, रूढीला हळूहळू कायद्याचें स्वरूप येतें ह्या दृष्टीनें हें आमचें म्हणणें म्याकलेनन साहेबाच्या म्हणण्याशीं जुळतें. पण ही चाल मूळच्या उपजतबुद्धीवरून उत्पन्न झाली, किंवा मुली मारण्याच्या प्रघातामुळें बायका दुर्मीळ होऊन उत्पन्न झाली, ह्या गोष्टी आह्मास त्याच्याप्रमाणें गृहीत कराव्या लागत नाहींत. शिवाय हें आमचें म्हणणें ज्ञातिबाह्य व ज्ञात्यन्तर्गत विवाहपद्धती पुष्कळ ठिकाणीं एकत्र असूं शकतात ह्या गोष्टीशींहि विरुद्ध दिसत नाहीं. शिवाय, एकाद्या जातिसमूहामध्यें सर्वत्रच ज्ञातिबाह्य विवाहाचा कडक कायदा असतो, असेंहि कल्पिण्याची अडचण आमच्या ह्या म्हणण्यांत अंतर्भूत होत नाहीं.

१७. पण विवाहविधींमध्यें बायको धरून आणण्याचा जो प्रकार पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो, त्याचें अशा रीतीनें समर्थन होतें काय ? म्याक्लेनन साहेबाची समजूत अशी आहे कीं, ज्या ज्या ठिकाणीं हा विधि हल्लीं दृष्टीस पडतो त्या त्या ठिकाणीं पूर्वीं पूर्ण ज्ञातिबाह्य विवाहपद्धति अस्तित्वांत होती. पण एकंदर गोष्टींचा विचार करतां असें समजलेंच पाहिजे असें नाहीं. बायका धरून आणण्याचा हा विधि अनेक कारणांवरून

उत्पन्न होतो; किंवा असें म्हणणें कदाचित् अधिक बरोबर होईल कीं, त्याला अनेक समवायि कारणें उत्पन्न होत असतात.

बायका ताब्यांत घेण्यासाठीं लढणाऱ्या रानटी टोळ्या अद्यापि आहेत हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे; असें जर आहे तर बायकोला धरण्याच्या मागून ती ताब्यांत घेणें हा व्यापार सहजच येतो. रानटी माणसाच्या दृष्टीनें एकट्याच्याच ज्या ताब्यामुळें ती त्याची बायको बनते तो ताबा तिच्यावर हात टाकून त्यांत त्यास यश आलें म्हणजे त्या योगानेंच उत्पन्न होतो. एवंच हा विधी जसा इतर जातींतून एकाद्या स्त्रीस प्रत्यक्ष धरून आणिल्यानें उत्पन्न होईल, तसाच जातींतल्या जातींतहि तीस प्रत्यक्ष धरिल्यानें उत्पन्न होईल.

आतां एकादा पुरुष एकाद्या स्त्रीस धरूं लागला, तर जातींतल्या इतर पुरुषांकडून जसा त्यास विरोध होण्याचा संभव आहे, तसा स्वतः त्या स्त्रीकडूनहि होण्याचा संभव आहे. सर जॉन लबकचें मत असें आहे कीं, त्या स्त्रीचा लाजाळूपणा ही गोष्ट धरण्याचा विधि स्थापन होण्यास पुरेसें कारण नाहीं; आणि असेंहि कदाचित् असेल कीं तेवढ्या एकाच गोष्टीनें प्रत्येक विधीची योग्य उपपत्ति होणार नाहीं. पण ही गोष्ट महत्त्वाची आहे असें मानण्यास कारणें आहेत. क्रांट्स् साहेब असें सांगतो कीं, एस्किमो लोकांत एकाद्या तरुणीला कोणी मारावयास आले म्हणजे ती लागलाच मोठा भिण्याचा आव आणिते, आणि केंस ओरबाडावयास लागून दरवाजाबाहेर पळते; कारण अविवाहित स्त्रीनें लग्नाला प्रति-

कूलता न दाखविणें म्हणजे विनयशीलतेचा भंग करणें असें समजतात. बुशमेन लोकांतील मुली असेंच समजतात; कारण त्यांच्यांतहि विवाहेच्छूस मुलीच्या आईबापांप्रमाणें मुलीचीहि संमति मिळवावी लागते; आणि त्याप्रसंगीं ती अगदीं नाहीं नाहीं म्हणण्याचा आव आणिते. तद्वतच सिनै पर्वताजवळील आरब लोकांबद्दल बर्कहार्ट असें म्हणतो कीं, त्यांच्यांतील मुलीस कोणी मागावयास आला म्हणजे ती स्वसंरक्षणार्थ त्याच्यावर दगडांचा वर्षाव करूं लागते, व त्यास जखमाहि करिते, पण यावरून तो तीस आवडत नसते असें समजावयाचें नाहीं; कारण ती असल्या प्रसंग जितका ज्यास्त झगडा करील, चावेल, लाथा झाडील, ओरडेल आणि मारील, तितकी तिच्या मैत्रिणी तिला मागून ज्यास्त शाबासकी देतात; तद्वतच पुढें नवऱ्याकडे जात असतां अत्यन्त स्फुंदस्फुंदून मोठ्यानें रडणें हें मोठें विनयशीलतेचें लक्षण समजलें जातें. मूझो लोकांबद्दल पीड्राहिटा असें सांगतो कीं, आईबापांबरोबर करार केल्यानंतर वर वधूस पाहावयास येत असे, आणि तीन दिवसपर्यंत तीस कुरवाळीत रहात असे; पण तो असें करीत असतां इकडे ती त्यास मुष्टिप्रहार करीत असे, आणि काठ्यांनींहि मारीत असे. अशा रीतीनें तीन दिवस गेल्यावर ती अमळ थंड होई, व त्याचा स्वैंपाक करावयास लागे.

ह्या सर्व उदाहरणांवरून असें स्पष्ट होतें कीं, अब्रूसाठीं धारण केलेल्या किंवा खऱ्याखुऱ्या लाजाळूपणामुळें स्त्री स्वतः विरोध करावयास कमी करिते असें ना-

हीं. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं तिच्या बरोबर तिच्या मैत्रिणीहि विरोध करूं लागतात असें दिसून येतें. उदाहरणार्थ, सुमात्रा बेटांत वधू आणि तिच्या कुटुंबांतील वृद्ध बाया वरास वधू मिळविण्यास खरा किंवा खोटा प्रतिबंध करणें म्हणजे मोठी अब्रूची गोष्ट समजतात.मापुची लोकांत विवाहसमयीं जमलेल्या सगळ्या बायका एकदम उठतात किंवा दुसरें कांहीं हातास लागेल तें घेऊन विपत्तींत सांपडलेल्या कुमारीच्या मदतीस धांवतात; वधू कितीहि उत्सुक असली तरी तिनें विरोध करणें व झगडणें ही मोठी अब्रूची गोष्ट समजतात. कामस्चाडेल लोकांत वधूस धरण्याची परवानगी वरास मिळाल्यानंतर तीस तो एकटी किंवा थोडक्याच मंडळींत पकडण्याची संधि पहातो, कारण या वेळीं खेड्यांतील सर्व बायका तिचें रक्षण करणें हें आपलें कर्तव्य समजत असतात.

एवंच आपणास असा पुरावा सांपडतो कीं, धरण्याचा विधि उत्पन्न होण्याचें एक कारण स्त्रीविरोध हें होय; मुख्यत्वेंकरून वधूचा विरोध, आणि गौणत्वेंकरून तिच्या मैत्रिणींचा विरोध. हलक्या जातींच्या स्त्रियांच्या चालीरीतींमध्यें जरी फारसा लाजाळूपणा अंतर्भूत होत नाहीं, तरी तो त्यांच्यामध्यें मुळींच नसतो असेंहि आपणास समजतां कामा नये. म्हणून खरोखरच लाजाळूपणा आणि ओढूनताणून आणलेला लाजाळूपणा हे दोन स्त्रीनें प्रतिरोध करणें आणि म्हणून पुरुषानें तीस पकडण्याचा प्रयत्न करणें ह्या दोन्ही गोष्टी स्वाभाविकरीत्या उत्पन्न करण्यास पुरेशी कारणें आहेत. शिवाय, रानटी माणूस आपल्या बायकोस गुलाम करीत असून

तीस क्रूरपणें वागवीत असतो, ही गोष्ट प्रतिरोधाचें आणखी एक कारण होय.

बरें, हा जोराचा प्रतिरोध स्वत: वधू किंवा तिच्या मैत्रिणी करितात असें नाहीं; तर तिच्या कुटुंबांतील पुरुषहि बहुधा त्यास प्रतिरोध करीत असतात. एकाद्या स्त्रीची किंमत जशी बायकोच्या नात्यानें असते तशी मुलगी या नात्यानेंहि असते; आणि सामाजिक प्रगतीच्या अगदीं खालच्या पायरीपासून तों अगदीं वरच्या पायरीपर्यंत बाप मुलीपासून नोकरी घेण्यास आपण हक्कदार आहों असें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या म्हणतच असतो. उदाहरणार्थ, नीचत्वास पावलेले जे फ्यूजियन लोक त्यांची गोष्ट अशीच आहे, म्हणून त्यांच्यांत वधूसाठीं वर तिच्या बापास कांहीं मदत करीत असतो; उदाहरणार्थ, त्याची होडी बांधण्यास त्यास तो मदत करितो. त्यांच्यापेक्षां ज्यास्त सरसावलेल्या रानटी लोकांतहि सर्वत्र असेंच आहे; म्हणजे वधूसाठीं वर तिच्या बापाचें कांहीं ठराविक काम करितो किंवा त्यास कांहीं ठराविक किंमत देतो. इंग्रज लोकांतहि पूर्वीं असेंच होतें ह्याबद्दल पुरावा सांपडतो. त्या लोकांत मुलीस कोणीं फूस लावून गर्भवती केल्यास बाप तिच्यावर दिवाणींत जी नुकसानीची फिर्याद करितो तींत असें लिहितो कीं, गर्भारपणामुळें मुलीला माझी नोकरी करतां न आल्यामुळें माझें नुकसान झालें आहे तें भरून मिळावें. यावरून असें अनुमान निघतें कीं, ज्या अत्यन्त रानटी समाजांत अ [illegible] बापांच्या किंवा इतरांच्या हक्कांकडे इतर फारसें ल[illegible] देत नाहींत, त्या ठिकाणीं मुलगी कोणी ध-

रून नेऊं लागल्यास त्याच्याशीं लढावयास जाणें ह्या-खेरीज त्यास अन्यमार्ग नसतो. ह्या अनुमानाच्या पुष्टि-करणार्थ प्रत्यक्ष पुरावाहि सांपडतो. मापुची लोकांबद्दल स्मिथ असें म्हणतो कीं,मुलीचे आईबाप विरोध करूं लागले म्हणजे शिंग वाजवून तो आपल्या शेजाऱ्यांस लागलेंच बलावणें करितो, आणि ते लागलेच त्याच्या पाठीस लागतात. कास्पियन समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यावर गॉडॉर नांवाचे जे लोक राहतात त्यांच्यामध्यें अशी चाल आहे कीं, वरानें वधूस पळविलीच पाहिजे, मग तसें करतांना तिचे आईबाप त्याच्या पाठीस लागले तरी हरकत नाहीं; त्यांस तो तीन दिवसांच्या आंत सांपडल्यास त्यास ठार करण्याचीहि परवानगी असते. गोंड लोकांत अशी चाल आहे की, आईबापांनीं मुलगी देत नाहीं म्हटल्यास वर तीस जबरीनें घेऊन जातो. एवंच वधूस धरण्याची चाल उत्पन्न होण्यास आणखी एक कारण आढळून येतें; आणि सामाजिक रूढी चांगल्या स्थापन होण्यापूर्वी हें कारण सामान्य असलें पाहिजे. सारांश, आईबापांस न जुमानतां वधूस चोरून नेणें हा प्रकार प्रथम सुरू झाला; नंतर त्यांनीं सूड घेऊं नये म्हणून त्यांचें नुकसान भरून देण्याचा सुरू झाला; ह्यापासून पुढें आईबापांस अगोदरच देणग्या देण्याचा सुरू झाला; आणि अशा रीतीनें शेवटीं आईबापांस पैसे देऊन मुली विकत घेण्याचा प्रचार अमलांत आला.

तर, मग, जातींतल्या जातींतच एकादा माणूस एका-द्या स्त्रीस आपलीशी करूं लागल्यास त्यास जर तीन प्रकारांनीं विरोध होऊं शकतो, तर इतर जातींतून बा-

यका चोरून आणण्याची चाल गृहीत केल्याखेरीज त्यांस धरण्याच्या विधीचें समर्थन होत नाहीं असें म्हणणें बरोबर दिसत नाहीं.

परंतु म्याक्लेननसाहेब म्हणतो त्याप्रमाणें हा विधि उत्पन्न झाला अशी कल्पना केली तरी तो लग्नविधि म्हणून शिल्लक राहिला. ह्यावरून रानटी लोकांत जातिबाह्यविवाहपद्धति तेवढीच कायदेशीर असे असें ठरत नाहीं. शत्रूपासून धरून आणलेल्या ज्यांच्या बायका आहेत असे पुष्कळ लढवय्ये असलेल्या, आणि म्हणून ते इतरांपेक्षां जास्त मानार्ह मानिलेल्या, टोळींतल्या लोकांत सहजच अशी महत्त्वाकांक्षा उत्पन्न होईल कीं, बायको धरून आणतां न आल्यास निदान ती धरण्याचें ढोंग तरी करावें. प्रत्येक समाजामध्यें कनिष्ठ लोक श्रेष्ठांचें अनुकरण करीत असतात; आणि अशा रीतीनें पूर्वजांनीं न पाळिलेल्या अशा चालीरीती निरनिराळ्या वर्गांमध्यें सुरू होतात. याप्रमाणें इतर जातींतून बायका पकडून आणण्याची चाल शास्त्या वर्गामध्यें असून पुढें त्या जातीशीं त्या वर्गाचा स्नेह झाल्यास, त्यांच्यांतून बायका पकडून आणण्याचा विधि तेवढा राहणार आहे; आणि नंतर श्रेष्ठानुकरण न्यायानें खालच्या खालच्या वर्गांतील लोकहि सन्मान्य समजून त्याच विधीचें अनुकरण करूं लागतील. एवंच, ह्या धरण्याच्या विधीला वर सांगितलेल्या कारणांपैकीं, अन्य एकादें कारण नसलें तरी तेवढ्यावरून विशिष्ट समाजांत पूर्वीं बाह्य जातींतूनच बायका आणण्याची रूढी होती अ-

सें सिद्ध होणार नाहीं, तर इतकेंच सिद्ध होईल कीं, त्यांच्यांतील मुख्य लोक तसें करीत असत.

१८. आणि आतां हाच कोटिक्रम पुढें चालवून जातिबाह्यविवाहपद्धति आणि जात्यन्तर्गतविवाहपद्धति, ह्या दोन्ही एकाच विभिन्नीकरणसरणीनें उत्पन्न झाल्या आहेत किंवा नाहीं हें पाहूं. ज्या काळीं स्त्रीपुरुषांचे संबंध अनियमित बदलत जाणारे, आणि त्या त्या वेळच्या मनोवृत्ती आणि परिस्थिति ह्यांवरून निश्चित होणारे, असे असत तेथून सुरवात करून त्यावरून परिस्थित्यनुरूप पुढें कोठें एका प्रकारच्या विवाहपद्धतीची आणि कोठें दुसऱ्या तऱ्हेच्या विवाहपद्धतीची स्थापना कशी झाली हें आपणास दाखवितां आलें पाहिजे.

आतां हें उघड दिसतें कीं, एकादी रानटी टोळी सभोवतालच्या टोळ्यांशीं जर शांततेनें राहत असेल तर तिच्यांत जात्यन्तर्विवाहपद्धतीच सुरू राहिली पाहिजे; कारण दुसऱ्या जातींतून बायका धरून आणण्यास कारण एक सार्वजनिक लढाई पाहिजे किंवा ती उत्पन्न करणारा खाजगी तंटा तरी पाहिजे. पण अशा प्रकारें उत्पन्न झालेली जात्यन्तर्विवाहपद्धति फारच क्वचित् असली पाहिजे; कारण टोळ्यांचीं भांडणें हीं बहुधा सर्वत्र असतातच. पण ही विवाहपद्धति नेहमीं शांततेनेंच राहणाऱ्या टोळ्यांमध्यें असेल असें नाहीं, तर लढाईत ज्यांचा नेहमीं पराजय होत असेल त्यांच्यामध्येंहि ती असली पाहिजे. अशा टोळ्यांपैकीं एकादे वेळीं एकाद्या टोळींतील एकाद्यानें जेत्या टोळींतील एकादी बायको धरून आणिल्यास तेवढ्यावरून बायका धरून आणण्याचा

प्रघात तिच्यांत सुरू होईल असें नाहीं; उलट अशी जो कृति करील तो शत्रूस आपल्यावर सूड घेण्यास प्रवृत्त करितो, या समजुतीवर टोळींतील इतर लोक त्याची निर्भर्त्सनाच करितील. एवंच अशा टोळींत जात्यन्तर्विवाहपद्धतीच कायम राहील असें नाहीं, तर इतर टोळ्यांतून बायका आणण्याविरुद्ध लोकांचा ग्रह प्रथम उत्पन्न होईल, आणि शेवटीं तन्निषेधार्थ त्या टोळींत कायदाच होईलः सारांश, स्वसंरक्षणार्थच ती टोळी जात्यन्तर्विवाहपद्धतीस चिकटून राहील. बरें, जात्यन्तर्विवाहशील टोळ्या जातिबाह्य विवाहशील टोळ्यांइतक्याच पुष्कळ आहेत असें जें म्याकलेनन म्हणतो, त्याच्याशींहि हें आमचें म्हणणें जुळतें; आणि भाषा व कुळ यांनीं परस्परसंबंध असलेल्या एकाद्या जातिसंघापैकीं कांहीं जातिबाह्यविवाहशील व कांहीं अंतर्विवाहशील आढळतात असें तो जें म्हणतो,त्याच्याशींहि जुळतें.

आतां हें उघडच दिसतें कीं, ज्यांचें बलाबल फारसें भिन्न नाहीं अशा टोळ्यांमध्यें वरचेवर परस्पर हल्ले व लुटी होत असतील. व त्यांबरोबर बायकाहि वरचेवर जबरीनें धरून आणीत असतील. त्यांपैकीं कोणत्याहि टोळींतील सर्व लोकांना अशा तऱ्हेनें बायका मिळतील असें नाहीं; आणि म्हणून प्रत्येक टोळींत कांहींच्या बायका जातींतल्या असतील आणि कांहींच्या बाहेरच्या असतील; म्हणजे, तिच्यामध्यें दोन्ही विवाहपद्धती सुरू राहतील. अशा टोळींत बाहेरून बायका धरून आणणें ह्या गोष्टीचा कोणी निषेध करणार नाहीं; कारण इतर टोळ्या हिच्यापेक्षां फारशा प्रबल नसणार; बरें, बाहे-

रूनच बायका आणिल्या पाहिजेत अशीहि सक्ती असल्या टोळींत होणार नाहीं; कारण असें बहुमत होण्याइतके बाहेरून बायका आणिलेले लोक त्या टोळींत असणार नाहींत. पण जर एकाद्या टोळी समूहापैकीं एकादी टोळी लढाईंत वरचेवर जय मिळवून सर्वांत प्रबल झाली, तिच्यांत बायका चोरून आणलेल्यांची संख्या निमेहून अधिक झाली, आणि चोरून आणलेली बायको असणें ही शौर्याची खूण होऊन तसल्या शौर्याशिवाय माणूस लग्न करण्यास योग्यच होत नाहीं असें ठरून गेलें, तर जातींतलीच बायको करणें ही गोष्ट नापतीची समजली जाऊन, पुढें पुढें लज्जास्पदच समजली जाऊं लागेल, आणि मग बाहेरूनच बायको आणिली पाहिजे असा त्या टोळींत कायदा होऊन जाईल, मग लढून आणा किंवा चोरून आणाः सारांश, ती टोळी बाह्यविवाहशील होऊन जाईल. ह्याचा परिणाम पुढें काय होईल तें पाहूं. अशा रीतीनें बाह्यविवाहशील बनणारी टोळी जशी जास्त जास्त प्रबल होत जाईल, तशा शेजारच्या टोळ्या त्यांच्यांतील बायका कमी होऊन क्षीण होत जातील; मग ही टोळी बरीच वाढून तिचे विभाग होतील; आणि ते विभाग शेजारच्या टोळयांचीं वसतिस्थानें हिसकावून घेऊन तेथें तीच विवाहसरणी घेऊन जातील. पुढें लवकरच ह्या पोटटोळ्यांमध्यें तंटे उत्पन्न होऊन त्या एकमेकींतल्या बायका हिरावून घेऊं लागतील; आणि नंतर म्याकलेनन साहेब म्हणतो त्याप्रमाणें त्यांच्यांत जातींतल्या जातींतलीच बाह्यविवाह-रूढी सुरू होईल. कारण दुसऱ्या जातींनीं चोरण्यासाठीं प्र-

त्येक जाति बायका उत्पन्न करिते असें जर गृहीत करावयाचें नसेल, तर आपणास असेंच अनुमान केलें पाहिजे कीं, बाह्यविवाहपद्धतींत अंमळ फरक होईल. म्हणजे, प्रत्यक्ष चोरून आणलेल्या बायकांच्या ऐवजीं अडचणीच्या प्रसंगीं जातींतच जन्मास आलेल्या पण परकी कुळांतल्या बायकांशीं लग्नें केलीं तरी चालतील, अशी अनुज्ञा उत्पन्न होईल. आणि अशा रीतीनें स्त्रीपुरुषव्यवहाराच्या अनियमितपणामुळें बायकांकडून नातें गणण्याची जी पद्धति प्रथम उत्पन्न होते, ती बाप कोण हें समजण्याचें साधन झालें तरी कायम राहील; कारण एरवीं वरच्यासारखी विवाहपद्धति अमलांत आणतां येणार नाहीं.

१९. सामाजिक जीवितावर बाह्य व अंतर्विवाहपद्धतींचें जे परिणाम होतात त्यांच्या संबंधानें फारसें महत्त्वाचें सांगण्यासारखें कांहीं दिसत नाहीं.

अगदीं मूलस्वरूपीं जी बाह्यविवाहपद्धति आहे ती अत्यन्त नीच प्रकारच्या रानटी स्थितींत उत्पन्न होते हें उघडच आहे; आणि समाजांचीं परस्परवैरें जशीं कमी तीक्ष्ण होत जातात, आणि युद्धपद्धति कमी क्रूर होत जातात, तशी ती पद्धति कमी कडक होत जाते. टोळींतील खुंट जेथें फार लहान असतील तेथें हे जातीजातींचे विवाहसंबंध इंद्रियविज्ञानशास्त्रदृष्ट्या फार फायदेशीर होतात हें खरें आहे; आणि म्हणून पुढें जो फायदा जेते व जित ह्यांच्या संमिश्रणानें होत असतो, तो यावेळीं बाह्यविवाहपद्धतीनें उत्पन्न होईल; आतां असा हा फायदा उत्पन्न व्हावा असा या रानटी लोकांचा ह्या पद्धतीचा स्वीकार करण्यांत उद्देश

नसतो हें सांगावयास नकोच; कारण त्यांस स्वाभाविक कार्यकारणसंबंधाचें ज्ञान नसून, शिवाय दूरवरचा विचारहि नसतो. पण प्रथम जेव्हां बाह्यविवाहपद्धतीची स्थापना होते, तेव्हां स्त्रियांची स्थिति फार नीच असते; त्यांना त्यांचे नवरे पशूंप्रमाणें वागवीत असतात; आणि स्त्रीपुरुषसंबंधामध्यें जे उच्चतर मनोभाव असावे, त्यांचा यावेळीं अगदीं अभाव असतो. ह्या पद्धतीच्या वेळीं राजकीय जीवित जसें अगदीं नीचप्रकारचें असतें, तसें कौटुंबिक जीवितहि अगदीं नीच प्रकारचें असतें.

आतां हें उघडच आहे कीं, अंतर्विवाहपद्धति ही प्रथम विशेष शांतिशील टोळ्यांमध्यें सुरू होत असून, पुढें निरनिराळ्या टोळ्यांचीं परस्परवैरें जशीं कमी होत जातील तसतशी ज्यास्त ज्यास्त पसरत गेली असल्यामुळें, ती उच्चतर जातीच्या कौटुंबिक स्थितीची सहचारिणी असली पाहिजे.

---

# प्रकरण पांचवें

## संमिश्र स्त्रीपुरुषव्यवहार



२०. नीच समाजांमध्यें स्त्रीपुरुषांचे संबंधांमध्यें अनिश्चितपणा व अनित्यता कशी असते ह्यांचीं उदाहरणें अगोदरच ( तिसऱ्या प्रकरणांत ) आलींच आहेत. असल्या समाजांत सर्वांचें वर्तन " बळी तो कान पिळी " ह्या धोरणावर चाललेलें असतें, आणि त्यांजवर राजकीय नियंत्रणें किंवा नैतिक मनोभाव ह्यांचा कांहींच आळाबंदा नसतो. हे लोक एकमेकांपासून बायका जबरीनें घेत असल्यामुळें आंगचा जोर आणि मनाची आवड यांनीं स्थापन होणाऱ्या स्त्रीपुरुषसंबंधाविना दुसरा कोणताहि बंध ते ओळखीत नाहींत. आपण ज्यास लग्नसंबंध म्हणून समजतों तो त्यांच्यांत बहुतेकांशीं मुळींच नसतो असें दाखविण्यासाठीं अगोदर उदाहरणें दिलींच आहेत, त्यांत आतां आणखी भर घालूं.

हैदा लोकांबद्दल पूल साहेब असें सांगतो कीं, त्यांच्यांतील स्त्रिया इतर जातीच्या पुरुषांशीं जरी क्वचितच संबंध ठेवितात, तरी स्वजातींतील पाहिजे त्या पुरुषाशीं जातात. मदूरा प्रांतांतील पिनी डोंगरावरील लोकांत संमिश्र स्त्रीपुरुषव्यवहाराला बहुतेक पूर्ण मोकळीक आहे. क्यापटिन हार्कनेस म्हणतो कीं, निलगिरी पर्वतावरील एरुलार नामक लोकांत लग्नसंबंध म्हणून मुळींच नाहीं;

त्यामुळें तेथें स्त्रीपुरुषांचा यथेच्छ व्यवहार होत असतो; आणि तो संबंध कायम ठेवावयाचा किंवा तोडावयाचा हें मुख्यत्वेंकरून स्त्रीच्या मर्जीवर अवलंबून राहतें. तीहूर नांवाच्या या देशांतील दुसऱ्या एका लोकांबद्दल असें म्हणतात कीं, त्यांचे मोठाले समाज अशाच रीतीनें राहतात; त्यांच्यांत एकाद्या जोडप्याचें लग्न झालें आहे असें समजत असलें, तरी तें बंधन नांवाचेंच असतें. आणि आण्डामानीज लोकांमध्यें एक ब्राह्मण शिपाई वर्षांवर राहिला होता, तो त्यांजबद्दल असें सांगतो कीं, त्यांच्यामध्यें हा संमिश्र व्यवहार इतका संमत आहे कीं, एकादी अविवाहित स्त्री एकाद्या पुरुषास नाहीं म्हणाल्यास तिनें आपला मोठा अपमान केला असें तो समजतो, आणि त्याबद्दल कधीं कधीं चांगला सूडहि घेतो.

मागें आह्मीं दाखविलेंच आहे कीं, पुष्कळ हलक्या प्रतीच्या टोळ्यांतून ह्या वस्तुस्थितींत इतका अल्प फेरबदल झालेला असतो कीं, त्यांच्यामध्यें ह्या विवाहविषयक संबंधाचा कोणताच प्रकार नसतो; आणि लग्न ह्या अर्थाचा त्यांच्यांत शद्ब देखील नसतो. त्या त्या वेळच्या लहरीप्रमाणें त्यांच्यांत स्त्रीपुरुषसंबंध जडत असतात, आणि अगदीं अल्प कारणावरून तुटत असतात. मंत्र नांवाच्या लोकांत ओळखीशिवायहि लग्नें होतात, अल्प कारणावरून काडी तोडतात, आणि कोठें कोठें कांहीं पुरुष चाळीस किंवा पन्नास वेळांहि लग्नें करितात असें जें म्हणतात, तीच स्थिति ह्या हलक्या जातींतून सर्वत्र आढळते.

२१. असल्या पुराव्यावरून कित्येक ग्रंथकार असा

तर्क बांधितात कीं, माणसाची मूळची स्थिति म्हणजे स्त्रीपुरुषांच्या अगदीं स्वेच्छाचाराची होती. रानटी लोकांत पूर्ण व्यभिचार ही केवळ रूढीच असते असें नाहीं, तर त्यांच्यांत तो एकप्रकारचा कायदाच असतो असें ते समजात. सर **जॉन लबक** यानें तर या अनिर्बंध स्त्रीपुरुष व्यवहारास " सगळ्या जातीचें लग्न " असें नांव द्यावें, असें देखील सुचविलें आहे. पण, **स्पेन्सर** साहेब म्हणतात, मूळ लोकांत शुद्ध संमिश्रव्यवहार कधींहि कोठें असेल असें मला वाटत नाहीं; आणि तसा कधीं कोठें असला, तरी वरच्या नांवावरून त्याची खरी कल्पना यावयाची नाहीं.

पूर्वीं आह्मीं म्हटलेंच आहे कीं, अगदीं प्रारंभीच्या सामाजिक स्थितींत सामाजिक कायदे मुळींच नसले पाहिजेत. सामाजिक कायदे म्हटले म्हणजे अगोदर सारखें सामाजिक अस्तित्व असलें पाहिजे; आणि सामाजिक अस्तित्व असण्याला एकामागून एक अशा कित्येक पिढ्या उत्पन्न झाल्या पाहिजेत. म्हणून " जातिविवाहाचा " कायदा प्रारंभीं असूं शकणार नाहीं. सर **जॉन** लबक असें म्हणतो कीं, प्रारंभीं इतर गोष्टींत जशी व्यक्तीची मालकी नसे, तशी बायकांच्या बाबतींतहि नसे. तो म्हणतो कीं, प्रारंभीं ज्याप्रमाणें टोळीची जमीन सर्वांची मिळून असे, तशा बायकाहि सर्वांच्या मिळून असतात; आणि इतर टोळ्यांतून जेव्हां बायका चोरून आणूं लागले, तेव्हांच त्यांच्या संबंधाच्या खाजगी मालकीची स्थापना झाली: कारण अशा रीतीनें चोरून आणलेल्या बायका, त्या आणतील त्यांच्याच होत, असे

इतर लोक समजूं लागले. आतां मालकीच्या संबंधाची एकंदर कल्पना जशी वृद्धिंगत होत गेली, तसाच वैवाहिक संबंधहि पक्क होत गेला असेल ही गोष्ट जरी संभवनीय दिसते, तरी मालकीच्या संबंधाची कल्पना लबक म्हणतो तितकी अपक्क कधींहि असेल असें वाटत नाहीं. आतां हें खरें आहे कीं, जमिनीवर जी सगळ्या टोळीची मालकी असते ती कित्येक एकलकोंड्या व जमाव करून राहणाऱ्या जनावरांच्या मालकीसारखी असते; कारण तीं आपल्या गुहेंत किंवा वसतिप्रदेशांत इतर जनावर आल्यास त्यास हांकून लावितात. तद्वतच रानटी लोकांत पकडलेल्या पारधीवर सर्वांची सारखी मालकी असते, बहुधा तरी ती अगदींच सारखी असत नाहीं, तिच्यांत कांहीं तरी कमजास्तपणा असतोच. पण ह्याचें कारण उघडच आहे. पारधी लोकांच्या जमिनीवर संयुक्त मालकी असण्याचें कारण असें आहे कीं, त्यांची तिजवर अन्य तऱ्हेची मालकी असूंच शकत नाहीं, आणि त्यामुळें त्या जमिनींत उत्पन्न होणाऱ्या उत्पन्नावरहि त्यांची संयुक्त मालकी असते. पण यावरून इतर वस्तूंवर रानटी लोकांत व्यक्तीची मालकी असत नाहीं अशी कल्पना करणें हें साधार दिसत नाहीं, किंवा संभवनीयहि दिसत नाहीं. कुत्र्याच्या ठिकाणींहि मालकीची कांहीं भावना दृष्टीस पडते, कारण तो धरलेल्या भक्ष्याकरितांच किंवा राहण्याच्या पिंजऱ्याकरितांच भांडतो असें नाहीं, तर मालकाच्या चीजवस्तूसाठीं देखील तो भुंकत असतो. अगदीं रानटी अशा स्थितींत देखील माणसाच्या ठिकाणीं मालकीची कल्पना ह्याहून कमी अ-

सेल असें वाटत नाहीं. म्हणून आपणास अशी कल्पना केली पाहिजे कीं, त्याला ह्यापेक्षां जास्त कल्पना होती; आणि ह्या कल्पनेच्या पुष्टीकरणार्थ पुरावाहि सांपडतो. बहुतकरून रानटी लोकांचीं शस्त्रें, भूषणें, आणि वस्त्रें, ज्याचीं त्याचीं मालकीचीं असतात. नीचत्वास पावलेल्या अशा फ्यूजियन लोकांत देखील होड्या खाजगी मालकीच्या असतात. आणि हें उघडच आहे कीं, ज्या पुढच्या फायद्याच्या कल्पनेमुळें सुबुद्ध प्राणी एकादी उपयुक्त वस्तु तयार करितो, किंवा मिळवितो त्याच कल्पनेमुळें, ती कोणी घेऊं लागल्यास त्यास तो अडथळा करितो. बहुधा ह्या लोकांत ज्याच्या ताब्यांत विशिष्ट वस्तु असेल त्याच्याशीं कोणी भांडत नाहीं, कारण तीं भांडण्या इतक्या किंमतीचीच नसते, आणि ज्या ठिकाणीं विरोध करूनहि दुसरा कोणी ती घेतो, त्या ठिकाणीं तिचें तो व्यक्तिशःच धारण करितो. ज्या वासनेमुळें मूळ माणूस अशा रीतीनें इतर मोलवान वस्तु आपल्याशाच करण्यास उद्युक्त होतात, त्याच वासनेमुळें ते बायकाहि आपल्याशाच करण्यास उद्युक्त होतात. म्हणून बायकांवर खाजगी मालक्या उत्पन्न झाल्या पाहिजेत. आणि इतर खाजगी मालक्या स्थापन करणारे जे प्रबलतर लोक तेच त्या नाकबूल करणार.

आणि पुरावा जो सांपडतो तो ह्याच निर्णयाला पुष्टि देणारा असा सांपडतो. कोठेंहि संमिश्र व्यवहार कितीहि ठळक असला तरी कांहीं दिवस टिकणारे असे स्त्रीपुरुषसंयोग त्या ठिकाणीं असतातच. मागें सांगितलेल्या लोकांत, किंवा आल्यूशन बेटांतील लोक, उत्तर अमेरिकें-

तील लोक, कुचिन लोक, या देशांतील बडगा, कुरुंबा व कोरिया लोक, आणि आफ्रिकेंतील हाटेंटाट व इतर लोक इत्यादि लोकांत जरी लग्नविधि मुळींच नाहीं, तरी "लग्नविधि नाहीं" याच विधानावरून असें गर्भित होतें कीं, त्यांच्यांत लग्नाच्या स्वरूपाचें कांहीं तरी आहे. उत्तर अमेरिकेंतील लोकांमध्यें सामान्यतः स्त्रीपुरुषांच्या संबंधास त्यांच्या संमतीखेरीज कोणाची मान्यता किंवा साक्ष जरी कांहीं लागत नाहीं, तरी त्यांच्यामध्यें कांहीं तरी संयोग असतोच. बुशमेन आणि क्यालिफोर्निया मधील इंडियन लोक ह्यांच्यामध्यें ह्या स्त्रीपुरुषसंबंधास जरी शद्ब नाहीं, तरी तो संबंध आहेच. अयोध्या प्रांतांतील तीहूर लोकांसारख्या लोकांमध्यें संमिश्र व्यवहार जरी इतका आहे कीं, विशिष्ट पुरुषांचें लग्न झालें म्हणून समजत असले तरी तें बंधन नांवाचेंच असतें, तरी त्यांचें लग्न झालें म्हणून समजतात ही गोष्ट आहेच. हल्लीं अस्तित्वांत असलेल्या ज्या फ्यूजियन, आस्ट्रेलियन, व आण्डामानीज ह्या अत्यन्त क्षुद्र जाती, त्यांच्यामध्यें स्त्रीपुरुषसंबंध प्रारंभीं कोणत्याहि रीतीनें उत्पन्न झाले असले तरी ते कमजास्त काळपर्यंत कायम रहात असतात. ह्यावरून आपण असें अनुमान काढिलें पाहिजे कीं, ज्याचा इतिहास उपलब्ध नाहीं अशा पौराणिक काळांत देखील संमिश्र व्यवहारास विशिष्ट स्त्रीपुरुषांचे संबंध स्थापन होऊन, कांहीं प्रतिबंध होत असे; हे संबंध माणसांच्या आवडीवरून प्रथम उत्पन्न होऊन ते इतर कोणी मोडूं लागल्यास अंगजोरावर राखिले जात असत.

२२. तथापि अगदीं प्रारंभीं संमिश्रव्यवहारास अशा रीतीनें प्रतिबंध झाला तरी फारच अल्प होतो ही गोष्ट कबूल करून, त्यावरून नात्यासंबंधाच्या काय कल्पना उत्पन्न होतात त्याचा प्रथम विचार करूं.

अशा लोकांत प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष कारणांवरून स्त्रीवंशाकडूनच नातीं ओळखण्यास सुरवात होते. कारण संमिश्रव्यवहार जर फार विस्तृत प्रमाणावर असेल, आणि ज्ञात बापापेक्षां अज्ञात बापांचींच मुलें जास्त असतील, तर आई व मूल यांचा संबंध सर्वत्रच ज्ञात होत असल्यामुळें अशा लोकांत नातें बापाकडून न गणतां आईकडून गणण्याचीच चाल जास्त उत्पन्न होईल. म्हणून ज्या थोड्या उदाहरणांत बाप कोण हें उघड उघड समजत असेल अशा ठिकाणीं देखील मुलें अमकी-अमकीचीं म्हणून समजूं लागतील व म्हणूं लागतील. आपल्यामध्यें आई व बाप दोन्ही बरोबर ठाऊक असतांहि अमुक अमक्याचा म्हणून सामान्यतः म्हणतात; म्हणून उलट पक्षीं रानटी लोकांत आई व बाप दोन्ही ठाऊक असतील तेथेंहि मुलगा अमकी अमकीचा म्हणून सामान्यतः म्हणत असतील.

ही चाल स्थापन होण्यास आणखी एक कारण होतें. रानटी लोकांत संमिश्र व्यवहाराला कांहीं वेळ टिकणाऱ्या संबंधांनीं सर्वत्र कमजास्तपणा येत असतो असें जरी आह्मी समजतों, तरी आपणास असेंहि आढळून येतें कीं, आंदमानीज व इतर अगदीं नीच जातींत हे संबंध मूल प्यावयाचें सुटलें म्हणजे तुटतातः याचा परिणाम असा होतो कीं, त्यानंतर मुलाचा बापाशीं सह-

वास बंद होतो, आणि आईशीं तेवढाच चालू राहतो. म्हणून जेथें बाप माहीत असेल त्या ठिकाणीं देखील मूल असकीअमकीचें हीच कल्पना इतरांच्या मनांत सहज येत असते; आणि अशा रीतीनें, इतर कारणांवरून उत्पन्न झालेली रूढी दृढ होते.

अशा रीतीनें अशी रूढी एकदां पडून बायकांडून वंशगणनाची चाल उत्पन्न झाली, म्हणजे पुढें इतर टोळ्यांतील बाह्यविवाहपद्धतीबद्दल जेव्हां टोळींतीलच बाह्यविवाहपद्धति स्थापन होते, तेव्हां ती जास्तच दृढ होते. बायको बाहेरच्या टोळींतूनच आणिली पाहिजे ह्या कायद्यास ती बाहेरच्या कुळांतली पाहिजे अशा कायद्याचें स्वरूप सहज येणार आहे. कारण आईकडून वंशगणन करूं लागले म्हणजे म्याकलेनन साहेब म्हणतो त्याप्रमाणें टोळींतील बाहेरच्या बायकांच्या मुली बाह्यविवाहरूढीप्रमाणें विवाहास योग्य ठरतील; आणि म्हणून जेथें बाहेरच्या बायका मिळून कायदा पाळणें शक्य नसेल, तेथें अशा रीतीनें तो पाळणें शक्य असल्यामुळें ह्या रूढीचें दृढीकरण होईल. ह्याचा परिणाम असा होईल कीं, स्त्रियांकडून नातें गणण्याची चाल कायम होईल, आणि एकच आडनांवाच्या, किंवा एकाच कुळांतल्या स्त्रीपुरुषांचीं लग्नें होऊं नयेत अशी मनाई उत्पन्न होईल.

सर जॉन लबक आणि मि. म्याकलेनन ह्यांनीं गोळा केलेल्या उदाहरणांवरून असें दिसतें कीं, पूर्व व पश्चिम आफ्रिका, सर्केशिया, हिंदुस्थान, तार्तरी, चीन, आस्ट्रेलिया, आणि उत्तर व दक्षिण आफ्रिका, ह्या सर्व ठिकाणीं ही चाल आढळून येते. तिची वरच्यासारखीच

उपपत्ति करण्यास आणखीहि कांहीं कारणें आहेत. एक हें कीं, तशी उपपत्ति केल्यास प्रारंभीं बापाचें नातें मुळींच लक्षांत घेत नसत अशी विलक्षण कल्पना करावयास नको. दुसरें हें कीं, अशा रीतीनें असंबद्धतेचा आरोप टळतो. हल्लीं जेथें स्त्रियांकडून नातें गणण्याची चाल आहे, तेथें बाप कोण हें जरी लक्षांत घेत नाहींत, तरी बहुशः ठाऊक असतें; कारण बाप कोण हें उघड कळावें इतके टिकाऊ स्त्रीपुरुषसंबंध अगदीं नीच जातींत देखील असतात इतकेंच नाहीं, तर आमच्यांत बायकाकडून नातें धरतात असें जे हे लोक विधान करितात, त्यावरूनच पुरुषांकडूनचें नातें त्यांच्या लक्षांत असतें ही गोष्ट गर्भित होते: फार कशाला? ह्या लोकांच्या अगदीं क्षुद्र जातींत देखील आईप्रमाणें बापाला देखील शब्द नेहमीं असत नाहीं काय? आणि तिसरें कारण असें कीं, ज्या कुळांस आपसांत विवाह करण्याचा प्रतिबंध असतो त्यांचीं जीं लांडगा, आस्वल, गरूड, इत्यादि आडनांवें असतात तीं पुरुषांचीं असतात; आणि त्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, तीं कुळें तसल्या नांवाच्या प्रसिद्ध पुरुषांपासून प्रथम उत्पन्न झालीं; आणि ही गोष्ट स्त्रियांकडून नातें गणीत असतांहि त्यांनीं अभिमानपूर्वक ध्यानांत ठेविली.

२३. स्त्रीपुरुषांच्या अनियंत्रित संबंधाचे वंशगणनावर काय परिणाम होतात ह्याचा एथवर विचार केला, व त्यामध्यें जरासें विषयान्तर करावें लागलें. तेव्हां आतां तो विचार सोडून देऊन समाज व त्यांतील व्यक्ती यांजवर त्याचे परिणाम काय होतात तें पाहूं.

संमिश्रव्यवहार जितका ज्यास्त असेल त्या प्रमाणानें नातीं थोडीं व दुर्बल असतात. अशा ठिकाणीं प्रत्येक बाईच्या निरनिराळ्या मुलांचे बाप माहीत नसतात इतकेंच नाहीं, तर त्या मुलांचाहि परस्परसंबंध कमी असतो. तीं केवळ सावत्र भाऊ व सावत्र बहिणी म्हणूनच संबद्ध असतात. ह्यामुळें कुटुंबबंधनें दुर्बल असतात इतकेंच नाहीं तर तीं फारशीं दूर पसरूं शकत नाहींत; आणि ह्यावरून त्या समाजांतील घटकांमध्यें निकटपणा कमी असतो असें व्यक्त होतें. त्यांच्या जरी हिताहिताच्या कांहीं गोष्टी सर्वसामान्य असतात, आणि आपलें सर्वांचें कांहीं सामान्य नातें आहे अशी जरी कांहीं अर्धवट कल्पना त्यांस असते, तरी ज्यांचा नात्याचा स्पष्ट संबंध आहे अशा समूहांमध्यें सामान्य हिताहितावरून जें सामर्थ्यतत्त्व उत्पन्न व्हावयाचें त्याची ह्याठिकाणीं वाण असते. त्याप्रमाणेंच श्रेष्ठ कनिष्ठ हा संबंध स्थापन होण्यासहि अशा ठिकाणीं अडथळा उत्पन्न होतो. अमक्यापासून अमका उत्पन्न झाला असें निश्चयानें माहीत नसलें, म्हणजे प्रबलाच्या तत्कालीन श्रेष्ठत्वापेक्षां उच्चतर श्रेष्ठत्व उत्पन्न होण्याचा संभव नसतो; म्हणजे, अशा ठिकाणीं कायमचा राजकीय अधिकार उत्पन्न होऊं शकत नाहीं. ह्याच कारणामुळें अशा ठिकाणीं पितृपूजेची आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या धार्मिक बंधनांची वाढ खुंटून जाते. एवंच अनियमित स्त्रीपुरुषसंबंधांमुळें समाजसंरक्षण व समाजोत्क्रमण ह्यांस अनेक तऱ्हांनीं विघ्न येतें.

आतां असले संबंध संततीच्या कल्याणास प्रतिकूल

असतात हें तर सांगण्याचें कारणच नाहीं. जेथें बापाचें नातें ओळखिलें जात नाहीं, तेथें मुलांस बहुतेक सर्वांशीं आईवर अवलंबून रहावें लागत असतें. रानटी लोकांचे थंडी, वारा, अन्नपाणी, इत्यादि पुष्कळ गोष्टींच्या संबंधानें वारंवार फार हाल होत असल्यामुळें त्यांच्यामध्यें शिशुसंगोपन हें नेहमींच जोखमाचें काम असतें; म्हणून ज्याठिकाणीं त्या कामीं आईस बापाची मदत नसेल, त्या ठिकाणीं तें ज्यास्तच कठीण होत असलें पाहिजे. आण्डामानीज लोकांच्या लग्नासारख्या अल्पकालिक लग्नाच्या संततीचीहि स्थिति अल्पतर प्रमाणानें अशीच असली पाहिजे; कारण त्या लोकांत अशी चाल आहे कीं, मूल अंगावरचें सुटलें म्हणजे आईबापें पृथक् होतात. म्हणून त्यांच्यामध्यें पुष्कळ वेळां असें होत असलें पाहिजे कीं आईला एकटीलाच मुलाचें योग्य संरक्षण व पोषण करतां न आल्यामुळें मूल गतप्राण झालें पाहिजे. आतां अशा ठिकाणीं पुरुषबायका एकमेकांस मदत करीत असतात हें खरें आहे. उदाहरणार्थ, आण्डामानीज लोकांच्या बायका एकमेकींस मुलें पाजण्याच्या कामीं मदत करितात; आणि अन्न व दुसऱ्या चिजा बहुधा पुरुष पुरवितात; अशा रीतीनें कांहीं अंशीं प्रत्येक मूल सगळ्या टोळीचेंच मूल बनतें. पण टोळीच्या ह्या अनियमित संगोपनाला बापाच्या संगोपनाची तोड कधीं येणार नाहीं. लोकसंख्या कायम राखण्याच्या कामीं हे अनियमित स्त्रीपुरुषसंबंध किती कुचकामाचे असतात ह्याबद्दल प्रत्यक्ष पुरावा सांपडतो. कारण फ्रान्सिस डे नांवाचा नुक्ताच (पंचवीस--तीस वर्षांपूर्वीं)

तिकडे जाऊन आलेला माणूस असें म्हणतो कीं, आण्डामानीज लोकांची संख्या कमी होत आहे. तीन मुलें जीस आहेत अशी एकच स्त्री त्याच्या तेथें दृष्टीस पडली. यूरोपियन लोकांच्या वसाहतीनजीक राहणाऱ्या लोकांत एका वर्षांत मृत्युसंख्या ३८ होती, आणि जननसंख्या काय ती १४ होती.

आतां संततीवरून नजर काढून संतत्युत्पादकांकडे लाविली तर असें स्पष्ट दिसतें कीं, त्यांसहि टिकाऊ विवाहसंबंधाचा अभाव बराच घातक होतो. जातिसंरक्षण जें अशा टोळींत कमजास्त होत असतें, तें बायकांवर फाजील ओझें पडून होत असतें; आणि पुरुषांस जरी स्त्रियांसारखी प्रत्यक्ष घस सोसावी लागत नाहीं, तरी अप्रत्यक्ष सोसावी लागते. प्रौढ वय निघून गेलें म्हणजे लवकरच त्यांची शक्ति क्षीण व्हावयास लागून, त्यावेळीं कुटुम्बसाहाय्य मिळून जें दुःखांत सुख व्हावयाचें, तें त्यांस होत नाहीं. उदाहरणार्थ, आण्डामानीज लोकांबद्दल डेसाहेब असें म्हणतो कीं त्यांच्यांतील थोडेच लोक चाळीस वर्षांवर जगतात; आणि त्यांस अनेक रोग जडलेले असतात. दुसरें एक नुकसान त्यांस सोसावें लागतें तें हें कीं, कुटुंबजीवित वृद्धिगत झाल्यानें जीं उच्चतर सुखें उत्पन्न व्हावयाचीं तीं त्यांस मिळत नाहींत.

एवंच स्त्रीपुरुषांचे अनियमित संबंध समाज, तरुण, आणि प्रौढ, यासर्वांसच प्रतिकूल असतात. पूर्वीं आपल्या ही गोष्ट नजरेस आलीच आहे कीं, मूळमाणसाचे शरीरविषयक, मनोवृत्तिविषयक, आणि बुद्धिविषयक जे विशेष असतात, ते समाजोत्क्रमणास सर्व तऱ्हांनीं फारच विघ्न क-

रीत असतात; आणि ह्या ठिकाणीं आपल्या असें नजरेस येतें कीं, कायमचे विवाहांस अनुकूल अशा मनोविकारांचा जो अभाव त्यांजमध्ये असतो तो आणखी विघ्न करीत असतो.

२४ पण ह्या अत्यन्त नीच स्थितीपासून उच्चतर स्थिति उत्पन्न होण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. स्त्रीपुरुषव्यवहारासंबंधानें अनियमितपणानें वागणारे लोकसमूह दोन तऱ्हांनीं उत्क्रान्त होऊन ज्यास्त नियमित व्यवहाराचे भक्त बनत जातात.

सर्वत्र सुरू असलेल्या संमिश्रव्यवहाराबरोबर कांहीं वेळ टिकणारे असें जर स्त्रीपुरुष संबंध चालू असतील, आणि इतर मुलांपेक्षां जर ह्या मुलांना वाढण्याचा व सशक्त होण्याचा संभव जास्त असेल, तर असल्या संबंधापासून होणाऱ्या व्यक्तीची संख्या वाढून प्रबलहि झाली पाहिजे, आणि असल्या व्यक्तींच्या ठिकाणीं इतर संबंधांपेक्षां असले संबंध करण्याची प्रवृत्ति वंशपरंपरेनें ज्यास्त येण्याचा संभव असल्यामुळें पिढ्यानुपिढ्या कांहीं कुळांमध्यें असलेच संबंध जास्त होऊं लागतील. हे संबंध ज्या ठिकाणीं जाति कायम ठेवण्यास अनुकूल असतील, त्या ठिकाणीं "उत्तमांचा टिकाव" हें तत्त्व त्यांच्याच स्थापनेला अनुकूल होईल. "ज्या ठिकाणीं जाति कायम ठेवण्यास अनुकूल असतील" असे जें एथें आह्मीं म्हटलें आहे तें मुद्दामच म्हटलें आहे; कारण जेथें प्रदेश अगदीं निर्जन असेल तेथें असले संबंध कदाचित् अनुकूल असणार नाहींत. पुष्कळ मुलांच्या संगोपनाला अनुकूल असे जे स्त्रीपुरुषसंबंध त्यांचा अशा ठिकाणीं काहींच फायदा व्हावयाचा नाहीं; कारण तेथें उत्पन्न होणारें अन्न सर्वांस पुरणार नाहीं. तद्व-

तच अत्यन्त कडक हवेंत विशेष काळजीपूर्वक शिशुसंबर्धन केल्यास त्यापासून कांहीं फायदा होणार नाहीं; कारण ज्या ठिकाणीं प्रौढवयामध्यें फार हाल सोसावयास लागत असतील, त्या ठिकाणीं ते सोसण्यास असमर्थ अशा मुलांचें संगोपन करण्यापासून समाजसंरक्षणास मदत होणार नाहीं; उलट त्यांच्या वर्धनांत अन्न व श्रम फुकट खर्च होऊन समाजाचें नुकसानच होईल. आईला जितकी काळजी घेतां येईल त्याहून ज्यास्त काळजीशिवाय मूल तगाव धरण्यास समर्थ आहे ह्यावरूनच पुढें प्रौढवयांत तें टिकाव धरूं शकेल, असें कांहीं प्रकारच्या परिस्थितींत सिद्ध होईल. पण अशीं हीं अत्यान्तिक उदाहरणें एकीकडे ठेविल्यास इतरत्र स्त्रीपुरुषांच्या टिकाऊ संबंधांचे मुलांवर जे हितकर परिणाम होतात, त्यांवरून तेच संबंध उक्त समाजामध्यें स्थापन होण्याचा कल उत्पन्न होईल.

निरनिराळ्या समाजांमध्यें जीवनार्थ जो कलह चाललेला असतो, त्याचाहि कल ह्याच गोष्टीकडे असतो. वर सांगितलेली अट ध्यानांत धरतां, ज्या ज्या गोष्टींमुळें संख्या किंवा उत्साह ह्यासंबंधानें एकाद्या टोळीचें सामर्थ्य ज्यास्त होईल, त्या त्या योगें तीस लढाईत सरशी प्राप्त होण्याचा संभव प्राप्त होईल; म्हणून, बाकीच्या गोष्टी सारख्याच असल्यास, ज्या समाजांत स्त्रीपुरुषसंबंध कमींत कमी अनियमित असतील, तो समाज बहुतकरून विजयी होईल. “ बाकीच्या गोष्टी सारख्या असल्यास ” असें आह्मी यासाठीं म्हणतों कीं, त्यांचाहि जयापजयाशीं संबंध असतोच. लढाईत जो जय मि-

ळतो तो केवळ संख्येवरून किंवा बळावरूनच मिळत नाहीं. तर धैर्य, सोसकपणा, चपळाई, त्वरा, शस्त्रांचा उपयोग करण्यांत चतुराई, इत्यादिकांचा उपयोग त्या ठिकाणीं होत असतो. एकादी टोळी एरवीं जरी कमी प्रतीची असली, तरी शत्रूचा झटकन् माग लावण्याच्या कामीं तिच्यांतील लोक हुशार असल्यास, किंवा दबा धरण्याच्या कामीं हुशार असल्यास, ती टोळी विजयी होईल. शिवाय, शेजारीं शेजारीं असणाऱ्या कित्येक टोळ्यांमध्यें स्त्रीपुरुषव्यवहाराच्या संमिश्रतेमध्यें फारसे फरक नसतील तर त्यांच्यामधील कलहांवरून त्याचा व्यवहारांत सुधारणा होण्याचा संभव उत्पन्न होणार नाहीं. अशा ठिकाणीं कधीं कधींच त्यांत सुधारणा होईल व ती फार हळूहळूहि होईल. तद्वतच अनियमित स्त्रीपुरुषसंबंधांपासून उत्पन्न झालेल्या संततीवर नियमित संबंधांपासून उत्पन्न झालेल्या संततीला जें वर्चस्व प्राप्त होत असतें, तें कांहीं ठिकाणीं पहिल्या प्रकारच्या संततील, अन्नाचें वैपुल्य आणि हवेचें अनुकूल्य असल्यास त्याच्या योगानें कमी होत असतें आणि ह्यामुळें ताहिती बेटामध्यें स्त्रीपुरुषव्यवहारासंबंधानें फार अनियमितपणा असूनहि तेथें लोकसंख्या फार असे, व सामाजिक प्रगतिहि बरीच झालेली होती, कारण तेथें उदरनिर्वाह सहज होत असून शिशुसंवर्धनहि सोपें पडत असे.

तथापि, सामान्य परिस्थितींत जास्तसंख्याक व जास्त बलवान् अशी संतती जास्त नियमित स्त्रीपुरुषसंबंधांनींच वर्धन करतां येण्याचा संभव असल्यामुळें, एकंदरींत संमिश्रव्यवहार ज्यांच्यांत कमी आहे अशा समाजांपुढें,

ज्यांच्यांत तो जास्त आहे असे समाज नष्टच होत गेले असले पाहिजेत.

२५. ह्या सर्व गोष्टींचा विचार उत्क्रान्तिदृष्टचा करतां आपल्या नजरेस असें येतें कीं, प्रारंभीं कौटुंबिक संबंध राजकीय संबंधांहून फारसे वृद्धिंगत झालेले नसतातः म्हणजे, असंबद्धता आणि अनिश्चितता हीं दोन्हीं ठिकाणीं दिसत असतात.

ह्या मूळ स्थितीपासून कौटुंबिक उत्क्रमण अनेक दिशांनीं होत जाऊन सुसंबद्धता व निश्चितता हीं वाढत जातात. कांहीं ठिकाणीं एक बायको व अनेक पुरुष ह्यांमध्यें कमजास्त काळ टिकणारे संबंध बनूं लागतात; पण सामान्यतः असले संबंध एक पुरुष व अनेक स्त्रिया यांच्यामध्येंच उत्पन्न होत असतात. अशा प्रकारचे संबंध कधीं कधीं एकाच टोळींत आढळून येतात, आणि कधीं कधीं भिन्न भिन्न टोळ्यांत आढळून येतात; आणि त्याबरोबरच एकेक स्त्री व एकेक पुरुष यांचेहि संबंध आढळून येत असतात. उपलब्ध पुराव्यावरून असें व्यक्त होतें कीं, हे सर्व विवाहप्रकार संमिश्रव्यवहारास प्रतिबंध करीत असून, ते सर्व लवकरच सुरू होत असतात.

अशा रीतीनें सुरू झालेले जे निरनिराळे कुटुंबप्रकार त्यांचा विचार आतां कर्तव्य आहे. म्हणून त्यांचें आपण वर सांगितलेल्या क्रमानेंच विवेचन करूं.

---

# प्रकरण सहावें

## अनेकपति-विवाहपद्धति



२६. संमिश्र स्त्रीपुरुषव्यवहारास, अनिश्चित अनेकपत्नीविवाहपद्धतीशीं संयुक्त अशी अनेकपतिविवाहपद्धति, असें म्हणता येईल; आणि प्रगतीचा एक मार्ग म्हटला म्हणजे ही अनिश्चितता कमी होत जाणें हा होय.

फ्यूजियन लोकांबद्दल आडमिरल फिट्झ्रॉय असें म्हणतो:—" त्यांच्यांतील कांहीं लोक संमिश्ररीत्या रहात असत असें मानण्यास आह्मास कांहीं कारण दिसत होतें—म्हणजे, त्यांच्यांत थोड्याशा बायका पुष्कळ पुरुषांसमवेत रहात असत. " ह्या स्थितीस कांहींसा मर्यादित संमिश्रव्यवहार असें म्हणतां येईल. पण या संशययुक्त विधानावर फारसा भरंवसा न ठेवतां स्पष्ट अनेकपतित्व व स्पष्ट अनेकपत्नीत्व दाखविणाऱ्या विधानांकडे आपण आतां लक्ष देऊं. उदाहरणार्थ, टोडा लोकांबद्दल शार्ट आपणास असें सांगतो कीं, त्यांच्यांत जर चार पांच वधू असून पैकीं एकाचें लग्नाचें वय होऊन लग्न झालें असलें तर, त्याची बायको इतर भावांस आपले नवरे म्हणून म्हणते, आणि ते जसे वयांत येत जातील तशी ती त्यांच्याशीं जाऊं लागते. बरें, त्या स्त्रीच्या जर धाकट्या बहिणी असतील, तर त्याहि वयांत येतील तशा तिच्या नवऱ्याच्या किंवा नवऱ्यांच्या बायका होतात.

अशा रीतीनें अनेक बंधूंच्या कुटुंबांत कधीं एक बायको असते व कधीं अनेक बायका असतात; पण एक असो वा अनेक असोत, त्या सर्व एकाच आड्याखालीं राहून सर्व बंधूंशीं संमिश्रव्यवहार करितात. नायर लोकांत सरासरी असल्याच प्रकारची व्यवस्था आहे; मात्र त्यांच्यांत नवरे परस्पर बंधू नसतात. कित्येक पुराव्यांवरून म्याक्लेनन साहेब असा सिद्धान्त काढितो कीं, त्यांच्यांत एका स्त्रीला दोन किंवा चार किंवा अधिक नवरे असण्याची चाल असून ते तिच्याशीं कांहीं नियमानुरूप व्यवहार करीत असतात. ह्यामिल्टन असें सांगतो कीं, नायर स्त्रीस बारांहून जास्त नवरे करतां येत नसत, आणि ते कांहीं विशिष्ट पदवीचे व जातीचे करावे लागत असत. उलट पक्षीं बुचानन असें सांगतो कीं, त्यांच्यांत लग्नानंतर स्त्रियांस पाहिजे तितक्या पुरुषांशीं व्यवहार करतां येतो; मात्र ते कांहीं विशिष्ट वंशांतले किंवा ज्ञातीचे असले पाहिजेत. शिवाय हामिल्टन असें सांगतो कीं, नायर जातीचा पुरुष अनेक नवरेसमूहांतील एकेक असूं शकतो.

एवंच या ठिकाणीं कांहींसें निश्चित असें अनेकपतित्व व अनेकपत्नीत्व एके ठिकाणीं दिसून येतें. आणि अर्धवट सुधारलेले जे ताहितीयन लोक त्यांच्यामध्येंहि अशाच सारखा एक स्त्रीपुरुषसंबंध असे. त्यांच्यांत नवऱ्यापेक्षां बायकोचा दर्जा जर कोणत्याहि प्रकारें वरचढ असेल तर तिला वाटेल तितके दुसरे नवरे घेण्याची परवानगी असे, तथापि नांवाची ती पहिल्या नवऱ्याची बायको असे.

असो, आतां हे दोन्ही प्रकार ज्यांच्यामध्यें संयुक्त दिसतात अशा कुटुंबांवरून ( त्यांस कुटुंबें म्हणावें किंवा नाहीं याबद्दल शंकाच वाटते ) नजर काढून शुद्ध अनेकपतित्वाखालींच मोडणाऱ्या निरनिराळ्या कुटुंबप्रकारांचा विचार करूं. त्यांपैकीं एका प्रकारामध्यें नवरे परस्परसंबद्ध नसतात; दुसऱ्यामध्यें ते संबद्ध असून बहुधा भाऊ भाऊ असतात.

२७. ही गोष्ट आपल्या अगोदर नजरेस आलीच आहे कीं, ज्या टोळ्यांत अनेकपत्नी कुटुंबें आहेत त्यांच्यांत अनेकपति-कुटुंबेंहि आढळून येतात; क्यारिब लोक, एस्किमो लोक, आणि वारा लोक. आणखी एक उदाहरण म्हटलें म्हणजे, आल्युशन बेटवाल्यांचें होय; हे लोक अनेकपत्नी असून त्यांच्यांत प्रत्येक बायकोस दोन नवरे करतां येतात. क्यानरी बेटांतील मूळचे लोक अनेकपतिपद्धतीचें अनुकरण करीत असत, पण ते अनेक पती बहुधा बंधू बंधू नसत. लान्सरोटा एथें जेव्हां स्पानिश लोक गेले, तेव्हां तेथें एक विचित्र चाल त्यांस दिसून आली. त्यांच्यांत एका स्त्रीस अनेक नवरे असत; त्यांच्यांत नवऱ्याचें नवरेपण एक चांद्रमास काय तें समजत असत. म्याकलेनन साहेब म्हणतो, कासिया लोक आणि सापारोजियामधील कोसाक लोक ह्यांच्यांतहि अशीच चाल होती.

ह्याच्याहून जास्त दर्जाची अनेकपतिपद्धति पुष्कळ लोकांत आढळते; कांहीं लोकांत ती व कमी दर्जाची अशा दोन्हीहि आढळतात, व कांहींत तीच आढळते. टेनेंट साहेब आपणास असें सांगतो कीं, सीलोनच्या अं-

तःप्रदेशांत अनेकपतिपद्धति सर्वत्र सुरू आहे, आणि विशेषतः श्रीमान् वर्गामध्यें आहे; त्यांच्यांत एकेका स्त्रीस तीन किंवा चार नवरे असतात, आणि कधीं सातसातहि असतात. सामान्यतः हे अनेक नवरे एकाच कुटुंबांतील पुरुष असतात, आणि बहुशः बंधू बंधूच असतात. अशा प्रकारची विवाहपद्धति अमेरिकेंत आव्हारो लोक व मापुरी लोक, आणि एशिया खंडांत काश्मीर, किनावेर, किस्तावेर, व सिरमोर या लोकांत आढळते असें म्याकलेनन म्हणतो. फार प्राचीन काळीं ती आणखी बऱ्याच ठिकाणीं अस्तित्वांत असे, पण हल्लीं नाहीं. अरबस्थानांत पूर्वीं एका बायकोस पुष्कळ नवरे असत असें स्ट्राबो म्हणतो, आपल्यांत पांच पांडवांची द्रौपदी प्रसिद्धच आहे, आणि प्राचीन काळीं ब्रिटनमध्यें ही पद्धति असे असें सीझर म्हणतो.

२८. आतां कौटुंबिक संबंधांचा हा जो प्रकार त्याची उत्पत्ति व वृद्धि यांबद्दल आपणास काय म्हणतां येईल त्याचा विचार करूं.

पूर्वींच आम्हीं म्हटल्याप्रमाणें, मुलींस ठार मारण्याची चाल व त्यावरून उत्पन्न झालेली स्त्रियांची दुर्मीलता यावरून ही पद्धति उत्पन्न झाली असें म्हणण्यास आधार सांपडत नाहीं. स्त्रियांच्या दुर्मीलतेवरून त्यांचें अपहरण करण्याची जेथें रूढी उत्पन्न झाली आहे म्हणून म्हणतात, तेथें ती पद्धति आढळत नाहीं हें आपल्या नजरेस आलेंच आहे; मात्र अशा ठिकाणीं अनेकपत्नीपद्धति ज्यास्त रूढ दिसते. आपल्या नजरेस आणखी असेंहि आलेंच कीं, ह्या दोन पद्धति एकत्र आढळत असल्यामुळें प्रस्तुत प-

द्धति पुरुषांच्या वैपुल्यामुळें उत्पन्न झाली असेल असेंहि मानतां येत नाहीं. आतां टोडा लोकांबद्दल आपण असें वाचितों हें खरें आहे कीं, त्यांच्यांत बायका फार दुर्मीळ असल्यामुळें एका स्त्रीचे पुष्कळ नवरे असतात. पण ताहिती लोकांचें उदाहरण याच्या विरुद्ध आहे. कारण त्यांच्यांत बायकांचें दौर्मिल्य होतें असें मानण्यास जागा नसूनहि, अनेकपत्नीपद्धति व इतर स्त्रीपुरुषसंबंध यांखेरीज अनेकपतिपद्धतिहि अमलांत असे, भाऊ भाऊ व कुटुंबांतील इतर पुरुष कधीं कधीं बायकांची अदलाबदली करीत असत, आणि प्रत्येकाची बायको ही त्याच्या मित्राचीहि बायको म्हणून समजली जात असे.

बरें, ही पद्धति गरीबीमुळें उत्पन्न झाली असेल असेंहि म्हणतां येत नाहीं; तथापि ती एकदां अन्य कारणावरून सुरू झाल्यास गरिबीमुळें कदाचित् चालू राहील किंवा पसरूंहि शकेल. द्रव्यविषयक स्थिति बरी असलेल्याहि कांहीं समाजांत ती सामान्य आहे; आणि कांहीं ठिकाणीं जरी ती गरीब लोकांतच दिसते, तरी इतरत्र श्रीमंतांतच दिसते. सीलोनमध्यें ही पद्धति मुख्यत्वेंकरून श्रीमंत लोकांत आढळते असें टेनेंटसाहेब सांगतो हें वर सांगितलेंच आहे; आणि ज्या अर्थीं गरीबांमध्यें प्रत्येकाची निदान एकेक तरी बायको असते, त्या अर्थीं असें व्यक्त होतें कीं, तेथें ह्या पद्धतीचें कारण स्त्रियांची दुर्मीलता हेंहि नाहीं, आणि एकेक स्त्री बाळगण्याचा सामर्थ्याभाव हेंहि नाहीं.

सारांश, आधींच आपण केलेल्या अनुमानांस अनुसरून असेंच मानिलें पाहिजे कीं, मूळच्या अनियंत्रित स्थितीपासून जे अनेक विवाहसंबंधप्रकार उत्पन्न झाले, त्यां-

तील अनेकपतिविवाहसंबंध हा एक होय; आणि इतर प्रचारांस अनुकूल परिस्थिति न मिळाल्यामुळें, जेथें जेथें त्यांच्यापुढें ह्याचें निर्दलन झालेलें नाहीं, तेथें तेथें तो कायम राहिलेला आहे.

२९. अनेकपतिपद्धतीच्या ज्या प्रकारामध्यें एका स्त्रीचे परस्परांशीं असंबद्ध असे कित्येक नवरे असून त्या प्रत्येक नवऱ्यास कित्येक परस्परासंबद्ध बायका असतात अशा ह्या सरासरी संमिश्रव्यवहारसदृश प्रकारापासून निघून, ज्या प्रकारामध्यें ह्या असंबद्ध नवऱ्यांना एकच बायको असते त्या प्रकाराकडे, आणि तेथून निघून ज्या प्रकारामध्यें नवरे परस्परसंबद्ध असतात त्या प्रकाराकडे, आणि शेवटीं ज्या प्रकारांत नवरे भाऊभाऊच असतात त्याकडे, जेव्हां आपण वळतों, तेव्हां कुटुम्बरचनेंत सुधारणा कशी होत जाते, हेंच आपण क्रमाक्रमानें पाहिल्यासारखें होतें. ह्या निरनिराळ्या पद्धतींचे परिणाम काय होतात ह्याचें म्याकलेननें जें निदर्शन केलें आहे, त्याला अगोदरच उल्लेख आलेला आहे.

नायरलोकांप्रमाणें ज्यांच्यांत प्रत्येक स्त्रीला कित्येक असंबद्ध नवरे असून प्रत्येक नवऱ्याला कित्येक असंबद्ध बायका असतात, त्या ठिकाणीं विशिष्ट मुलाचा बाप कोण हेंच समजत नाहीं असें नाहीं, तर प्रत्येकाचीं मुलें कित्येक निरनिराळ्या कुटुम्बांत असूं शकतात. अशा ठिकाणीं ज्ञात नातें स्त्रीच्या द्वाराच असून शिवाय असें असतें कीं, प्रत्येक माणसाचें कौटुंबिक प्रेम विशिष्ट मुलांचेच ठिकाणीं बद्ध न राहतां पुष्कळ ठिकाणीं प्रस्तृत झाल्यामुळें प्रसरणानें अगदीं पातळ होतें. आणि अशा रीतीनें

मातृप्रेम तेवढेंच एकीकृत होत असल्यामुळें आणि पितृप्रेम प्रस्तुत होत असल्यामुळें, कौटुंबिक बंधनें संमिश्रव्यवहारांतल्यापेक्षां फारशीं दृढतर असत नाहींत. आईखेरीज एकाद्याची ज्ञात नातेवाईक म्हटलीं म्हणजे त्याचे सावत्रभाऊ, सावत्रबहिणी, व त्या बहिणींचीं मुलें, एवढींच असतात.

ज्या ठिकाणीं परस्परांशीं असंबद्ध नवरे एकाच बायकोला बद्ध असतात, आणि म्हणून ज्या ठिकाणीं त्यांचीं मुलें अमक्याचीं अमकीं म्हणून जरी व्यक्तिशः सांगतां येत नाहीं, तरी तीं सगळीं मिळून एक कौटुंबिक समूह बनत असतो, व त्या ठिकाणीं पितृप्रेमाला कांहींशी जागा उत्पन्न होते. प्रत्येक नवऱ्याला त्या मुलांबद्दल कांहीं तरी कळकळ वाटत असते; कारण त्यांतील कांहीं त्याच्या पोटचीं असण्याचा संभव असतो; आणि कधीं कधीं सारखवटपणावरून आणि आईच्या माहितीवरून अमकीं अमक्याचीं म्हणून म्हणतहि असतात. ह्या ठिकाणीं खात्रीनें ज्ञात अशीं नातीं जरी पूर्वीच्या उदाहरणांतल्या सारखींच बायकांकडून तेवढींच असतात, तरी कौटुंबिक समूह स्थापन होण्याच्या कामीं कांहीं प्रगति झालेली दृष्टीस पडते.

आणि जेथें नवरे हे बंधूबंधू असतात, तेथें मुलांचा मातृवंश आणि पितृवंश हे दोन्ही ज्ञात असतात. कुटुंबांतील प्रत्येक मूल आपलें स्वताचें नसलें, तरी तें आपला पुतण्या किंवा पुतणी आहे हें प्रत्येक भावास माहीत असतें. दोन्ही बाजूंची वंशावळी अशा रीतीनें नक्की होणें ह्या गोष्टीचा कुटुंबबंधन दृढ होण्याच्या कामीं अर्थात् अनुकूल परिणाम होत असतो. प्रत्येक कुटुम्बसमूहा-

मधील निकटच्या आप्तपणाखेरीज पुढच्या पुढच्या पिढ्यांतून निरनिराळ्या समूहांत दूरदूरचीं नातीं उत्पन्न होतात, आणि तीं केवळ स्त्रियांच्या बाजूनेंच नसून पुरुषांच्या बाजूनेंहि असतात. आणि आप्तपणाच्या ज्या ह्या शाखा वाढत जातात त्यांनीं समाजास बळकटी येते.

एवंच संमिश्रव्यवहारापासून अनेकपतिव्यवहाराकडे जाणें म्हणजे जसें ज्यास्त संबद्ध व निश्चित अशा कौटुंबिक संबंधाकडे जाणें होय, त्याप्रमाणेंच त्या व्यवहाराच्या प्रकारांपासून उच्चतर प्रकारांकडे जाणें म्हणजे त्याच्याहूनहि ज्यास्त संबद्ध व निश्चित अशा कौटुंबिक संबंधांकडे जाणें होय.

३०. सामाजिक संरक्षण, संततिवर्धन, आणि प्रौढांचीं जीवितें, ह्यांच्यावर ह्या विवाहपद्धतीचे काय परिणाम होतात तें आतां पाहूं. कांहीं लोक स्वतः मिळविलेल्या विश्वसनीय माहितीवरून असें सांगतात कीं, कांहीं ठिकाणीं ह्या पद्धतीपासून फायदा होतो. ह्यासंबंधानें असें दिसतें कीं, ज्याप्रमाणें कांहीं ठिकाणें अशीं आहेत कीं तेथें हलक्या प्रतीचेच तेवढे प्राणी राहूं शकतात, त्याप्रमाणें कांहीं विशिष्ट भौतिकपरिस्थिति असलेल्या समाजांत कौटुंबिक जीविताचे कांहीं हलके प्रकार तेवढेच टिकाव धरूं शकतात, कारण तेच तेथें चालण्यासारखे असतात. " धिआवोड् आव्ह स्नो " ( हिमालय ) ह्या आपल्या ग्रंथांत तिबेटमधील अनेकपतिविवाहसरणी हिमालयांतील ओसाड प्रदेशास कितपत योग्य आहे या प्रश्नाचा विचार करीत असतां, विल्सन साहेब असें म्हणतो कीं, त्या ठिकाणीं अन्नाच्या पुरवठ्यापलीकडे

वाढण्याचा कल लोकवस्तींत दृग्गोचर होतो; आणि तेथील अनेकपतिविवाहपद्धति आणि साधु व साध्व्या बनण्याची रूढी ह्या गोष्टी ह्या कलास आवरण घालण्याच्या कामीं फारच उपयुक्त दिसतात. ही पद्धति त्यांनीं मुद्दाम सुरू केलेली नसून पूर्वींच्या रानटी स्थितींतील शिलक राहिलेली असावी; पण ती कशीहि उत्पन्न झालेली असली, तरी ह्या हिमस्थानाला ती अगदीं योग्य आहे ह्यांत बिलकूल संशय नाहीं. इतर देशाप्रमाणेंच जर तेथें लोकसंख्या वाढली असती, तर त्याचे परिणाम तिबेटन लोकांस किंवा त्यांच्या शेजाऱ्यांस बरेच जांचले असते. पण हल्लींच्या पद्धतीमुळें त्यांतील प्रत्येकापाशीं थोडीबहुत स्वताची किंवा भागीची जमीन व घरहि असून, त्यांमुळें त्यांचें संरक्षण व निर्वाह हीं होत असतात.

आतां संततीच्या कल्याणावर ह्या पद्धतीचे काय परिणाम होत असतील ह्याबद्दल विश्वसनीय पुरावा मिळत नाहीं. पण इतक्या निर्जन प्रदेशांत ही पद्धति प्रजावृद्धीस आळा घालून जर फायदेशीर म्हणून ठरते, तर त्याचा अर्थ असा होतो कीं, एकपतिविवाहपद्धतीपासून कुटुंबांतील मुलांस तेथें जितकें सुख झालें असतें, त्यापेक्षां ह्या पद्धतीपासून जास्त होतें. कारण त्या पद्धतीपेक्षां ह्या पद्धतीनें एकंदर मुलांची संख्या कमी उत्पन्न होत असल्यामुळें त्यांस अन्नवस्त्र जास्त बरें मिळून त्यांच्यांत मृत्युसंख्या कमी होत असेल, आणि त्यांची वाढ जास्त जोराची होत असेल. आतां अशा मुलांवर आईबापांचा मानसिक प्रभाव कितपत पडत असेल ह्यांचा विचार करतां असें दिसतें कीं, अमुक मुलाचा

अमुकच बाप हें बरोबर कळत नसल्यामुळें आणि अनेक बापचुलत्यांचे वर्तनांत विरोध उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळें, त्यापासून मुलांचें बरेंच नुकसान होत असेल.

आतां प्रौढांच्या जीवितांच्या संबंधानें पाहतां, त्यांच्यावर ह्या विवाहपद्धतीचा आपणास वाटतो तितका हानिकारक परिणाम होत नाहीं. उदाहरणार्थ, विल्सन साहेब असें म्हणतो कीं, रानटी स्थितींत कुटुंबांतील मुख्यास व्यापाराकरितां, सरकारी कामावर, किंवा लढाईनिमित्त, लांबलांब ठिकाणीं जाण्याचा प्रसंग वरचेवर येत असल्यामुळें, अनेकपतिविवाहपद्धतींत त्यास आपल्या इतक्याच काळजीचा माणूस घरीं ठेवून जातां येतें, ही कांहीं अंशीं फायद्याचीच गोष्ट आहे. टालबॉयव्हीलर असें म्हणतो कीं, ही पद्धति धनगरी जातींत प्रथम उत्पन्न झाली असावी, कारण त्या लोकांस कुटुंब मागें टाकून महिनेच्या महिने दूर जावें लागत असतें; त्यावेळीं बाकीचे भाऊ पाळीपाळीनें कुटुंबाची काळजी वहात असतात. विल्सनसाहेब म्हणतो कीं, असा फायदा ह्या पद्धतीपासून होत असतो खरा, कारण असली पत्नी एकाहि पतीशिवाय अगदीं एकटी राहिलेली माझ्या पाहण्यांत कधीं आली नाहीं. ह्यासंबंधानें टर्नरचें मत असें आहे म्हणून तो म्हणतो कीं, ह्या चालीमुळें त्या लोकांच्या चालीरीती बिघडलेल्या दिसत नाहींत. बायकोला ह्या चालीपासून पाहिजे तितकें स्वातंत्र्य मिळून, शिवाय ती घरची मालकीण व नवऱ्यांची सोबतीण बनत असते; तथापि कधीं कधीं पुष्कळ धनी व अधिक दगदग असाहि अशा स्त्रीला अनुभव येतो हें

विसरतां कामा नये. वारन हेस्टिंग्सच्या कारकीर्दींत जॉर्ज बोगलबरोबर तिबेटांत जें मिशन पाठविलें होतें, त्याच्या हकीकतींत आपण असें वाचितों कीं, व्यापारी जसे व्यापारांत एकत्र पैसे घालितात तसे हे लोक लग्नांत घालितात. बरें, ह्यामुळें त्या भागीदारांत वरचेवर मत्सर उत्पन्न होतो असेंहि नाहीं. त्यांना मत्सराचें वारें फारसें लागलेलें नसतें. अशा लग्नापासून झालेल्या संततीबद्दल कधीं कधीं तंटे उत्पन्न होतात हें खरें आहे; पण त्याचा निकाल मुलांच्या चेहऱ्यांची तुलना करून करितात, किंवा त्याच्या आईच्या सांगण्यावरून करितात.

२१. अगदीं मूळच्या समाजांत स्वतंत्ररीत्या उत्पन्न होणाऱ्या विवाहव्यवस्थांपैकीं अनेक पतिपद्धति ही एक आहे असें जर आपण मानितों, तर ती क्षीण कशी होत जाते ह्या गोष्टीचा विचार, म्याकलेननसाहेब ही पद्धति एका कालीं प्रत्येक समाजांत होती असें मानून जसा करितो, तशा दृष्टीनें करणार नाहीं.

आतां ही पद्धति क्षीण होण्याची तो जीं अनेक कारणें देतो त्यांपैकीं एक आपणांस कबूल करण्यास कांहींएक हरकत नाहीं. तो असें दाखवितो कीं, काण्डयन लोकांप्रमाणें कांहीं लोकांत सामान्यजन जरी अनेकपतिपद्धतीचें अनुकरण करीत असतात, तरी त्यांच्यांत नायकाची एकट्याचीच एक बायको असते. आणि होरेसडेलापेन्नाच्या वेळीं तिबेटांतहि असाच प्रकार दृष्टीस पडत असे. कारण तो म्हणतो कीं ही पद्धती सरदार व श्रीमान् लोकांत क्वचितच दृष्टीस पडते, कारण ते बहुधा एकेकच बायको करितात, आणि एकाहून अधिक क्वचि-

तच करितात. म्हणून, चालीरीती वरच्या वर्गांतून खालच्यांकडे जात असतात, ही गोष्ट ध्यानांत ठेवतां असें अनुमान निघतें कीं, जेथें परिस्थिति अनुकूल असेल तेथें ही पद्धति जाऊन तिच्या ऐवजीं एकपतिपद्धतिच उत्पन्न होण्याचा संभव विशेष आहे, पण श्रेष्ठ प्रकारांपुढें कनिष्ट प्रकार आपोआप क्षीण होत जातात हें वरच्या गोष्टीला एकटेंच कारण आहे असें न मानतां, म्याकलेनन साहेब असें म्हणतो कीं, श्रेष्ठ प्रकार हे कनिष्टांचें रूपान्तर होऊनहि उत्पन्न होत असतात. लाडाकमध्यें सर्वांत वडीलभावाचा त्यांच्या सामान्य पत्नीवर पहिला हक्क असतो, आणि त्याच्या मरणानंतर त्याची मालमत्ता, सत्ता, आणि स्त्री हीं त्याच्या धाकट्या भावाकडे जातात; ही अनेकपतिपद्धति नमुनेदार समजून तिजवरूनच हीब्रू लोकांमधील तद्विषयक चाल उत्पन्न झाली होती म्हणून तो समजतो. त्या चालीप्रमाणें त्या लोकांत वडील भाऊ मेला म्हणजे त्याची बायको स्वीकारणें धाकट्या भावास भागच पडत असे, आणि कांहीं लग्नविधि न करतांच ती त्याची बायको बनत असे. ह्यावरून तो असा तर्क काढितो कीं, त्या लोकांत एकपत्नी व अनेकपत्नी ह्या पद्धति सुरू होण्यापूर्वीं अनेकपतिपद्धति चालू होती.

पण मूळ लोकांच्या चालींवरून ह्या गोष्टीची दुसऱ्या एका तऱ्हेनें उपपत्ति करतां येत असून, तीच ज्यास्त स्वाभाविक दिसते. प्रारंभींच्या सामाजिक रूढींप्रमाणें बायका ह्या मालमत्ताच समजल्या जात असल्यामुळें, इतर मालमत्तेप्रमाणेंच त्याहि वंशपरंपरा संक्रान्त होत असतात. हैदा लोकांत मृताची पत्नी त्याच्या भावाच्या

अंतःपुरांत संक्रान्त करितात; झुलू लोकांत नवरा मेल्यावर त्याच्या बायकोस त्याच्या भावाच्या हवालीं करितात; डमारा लोकांत नाईक मरण पावला असतां त्याच्या बायकांस त्याच्या भावाकडे किंवा अगदीं जवळच्या नातलगाकडे पाठवितात; इत्यादि हकीकती वाचून आपणास असा संशय येतो कीं, भावाची बायको घेणें ह्या गोष्टीचा अनेकपतिपद्धतीशीं कांहींएक संबंध नाहीं. आणि कांगोमध्यें तीन भाऊ असून त्यांतला एक मेला म्हणजे बाकीचे दोघे त्याच्या रांडांची वांटणी करून घेतात, सामोआमध्यें मृतमाणसाचा भाऊ त्याच्या बायकोवर आपला हक्क आहे म्हणून समजत असे; व्हेरापाझमध्यें मृताचा भाऊ स्वताचें लग्न झालेलें असलें तरी त्याची बायको एकदम घेत असे, आणि त्यानें तीस न घेतल्यास दुसरा नातलग तिजवर हक्क सांगे, इत्यादि गोष्टी वाचून वरील संशय दृढ होतो. ह्या उदाहरणांवरून असें व्यक्त होतें कीं, ज्या ठिकाणीं बायका म्हणजे मोलाच्या समजल्या जाऊन बहुधा विकत घेतलेल्या असतात, त्या ठिकाणीं इतर मालमिळकतीप्रमाणें हीहि मिळकत वंशपरंपरेनेंच भावाकडे जाते. आणि ह्याबद्दल जर आणखी पुरावा पाहिजे असेल, तर तो ह्या गोष्टीवरून मिळतो कीं, कांहीं ठिकाणीं बापाच्या बायका देखील वंशपरंपरेनें मुलाकडे येतात. टामसन म्हणतो कीं, न्यूझीलंदर लोकांमध्यें मृत बापाच्या बायका मुलांकडे जात असत, आणि मृत भावाच्या बायका इतर भावांकडे जात असत. मिश्मी लोकांबद्दल रोलाट असें म्हणतो कीं, जेव्हां त्यांच्यांतील एकादा माणूस मरतो किंवा वृद्ध होतो

तेव्हां त्यांच्यांत असें करितात कीं, त्याच्या बायका त्याच्या मुलांत वांटून देतात, व त्या त्यांच्या बायका होतात. टार्किमाडा मेक्सिकोमध्यें असें कांहीं प्रांत आहेत म्हणून सांगतो कीं, मृतबापाच्या ज्या बायकांस मुलें झालेलीं नसतील, त्या त्याच्या मुलाकडे वंशपरंपरेनें येतात. बर्टन असें सांगतो कीं, एग्बा लोकांत मुलाची प्रत्यक्ष आई खेरीजकरून मृत बापाच्या बाकीच्या सर्व बायका त्याच्याकडे हक्कानें येतात. वास्मन असें सांगतो कीं, स्लेव्हकोस्ट येथें अशीच चाल आहे, आणि डेहामीमध्येंहि तशीच आहे.

म्हणून मृतभावाच्या विधवेशीं लग्न करण्याच्या चालीवरून, तत्पूर्वीं अनेकपतिपद्धति सुरू होती असें अनुमान काढतां येत नाहीं, आणि क्षीण होणाऱ्या ह्या पद्धतीपासून उच्चतर विवाहपद्धतींची सुरवात होते, हेंहि अनुमान आह्मास कबूल करतां येत नाहीं.

३२. अनेकपतिपद्धतीचे निरनिराळे प्रकार म्हणजे संमिश्रव्यवहार क्रमाक्रमानें ज्यास्त मर्यादित होऊन उत्पन्न झालेले कुटुंबसंबंधांचे नमुने होत, असें आपण समजत असल्यामुळें ह्यासंबंधानें आपण असें म्हटलें पाहिजे कीं, निरनिराळ्या समाजांमध्यें हे नमुने जे उत्क्रान्त झालेले, टिकाव धरून राहिलेले, किंवा नष्ट झालेले दिसतात, ते एकंदर परिस्थितीस अनुसरून तसे झालेले असतात. आतां कांहीं ठिकाणीं ह्या पद्धतीच्या उच्चतर प्रकारांनीं नीचतर प्रकारांस हुसकून लाविलेलें जें दिसत नाहीं ह्याचें कारण बहुधा हें असावें कीं, उच्चतर प्रकारांचे फायदे लक्षांत यावे इतकी त्यांची परस्परांशीं स्पर्धा झालेली

नसते. अनेकपत्नीपद्धति व एकपत्नीपद्धति ह्यांच्याशीं टक्कर खेळतांना, वर सांगितलेल्या कारणांवरून, कांहीं ठिकाणीं, अनेकपतिपद्धतीस अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली असेल. कारण, त्या ठिकाणीं अनेकपत्नीपद्धतीच्या व एकपत्नीपद्धतीच्या कुटुंबांतील पुष्कळ मुलांना पोटभर अन्न मिळालें नसेल.

उलट पक्षीं, ज्या कारणांमुळें कांहीं ठिकाणीं अनेकपतिपद्धतीचे उच्चतर प्रकार नीचतरांना हांकून लावण्यास समर्थ झाले, त्याच करणांनीं इतर ठिकाणीं ती पद्धति अगदीं नष्ट होण्याचा योग आला असेल. बऱ्याच प्रदेशांवर अन्नाचा पुरवठा अगदीं बेताचा असल्यामुळें, ज्या ठिकाणीं लोकसंख्या वाढणें गैरफायद्याचें झालें असेल तीं ठिकाणें वजा करतां, इतरत्र अनेकपतिपद्धतियुक्त समाजांत हल्ला व स्वसंरक्षण याकरितां लोकसंख्या कमी उत्पन्न झाल्यामुळें, ज्या समाजांत ती संख्या वाढण्यास ज्यास्त अनुकूल कुटुंबव्यवस्था असतील त्या समाजांपुढें ते सहजच हार गेले असतील. अनेकपतिपद्धति पूर्वीं सामान्य असून हल्लीं ती कमी झाली आहे याचें बहुधा हेंच मुख्य कारण असावें. इतर गोष्टी समान असतां, हा नीचतर कुटुंबनमुना उच्चतर नमुन्यांना हार गेलेला दृष्टीस पडतो; ह्याचें एक कारण त्यापासून संतति कमी उत्पन्न होते हें होय, आणि दुसरें कारण त्यामध्यें कुटुंबसंनिकर्षण कमी असल्यामुळें सामाजिकसंनिकर्षणहि कमी उत्पन्न होतें हें होय.

---

# प्रकरण सातवें

## अनेकपति–विवाहपद्धति

३३. अनेकपतिपद्धति जितकी आपणास विलक्षण वाटते तितकी अनेकपत्नीपद्धति वाटत नाहीं ह्याचें कारण ती आपणास जास्त परिचित आहे हें होय. कारण ही पद्धति अत्यन्त सुधारलेल्या लोकांनीं न व्यापिलेल्या अशा जगाच्या सर्व भागांत सामान्य आहे.

ही पद्धति सर्वत्र सुरू आहे; ती जशी अगदीं थंड प्रदेशांत दृष्टीस पडते, तशीच अतिशय उष्ण प्रदेशांतहि दृष्टीस पडते. ती सर्व जातींत आढळून येते. फ्यूजियन लोक, आस्ट्रेलियन लोक, आणि तास्मेनियन लोक, ह्या ज्या अत्यन्त क्षुद्र जाती त्यांच्यांत ती दृष्टीस पडते हें आपल्या नजरेस अगोदर आलेंच आहे. न्यूकालिडोनिया, टाना, व्हेट, इरोमांगा, लिफू, या प्रदेशांतील निग्रीटो लोकांत ती सुरू आहे. मलाया व पालिनिशिया यांमध्यें तर ती सर्वत्र आढळते; उदाहरणार्थ, ताहिती बेटांत, सांडविच बेटांत, न्यूझीलंदमध्यें, मादागास्कारमध्यें व सुमात्रामध्यें अमेरिकेमध्येंहि ती सर्वत्र दृष्टीस पडते; उदाहरणार्थ, उत्तर अमेरिकेंतील एस्किमो लोकांपासून तो मास्किटो लोकांपर्यंत, आणि दक्षिण अमेरिकेंतील क्यारिब लोकांपासून तों पाटागोनियन लोकांपर्यंत; तद्वतच, प्राचीन काळीं अमेरिकेंत मेक्सिको,

पेरू आणि मध्य अमेरिका, हीं जीं तीन सुधारलेलीं राष्ट्रें होतीं, त्यांच्यांतहि ती चालूच होती. आफ्रिकेंतील लोकांतहि ती सामान्यच आहे; उदाहरणार्थ, दक्षिण आफ्रिकेंतील हाटेंटाट लोकांत, डामारा लोकांत व काफिर लोकांत, मध्य आफ्रिकेंतील आशांटी लोकांत; पूर्व आफ्रिकन लोक, कांगोमधील लोक, किनाऱ्यावरचे नीग्रो, किनाऱ्याच्या आंतील नीग्रो, व डाहोमन लोक, ह्यांच्यामध्यें; आणि उत्तरेकडील फुल्ला लोक व आबिसिनियन लोक ह्यांच्यामध्यें. एशियाखंडांतील स्थाइक सिंगालीज लोक, हिंदुस्थानांतील अर्धवट स्थाईक डोंगरी लोक, आणि नेहमीं भकटणारे याकुती लोक, या सर्वांमध्यें ही चाल आढळून येते. एशिया खंडांत प्राचीन काळीं ही चाल होती हें प्रसिद्धच आहे. खरोखर म्हणाल तर, हल्लींचे व प्राचीन सुधारलेले लोक व रानटी लोक, ह्या सर्वांची मोजदाद करतां बहुपत्नी लोक एकपत्नी लोकांहून संख्येनें फार मोठे दिसतात.

ह्या बहुपत्नी रूढीला परिस्थितीचा अडथळा जर आला नसता तर ती ह्याहूनहि जास्त पसरलेली दृष्टीस पडली असती. उदाहरणार्थ, बुशमेन लोकांत अनेक स्त्रिया करण्याची जरी परवानगी आहे, तरी ते गरीब असल्यामुळें त्यांच्यांत फारच थोडे लोक एकाहून जास्त स्त्रिया करितात. गोंड लोकांबद्दल फार्सिथ असेंच सांगतो. वेड्डा लोकांबद्दल टेनेंट असें म्हणतो कीं, ते गरीब असल्यामुळें त्यांस अनेक बायका करतां येत नाहीं. आस्ट्रियाक लोकांची स्थिति अशीच आहे. आतां आस्ट्रेलियन व फ्यूजियन ह्या अत्यन्त गरीब लोकांत ही

चाल जी बरीच दृष्टीस पडते त्याचें कारण हें कीं, त्या ठिकाणीं बायकांस उदरनिर्वाहापुरतें अन्न मिळवितां येतें.

गरीबीच्या योगानें अनेक बायका करण्याच्या चालीस जो प्रतिबंध उत्पन्न होतो, तेवढाच त्या चालीस स्वाभाविक प्रतिबंध आहे असें नाहीं. तीस दुसरा एक प्रतिबंध आहे; आणि तो ध्यानांत आणिला म्हणजे, प्रवाशांच्या वर्णनावरून अनेकपत्नीसमाजांविषयीं ज्या आपल्या कल्पना बनलेल्या असतात, त्या बऱ्याच अंशीं बदलतात. त्यांच्या वर्णनावरून आपला असा समज होऊन जात असतो कीं, असल्या समाजांत अनेक बायका सर्वांच्याच नसल्या तरी बहुतेकांच्या असतील. तथापि थोड्याशा विचारानें ह्या समाजाबद्दल आपल्यास संशय येणार आहे. उदाहरणार्थ, टर्नर आपणास असें सांगतों कीं, लिफूमध्यें बुलाला ( नायकाला ) चाळीस बायका असतात, व सामान्य माणसास तीन किंवा चार असतात. पण हें ऐकून सहजच असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, हें व्हावें तरी कसें? इतक्या बायका तेथें येतात कोठून? इतर प्रवाशांच्या वर्णनावरून, जरी कमी प्रमाणावर तरी असल्याच प्रकारच्या शंका उत्पन्न होतात. मंगोपार्कच्या ग्रंथांत आपणास असें लिहिलेलें आढळतें कीं, माण्डिंगो लोक अनेक बायका करणारे असून त्यांतील प्रत्येक बायको पाळीपाळीनें घरधनीण समजली जात असते. डमारा लोकांबद्दल अण्डर्सन असें म्हणतो कीं, त्यांच्यांत अनेकपत्नीपद्धति बरीच आढळून येते; व त्यांच्यांत प्रत्येक बायको आपणासाठीं निराळी झोंपडी बांधीत असते. लेसप्स आपणास असें सांगतो कीं, या-

कृत लोकांस वरचेवर फिरावें लागत असल्यामुळें, त्यांच्यांतील प्रत्येकजण मुक्कामाच्या प्रत्येक स्थळीं एकेक बायको नेऊन ठेवीत असतो. हैडा लोकांबद्दल असें सांगतात कीं, त्यांच्यांत ही पद्धति सार्वत्रिक असून तिला बंधन काय तें उदरनिर्वाहाच्या साधनांचा कमजास्तपणा एवढेंच आहे. हीं सर्व विधानें खरीं मानण्यास प्रथम असें घेऊन चाललें पाहिजे कीं, या सर्व लोकांत पुरुषांपेक्षां बायका ज्यास्त विपुल आहेत. पण ह्या लोकांत मुलांपेक्षां मुली फारच ज्यास्त जन्मास येतात, किंवा लढायांतून ह्यांच्यांतले फारच पुरुष पडतात, ह्यांपैकीं एकादी असंभवनीय गोष्ट गृहीत केली नाहीं तर असें म्हणावें लागतें कीं, वरच्या वर्णनांतून अतिशयोक्तीचा भाग बराच असावा. पुराव्याचा बारीक विचार करतां हा संशय दृढ होतो. कारण वरचेवर असें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष विधान केलेलें आढळतें कीं, माणसाला बायका विकत घेण्याचें किंवा पोसण्याचें साधन ज्या मानानें कमजास्त असेल, त्या मानानें त्याच्या बायकांची संख्या लहानमोठी असते; आणि ज्या अर्थीं सर्व समाजांतून बहुजन सामान्यतः गरीब असतात, त्या अर्थीं अल्प लोकांच्याच एकाहून अधिक बायका असतील; आणि बाकीच्यांना मुळींच बायका नसतील, किंवा एकएक असतील.

आणखी चवकशी करतां ह्या अनुमानास निश्चित आधार सांपडतो. अनेक वर्णनांवरून असें दिसून येतें कीं, अनेकपत्नीपद्धति असलेल्या समाजांतून विशेष श्रीमान् किंवा श्रेष्ठ दर्जाच्या लोकांच्याच काय त्या एकाहून अधिक बायका असतात. उदाहरणार्थ, लिक्टे-

न्स्टिन असें म्हणतो कीं, कूसा लोकांपैकीं बहुतेकांना एकेकच बायको असते; आणि राजे व गांवनाईक ह्यांनाच काय त्या चार किंवा पांच बायका असतात. जाव्हा बेटांतील लोकांबद्दल राफल्स साहेब असेंच म्हणतो; आणि सुमात्रामधील लोकांबद्दल असलेंच विधान आढळतें. प्राचीन मेक्सिकोमध्यें "सरदारलोकांव्यतिरिक्त लोक एकाच बायकोवर तृप्त असत; सरदारांच्या मात्र आठआठशें देखील बायका असत; आणि निकाराग्वामधील लोकांविषयीं ओव्हीडो असें म्हणतो कीं, त्यांच्यांत पुढारी लोकांखेरीज इतरांच्या एकेकच बायका असत."

ह्या व पुढें येणाऱ्या विधानांवरून अनेकपत्नी समाज म्हणून जे म्हणतात त्यांचा अर्थ काय घ्यावयाचा हें आपल्या ध्यानांत येईल. जेथें जेथें ही पद्धति आहे म्हणून सांगतात, तेथें एकपत्नीपद्धति त्याच्याहून ज्यास्त जोरावर असते असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं.

३४. स्त्रीपुरुषव्यवहारसंबंधी अगदीं प्रारंभींची जी अनियमित स्थिति तेथून सुरवात करून, पुढें सहजच काय झालें असावें असा जर आपण प्रश्न केला, तर अनेकपत्नीपद्धति प्रसृत कशी झाली ह्याबद्दल आपणास घोंटाळा पडणार नाहीं.

शरीराच्या व मनाच्या ज्या विशेष सामर्थ्यामुळें कांहीं माणसांस लढवय्ये व नाईक ह्या दृष्टींनीं वर्चस्व प्राप्त झालें, त्याच सामर्थ्यामुळें इतर टोळ्यांतील किंवा आपल्याच टोळींतील बायका आपल्याशा करण्याचीहि शक्ति सहजच त्यांस विशेष आली. आणि ज्या रीतीनें चोरलेली बायको बगलेंत असणें हें श्रेष्ठत्वाचें लक्षण

म्हणून समजलें जाऊं लागलें, त्याच रीतीनें स्वदेशी किंवा परदेशी अनेक बायका बगलेंत असणें हें त्याचेंच लक्षण समजलें जाऊं लागलें. रेमनी म्हणतो कीं, अपाची जातीचा जो माणूस सर्वांत ज्यास्त बायका राखूं किंवा बाळगूं शकतो, किंवा बाळगण्याच्या सामर्थ्यामुळें आपणाकडे ओढून घेऊं शकतो, तोच अत्यन्त मानार्ह म्हणून समजला जातो. ही स्थिति नमुनेदार आहे. अनेकपत्नित्व हें सर्वत्र उच्चवर्गीयत्वाचें एक चिन्ह बनलेलें आहे. प्राचीन मेक्सिकोमध्यें आव्हिट्झाटल्च्या पूर्वजांच्या पुष्कळ बायका असत, व त्याचें कारण हें कीं, ज्याच्यापाशीं सुखवर्धन करणारीं माणसें ज्यास्ती, त्याचा अधिकार व वैभव हीं तितकीं ज्यास्त वाढतात, असें त्यांस वाटे. मादागास्करमधील सरदार लोक व श्रीमंत लोक ह्यांच्यामध्यें अनेक बायका असणें ही गोष्ट सामान्य आहे, आणि ह्याच्याबद्दल निर्बंध एवढाच आहे कीं, राजाखेरीज इतर कोणीं बारा बायका करूं नये. पूर्व आफ्रिकन् लोकांत नाईक लोक पुष्कळ बायका असणें मोठें भूषण मानितात, व त्यांच्यांत बारांपासून तीनशेंपर्यंत बायका असतात. आशान्टीमध्यें नायकांच्या अमुक बायका असणें हें कांहीं अंशीं त्यांची पदवी, व कांहीं अंशीं त्या विकत घेण्याचें त्यांचें सामर्थ्य, ह्यावर अवलंबून असतें. हीब्रयू लोकांतहि, त्यांचे न्यायाधीश व राजे जे गिडीअन, डेव्हिड व सालोमन, त्यांचा मोठेपणाहि अशाच रीतीनें व्यक्त झालेला होता; हल्लींहि आपल्या इकडच्या राजांमध्यें व मांडलिकांमध्यें तीच गोष्ट दृष्टीस पडते. ह्या सर्व गोष्टींचा विचार करतां असें ध्यानांत येतें कीं,

अनेकपत्नीपद्धति जी प्रथम स्थापन झाली व पुढें चालू राहिली, त्यास कारण तिला दिलेला जो मोठेपणा तोच बऱ्याच अंशीं होय; प्रथम हा मोठेपणा सामर्थ्य व शौर्य ह्यांचें लक्षण म्हणून देत असत, पुढें सामाजिक आढ्यतेचें लक्षण म्हणून देऊं लागले. ह्या सिद्धांतास यूरोपच्या इतिहासाचाहि पाठिंबा मिळतो. उदाहरणार्थ, टासीटस असें म्हणतो कीं, रानटी लोकांपैकीं प्राचीन जर्मन लोक एवढेच कायते एका बायकोवर तृप्त असत, व त्यांच्यांत अपवाद कायते थोडेसे मोठ्या कुळांतले लोक असत. तद्वतच मांटेस्कु असें म्हणतो कीं, मेरोव्हिन्जियन राजांमध्यें अनेक बायका असणें हें मोठेपणाचें लक्षण मानिलें जाई.

अनेकपत्नीपद्धति अमलांत येण्यास प्रारंभापासून द्रव्यविषयक फायदा हेंहि आणखी एक कारण झालेलें आहे. उदाहरणार्थ, असें सांगतात कीं न्यूकालिडोनियामध्यें नायकांना दहा, वीस किंवा तीस बायका असतात; आणि जितक्या ज्यास्त असतात तितकीं त्यांचीं शेतें ज्यास्त चांगलीं पिकतात, व त्यांच्यांत धान्य जास्त उत्पन्न होतें. आफ्रिकेमध्यें सर्वत्र ह्याच हेतूवरून अनेकपत्नीपद्धति चालू असलेली आढळून येते. केलीच्या ग्रंथांत आपण असें वाचितों कीं, मांडिंगोंच्या बायका सर्पण व पाणी हीं आणण्यासाठीं दूरदूर जातात, आणि त्यांचे नवरे त्यांस पेरणें, शेतांतील रान काढणें, आणि कापणी करणें ह्या कामीं लावितात; शूटर असें सांगतो कीं, काफिर लोकांमध्यें बायकोस घरांतील सर्व काम उरकून शिवाय बाहेरचें सर्व मेहनतीचें काम करावें लागतें; ती आपल्या नवऱ्याकडे बैलासारखी ख-

पते; व तो तिच्या संबंधानें असें म्हणत असतो कीं, तिला ज्या अर्थीं मीं विकत घेतली आहे त्या अर्थीं तिनें मेहनत केलीच पाहिजे. ह्या सर्व गोष्टींवरून असें स्पष्ट ध्यानांत येतें कीं, पुष्कळ बायका असाव्या असें वाटण्याचें एक कारण आपल्यापाशीं पुष्कळ गुलाम असावे असें माणसास वाटतें हें होय.

ज्या अर्थीं प्रत्येक समाजांत श्रीमान् व प्रबल लोकांच्या कृती, हाच नीति व अनीति ह्यांचा ताजवा बनलेला असतो, त्या अर्थीं जेथें जेथें अनेकपत्नीपद्धति सुरू असेल, तेथें तिला नीतीचा आधार प्राप्त होऊन जातो. मोठे लोक तिचा स्वीकार करितात एवढ्यावर ती प्रशंसनीय मानिली जाऊं लागते; व गरीब लोक एकपत्नीपद्धतीचा अवलंब करीत असल्यामुळें ती हलकी मानिली जाऊं लागते. अनेकपत्नीविशिष्ट समाजांत एकपत्नीपद्धति गर्ह्य मानितात ह्याचें कारण हेंच होय. कधीं कधीं ह्या पद्धतीस धर्माचाहि आधार दिलेला आढळतो. चिपिवायनलोक असें समजतात कीं, अनेकपत्नीपद्धति देवास फार आवडते, कारण पुष्कळ मुलें असणें हें फार प्रशंसनीय समजलें जातें. अमेरिकेंतील मार्मन नांवाच्या अनेकपत्नीक ख्रिस्तीलोकांत असलाच समज आहे. आणि हीब्र्यू लोकांत अनेक बायका असणें ही गोष्ट प्रचलित नीतिविषयक समजुती किंवा कल्पित ईश्वरी आज्ञा ह्यांच्या विरुद्ध समजली जात नव्हती, हें त्यांच्या पुस्तकांत ह्या चालीचा स्पष्ट किंवा गर्भित निषेध केलेला नाहीं ह्यावरून जसें दिसतें, तसें त्यांच्यांतील ज्या कांहीं राजांच्या पुष्कळ बायका व पुष्कळ राखा होत्या,

त्यांच्यावर ईश्वरानें कृपा केली होती असें ते जें समजत, त्यावरूनहि व्यक्त होतें.

ह्या चालीच्या संबंधानें दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, ती ज्या समाजांत आढळते त्यांतील पुरुषांप्रमाणें त्यांतील बायकांनाहि ती पसंत असते; बहुतेक ठिकाणीं नसली तरी कांहीं ठिकाणीं तरी निःसंशय. बँक्रॉफ्ट असें सांगतो कीं, अनेक बायका असल्या म्हणजे श्रमविभाग जास्त होत असल्यामुळें, कोमांची लोकांत बायका ह्या चालीच्या विरुद्ध नाहींत; आणि माकालोलो नांवाच्या जातींतील बायकांबद्दल लिव्हिंग्स्टन असें सांगतो कीं, "इंग्लंदांत माणसास एकावेळीं एकच बायको करतां येते हें ऐकून त्या असें म्हणाल्या कीं, आपणास असल्या देशांत रहाणें आवडावयाचें नाहीं; इंग्लिश स्त्रियांना ही चाल कशी आवडते याचेंच त्यांस मोठें आश्चर्य वाटलें; कारण त्यांच्या मतें प्रत्येक श्रीमंत माणसानें श्रीमंतीचें लक्षण म्हणून पुष्कळ बायका केल्याच पाहिजेत अशी त्यांची पक्की समजूत होती. झांबीझी नदीच्या कांठावरील सर्व रानटी लोकांत असल्याच कल्पना आढळतात."

सारांश, अनेकपत्नीपद्धति ही प्रथम रानटी लोकांच्या ज्या अनियंत्रित कामवासना त्यांनीं प्रारब्ध झालेली असून, पुढें तीस, ज्या कारणांनीं राजकीय व औद्योगिक नियंत्रण स्थापन झालें, त्याच कारणांचें पाठबळ मिळत गेलेलें आहे. सारांश, असुधारलेल्या व अर्धवट सुधारलेल्या समाजांमध्यें नियामक सत्तेचें तें एक स्वाभाविक अंग बनून गेलेलें आहे.

३५. गेल्या दोन प्रकरणांत ह्या ववैाहिक संबंधाच्या ज्या नमुन्यांचें विवेचन केलें, त्यांत व ह्या नमुन्यांत असा भेद आढळतो कीं, ह्या पद्धतींत कांहीं प्रगति दिसून येते. संमिश्रव्यवहारापेक्षां ही बरी आहे हें सिद्ध करावयास नकोच; आणि अनेकपतिपद्धतीपेक्षां ही बरी आहे, असें मानण्यास आपणास कारणें आढळतात.

पहिलें कारण असें कीं, ह्या पद्धतीखालीं त्या पद्धतीपेक्षां अधिक निश्चयात्मक नातीं उत्पन्न होतात. ज्या ठिकाणीं स्त्रीपुरुषव्यवहार अगदींच अनियमित असेल, त्या ठिकाणीं आई कोण एवढेंच माहीत असतें. आतां ज्या ठिकाणीं अनेक नवरे पाहिजेत ते नसून भाऊ भाऊ असतात, तेथें बाप कोण हें माहीत नसलें तरी बापाचें कुळ तरी माहीत असतें. पण अनेकपत्नीपद्धतीखालीं आई व बाप हीं दोन्ही माहीत पडतात. असें असल्यामुळें आईबापांचें जें मुलांवरील प्रेम तें वरच्या दोन पद्धतींपेक्षां ह्या पद्धतीखालीं साहजिकच ज्यास्त दृढ असतें: प्रेमबंध एकेऱ्याचा दुहेरा बनतो. ह्या पद्धतीचा दुसरा एक परिणाम असा होतो कीं, बापाच्या बाजूनें पिढ्यानुपिढ्यांची वंशावळ लावितां येते. त्यामुळें कुटुंबदार्ढ्य ज्यास्त वाढतें. बाप व मुलगा ह्यांच्या निश्चयात्मक एकोप्याव्यतिरिक्त पिढ्यापिढ्यांचे बाप व पिढ्यापिढ्यांचे पुत्र ह्यांच्यामध्यें निश्चयात्मक एकोपा उत्पन्न होतो.
पण अशा रीतीनें हें कौटुंबिकदार्ढ्य जरी सरळ ओळीनें वाढत गेलें, तरी बाजूबाजूच्या रेषांनीं तें वाढल्यास फारच अल्प प्रमाणावर वाढतें. एक बाप व पुष्कळ आया यांच्या मुलांपैकीं, कांहीं जरी सख्खीं भावंडें असलीं, तरी त्यांच्यां-

तील बहुतेक सावत्र भावंडेंच असतात; आणि त्यांचें बंधुप्रेम बहुशः अनेकपति व एकपत्नी असल्या कुटुंबांतील मुलांपेक्षां कमी असावें. एकच आई व पुष्कळ बाप अशा ठिकाणीं, मुलांमध्यें आईकडून जितके मत्सर उत्पन्न होण्याचा संभव असेल, त्यापेक्षां एक बाप व अनेक आया असल्या ठिकाणीं, तसले मत्सर त्यांच्याकडून उत्पन्न होण्याचा संभव ज्यास्त आहे. म्हणून ह्या बाबतींत कुटुंब ह्या पद्धतीखालीं त्या पद्धतीइतकेंच असंकलित राहतें, किंवा कदाचित् ज्यास्त असंकलित होतें. आपल्या ह्या खंडांतील राजांच्या घराण्यांतून जे कलह व रक्तस्राव होत असतात त्यांचें कारण बहुधा हेंच असतें.

पण असल्या सावत्र भावांमध्यें अधिकारासंबंधानें जे कलह होतात ते वजा करतां, आपणास असें म्हणतां येईल कीं, ह्या पद्धतीखालीं वंशक्रम निश्चित झाल्यामुळें कुटुंब ज्यास्तच निश्चितस्वरूप होतें, त्याच्या फांद्या ज्यास्त विस्तृत पसरूं शकतात, आणिअशा रीतीनें तें उच्चतर नमुन्याचें बनतें.

३६. आतां अनेक पत्नीपद्धतीचे समाजाच्या स्वसंरक्षणावर, संततीच्या कल्याणावर, आणि वयांत आलेल्यांच्या जीवितक्रमांवर, काय परिणाम घडतात, हें पाहणें आहे.

रानटी समाजांच्या सभोंवती जर त्यांचा द्वेष करणारे समाज असले, तर त्यांजपासून त्यांचा फायदा होतो. काफिर लोकांबद्दल लिव्हिंग्स्टन असें म्हणतो कीं, " त्यांच्यांतील पुष्कळ पुरुष त्यांच्या वारंवारच्या लढायांतून पडत असल्यामुळें त्यांच्यांत बायकांपेक्षां पुरुष

कमी असतात. त्यामुळें अनेकपत्नीपद्धति उत्पन्न होते, आणि बायका बहुतेक नोकरांचीं कामें उचलितात. ” आतां पुरुष लढायांतून पुष्कळ मेल्यामुळें ही पद्धति सुरू होते, हा जो वरील साहेबाचा तर्क तो कबूल न केला तरी, त्यानें न सांगितलेली ही गोष्ट आपणास लक्षांत घेण्यास हरकत नाहीं कीं, बायकांपेक्षां पुरुषांचें मृत्युप्रमाण बरेंच वाढलें म्हणजे लोकसंख्या कायम ठेवण्यास अनेक बायका करणें हें चांगलें साधन असतें. पुरुषांचा वरचेवर संहार होत असतां त्यांतून निभावलेल्यांच्या जर एकेकच बायका असतील, आणि त्यामुळें पुष्कळ बायका जर नवऱ्यांविहीन राहतील, तर मुलांची कमतरता उत्पन्न होईल: म्हणजे काय, तर, मृत्युसंख्येनें झालेला खड्डा भरून काढण्यास जननसंख्या पुरी पडणार नाहीं. अन्न पुरेसें असून इतर गोष्टी सारख्या असल्यास, ज्या दोन समाजांमध्यें तंटा आहे त्यांच्या संबंधानें असें होईल कीं, जो समाज आपल्यांतील सर्व बायकांचा आया ह्या नात्यानें उपयोग करीत नाहीं, तो, तसा जो समाज उपयोग करितो त्याच्यापुढें टिकाव धरूं शकणार नाहीं; म्हणजे काय, तर, अनेकपत्नीसमाजापुढें एकपत्नीसमाज नष्ट होऊन जाईल. रानटी समाज व अल्परीत्याच वृद्धिंगत झालेले समाज, ह्यांच्यामध्यें अनेकपत्नीपद्धति इतकी कां आहे याचें मुख्य कारण बहुधा हेंच असावें. प्रारंभीच्या स्थितींत ही पद्धति समाजसंरक्षणास आणखी एका रीतीनें अनुकूल होत असते ती रीति ही:—कांहीं अविवाहित, कांहीं एकपत्नी आणि कांहीं अनेकपत्नी लोक ज्याच्यांत आ-

हेत, अशा रानटी समाजांत सामान्यतः अनेकपत्नीवर्ग सर्वांत श्रेष्ठ असला पाहिजे; पूर्ण रानट्यांत ज्यास्त प्रबल व शूर असला पाहिजे, आणि अर्धवट रानट्यांत, ज्यास्त श्रीमानहि असला पाहिजे; आणि असले लोक ज्यास्त योग्यतेचे बहुधा असतातच. म्हणून त्या समाजांत सामान्यतः अर्ध्याहून अधिक संतति इष्ट स्वभाव असलेल्यांपासूनच उत्पन्न झालेली असते त्यामुळें असला समाज संख्येनेंच प्रबल होतो असें नाहीं, तर त्यांतील ज्यास्त लोक चांगले लढवय्ये निपजतात. ह्यामुळें असल्या समाजाच्या रचनेंतहि एकप्रकारची सुधारणा उत्पन्न होते. ह्यापेक्षां हलक्या प्रकारच्या कौटुंबिक नमुन्यांशीं तुलना करून पाहतां, ही पद्धति पुरुषांच्या वंशांतच मालमत्तेची संक्रान्ति स्थापन करीत असल्यामुळें राजकीय स्थैर्यास अनुकूल अशी असते. आतां हें खरें आहे कीं, असल्या पुष्कळ समाजांत स्त्रियांकडूनच राजकीय वंशपरंपरा गणिली जात असते, व त्यामुळें तेथें या पद्धतीचा फायदा होत नाहीं. आफ्रिकेंत सामाजिक संकलन इतकें अपूर्ण दिसतें ह्याचें एक कारण कदाचित् हेंच आसावें; कारण तेथें राज्यें वरचेवर स्थापन होत असतात, आणि कांही काळानें पुनः नष्ट होतात. पण अधिकार बापाकडून मुलाकडे यावा ही गोष्ट ह्याच पद्धतीखालीं प्रथम शक्य होते; आणि जेथें हा प्रघात चालू होईल, तेथें राज्याची स्थिति वरच्याहून बरी असते. 'वरच्याहून बरी असते' असें म्हटलें यावरून, एकंदरींत चांगली असते असें मात्र समजावयाचें नाहीं. कारण आपण असें वाचितों

कीं, डमारा लोकांत नायकाची जी लाडकी बायको असेल, तिचा वडील मुलगा बापाच्या मागें गादीवर बसतो; आणि कूसा काफिर लोकांमध्यें बापाच्या मागून गादीवर बसणारा मुलगा नेहमींच सर्वांत वडील असतो असें नाहीं; तर बहुधा राजाची जी बायको अत्यन्त प्राचीन व श्रीमान् घराण्यांतील असेल, तिचा तो मुलगा असतो. ह्यावरून ह्या पद्धतीखालीं गादीवर कोण बसणार, ह्याविषयीं कधीं कधीं अनिश्चितत्व कसें उत्पन्न होतें व तें राज्याच्या स्थाईकपणास प्रतिकूल कसें असतें, हें ध्यानांत येतें. असो. शिवाय पुरुषांच्याच वंशांत नियमित रीतीनें संक्रान्ति झाल्यानें पूर्वजपूजेची स्थापना होण्यास मदत होते; आणि अशा रीतीनें समाजसंकलनाच्या कामीं ती आणखी एका रीतीनें उपयोगीं पडते. कारण जिवंतास नमून वागण्याबरोबर ह्यायोगें मृतास नमून वागण्याची शिस्त सुरू होते. एणेकरून गतकालांतील अग्रगण्य पुरुषांपासून प्राप्त झालेले नियम, विधि आणि निषेध यांना पवित्र आज्ञांचें स्वरूप प्राप्त होतें; आणि सर्व प्राचीन सुधारणांवरून असें दिसून येतें कीं, यापासून जी धर्मसंस्था उत्पन्न होते ती, राज्यांत व्यवस्थितपणा राखण्याच्या कामीं आणि संरक्षक व लढाऊ खात्यांचा जोरदारपणा वाढविण्याच्या कामीं, उपयोगीं पडते.

ज्या प्रदेशांत खाद्य दुर्मीळ असेल, तेथें संततिवर्धनावर ह्या रूढीचे परिणाम अनेकपतिपद्धतीच्या परिणामा इतके चांगले होत असतील किंवा नाहीं, याचीच वानवा आहे; तेव्हां ते जास्त चांगले होत नाहींतच; पण उष्ण व सुपीक अशा प्रदेशांत अपोषणामुळें मुलांमध्यें

मृत्युसंख्येचें प्रमाण ज्यास्त मोठें असण्याचा संभव नाहीं, आणि म्हणून अशा ठिकाणीं अमुक मुलांचा अमकाच बाप हें माहीत असल्यानें, त्यांचें संरक्षण होण्याच्या कामीं मदत होते. खरोखरच कांहीं ठिकाणीं अनेकपतिपद्धतीचा कल मुलांचें मृत्युप्रमाण प्रत्यक्षरीत्या कमी करण्याकडे असतो; उदाहरणार्थ, ज्या ठिकाणीं पुरुषास आपल्या मृतबंधूच्या बायकोशीं लग्न करण्याची व त्याचीं मुलेंमाणसें आपलींशीं करण्याची परवानगी असते, किंवा आज्ञाच असते, तेथें अशी गोष्ट होते. कारण आपल्या असें दृष्टीस पडतें कीं, प्रारंभीं जी हक्काची म्हणून गोष्ट असते ती पुढें कर्तव्य होऊन बसते. चिपिवाजसारख्या हलक्या जातींतहि मृतबंधूच्या विधवेशीं लग्न करण्याबद्दल सक्ती असून त्याबद्दल ते असें कारण देतात कीं, त्यास तिच्या मुलांस संभाळावें लागत असतें. आस्ट्रियाक लोकांत, त्यांचा देश भिकार असल्यामुळें, अनेकपत्नीपद्धति सामान्य नसून लोक भावांच्या विधवांशीं लग्नें लावितात; यावरून असें अनुमान निघतें कीं, अशा ठिकाणीं असल्या चालीमुळें मुलांची मृत्युसंख्या कमी होत असली पाहिजे. हीब्रू लोकांच्या धर्मांत जें सांगितलें आहे कीं माणसानें आपल्या मृतभावाला बीजोत्पत्ति करून द्यावी, त्याचा प्रारंभीचा अर्थ बहुधा असा असावा कीं, त्यानें त्याच्या मुलांचें संगोपन करावें; कारण तसें कर असें मृताची विधवा त्यास सांगत असे, व त्यानें नाकारिल्यास वडील माणसांच्या देखत ती त्याच्या तोंडावर थुंकत असे. पोरक्या पुतण्यापुतणीचें संरक्षण करण्याची जी सक्ती, तिच्यावरून असला अने-

कपत्नीविवाह उत्पन्न झाला असावा हा संशय कांहीं सध्याच्या गोष्टींवरून दृढ होतो. उदाहरणार्थ, लेडी डफ गॉर्डन नांवांची स्त्री ईजिप्त देशांतून तिनें पाठविलेल्या एका पत्रांत असें लिहितेः–"अमेरिकन वकिलाचा नोकर हसन ह्याची आज गांठ पडली; तो फार सभ्य गृहस्थ आहे. तो म्हणाला, गतवर्षींपासून मीं आणखी एक बायको केली आहे. मीं विचारिलें, कां म्हणून? तो म्हणाला, माझी विधवा भावजय आहे. माझा मृत भाऊ व मी नेहमीं एकत्र रहात असूं; त्यास हल्लीं दोन मुलगे आहेत. ती तरुण आहे किंवा सुंदर आहे असें नाहीं; पण तिचें व तिच्या मुलांचें रक्षण करणें हें मी आपलें कर्तव्य समजतों, व तिनें परक्याशीं लग्न करणें चांगलें नव्हें." पण बहुतेक रानटी समाजांत अनेकपत्नीपद्धति शिशुसंगोपनास जरी प्रतिकूल नसली, आणि ज्यांत परोपकारबुद्धि पक्क झालेली नाहीं अशा समाजांतून मुलांची मृत्युसंख्या कमी करण्यास जरी ती प्रसंगवशात् साधनीभूत होत असली, तरी तिचे मुलांवर होणारे नैतिक परिणाम ह्या पद्धतीहून कमी दर्जाच्या वैवाहिक संबंधाच्या परिणामांहून ज्यास्त चांगले असणें बहुतेक अशक्यच दिसतें. ज्या ठिकाणीं घर एकच असेल त्या ठिकाणीं निरनिराळ्या आयांचीं व त्यांच्या पोरांचीं जीं निरनिराळीं हिताहितें त्यांत भेदभाव असल्यामुळें जे तंटे होणार, ते मुलांच्या नीतीस घातुक झालेच पाहिजेत. बरें, जेथें निरनिराळ्या बायकांना निरनिराळीं घरें करून दिलेलीं असतील, त्या ठिकाणीं देखील त्यांचे जे परस्परमत्सर त्यांपासून होणारे अनिष्ट प-

रिणाम टाळतां यावयाचे नाहींत; आणि बापाची माया पुष्कळ ठिकाणीं विभक्त झाल्यामुळें पातळ होऊन जीं अनिष्टें उत्पन्न होतात, तींहि कायम रहावयाचींच.

अपक्व समाजांत ह्या पद्धतीचे वयांत आलेल्यांच्यावर जे परिणाम होतात ते सर्वांशींच वाईट नसतात. जेथें राहणी अशी असेल कीं, बायकांस स्वतांचा उदरनिर्वाह करतां येत नाहीं, व पुरुषांची संख्या कमी, तेथें जर ही पद्धति नसली, तर कांहीं बायकांस कोणीहि त्राता नसल्यामुळें त्यांना फार कष्ट सोसावे लागतात. एस्कीमो लोकांत ही गोष्ट निदर्शनास येते. त्यांच्या त्या परिस्थितींत पुरेसें अन्न व वस्त्र पुरुषांसच मिळवतां येण्याचा संभव असल्यामुळें त्यांच्यांतील विधवांशीं दुसऱ्या कोणीं जर लग्न केलें नाहीं, तर त्या लवकरच उपाशीं मरतात. ज्या ठिकाणीं खाद्य मिळविणें फारसें कठीण नसेल, त्या ठिकाणीं देखील, पुरुष जर लढायांतून बरेच पडत असतील, तर अनेकपत्नीपद्धतिविना, जें संरक्षण रानटी स्थितींत अगदीं अवश्य होय, तें बऱ्याच स्त्रियांना मिळणार नाहीं. एवंच रानटी समाजांतून वयांत आलेल्या स्त्रियांवर जीं संकटें अनिवार्य रीतीनें येत असतात, त्यांपासून त्यांचा या पद्धतीनें कांहीं अंशीं बचाव होतो; व ते लोक दयाविहीन असल्यामुळें अन्य तऱ्हेनें तसा बचाव होण्याचा संभवच नसतो. आतां या पद्धतीपासून अनिष्टपरिणामहि—व विशेषतः स्त्रियांवर—मोठे होतात हें खरें आहे. मादागास्कारमध्यें अनेकपत्नीपद्धतीस "फँपोराफेसाना" म्हणून जें नांव आहे त्याचा धात्वर्थ "वैर उत्पन्न करण्याचें साधन" असा आहे. हीब्रयू

लोकांतहि ह्या पद्धतीस अशींच नांवें आहेत. कधीं कधीं हे तंटे बायकांत विभक्तपणा करून कमी करीत असतात. बाटा लोकांबद्दल मार्स्डेन म्हणते कीं, त्यांच्यांत नवऱ्यास प्रत्येक बायकोस निरनिराळी चूल घालून देणें व निरनिराळीं भांडींकुंडीं देणें भाग पडतें; तेथें त्या आपापले स्वयंपाक निरनिराळे करितात, व नवऱ्याचा पाळीपाळीनें करितात. मिश्मी जातींतील नायकाच्या बायकांबद्दल विलकॉक्स असें लिहितो कीं, मुख्य पत्नी खेरीजकरून " बाकीच्या बायका तंटे न व्हावे म्हणून त्यांस नेमून दिलेल्या निरनिराळ्या घरांतून राहतात, किंवा आपल्या आप्तांकडे राहतात. सर्व आफ्रिकेंतून असलीच व्यवस्था बहुधा दृष्टीस पडते. " पण अशा रीतीनें नैतिक अनिष्टांचें निवारण फार अल्पप्रमाणावर होतें हें उघडच आहे. शिवाय स्त्रीपुरुषसहचर्यापासून वृद्धिंगत होणारे जे उच्चतर मनोविकार, ते ह्या पद्धतीनें जरी अगदींच बंद न झाले, तरी त्यांची वृद्धि बरीच खुंटून जाते. ही पद्धति पुरुषांच्या नैसर्गिक वासनांवरून उत्पन्न झालेली असल्यामुळें, व स्त्रियांच्या आवडीनावडींचा तींत मुळींच विचार केला नसल्यामुळें, तिच्यापासून स्त्रीपुरुषांत होणारे संबंध जनावरांतील परस्परसंबंधांहून उच्चतर तऱ्हेचे असे क्वचितच आढळतात, व तेहि अल्पच प्रमाणावर आढळतात. बायका म्हणजे इतर मालमत्तेसारख्या होत, म्हणून त्या बापांनीं विकावयाच्या आणि नवऱ्यांनीं विकत घेऊन गुलामाप्रमाणें वागवावयाच्या, अशा कल्पनांचें त्या लोकांत ह्या पद्धतीशीं साहचर्य असल्यामुळें, सहानुभूति व सन्मा-

न ह्या मनोविकारांस त्यांच्यांत जागाच रहात नाहीं. ह्यायोगानें माणसांच्या जीवितक्रमांत कमीपणा कसा येतो, हें आफ्रिकेंतील असल्या लोकांबद्दल **मान्ट नीरो** जें म्हणतो, त्यावरून स्पष्ट दिसतें. "नीग्रो लोकांस प्रीति, माया, किंवा मत्सर ह्यांची मुळींच ओळख नसते. मी आज पुष्कळ वर्षें आफ्रिकेंत आहें; पण एवढ्या अमदानींत एकाद्या नीग्रो पुरुषानें एकाद्या नीग्रो स्त्रीबद्दल किंवा स्त्रीला अल्पहि कळवळा व्यक्त केलेला म्यां पाहिला नाहीं; त्यानें तिच्या कटीसभोवती हात घातलेला किंवा तिला आलिंगन दिलेलें किंवा तिचें चुंबन घेतलेलेंहि कधीं पाहिलें नाहीं. त्यांच्या भाषेंत प्रेम किंवा माया हीं दर्शविणारे शब्दच नाहींत." सर **जॉन लबक** असें म्हणतो कीं, हाटेंटाटलोक एकमेकांशीं इतक्या थंड्या व त्रयस्थ रीतीनें वागतात कीं, दुसऱ्यास वाटेल कीं त्यांच्यांत प्रेम म्हणून मुळींच नाहीं; कूसा काफिरलोकांमध्यें लग्नाच्या बाबतींत प्रेमाचा मनोभाव मुळींच नसतो; आणि यारीबा प्रांतांत बायको करणें व कणीस तोडणें ह्यांचें महत्त्व सारखेंच समजतात; म्हणजे, त्यांत मायेचा प्रश्न मुळींच नसतो. आतां हा प्रेमभाव ह्यापद्धतीपासूनच उत्पन्न होतो असें मात्र समजावयाचें नाहीं; कारण हलक्या प्रतीच्या एकपत्नी काय व अनेकपत्नी काय, सर्वच लोकांत तो दृष्टीस पडतो. आपणास एवढेंच म्हणतां येईल कीं, ही पद्धति ह्या मनोविकाराच्या पुष्टीस प्रतिकूल आहे.

ह्याशिवाय ह्या पद्धतीपासून प्रौढांच्या संबंधानें आणखी एक अनिष्ट असें उत्पन्न होतें कीं, मुलें व्हावयाचें वय

गेल्यानंतरचें जें स्त्रीपुरुषांचें आयुष्य तें कष्टमय होतें. स्त्रियांविषयीं पुरुषांस आधींच कळवळा अगदीं अल्प असल्यामुळें पुढें तो सहजच नष्ट होतो; पुरुषांचीहि त्या वयांत कमजास्त मानानें तीच स्थिति होते; आणि त्यामुळें दोघांचीहि आयुर्मर्यादा लवकरच कष्टमयरीतीनें अजीबाद खुंटून जाते.

३७. सुधारत जाणाऱ्या समाजांतून अनेकपत्नीपद्धतींत जे फेरबदल होत जातात, व एकपत्नीपद्धतीबरोबर ते जे पसरत जातात, त्यांबद्दल आतां दोन शब्द लिहिणें जरूर दिसतें.

रानट्यांमधील प्रबल माणूस ज्या दोन किंवा अधिक बायका आपल्याशा करितो, त्यांच्यामध्यें कलह उत्पन्न होऊं लागतात. कोठें कोठें एक बायको मोठी असते व दुसरी लहान असते; उदाहरणार्थ, आस्ट्रेलियन लोकांमध्यें व कधीं कधीं बुशमेन लोकांमध्यें. कोठें कोठें ह्या बायका कांहीं कांहीं अंतरानें विकत घेतलेल्या असतात व त्यांपैकीं ही किंवा ती त्याची आवडती असते; उदाहरणार्थ, डमारालोकांमध्यें व फिजियन लोकांमध्यें. कोठें कोठें अनेक बायकांपैकीं पहिली तेवढी कायदेशीर समजली जाते; उदाहरणार्थ, पदवीच्या ताहितियन लोकांत व एकंदर चिब्चा लोकांत. कोठें कोठें राजानें दिलेली बायको मुख्य समजली जाते. सारांश, पहिल्यापासून अनेक बायकांमध्यें भेद स्थापन होण्याचा व कालेंकरून ते निश्चित होत जाण्याचा कल त्यांच्यांत दिसून येतो. शिवाय, स्वदेशांतील बायका, आणि लढाईच्या प्रसंगीं बाह्य टोळींतून धरून आणलेल्या बायका, ह्यां-

त्यामध्यें भेद उत्पन्न होत असतो. कायदेशीर बायका व रखेल्या ह्यांच्यामधील भेद प्रारंभीं बहुधा अशाच रीतीनें उत्पन्न झालेला असावा; आणि हीब्रयू लोकांच्या धर्मांत असेंच सांगितलें आहे कीं, जित शत्रूपासून आणलेल्या बायका ज्याच्या त्यानें ठेवाव्या, व त्यांची सोडचिठ्ठी केल्याशिवाय त्यांस पाहिजे तेव्हां टाकून द्याव्या; म्हणजे, त्यांस लग्नाच्या बायकांसारख्या न वागवितां रखेल्यांसारख्या वागवाव्या. अशा रीतीनें एकदां हा भेद उत्पन्न झाल्यावर मग त्यास असें विस्तृत स्वरूप आलें असावें कीं, वरच्या वर्गातील स्त्रिया त्या लग्नाच्या बायका समजाव्या, व खालच्या दर्जाच्या त्या रखेल्या समजाव्या; त्यांपैकीं पहिल्यांस श्रम करावयास लावीत नसावे, व दुसऱ्यांस गुलामांप्रमाणें वागवीत असावे. आणि अशा रीतीनें निरनिराळ्या बायकांत श्रेष्ठकनिष्टपणा उत्पन्न झाल्यावर, शेवटीं ह्याच्याहून सुधारलेल्या समाजांतून एक मुख्य बायको म्हणून गणली जाऊं लागली असावी, आणि अखेरीस राजे लोकांमध्यें ती राणी म्हणून समजली जाऊन, तिची मुलें गादीचीं कायदेशीर वारस बनलीं गेलीं असावीं.

पुढें आम्हीं सांगणार आहों त्याप्रमाणें जसा एकपत्नीपद्धतीचा प्रसार होत गेला, तसा वर सांगिल्याप्रमाणें एका बायकोचें महत्त्व वाढत जाऊन आणि बाकीच्या बायका हळूहळू दासींसारख्या व शेवटीं त्याहूनहि कमी दर्जाच्या बनून, जे फेरबदल होत गेले, त्यांच्या योगानें अनेकपत्नीपद्धतीचा क्षय होत गेला असावा. ह्या रूपान्तराच्या निरनिराळ्या पायऱ्या इराणच्या लो-

कांमध्यें दिसून येत. कारण त्यांच्या राजाच्या कांहीं राखा असून शिवाय तीन किंवा चार बायका असत; आणि ह्यांच्यापैकीं एक राणी असून ती इतरांपेक्षां कांहीं विशेष अर्थी बायको म्हणून मानिली जात असे. असिरियन लोकांमध्येंहि राजाची लग्नाची बायको अशी एकच असून कांहीं राखा असत; ईजिप्शन लोकांच्या भिंतींवरील चित्रांवरून असेंच दिसतें, कारण त्यांच्यांत राजाच्या बाजूला त्याची एक कायदेशीर बायको बसविलेली असून, त्याच्या राखलेल्या स्त्रिया त्या दोघांच्या करमणुकीकरितां त्यांच्या समोर नृत्य करीत आहेत असें दाखविलेलें असतें. पेरू देशांतील व चिब्चा लोकांमधील प्राचीन राजे यांची अशीच गोष्ट असे; आणि आबिसिनियांतील हल्लींच्या राजांचीहि तशीच आहे.

आतां साहाजिकरीत्याच पुढें असें झालें कीं, ही पद्धति जरी हळूहळू क्षीण होत गेली तरी राज्यकर्त्यांमध्यें ती सगळ्यांत जास्त दिवस जिवंत राहिली; कारण हा वर्ग एकंदर समाजामध्यें असल्या बाबतींत जास्त पुराणप्रिय असतो. ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास यूरोपांत सुधारणा होत असतां प्रारंभी प्रारंभीं तेथील राजांमध्यें ही पद्धति कांहीं विशिष्टस्वरूपानें अस्तित्वांत होती ह्याबद्दल आपल्यास आश्चर्य वाटणार नाहीं. मेरोव्हिजियन राजांमध्यें ती होती हें वर गर्भित झालेंच आहे; कारण राजा क्लोथेर व त्याचे मुलगे हे त्यांची उदाहरणें होत. आणि धर्मगुरूकडून ही पद्धति बंद केली गेल्यानंतरहि, पुष्कळ प्रियपात्रें गुप्त किंवा प्रसिद्धरीत्या ठेवण्याच्या रूपानें यूरोपांतील राजेलोकांम-

ध्यें ती बहुतेक पर्वांपर्यंत होती ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.

३८. एकंदर गोळाबेरीज करतां प्रथम आपण असें म्हटलें पाहिजे कीं, उत्क्रमणाच्या दृष्टीनें पाहतां अनेकपत्नीविषयक जो कौटुंबिक नमुना आहे, तो आतांपर्यंत वर्णिलेल्या नमुन्यांहून उच्चतर दर्जाचा आहे. त्यापासून उत्पन्न होणारे संबंध बाजूच्या ओळींत वरच्या इतकेच निश्चित असतात, आणि सरळ ओळींत तर जास्तच निश्चित असतात. पुरुष व स्त्री या दोन्ही बाजूंनीं रक्त एकच आहे ह्या ज्ञानामुळें आईबाप व मुलें ह्यांच्यामध्यें पद्धतीखालीं जास्त निकटसंबंध उत्पन्न होत असतो; आणि पुढच्या पुढच्या पिढ्यांमध्यें हा निकट संबंध कायम राहिल्यामुळें कौटुंबिक संकलन वरच्याहून जास्त विस्तृत होण्याचा संभव उत्पन्न होतो.

बहुतेक परिस्थितींत अनेकपत्नीपद्धतीचा, संमिश्र व्यवहार आणि अनेकपतिपद्धति या दोहोंवर पगडा बसलेला आहे; याचें कारण सामाजिक गरजा तिच्या योगानें जास्त चांगल्या भागतात हें होय. ही गोष्ट त्या पद्धतीखालीं कौटुंबिक संबंधाच्या फांद्या जास्त दूरवर पसरून एका रीतीनें साध्य होते. तद्वतच राजाधिकार एकाच वंशात स्थापन झाल्यानें जी राजकीय स्थिरता वृद्धिंगत व्हावयाची तीहि ह्या पद्धतीनें साधते. शिवाय, ह्यापद्धतीखालीं पितृपूजेस जास्त पक्क स्वरूप येणें शक्य होतें. अशा रीतीनें सामाजिक गरजा तिच्या योगानें जास्त चांगल्या भागतात.

एकीकडे ही पद्धति हिच्याहून कनिष्ट अशा विवाहपद्धतीस चेंगरून पसरलेली असतां, दुसरीकडे, बहुतेक

ठिकाणीं, ती तिच्याहून श्रेष्ठ पद्धतीपुढें टिकाव धरून राहिलेली दिसते. ह्याचें कारण रानटी स्थितींत लढाईंत लोक मरून लोकसंख्येंत जो खंड पडतो तो हिच्या योगानें ज्यास्त जलद भरून येत असल्यामुळें, आणि अशा रीतीनें समाजास टिकाव धरतां येण्याचा संभव हिच्यायोगें ज्यास्त वाढल्यामुळें, ही समाजसंरक्षणास ज्यास्त अनुकूल असते.

पण समाजोत्क्रमणाच्या कांहीं खालच्या पायऱ्यांना जरी ती योग्य अशी आहे, जरी ती कांहीं ठिकाणीं मुलांची व फाजील बायकांची ( एकेकानें एकेक बायको करून शिल्लक राहिलेल्यांची ) मृत्युसंख्या कमी करिते, तरी असल्या समाजांत घराबाहेर दृष्टीस पडणारा रानटी-पणा तो तिच्या योगानें घरांत दृष्टीस पडावयाचा बंद होतो असें मात्र मुळींच नाहीं; तर तो तेथें दृष्टीस पडतच असतो.

---

त्यास संभाळणें फारच कठीण पडतें; कॉपर इंदियन लोकांमध्यें रिचर्डसनच्या दृष्टीस अशीच गोष्ट पडली; तेव्हां अशा स्थितींत एकपत्नीपद्धति फार अस्थिर असते हें उघडच आहे. बाह्यकारणांमुळें ही जी अस्थिरता उत्पन्न होते तीस अंतःकारणांनीं पुष्टी येते; तीं अंतः कारणें रानटी माणसाच्या अनियंत्रित इच्छा ह्या होत. सेमिटिक सारख्या श्रेष्ठ जातींमध्यें देखील बायका टाकून देण्याची चाल इतकी जारीनें आढळून येते कीं, त्या जातींपैकीं बेडुईन लोकांच्या कांहीं टोळ्यांतून एकाद्या माणसाच्या एकामागून एक पन्नास बायका होतात; ह्यावरून सहजच असें अनुमान निघतें कीं, टिकाऊ असे जे एकपत्नीसंयोग ते हळूहळूच उत्पन्न झाले असले पाहिजेत.

४०. असले संयोग स्थापन होण्यास अनेक कारणें साधनीभूत झालेलीं आहेत. त्यांतील एक महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे मालमत्ते संबंधी ज्यास्त पक्क अशी कल्पना उत्पन्न होणें, व त्याबरोबर अदलाबदल व विक्रय ह्या रूढी स्थापन होणें, हें होय. एका माणसापासून दुसऱ्यानें एकादी स्त्री जबरदस्तीनें काढून घेणें ही गोष्ट धोक्याची असल्यामुळें तेणेंकरून तिला कांहीं अंशीं प्रतिबंध होत असे; पण पुढें जेव्हां बायका विकत घेऊं लागले, किंवा मेहनतीवर मिळवूं लागले, तेव्हां तसें होण्यास तो एक ज्यास्तच प्रतिबंध उत्पन्न झाला. एकाद्या माणसाला जर एकादी बायको कष्टाशिवाय किंवा मोबदला न देतां मिळाली असेल, तर ती आपल्या हातांतून जाऊं नये म्हणून जितक्या निश्चयानें तो झगडेल, त्यापेक्षां ती त्यानें तिच्या बापाला किंमत

देऊन किंवा त्याच्या घरीं ठराविक काळपर्यंत खपून मिळविली असल्यास, तिच्यासाठीं तो ज्यास्त निश्चयानें झगडेल; शिवाय, ज्यांनीं अशा रीतीनें बायका मिळविल्या असतील, ते लोक आपल्यापैकीं एकाद्याच्या बायकोवर अशी कोणी जबरदस्ती करूं लागल्यास त्याची अर्थात् छीःथूः करूं लागतील, व ज्याची बायको तो घेऊं पहात असेल त्याच्या मदतीस जातील. ह्याच कारणामुळें सोडचिठ्ठीलाहि अंमळ आळाबंदा उत्पन्न होतो. एकादी बायको जर पैशानें किंवा श्रमानें संपादिलेली असेल, आणि दुसरी मिळवूं म्हटल्यास जर तसेंच करणें भाग असेल, तर पहिलें लग्न मोडून टाकण्याची जी वासना तीस सहजच ह्या विचारानें आळाबंदा उत्पन्न होतो.

नंतर, मग, पुढच्या पायऱ्यांवर, पुरुष व स्त्रिया यांची संख्या सरासरी बरोबर होऊं लागून ह्या उच्चतर प्रकारच्या विवाहपद्धतीस ज्यास्त आनुकूल्य प्राप्त होतें. जसजशा लढाया कमी कमी होत जातील, आणि पुरुषवर्गातील जास्त जास्त लोक धंदे-उद्योगांत गुंतूं लागतील, तसतशी त्यांची मृत्युसंख्या कमी होत जाऊन एकपत्नीपद्धति पसरत जाते. कारण अशा स्थितींत अनेकपत्नीपद्धतीस प्रत्यक्षच विरोध उत्पन्न होतो. जेथें जेथें पुरुष व स्त्रिया यांची संख्या सरासरी सारखी असेल, त्या ठिकाणीं अनेकपत्नीपद्धति बरीच अमलांत यावयाची म्हणजे बरेच पुरुष लग्नाशिवाय राहिलेच पाहिजेत; आणि ह्या लोकांपासून त्या पद्धतीला विरुद्ध असें लोकमत उत्पन्न होऊन त्याचा कल त्या पद्धतीस बंधन घालणें व ती कमी करणें इकडे असलाच पाहिजे. कांहींएक पा-

यरीपर्यंत समाजसुधारणा झाल्यानंतर ह्या बाबतींत लोकमताचा पगडा राजेलोकांवरहि बसूं लागतो, ही गोष्ट जमिनीवर राहणाऱ्या डायाक लोकांमध्यें ही पद्धति फार क्वचित् दृष्टीस पडते असें जें लो साहेब म्हणतो, त्यावरून व्यक्त होतें: तो म्हणतो, त्यांच्यांत नाईक लोक कधीं कधीं ह्या पद्धतीचें अनुकरण करितात, पण तेणेंकरून त्यांचा त्यांच्या लोकांवरील पगडा कमी होतो.

एकपत्नीपद्धतीचा प्रसार होण्यास हीं जीं अप्रत्यक्ष कारणें सांगितलीं, त्यांमध्यें आतां प्रत्यक्ष कारणांची भर घातली पाहिजे. पण तसें करण्यापूर्वी, हा कौटुंबिक नमुना व तत्पूर्वींचे कौटुंबिक नमुने ह्यांमधील भेदाचें निरूपण प्रथम केलें पाहिजे.

४१. आतां हें उघडच आहे कीं, घटकांमधील बंधनांचें निश्चितत्व आणि जोम ह्यांच्या दृष्टीनें पाहतां, एकपत्नीकुटुंब हेंच सर्वांत अत्यन्त उत्क्रांत होय. अनेकपतिपद्धतींत मातृविषयक संबंध तेवढाच स्पष्ट असतो, आणि मुलांचा परस्परसंबंध अर्धवटच असतो. अनेकपत्नीपद्धतींत मातृविषयक व पितृविषयक दोन्ही संबंध स्पष्ट असतात; पण त्यांत कांहीं मुलांचा परस्परांशीं पूर्ण संबंध असून इतरांचा संबंध बापाच्या बाजूनेंच कायतो असतो. एकपत्नीपद्धतींत मातृविषयक व पितृविषयक संबंध स्पष्ट असतात एवढेंच नाहीं, तर सर्व मुलांचीं दोन्ही बाजूंनीं परस्परांशीं पूर्ण नातीं असतात. त्यामुळें कुटुंबरूपी संघ त्या पद्धतीखालीं ज्यास्त बंधनांनीं एकत्र संबद्ध झालेला असतो; आणि अशा रीतीनें ज्यास्त संनिकर्ष उत्पन्न होऊन, शिवाय, अनेकपत्नीकुटुंबांमध्यें जे पर-

स्परमत्सर अवश्यमेव उत्पन्न होतात, त्यांचा ह्या ठिकाणीं अभाव असतो.

हें जें विशिष्ट संकलीभवन तें असल्या कुटुंबांला पुढच्या पुढच्या पिढ्यांमध्यें ज्या फांद्या फुटत जातात, त्यांमध्येंहि दिसून येतें. सर्व मुलांचा एकच बाप, एकच आजा, पणजा, इत्यादि जो पितृवंशाचा निश्चितपणा तो अनेकपत्नीपद्धतीप्रमाणें ह्या पद्धतीखालीं असतोच; पण शिवाय सर्व मुलांची एकच आई, एकच आजी, वगैरे जो मातृवंशाचा निश्चितपणा तोहि असतो. म्हणून असल्या कुटुंबाच्या निरानिराळ्या फांद्या ज्यास्त ज्यास्त बंधनांनीं बद्ध होत जातात. रोमन लोकांप्रमाणें ज्या लोकांमध्यें वारसाचा हक्क पुरुषवंशांतच परंपरेनें जात असतो, तेथें फांद्या फुटणारा कुटुंबवृक्ष पूर्णपणें परस्परबद्ध रहात नाहीं; पण ज्या ठिकाणीं इंग्रज लोकांप्रमाणें स्त्रीवंशहि वारसांत गणिला जातो तेथें तो वृक्ष पूर्णपणें बद्ध असतो.

४२. समाज, संतति, आणि आईबापें, ह्या सर्वांना ही पद्धति, सामाजिक उत्क्रमणाच्या ज्या पायरीवर ती विशिष्ट रीत्या प्रचारांत येते, त्या पायरीवर फायदेशीर कशी होते, हें केवळ उपचारार्थ दाखविण्याची जरूरी दिसते.

नेहमींची लढाई व त्यामुळें होणारी पुरुषांची मोठी मृत्युसंख्या ह्यामुळें बायकाची संख्या पुरुषांपेक्षां ज्यास्त वाढून अनेकपत्नीपद्धति जरी लोकसंख्या कायम ठेवण्यास अनुकूल होते, तरी स्त्रीसंख्या जेव्हां पुरुषसंख्येहून फारशी मोठी नसते, तेव्हां एकपत्नीपद्धति तिच्याहून ज्यास्त संततिकारक आहे असें आढळून येतें. कारण कोणत्याहि पिढींत किती मुलें उत्पन्न होणार हें स्त्रीसंख्ये-

वर सामान्यतः अवलंबून असतें असें जर घेतलें, तर कित्येकांच्या एकाहून अधिक बायका असणें, व कित्येकांस मुळींच नसणें, ह्यापेक्षां प्रत्येकाला एकेक बायको असण्यापासूनच ज्यास्त मुलें होण्याचा संभव आहे. एवंच पुरुषांची मृत्युसंख्या कांहीं विशिष्ट प्रामाणानें कमी झाली म्हणजे नंतर, संततिसंख्येच्या दृष्टीनें एकपत्नीसमाज अनेकपत्नी समाजाकडून ज्यास्त जोमाचा ठरूं लागतो; आणि जितक्या पुरता सामाजिक टिकाव संख्यावृद्धीवर अवलंबून असेल, तितक्या पुरती ही पद्धति त्या टिकावास अनूकल होते. वर दर्शविलेले ज्यास्त बळकट व ज्यास्त फांद्या फुटलेले कौटुंबिकबंध इतर समाजांपेक्षां एकपत्नी समाजास ज्यास्त बळकट रीतीनें एकत्र ठेवूं शकतात. ह्या पद्धतीनें राजकीय स्थैर्यासहि विशेष बळकटी येते. पुरुषवंशांत सत्तेची संक्रान्ति होणें हा फायदा एकपत्नी व अनेकपत्नी ह्या दोन्ही पद्धतीखालीं सारखाच साधतो; पण निरनिराळ्या आयांच्या मुलांमध्यें सत्ता मिळविण्याबद्दल जो विरोध होण्याचा संभव असतो, त्यायोगें अनेकपत्नीपद्धतीखालीं हा फायदा कांहीं अंशीं नाहींसा होतो. एकपत्नीपद्धतीखालीं हें तंट्याचें बीज नाहींसें होतें, आणि त्यामुळें स्थाईक सत्तेस बरच्यापेक्षां कमी धोका येत असतो. असल्याच कारणांमुळें ह्या पद्धतीखालीं, पूर्वजपूजेच्या अभिवृद्धीस ज्यास्त मदत होते. पहिल्या पहिल्या राजांच्या वंशामध्यें स्थिरता उत्पन्न होण्यास जें जें अनुकूल असेल तें तें देवतांच्या कायम वंशावळी स्थापण्याच्या कामीं मदतीस होतें, व

त्यापासून नीतिनियमांच्या बाडांस धर्माचा आधार मिळूं लागतो.

जे समाज रानटी अवस्थेंतून बाहेर निघालेले असतील, त्यांच्यामध्यें एकपत्नीपद्धतीमुळें संततीची मृत्युसंख्या कमी होत जाते, हा एक तिचा उघडउघडच परिणाम होत असतो. आतां हें खरें आहे कीं, एशिया खंडांतील बर्फाळ मुलखांप्रमाणें जे नापीक प्रदेश आहेत, तेथें अनेकपतिपद्धतीनें झालेल्या मुलांना पोषण करण्यास कुटंबांत अनेक पुरुष असल्यामुळें त्यांची एकंदर स्थिति एकपत्नी कुटुंबांतील मुलांपेक्षां कदाचित् ज्यास्त चांगली असेल. शिवाय हेंहि संभवनीय दिसतें कीं, ज्या रानटी लोकांत बायकांना गुलामाप्रमाणें वागवून मरेमरेतों काम सांगत असतात त्यांच्यामध्यें, आणि ज्या ह्याहून सुधारलेल्या आफ्रिकेंतल्या सारख्या लोकांत बायकांस घरांत खपावें लागतें व शेतांतहि खपावें लागतें अशा लोकांमध्यें, प्रत्येक बायकोला हातभार लावण्यास सवती असल्यामुळें तिच्या हातून एकट्या बायकोपेक्षां शिशुसंगोपनाचें काम कदाचित् ज्यास्त चांगलें होत असेल. पण सामाजिक उत्क्रमणाच्या ज्या पायऱ्यांवर लोक लढाईंत गुंतलेले नसून वरींहि स्वस्थ बसलेले नसतात, तर ज्यास्त ज्यास्त धंदे-उद्योगांत गुंतलेले आढळं लागतात, त्या पायऱ्यांवर जसजसे आपण जाऊं लागतों, म्हणजे जसजसे पुरुष पोटास मिळविण्याच्या उद्योगास लागूं लागतात, आणि बायकांना हे श्रम कमी पडावयास लागून आपल्या कुटुंबाकडे ज्यास्त लक्ष द्यावयास सांपडूं लागतें, तसतसें एकपत्नीपद्धतीपासून शिशुसंवर्धनास दोन

रीतींनीं साहाय्य होऊं लागतें. आई मुलांवर सारखी नजर ठेवावयास लागून शिवाय बापहि त्यांच्यावर सारखी व संगळी नजर ठेवूं लागतो; निरनिराळ्या बायकांच्या निरनिराळ्या मुलांमध्यें त्याची नजर विभागली जात नाहीं.

बरें, ही मुलांची गोष्ट झाली; पण प्रौढांच्या जीवितावर ह्या पद्धतीचे परिणाम जास्तच फायदेशीर होतात, आणि ते भौतिक असतात व नैतिकहि असतात. जरी प्रारंभीप्रारंभीच्या सामाजांमध्यें एकपत्नीविवहापासून बायकांच्या संबंधानें पुरुषांच्या मनांत पूर्वींपेक्षां उच्चतर मनोविकार उत्पन्न होत नाहींत, किंवा त्यांच्या जीवितांतहि सुधारणा होत नाहीं, तरी नंतर नंतरच्या समाजांमध्यें असल्या विवाहाबरोवर असले मनोविकार व असली सुधारणा अवश्यमेव येत असते. विशेषंकरून बायका विकत घेण्याची चाल जशी कमी होत जाते, आणि लग्नाच्या कामांत स्त्रियांची आवड जशी अमलांत येऊं लागते, तसे सुधारलेल्या लोकांत स्त्रीपुरुषसंबंध ज्या मनोभावांनीं विशिष्ट असतात त्या मनोभावांची उत्क्रान्ति होऊं लागते. ह्या मनोभावांचे परिणाम प्रथम दिसतात त्यांहून फारच जास्त विस्तृत असतात. घरगुती संबंधांवर आपला अभाव चालवून ते प्रौढांच्या जीवितांची शारीरिक व मानसिक उन्नति कशी करितात हें स्पष्टच आहे, पण इतर रीतींनींहि त्या जीवितांवर त्यांचे हितकारक परिणाम होत असतात; कारण ते सौंदर्यविषयक सुखांचें कायमचें व खोल असें साधन होऊन बसतात. गानवादन, काव्य, कादंबरी, नाटक, इत्यादिकांपासून किती प्रकारच्या व किती खोल मानसिक मजा उत्पन्न होत असतात ह्या-

ची आठवण करतां, आणि त्या सर्वांचा प्रमुख विषय स्त्री-पुरुषप्रेम हा असतो हें ध्यानांत आणतां, आपल्यास असें कळून येईल कीं, ज्या पद्धतीपासून ह्या मनोविकाराची पुष्टी होते त्या एकपत्नीपद्धतीमुळेंच आपल्या विश्रांतीच्या वेळच्या बऱ्याच सुखांची उत्पत्ति होत असते.

४३. असो. तर मग, ह्या व गत प्रकरणांतून झालेल्या निरूपणाची समाप्ति करतांना आपणास असें म्हणतां येईल काय कीं मानवजातीच्या स्त्रीपुरुषसंबंधांचें एकपत्नीपद्धति हेंच स्वाभाविक स्वरूप आहे? असें जर म्हणतां येत असेल, तर दुसरा प्रश्न असा उद्भवतो कीं, मानवी प्रगतीच्या पहिल्या पहिल्या पायऱ्यांवर स्त्रीपुरुषसंबंध इतके अनिश्चित कां होते?

कनिष्ट प्राण्यांमध्यें ह्या संबंधाची योग्य व्यवस्था वंशपरंपरया आलेल्या उपजतबुद्धीवरूनच ठरत असते; योग्य व्यवस्था म्हणजे त्या त्या प्राणिजातीच्या कल्याणास अत्यन्त अनुकूल अशी व्यवस्था. कांहीं प्राण्यांमध्यें नर व मादी यांचें सततसाहचर्य असत नाहीं; कांही प्राण्यांमध्यें एक नर व अनेक माद्या असे संघ दृष्टीस पडतात; आणि कांहीं प्राण्यांमध्यें एक सबंद ऋतूपर्यंत एक नर व एक मादी यांचा संबंध आढळतो. माणसाहून कनिष्ट असे जे वानर वगैरे माणसाच्या जवळचे प्राणी आहेत, त्यांच्यामध्यें बराच काळ टिकणारे एकपत्नीसंबंध आढळून येतात, अशाबद्दल बराच पुरावा देतां येण्यासारखा आहे. असें जर आहे, तर मूळ माणासांमध्येंच स्वाभाविक कलांनीं प्रोत्साहित अशा या व्यवस्थेपासून भिन्न स्थिति कोठून आली? कदाचित् असें

झालें असेल कीं कनिष्ट वानर जातींतील प्राण्यांचे संघापेक्षां जेव्हां मूळमाणसांचे ज्यास्त मोठाले संघ बनूं लागले, तेव्हां हे संबंध मोडून टाकणारीं कांहीं कारणें नव्यानें उत्पन्न झालीं असतील, आणि कदाचित् त्या कारणांवरून उत्पन्न झालेल्या विवाहस्वरूपांपासून ते संघ कायम राहण्यास मदत झाल्यामुळें तीं तशींच अनियंत्रित राहिलीं असतील. कदाचित् असें झालें असेल कीं, पहिली अत्यन्त विस्कळित किंवा अत्यन्त अल्पसंकलित अशी स्थिति, आणि पुढची अत्यन्त संकलित अशी स्थिति, या दोहोंच्यामध्यें स्त्रीपुरुषसंयोगाच्या विविध प्रकारांना योग्य अशा विविधस्थिती उत्पन्न झाल्या असतील; आणि अशा रीतीनें मूळच्या स्वाभाविक कलापासून भिन्न भाव कांहीं काळपर्यंत उत्पन्न झाले असतील.

तें कसेंहि असलें तथापि ही गोष्ट स्पष्ट आहे कीं, आज पुष्कळ काळपर्यंत एकपत्नीपद्धति सुधारलेल्या माणसाचे ठायीं स्वाभाविक बनत चाललेली आहे. कारण हल्लीं लग्नाशीं संबद्ध अशा ज्या एकंदर कल्पना व मनोवृत्ती आहेत, त्यांच्या ठिकाणीं त्या संयोगाचें एकत्व हें गर्भितच असतें.

---

# प्रकरण नववें

## कुटुंब



४४. आतां कुटुंबाचे निरनिराळे नमुने आणि समाजाचे निरनिराळे नमुने ह्यांच्यामधील संबंधांकडे आपण पाहूं या. निरनिराळ्या प्रमाणांनीं संघटित झालेल्या निरनिराळ्या समाजांमध्यें गृहव्यवस्थांचे निरनिराळे प्रकार नेहमींच दिसतात काय? समाजाची युद्धशील घटना आणि शांतिशील किंवा उद्यमशील घटना यांचेबरोबर निरनिराळ्या कौटुंबिक रचना दृष्टीस पडतात काय?

ह्या प्रश्नांपैकीं पहिल्यास समाधानकारक असें कांहींच उत्तर देतां येत नाहीं. अत्यन्त साध्या आणि अत्यन्त संयुक्त अशा दोन्ही प्रकारच्या समूहांत एकच वैवाहिक संबंध आढळून येतो. दरिद्री असे जे रानवेड्डा लोक, जे इतके फांकलेले राहतात कीं त्यांस सामाजिक अवस्था प्राप्त झाली आहे किंवा नाहीं याचाच वानवा वाटतो, त्यांच्यांत अगदीं कडक अशी एकपत्नीपद्धति आढळून येते; तद्वतच भटकणारे बुशमेन हे असेच अति नीच असून, व त्यांच्यांत अनेकपत्नीपद्धतीला प्रत्यवाय नसूनहि, ते बहुधा एकपत्नी आढळतात. कांहीं स्थाइक व यांच्याहून अधिक सुधारलेल्या लोकांतहि ही पद्धति आढळून येते; उदाहरणार्थ न्यूगिनीमधील पोर्ट डोरी एथील लोक व डायाक लोक; या लोकांची

साधी सामाजिक स्थिति जाऊन त्यांस संयुक्त स्थिति प्राप्त झालेली आहे. आणि शिवाय जी राष्ट्रें संकलनानें आणि पुनःसंकलनानें फार विस्तृत झालीं आहेत, त्यांच्यामध्येंहि ही पद्धति आढळून येते. तद्वतच अनेकपतिपद्धतींहि एकाच प्रकारच्या समाजांतून आढळून येते असें नाहीं. ती साध्या समाजांतून आढळून येते. उदाहरणार्थ, फ्यूजियन लोक, आल्यूशन लोक आणि टोडा लोक; आणि ती सीलोन, मलबार व तिबेट या देशांमध्यें संयुक्त समूहांतहि आढळून येते. अनेकपत्नीपद्धतीचीहि स्थिति अशीच आहे. ती सरल, एकेऱ्या संयुक्त, दुहेऱ्या संयुक्त, व तिहेऱ्या संयुक्त, समाजांमध्येंहि दृष्टीस पडते. पण कुटुंबप्रकार, आणि समाजघटनेची पायरी ह्यामध्यें एकप्रकारचा संबंध मात्र लावून दाखवितां येण्यासारखा आहे. संयुक्त समूह बनण्यास जास्त व्यवस्थितपणा आणि जास्त बळकट नियंत्रणें लागत असल्यामुळें, त्या समूहांतून खासगी व सार्वजनिक व्यवस्था जास्त स्थाइक असल्या पाहिजेत हें उघडच होतें. जास्त जास्त मोठाले समुदाय एकत्र राखण्यास जी जास्त जास्त पसरलेली सरकारी व्यवस्था लागत असते, तिच्याबरोबर रूढीस कायद्याचें स्वरूप येत जाऊन त्यामुळें राजकीय संबंधाप्रमाणें घरगुती संबंधहि भिन्नस्वरूप होऊन जातात; आणि अशा रीतीनें कौटुंबिक रचना अनेकपतिपद्धातिविशिष्ट असोत किंवा अनेकपत्नीपद्धतिविशिष्ट असोत, वा एकपत्नीपद्धतिविशिष्ट असोत, त्या ज्यास्त निश्चितस्वरूप होऊन जातात.

तर, मग, निरनिराळे कौटुंबिक नमुने, आणि युद्धशील

व उद्यमशील असें वर्गीकरण केलेले निरनिराळे सामाजिक नमुने, ह्यांच्यामध्यें विशिष्ट संबंध दृष्टीस पडतात असें आपणास म्हणतां येईल काय ? उडत पाहणी करतां असले कांहींच संबंध लक्षांत येत नाहींत. प्रथम साध्या टोळ्यांकडे पाहतां शांतिशील अशा टोडा लोकांमध्यें एक मिश्र अशी अनेकपतिपद्धति व अनेकपत्नीपद्धति आढळून येते; आणि ज्यांना लढाई म्हणजे काय याचा अर्थ देखील समजत नाहीं अशा एस्कीमो लोकांमध्यें, एकपत्नीविशिष्ट संयोगांबरोबरच अनेकपतिविशिष्ट व अनेकपत्नीविशिष्ट असे संयोग आढळून येतात. बरें, युद्धशील असे जे क्यारिब लोक त्यांच्यांत कांहीं विशिष्ट प्रमाणावर अनेकपतिपद्धति दिसून येते, आणि त्याच्याहून जास्त प्रमाणावर अनेकपत्नीपद्धति दिसून येते. आतां अगदीं उलट टोंकाकडे जाऊन प्राचीन व अर्वाचीन अशा मोठ्या राष्ट्रांची एकमेकांशीं तुलना करूं लागलों तर असें दिसून येतें कीं, कांहीं ठिकाणीं युद्धशील स्वभाव आणि सामान्य अनेकपत्नीपद्धति यांचें साहचर्य दिसून येतें, आणि कांहीं ठिकाणीं त्या स्वभावाचें आणि सामान्य किंवा सार्वत्रिक अशा एकपत्नीपद्धतीचें साहचर्य दिसून येतें. असें आहे तरी, एकंदर गोष्टींचा जास्त बारीक विचार करतां असें नजरेस येतें कीं, युद्धशील नमुना व अनेकपत्नीपद्धति आणि उद्यमशील नमुना व एकपत्नीपद्धति या दोहोंदोहोंमध्यें सामान्य संबंध असतात.

पण प्रथम हें सत्य आपण ध्यानांत आणिलें पाहिजे कीं, जोराची अशी युद्धशील व्यवस्था जी दृष्टीस पडते,

ती फौजा व त्यांनीं मिळविलेले जय यांच्या रूपानें विशेषतः दृष्टीस न पडतां, सतत लुटारूपणाच्या रूपानें नजरेस येते. युद्धशील आणि उद्यमशील यांच्यामधील भेद म्हणजे वास्तविकरीत्या माणसें व इतर प्राणी यांच्याशीं झगडा करण्यांत जीवित खर्च होत आहे अशी स्थिति, आणि शांततेच्या उद्योगांत जीवित खर्च होत आहे अशी स्थिति, ह्यांच्यामधील भेद होय, किंवा संहार करण्यांत खर्च होणाऱ्या शक्ती आणि उत्पन्न करण्यांत खर्च होणाऱ्या शक्ती ह्यांच्यामधील भेद होय. युद्धशील नमुन्याची अशी कल्पना केल्यास, तिच्या बरोबर अनेकपत्नीपद्धति नेहमीं साहचर्यानें असते असें आपल्या नजरेस येतें.

आस्ट्रेलियन व तास्मेनियन लोकांपासून सुरवात करून, पुढें त्यांच्याहून पक्क अशा सरलसमाजांकडे वळून, संयुक्त व दुहेरे संयुक्तसमाज यांचा विचार करावयाचा, अशा पद्धतीनें जर ह्या विषयाचें निरूपण करूं लागलों, तर तें कंटाळवाणें होईल व निरर्थकहि होईल; कारण अगोदरच ( कलम ३३ ) आपल्या असें नजरेस आलें आहे कीं, कमी पुढें गेलेल्या समाजांत ही पद्धति सुरू असते, आणि त्यांचे शेजारच्या टोळ्यांशीं तंटेबखेडे नेहमीं चाललेले असतात; तेव्हां यावरून या दोन गोष्टी त्यांच्यांत साहचर्येंकरून असतात हें उघडच ठरतें. हें साहचर्य कार्यकारणसंबंधावरून उत्पन्न होतें ही गोष्ट कांहीं उलट उदाहरणांवरून सिद्ध होते. न्यूगिनीमधील पोर्ट डोरी एथील लोकांमध्यें कडक अशी एकपत्नीपद्धति असून सोडचिठ्ठीचीहि मोकळीक नाहीं, आणि ते लोक त्यांच्याच पायरीवरच्या इतर लोकांच्या मानानें पाहतां शां-

तिप्रिय व उद्यमशील असे आहेत. जमिनीवर राहणारे डायाक लोक हे ह्या गोष्टीचें दुसरें उदाहरण होत; कारण ते इतके एकपत्नीपद्धतिप्रिय आहेत कीं, त्यांच्यांत अनेक बायका करणें हा गुन्हा आहे; बरें, त्यांच्यांत त्यांच्या जमिनींबद्दल जरी जातीजातींचे तंटे होतात, आणि शत्रूचीं डोकीं जयचिन्हें म्हणून जरी ते कापून आणीत असतात, तरी त्यांच्यांत उद्यमवृद्धि इतकी झालेली आहे कीं, नेहमीं लढाई व पारध ह्यांच्यांत गुंतून राहण्याच्या ऐवजीं ते घरगुती श्रमाचीं वरींच कामें स्वतः करीत असतात, आणि त्यांच्यांत धंदेविभाग असून कांहीं व्यापारविषयक दळणवळणहि आहे. हिंदुस्थानांतील डोंगरी लोकांमध्यें ह्या गोष्टीचीं आणखी उदाहरणें दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, गोडचा स्वभावाचे बोडो व ढिमाल लोक; ह्यांच्यांत लष्करी व्यवस्था कांहीं नसून त्यांच्या शेतकीच्या आउतांखेरीज त्यांच्यापाशीं दुसरीं हत्यारेंहि नाहींत; आणि उद्योगधंद्यासंबंधानें ते इतके सुधारलेले आहेत कीं त्यांच्यांत श्रमांचा मोबदला होत असून, त्यांच्यांतील पुरुष बाहेरचें सर्व काम करीत असतात; आणखी ते एकपत्नी आहेत. त्याचप्रमाणेंच एकपत्नी असे जे लेप्चा लोक ते लढवय्ये अगदीं नाहींत. अमेरिकेंतीलहि कांहीं लोकांमध्यें असलाच स्वभावसंबंध आढळून येतो; कारण तेथील इतर लोकांत व असल्या लोकांत असा भेद दिसतो कीं, हे लोक कांहीं अंशों किंवा सर्वांशीं उद्यमप्रिय आहेत. उदाहरणार्थ, तेथील बहुतेक मूळचे लोक बहुधा अनेकपत्नी असून त्यांचा जन्माचा उद्योग पारध करणें व लढणें हाच दिसतो; पण तेथें इरोक्वाइस म्हणून जे लोक

होते, ते कायमच्या गांवांतून रहात असून शेती करीत असत; आणि त्यांच्यांत प्रत्येकाची कायती एकेकच बायको असे. प्यूब्लो लोकांचें उदाहरण ह्याहूनहि ज्यास्त ठळक आहे; ते लोक गांवांभोंवती भिंती बांधून रानटी लोकांस प्रतिबंध करितात, आणि स्वसंरक्षणार्थ तेवढेच लढतात; आणि असला कांहीं त्रास नसला म्हणजे शेती व दुसरे उद्योग-धंदे ह्यांच्यांतच गढून राहतात; आणि त्यांचे वैवाहिक संबंध अगदीं कडक असे एकपत्नीविशिष्ट आहेत. साध्या समाजांतून दिसणारा जो हा स्वभावविशेषसंबंध तो ज्या ठिकाणीं प्रवाशांच्या अपुऱ्या वर्णनांवरून स्पष्टरीत्या गर्भित होत नाहीं, तेथें बहुधा अप्रत्यक्षरीत्या लक्षांत येतो. सतत युद्ध आणि मुख्याच्या सत्तेची वृद्धि यांमध्यें स्वाभाविक संबंध आहे, ही गोष्ट अगोदरच आपल्या लक्षांत आली आहे; त्याचा गर्भितार्थ असा निघतो कीं, जेथें स्थाइक टोळ्यांतून नायकाची सत्ता अल्पच असेल तेथें लष्करी प्रवृत्ति फारशी नसते. आणि एकत्पनीपद्धतिविशिष्ट अशा ज्या वर टोळ्या सांगितल्या त्यांच्यामध्यें अशीच स्थिति आहे. टारीस सामुद्रधुनींत डार्लिंपल बेटांत नाईक मुळींच नाहींत; डोंगरी डायाक लोकांत नायकी सत्ता फारच दुर्बल आहे; बोडो व ढिमाल लोकांच्या खेड्यांतील नायकाच्या हातीं नामधारीच सत्ता असते; लेपूचा लोकांवर कोणी अंमल चालवूं लागल्यास ते दूर पळून जातात; आणि प्यूब्लो लोकांत तर शहराच्या सुभेदाराची वर्षास नवी निवडणूक होते. उलटपक्षीं, जी अनेकपत्नीपद्धति साध्या लुटारू टोळ्यांतून दृष्टीस पडते, ती ल-

ढाईमुळें त्यांचीं कायमच्या राज्याखालीं बनलेलीं जीं लहान लहान राष्ट्रें त्यांचे ठिकाणीं कायम राहते; आणि असल्या राष्ट्रांतून ती वारंवार फारच पसरते. पॉलिनिशियामध्यें लढाऊ व क्रूर राज्यपद्धतिविशिष्ट असे जे फिजियन लोक आहेत, त्यांच्यांत ती चांगलीच दृष्टीस पडते. आफ्रिकेंतल्या सर्व राज्यांतून अनेकपत्नीपद्धति आणि वृद्धिंगत झालेली नायकसत्ता हीं साहचर्येंकरून दृष्टीस पडतात; आणि आशान्टी व डाहोमे येथें तर ती पद्धति बरीच वाढलेली असून तेथील सरकारेंहि अत्यंत जुलमी आहेत. नष्ट झालेल्या अमेरिकन समाजांबद्दल असेंच म्हणतां येईल; कारण क्रूरराज्यपद्धतिविशिष्ट असे जे पेरुदेशीय, मेक्सिकोवासी, चिब्चा, व निकाराग्वामधील लोक, त्यांच्यांत अनेक बायका असणें हें मोठेंपणाचें लक्षण समजत. आणि आशिया खंडांत ज्या जुन्या जुलमी राज्यपद्धति होत्या त्याहि ह्याच रूढीनें विशिष्ट अशा असत. ह्या पुराव्याशीं जुळणारा असा दुसरा पुरावा असा मिळतो कीं, ज्या साध्या टोळींत सर्व लोक लढवय्ये असतील, तेथें अनेकपत्नीपद्धति बहुधा प्रसृत असते, पण अशा टोळ्यांचा बनलेला जो संयुक्त समाज त्यामध्यें अशी गंमत दृष्टीस पडते कीं, त्याचा जो लढवय्या भाग असेल तो ह्या पद्धतीनेंच विशिष्ट राहतो, आणि जो उद्यमशील असेल तो एकपत्नीपद्धति उचलूं लागतो. ह्या विभिन्नीकरणाचें पूर्वचिन्ह साध्या किंवा एकेऱ्या अशा लढाऊ टोळींत देखील दृष्टीस पडत असतें; कारण तिच्यांतलेच जे अगदीं कमी लढवय्ये असतील, त्यांस एकीहून अधिक

बायका मिळत नाहींत. आणि अनेक टोळ्या संयुक्त होऊन व लोकसंख्या वाढूं लागून, जेव्हां लढवय्ये वं कामकरी असा विभाग उत्पन्न होतो, तेव्हां तर ही गोष्ट ठळकरीत्याच दिसूं लागते. पण लढवय्यी सत्ता आणि अनेकपत्नीपद्धति ह्यांच्यामध्यें ह्यांच्याहूनहि अधिक प्रत्यक्ष संबंध आहेत; आणि चवथ्या प्रकरणांत आह्मीं दोन गोष्टी सांगितल्या आहेत त्यांची आठवण केल्यास ते आपल्या लक्षांत येतील. क्रूर टोळ्यांतील लोक लढाईत पकडलेल्या स्त्रियांस आपल्या बायका म्हणून जवळ ठेवितात किंवा गुलाम म्हणून ठेवितात, आणि लढवय्ये अशा रीतीनें जसजसे जास्त स्त्रिया मिळवितील तसतसे त्यांचे नामोसे वाढत जातात ( कलम ३४ ). म्याकलेनन साहेब असें दाखवितो कीं, कांहीं प्राचीन लोक लढवय्या वर्गाला बाह्य देशच्या बायका ( बहुधा देशांतील बायकांखेरीज ) करूं देत असत, जरी इतर वर्गाला त्या करण्याची परवानगी नसे. हीब्रयू लोकांमध्यें देखील लढाईत पकडलेल्या बायकांचा खासगी उपयोग करण्याची परवानगी असे ( कलम ३७ ). आणखी एक प्रत्यक्षसंबंध ३६ व्या कलमांत गर्भित झाला आहे; तो हा कीं, जेथें वरचेवर होणाऱ्या लढायांत पुरुषांची खच्ची पुष्कळ होऊन बायकांची संख्या फाजील होते, तेथें एकेकानें एकीहून अधिक बायका केल्यानें लोकसंख्या कायम राहण्यास आणि समाज सुरक्षित राहण्यास मदत होते, म्हणून नेहमींच्या लढायांनीं अनेकपत्नीपद्धतीस पूर्ण आयुष्य येतें; कारण तशी स्थिति असतां तिचा जे अवलंब करणार नाहींत, ते स-

माज नष्ट होऊन जातात. आतां ह्या पुराव्याशीं ह्याच्या उलट अशा एका गोष्टीची जोड लावून दिली पाहिजे; ती ही कीं, जसजसा लढवय्येपणा कमी होऊन उद्योगीपणा ज्यास्त वाढत जातो, व त्याबरोबर स्त्रीपुरुषांच्या संख्या जवळजवळ बरोबर होऊं लागतात, तसतसा अनेकपत्नीपद्धतीला ज्यास्त ज्यास्त प्रतिबंध होऊं लागतो; कारण पुष्कळ लोकांस स्त्रीविहीन ठेविल्याविना आणि अशा रीतीनें समाजस्थैर्याशीं विसंगत असा विरोध उत्पन्न केल्याविना तिचें अनुसरण इतरांस करतां येत नाहीं. एवंच उद्योगशीलतेनें स्त्रीपुरुषसंख्येमध्यें जो सारखेपणा येऊं लागतो, त्याचे योगानें एकपत्नीपद्धतीचें अवलंबन करणें बऱ्याच अंशीं भागच पडल्यासारखें होतें. शिवाय, अनेकपत्नीपद्धति व प्रमुखत्वेंकरून युद्धशील व्यवस्था, आणि एकपत्नीपद्धति व प्रमुखत्वेंकरून उद्यमशील व्यवस्था, ह्या दोहोंदोहोंमधील जो स्वाभाविकसंबंध तो ह्या गोष्टीवरून दिसतो कीं, ह्या दोन गृहव्यवस्थांच्या बुडीं असलेलें तत्त्व आणि त्यांच्याबरोबर दिसणाऱ्या ज्या दोन राजव्यवस्था त्यांच्या बुडीं असलेलें तत्त्व हीं दोन्ही एकमेकांशीं जुळतात. आपल्या हें नजरेस आलेंच आहे कीं, समाजघटनेचा जो युद्धशील नमुना आहे, तो जबरीच्या साहचर्याच्या तत्त्वावर रचलेला आहे, आणि उद्यमशीलनमुना स्वैच्छिक साहचर्याच्या तत्त्वावर रचलेला आहे. आतां हें स्पष्टच आहे कीं, अनेक बायका असणें ( मग त्या लढाईंत पकडलेल्या असोत किंवा त्यांच्या इच्छेस न जुमानतां त्यांच्या बापांकडून विका-

त घेतलेल्या असोत ) म्हणजे त्यामध्यें जबरीच्या नमुन्याचीच गृहसत्ता अंतर्भूत होत असते: म्हणजे काय तर, अशा ठिकाणीं नवरा हा जुलमी धनी असतो व बायका त्याच्या गुलाम असतात. उलट पक्षीं, जेथें लढाईमध्यें कमी बायका पकडल्या जातात व कमी पुरुष मरतात, तेथें जेव्हां एकपत्नीपद्धति चालू होते तेव्हां तिच्या बरोबर प्रत्येक बायकोचीहि किंमत पूर्वीपेक्षां वाढते; आणि म्हणून ती विकत घेतली असली तरी तिला पूर्वींहून ज्यास्त चांगल्या रीतीनें वागविण्याचा संभव असतो. आणि जेव्हां ह्याहूनहि ज्यास्त सुधारणा होऊन स्त्रीस लग्नाच्या बाबतींत कांहीं निवड करण्याचा अधिकार प्राप्त होतो, तेव्हां ह्या वैवाहिक संबंधाच्या उच्चतमस्वरूपीं जें स्वैच्छिक सहकार्य दृग्गोचर होत असतें, त्याची थोडीबहुत झुळूक मारूं लागते. अनेकपत्नीपद्धतीमध्यें जी घरगुती शिरजोरी अंतर्भूत होत असते, ती प्रबल अशा लढवय्या व्यवस्थेस योग्य अशी जी जुलमी राजसत्ता तिच्याशीं सुसंगतच असते; आणि उद्योगशील नमुना वृद्धिंगत होत जात असतां राजकीय जुलूम जो सहजच कमी होत जात असतो तो, त्या बरोबरच एकपत्नीपद्धति वृद्धिंगत होत जाऊन जो घरगुती जुलूम कमी होत असतो, त्याच्याशीं सुसंगतच असतो. ह्या आमच्या मताविरुद्ध यूरोपस्थ लोकांचे इतिहास कदाचित् कोणी आणील, आणि असें म्हणेल कीं ग्रीक व रोमन लोकांच्या काळापासून हे लोक जरी युद्धशील आहेत, तरी एकपत्नीहि आहेत. तर त्याला असें उत्तर आहे कीं, प्राचीन काळचीं यूरोपियन राष्ट्रें ज-

री वारंवार लढायांत गुंतलेलीं असत, तरी त्यांच्या लोकसंख्येचे मोठाले भाग उद्योगधंद्यांतहि गुंतलेले असत; त्यांच्यांत श्रमविभाग बराच असे, व व्यापारविषयक दळणवळणहि बरेंच असे. शिवाय आणखी एक गोष्ट अशी ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, उत्तर यूरोपांत रोमन लोकांच्या अमदानींत व नंतरहि जोंपर्यंत लढाया नित्य होत असत, तोंपर्यंत एकपत्नीपद्धति सार्वत्रिक झालेली नव्हती. जर्मन नायकांमध्यें अनेकपत्नीपद्धति असे, हें इतिहासकार टासीटस ह्यानें कबूल केलेलें आहे. बरें, मेरोव्हिंजियन राजे अनेकपत्नी असत ही गोष्ट अगोदरच आपल्या लक्षांत आलेली आहे. क्यारोलिंजियन राजांच्या वेळेस देखील प्रत्येक लढवय्याच्या दहा किंवा दहांहूनहि ज्यास्त बायका असत. आणि कीनिग्जवाटर असें म्हणतो कीं, राखा ठेवण्याची चाल त्यावेळीं इतकी कायदेशीर समजली जाई, कीं टुलूस शहरीं तेराव्या शतकांत देखील चालू असल्याबद्दलचा पुरावा सांपडतो. आणि शेवटची ती गोष्ट सांगावयाची ती ही कीं, सतराव्या शतकांत तीस वर्षांच्या युद्धानें (१६१८–१६४८) जर्मनींत जेव्हां पुरुषांची संख्या फार कमी झाली, तेव्हां कांहीं वर्षें पावेतों तेथें दोन बायका करण्यास कायद्याचीहि मनाई नसे.

एवंच वैवाहिक व्यवस्थांमध्यें फेरबदल उत्पन्न करण्यास जीं अनेक कारणें झालेलीं आहेत त्यांचा विचार करतां; आणि तद्वतच कांहीं समाज जरी पहिल्या मानानें शांतिप्रिय झालेले असले, तरी पूर्वींच्या लढवय्येपणाच्या अमदानींतील व्यवस्था त्यांच्यांत बऱ्याच कायम

राहिल्या आहेत, आणि कांहीं समाज प्रथम प्रमुखत्वें उद्योगशील असून पुढें पुन: युद्धशील बनलेले आहेत, व अशा रीतीनें त्याच्यांत विशिष्ट गुणांचें मिश्रण झालेलें आहे, ह्याहि गोष्टींचा विचार करतां; आह्मी म्हणतों हे संबंध बरेच स्पष्ट रीतीनें आढळून येतात हें वाचकांच्या लक्षांत येईल. मूळच्या लुटारू नमुन्याची सुधारणा होऊन उच्चतम असा उद्यमशील नमुना उत्पन्न होत असतांच त्याबरोबर अनेकपत्नीपद्धति जाऊन कडक अशी एकपत्नीपद्धति उत्पन्न झाली आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे; आणि कौटुंबिक नमुन्यांत हा जो फेरबदल झाला आहे, त्याचें मुख्य कारण लढवय्येपणाचा अस्त आणि उद्योगीपणाचा उदय हींच झालीं आहेत, ही गोष्ट ह्यावरून स्पष्ट दिसते कीं, ज्या ठिकाणीं शिक्षणसुधारणा, धर्मसुधारणा, इत्यादि काल्पनिक कारणें दिसत नाहींत, त्या ठिकाणींहि हा फेरबदल उत्पन्न झालेला आढळून येतो.

४५. आतांपर्यंत गृहसंबंधांचा विचार मुख्यत्वेंकरून घरगुती दृष्टयाच केला; आतां त्यांचा सार्वजनिक दृष्टया विचार करूं. कारण कुटुंब हा एक समाजाचा घटक आहे अशा दृष्टीनें त्याजकडे पाहतां, त्याच्या रचनेवर अनेक सामाजिक चमत्कार अवलंबून राहिलेले दृग्गोचर होतात.

गत प्रकरणांतून ज्या अनेक गोष्टी गोंविल्या आहेत त्यांवरून असें दिसतें कीं, कुटुंबाचे जे हलके नमुने आहेत, त्याचा हलक्या नमुन्याच्या समाजांशीं असलेल्या संबंधांचा अगोदर विचार केल्याविना, उच्चतर प्रकारच्या

कुटुंबाचे उच्चतर प्रकारच्या समाजाशीं जे संबंध असतात, त्यांची वास्तविक कल्पना करतां येत नाहीं. इतर गोष्टींप्रमाणें ह्या गोष्टीच्याहि संबंधानें असें होतें कीं, उत्क्रान्तिजन्य ज्या साध्या गोष्टींपासून ज्यास्त संकीर्ण गोष्टी उत्पन्न झाल्या असतील, त्या साध्या गोष्टींची माहिती नसतां त्या संकीर्ण गोष्टींवरून आपण जेव्हां अनुमानें काढूं लागतों, तेव्हां सहजच चूक होते. मूळ लोकांच्या धर्मांवरून म्याक्सम्यूलरादि पुराणवाद्यांनीं जे तर्क काढिले आहेत, त्यांमध्यें अशाच कारणानें चूक कशी झाली आहे याचें विवेचन अगोदर आलेंच आहे. हे पुराणकथावादी सुधारणेनें उत्क्रान्त झालेल्या कल्पना घेऊन त्यांवरून सुधारलेल्या लोकांचे जे मूळपुरुष त्यांच्यामध्यें काय कल्पना असतील यांचा विचार करूं लागल्यामुळें कमी संमिश्राची उपपत्ति लावण्यास ज्यास्त संमिश्राचा उपयोग करते झाले आहेत; आणि अशा रीतीनें त्यांनीं अनुमानांनीं ठरविलेल्या प्राचीन लोकांच्या धर्मविषयक कल्पना आणि हल्लीं अस्तित्वांत असलेल्या रानटी लोकांच्या कल्पना, ह्यांमध्यें मेळ दिसत नाहीं ही गोष्ट जेव्हां कबूल करणें त्यांस भागच पडलें, तेव्हां त्यांनीं असें गृहीत केलें कीं, श्रेष्ठ मानवजातींचीं मनें आणि कनिष्ट जातींचीं मनें ह्यांच्या व्यापारसरणीमध्येंच मूळपासूनचा भेद आहे; आणि ह्या गृहीत गोष्टीशीं विसंगतता न यावी म्हणून आर्केडियन सारख्या ज्या प्राचीन जातींपासून हल्लींची बरीचशी सुधारणा उत्पन्न झालेली आहे, त्या जातींस त्यांनीं कनिष्टांच्या वर्गांत नेऊन बसविलें आहे.

ह्या ग्रंथाच्या पहिल्या भागांत जे सिद्धांत आम्हीं नि-

रूपिले आहेत, ते ज्यांस कबूल असतील त्यांच्या ही गोष्ट तेव्हांच ध्यानांत येईल कीं, खालून वर संघटना करीत जाण्याच्या ऐवजीं वरून खालीं विघटना केल्यामुळें ही चूक उत्पन्न झालेली आहे. त्यांच्या ही गोष्ट लक्षांत येईल कीं, या गोष्टीची बरोबर उपपत्ति लावणें असल्यास मा-णसें सुधारणेच्या ज्या पायरीवर जनावरें पाळण्यास व जमीन नांगरण्यास समर्थ झालीं, त्याच्या खालच्या पाय-रीवर आपणांस चवकशी करीत गेलें पाहिजे.

४६. स्पेन्सर साहेब म्हणतात, वरील विवेचन सर हेन्री मेन या प्रसिद्ध ग्रंथकाराचीं जीं एतद्विषयक मतें आहेत, त्यांजवर आह्मी जी टीका आतां करणार आहों, त्याच्या प्रस्तावने दाखल आहे. साहेब म्हणतात, जरी त्याच्या ग्रंथांची किंमत आह्मी फार मानितों, आणि चांगल्या पक्कदशेस आलेल्या कुटुंबस्थितीबद्दल, आणि यूरोपियन राष्ट्रांच्या उत्क्रान्तीमध्यें त्या स्थितीचें अंग किती आहे ह्याबद्दल, त्याचे जे अभिप्राय आहेत ते ज-री कांहीं मर्यादांच्या आंत आह्मास मान्य वाटतात, त-री अत्यन्त प्राचीन अशा समाजावस्थांच्या संबंधानें त्यानें ज्या कांहीं गोष्टी गृहीत केल्या आहेत, व त्यांवर जो क-ल्पनाव्यूह रचला आहे, तो आह्मास मान्य करतां येत नाहीं.

सुधारलेले लोक आपल्या शेजारच्या रानटी लोकां-बद्दल जो तिरस्कार दर्शवितात व त्यांच्या रीतिभातींचें अवलोकन करण्याच्या कामीं जी हयगय करतात, त्यामुळें मोठी चूक होते, म्हणून सर हेन्री मेन यानें त्यांचा याबद्दल निषेध केला आहे. पण तो स्वतः या चुकीपासून अगदींच अलिप्त राहिला आहे असें मात्र

नाहीं. उच्चतर नमुन्याचे जे रानटी लोक आहेत त्यांच्यापासून मिळणाऱ्या पुराव्याचा जरी त्यानें उपयोग केला आहे, आणि कांहीं ठिकाणीं नीचतर रानटी माणसांपासून त्याच्या मतांस पुष्टिदायक असा पुरावा मिळाल्यास त्याचाहि जरी त्यानें आदर केला आहे, तरी असुधारलेल्यांचा जो मोठा समुदाय त्याचा त्यानें अगदींच अव्हेर केला आहे, आणि त्याच्या कृतीला विरुद्ध अशा ज्या अनेक गोष्टी त्यांच्यामध्यें दिसतात, त्यांजकडे त्यानें ढुंकूनहि पाहिलेलें नाहीं. "प्राचीन कायदा" ("Ancient law") या त्याच्या पुस्तकांत त्यानें जे सर्वव्यापी म्हणून सिद्धान्त ठोकून दिले होते, त्यांवर विरुद्ध टीका झाल्यामुळें जरी त्यानें त्यांच्यांत कांहींसा फेरबदल केला आहे, तरी तो फेरबदल फार अल्प आहे, व तोहि कांहीं अटींवर केलेला आहे. मि० म्याक्लेनन व सर जॉन लबक यांनीं त्याच्या मतांविरुद्ध जो पुरावा दिला आहे, त्यास तो फारसें महत्व देत नाहीं; आणि तें ह्या मुद्यावर कीं, त्यातील जो पुरावा त्यास सर्वांत विश्वसनीय वाटतो, तो हिंदुस्थानांतील डोंगरी लोकांच्या टोळ्यापासून प्राप्त झालेला आहे, आणि त्या टोळ्यांबद्दल त्याचें असें म्हणणें आहे कीं, त्यांच्यावर बाहेरून स्वाऱ्या करणाऱ्या लोकांचा प्रभाव पडल्यामुळें त्यांनीं विलक्षण चाली उचललेल्या आहेत.

प्रस्तुत विषयावरील पूर्वींच्या ग्रंथकारांनीं आपलीं अनुमानें बसविण्यास करावा तितका विस्तृत पुरावा गोळा केला नाहीं, म्हणून त्यास तो दोष देतो तो बरोबरच आहे. पण स्वतः त्यानें त्याच दोषास आप-

णास पात्र करून घेतलें आहे; आणि म्हणून प्रत्यक्ष घडून आलेल्या गोष्टीबद्दल कल्पनांचा उपयोग करणें हा जो दोष त्यानें पूर्वतर ग्रंथकारांच्या माथीं मारला आहे, तोच त्याच्या हातूनहि घडला आहे. प्रस्तुत विषयासंबंधानें व्यापक सिद्धान्त बसविण्यास जो पुरावा उपलब्ध आहे, त्यासंबंधानें तो असें म्हणतो कीं, तो तीन प्रकारचा आहे:—१. आपल्यापेक्षां कमी वृद्धिंगत अशा सुधारणांचीं समकालीन लोकांनीं केलेलीं वर्णनें; २. विशिष्ट जातींनीं आपल्या मूळच्या इतिहासाबद्दल करून ठेविलेले लेख; आणि ३. प्राचीन काळचा कायदा. आतां पहिल्या प्रकारच्या पुराव्यासंबंधानें टासीटसनें जर्मन लोकांचें केलेलें वर्णन हें उदाहरण जरी तो देतो, तरी अर्वाचीन प्रवाशांनीं हल्लींच्या निरनिराळ्या रानटी जातींबद्दल जीं वर्णनें केलेलीं आहेत, तीं ज्याअर्थीं तो ह्या सदराखालीं जमेस धरीत नाहीं, त्याअर्थीं त्या वर्णनांवर त्याचा विश्वास नाहीं हें उघडच दिसतें. पण अशा रीतीनें कांहीं पुरावा गाळिल्यामुळें, अनुभवाबद्दल कल्पनांचा उपयोग त्यास कसा करावा लागला आहे, ह्याचीं दोनच उदाहरणें एथें देऊं.

पितृप्रमुखत्वाची स्थिति ही सर्वांत प्राचीन होय असें गृहीत करून मेनसाहेब असें म्हणतो कीं, रानटी लोक आपल्या बापाचे सर्वांशीं आज्ञांकित असतात ही गोष्ट सार्वत्रिक आहे. आतां हलक्या जातींमध्यें मुलगे लहान असतांना बापास विरोध करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसल्यामुळें जरी त्याच्या आज्ञेंत कदाचित् रहात असतील, तरी ते प्रौढ झाल्यावरहि त्याच्या

आज्ञेंत तसेच राहतात, असें सर्वत्र होत नाहीं, आणि म्हणून ह्या गोष्टीस सार्वत्रिक म्हणतां येत नाहीं. ह्या ग्रंथाच्या पहिल्या भागांत आह्मीं असें दाखविलेंच आहे कीं, सर्वच जाती आज्ञाधारक आहेत असें नाहीं. उदाहरणार्थ, आपण असें वाचितों कीं, मंत्र लोक असे वागतात कीं, जणूंकाय आपल्याशिवाय जगांत दुसरें कोणी नाहींच; क्यारिब लोकांस आपल्या स्वातंत्र्याचा किंचित्हि भंग कोणीं केलेला खपत नाहीं, मापुची लोकांस कोणाचा हुकूम खपत नाहीं, आणि ब्राझिलमधील इंदियन वयांत आला कीं त्यास कोणतेंहि नियंत्रण नकोसें होतें. ह्या सर्व गोष्टींवरून, बापाला नमून राहणें हा मूळ माणसाचा नैसर्गिकच गुण आहे असें कांहीं अनुमान निघत नाहीं. पुनः आपण असें वाचितों कीं, ग्यालिनोभेरो नामक लोक वृद्ध माणसांना फार उद्धट रीतीनें वागवितात, मग तीं वृद्ध माणसें पुरुष असोत किंवा बायका असोत; आणि शोशोन व आराकेनियन लोकांत मुलांच्या अंगचें पाणी जाईल म्हणून त्यांस शिक्षा करीत नाहींत. ह्याहि उदाहरणांवरून सर्व जातींत प्रौढ मुलगे बापाशीं नमून असतात, असें अनुमान आपणास काढतां येत नाहीं. शिवाय आपणास असें समजतें कीं, नावाजो लोकांस पूर्ण स्वातंत्र्याचें लहानपणापासून बाळकडूच मिळालेलें असल्यामुळें, त्यांस नियंत्रण मुळींच सहन होत नाहीं, आणि म्हणून मुलें वयांत येई तों पावेतोंच बापाचें त्यांच्यावर पूर्ण साम्राज्य चालतें; कांहीं कालिफोर्नियन लोकांत मुलें वयांत आल्यावर त्यांजवर नायकाचा तेवढा ताबा चालतो; खा-

लच्या कानिफोर्नियांतील लोकांमध्यें मुलांस अन्न मिळविण्याचें सामर्थ्य आलें कीं ते पाहिजे तें करण्यास स्वतंत्र होतात. कोमांची लोकांत मुलांस बापाविरुद्ध बंड करण्याचा देखील हक्क दिलेला असून त्याबद्दल जातीच्या संमतीशिवाय बापास त्यांस शिक्षाहि करतां येत नाहीं. ह्या सर्व उदाहरणांवरून असें दिसतें कीं, कांहीं जातींत बापमुलाचा योग्य संबंध लहान वयांतच तुटून जातो. ज्या जातीपासून पितृशासनाची कल्पना आपणास प्राप्त झाली आहे, तिचे जे जास्त रानटी घटक आहेत, त्यांच्यामध्येंहि असल्याच गोष्टी दृष्टीस पडतात. बर्केहार्ट आपणास असें सांगतो कीं, बेडुइन लोकांमध्यें मुलगा बापाच्या तंबूंत राहत असेल, तोंपर्यंतच त्यास कांहींसा मान देतो; पण त्यास स्वतांचा तंबू उभारण्याचें सामर्थ्य आलें कीं तो कोणाचाहि उपदेश ऐकत नाहींसा होतो, आणि स्वताच्या इच्छेखेरीज पृथ्वीवर दुसऱ्या कोणास जुमानीत नाहीं. सारांश ह्या सर्व पुराव्यावरून, पुत्राचा आज्ञाधारकपणा स्वाभाविक आहे, व त्यापासून पितृशाशनपद्धति सहजच उत्पन्न होते, हे सिद्धान्त निष्पन्न होत नाहींत इतकेंच नव्हे, तर त्यावरून उलट असें दिसून येतें कीं, ह्या दोन गोष्टी, अनुकूल परिस्थिति असतां एकीपासून दुसरी अशा रीतीनें उत्पन्न न होतां, हळूहळू एकदमच उत्क्रान्त झालेल्या आहेत.

शिवाय, प्रारंभीं एकाच पूर्वजापासून उत्पन्न झालेलें असणें ह्याच आधारावर एकवटून सामाजिक व्यापार कसे घडत असत, ह्या गोष्टीस अनुलक्षून सर हेन्री

मेन असें म्हणतो कीं, "प्राचीन काळचे सर्व समाज प्रारंभीं आपण एकाच खोडापासून उत्पन्न झालों, असें समजत असत, आणि राजकीय दृष्ट्या एकत्र राहण्यास ह्याशिवाय कांहीं अन्य कारण असूं शकेल अशी त्यांस कल्पनाहि होत नसे; सारांश, एकाच रक्तापासून जे उत्पन्न झाले असतील तेच एका राजछत्राखालीं राहूं शकतात, ह्या गृहीतगोष्टीवरूनच राजकीय कल्पनांच्या इतिहासास सुरवात झालेली आहे."

आतां प्राचीन काळचे समाज म्हणजे ज्यांचे इतिहास आपणांस उपलब्ध आहेत तेच जर समजावयाचे असतील आणि राजकीय कल्पनांच्या इतिहासांत असल्याच समाजांच्या ज्या कल्पना तेवढ्याच जर गोंवावयाच्या असतील तर हें म्हणणें कदाचित यथार्थ होईल; पण ह्याच्याहून जुन्या समाजांना जर लक्षांत घ्यावयाचें असेल, आणि आर्यन व सेमिटिक ह्या लोकांव्यतिरिक्त लोकांच्या ज्या राजकीय कल्पना त्या जर ध्यानांत आणावयाच्या असतील, तर हें म्हणणें यथार्थ होणार नाहीं. सामाजिक समूहांचे एकमेकांशीं झगडे होऊन त्यांपासून राजकीय सहकार्याची उत्पत्ति होत असते, ह्याबद्दलचा पुरावा अगोदरच दिलेला आहे. जेथें समाजांतील सर्व लोक एकाच मूळपुरुषापासून उत्पन्न झालेले असतील, तेथें राजकीय सहकार्याची स्थापना जरी तेणेंकरून होते, तरी समाजांतील घटकांमध्यें जेथें असला संबंध नाहीं, अशा हजारों ठिकाणीं देखील असलें सहकार्य उत्पन्न झालेलें आहे. आस्ट्रेलियांतील एकाद्या टोळीचे लोक एकादा माणूस कांहीं काळपर्यंत

आपला मुख्य करून जेव्हां दुसऱ्या टोळींतील लोकांशीं लढतात, तेव्हां ते एकाच पुरुषापासून उत्पन्न झालेले असत नाहींत, तर निरनिराळ्या जातींचे असतात. उत्तर अमेरिकेंतील क्रीक लोक निरनिराळ्या पूर्वजांपासून उत्पन्न झालेले आहेत, हें त्यांच्या निरनिराळ्या वस्तुरूपी देवांवरून स्पष्ट होतें; तरी ते वीस हजार असून सत्तर गांवांमध्यें राहून त्यांनीं बरीच संकीर्ण अशी राज्यव्यवस्था उत्क्रान्त केली आहे. किंवा ह्याहूनहि उत्तम असें इरोकाइस लोकांचें उदाहरण घ्या; हे लोक जरी निरनिराळ्या जातींचे होते, तरी लढाई करितां त्यांचीं पांच किंवा सहा राष्ट्रें एकत्र होऊन तीं एका लोकसत्ताक राज्यव्यवस्थेखालीं लढत होतीं. खरोखरच प्राचीन काळीं एकाच जातीचे लोक राजकीय बाबतींत एकमेकांशीं एकोप्यानें न वागतां उलट परस्परांशीं विरोध करीत असत; ते इतके कीं त्याच्यासंबंधानें अमेरिकन इतिहासकार बांक्राफ्ट असें म्हणतोः—"कुचिन लोकांत जातींतल्या जातींत लढाई सुरू झाली, आणि बाप व मुलगे विरुद्ध विरुद्ध पक्षांस मिळाले नाहींत, असें व्हावयाचेंच नाहीं. शिवाय, आरंभीं स्त्रीपुरुषसंबंध अस्थिर असल्यामुळें एकाच कुटुंबांतील लोकांच्या सहकार्यानें राजकीय सहकार्याची उत्पत्ति होत असेल हें संभवत नाहीं; उदाहरणार्थ, वर सांगितलेल्याच क्रीक लोकांमध्यें म्हातारे व मध्यम वयाचे असे बरेच लोक आपल्या बायकांची वरचेवर अदलाबदल करीत असल्यामुळें त्यांतील प्रत्येकाच्या पुष्कळ बायका होतात, आणि त्यांचीं मुलें देशांत सर्वत्र विखरल्यामुळें त्यांस तीं माहीत देखील नसतात.

एवंच कुटुंबविषयक जी सर हेन्‌री मेन याची कृति आहे, ती सर्व समाजांस लागू पडत नाहीं असें स्पष्ट होतें; आतां त्या कृतीचा जरा ज्यास्त बारीक रीतीनें विचार करूं या.

४७. त्याच्या म्हणण्याचा गर्भितार्थ असा निघतो कीं, प्रारंभीं देखील निश्चित असे वैवाहिक संबंध असत. कारण तो असें म्हणतो कीं, "समाजाच्या बाल्यावस्थेंत, म्हणजे मानवजातीच्या इतिहासाच्या प्रथमोदयाच्या वेळीं ती ज्या अवस्थेंत आपणास दिसते त्या अवस्थेंत, प्रत्येकजण आपल्या बायकोवर व आपल्या मुलांवर अधिकार चालवीत असे, व तीं एकमेकांस मुळींच मानीत नसत. पण "स्त्रीपुरुषांचे प्राथमिक संबंध", "संमिश्रव्यवहार", आणि "अनेकपतिपद्धति" ह्या प्रकरणांत जीं अनेक उदाहरणें आह्मीं दिलीं आहेत, त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, निश्चित असे वैवाहिक संबंध उत्पन्न होण्यापूर्वी अनिश्चित असे वैवाहिक संबंध रानटी माणसांत आढळून येतात; आणि असेंहि दिसून येतें कीं, असल्या संबंधापासून जे कुटुंब-नमुने उत्क्रांत होतात, त्यांपैकीं कांहीं, "एक पुरुष, त्याची बायको, व मुलें" अशा घटकांचे बनलेले नसून, "एक बायको, कांहीं पुरुष, व मुलें" अशा घटकांचे बनलेले असतात; आणि असले हे नमुने बाल्यावस्थेंत किंवा गर्भावस्थेंत असलेल्या समाजांतच दृष्टीस पडतात असें नाहीं, तर ऱ्याच पुढें सरसावलेल्या समाजांतहि दृष्टीस पडतात.

दुसरी एक गोष्ट त्यानें अशी गृहीत केली आहे कीं सर्वत्र व सर्वकाळ मालमत्ता वंशपरंपरेनें पुरुषवंशांतच

संक्रान्त होत असते. आतां ज्या लोकांचा त्या साहेबानें विचार केला आहे, त्यांच्या ऐतिहासिक कालापासून अशी गोष्ट घडून आलेली आहे हें खरें असेल; आणि दुसऱ्या नमुन्यांच्या कांहीं रानटी लोकांमध्येंहि अशी स्थिति प्रत्यक्ष आहे—उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील कुकी लोक, बलुची लोक, न्यूझीलंदर लोक, व हाटेंटाट लोक—हेंहि खरें आहे. पण असुधारलेल्या लोकांत संपत्तीची संक्रान्ति सर्वत्रच पुरुषवंशांत होते असें मुळींच नाहीं. म्याकलेन ह्यानें मेनसाहेबाची ही क्लृप्ति आणि प्रत्यक्ष मिळणारा पुरावा, ह्यांमधील विरोध स्पष्ट करून दाखविला असून तो असेंहि दाखवितो कीं, जगामध्यें स्त्रीवंशांत मालमत्तेची संक्रान्ति होत असल्याचीं उदाहरणें सर्वत्र सांपडतात; आणि त्यानें याबद्दल जीं पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत त्यांत आह्मांस आणखीहि भर घालतां येणार आहे. बरें, ज्यांस कदाचित् मेनसाहेब बाल्यावस्थेच्याहि अगोदरचें असें म्हणेल, त्या समाजांतच ही रूढी दृष्टीस पडते असें नाहीं; किंवा ज्यांस तो "पितृसत्ताभिविशिष्ट" किंवा "बाल्यावस्थेंतलें" म्हणून अयोग्य रीतीनें म्हणतो, त्यांच्यांतच ही चाल आढळते असेंहि नाहीं; तर ज्या लोकसमूहांत किंवा राष्ट्रांत संमिश्र रचना उत्क्रान्त झालेल्या आहेत, त्यांच्यांतहि ती आढळून येते. ताहितियन लोकांमध्यें दोन वरच्या वर्गांमध्यें स्त्रीवंशाकडून नातें लेखण्याची चाल सामान्य होती; आणि टाँगन लोकांत सरदारीचा हक्क नेहमीं स्त्रीवंशांत संक्रान्त झालेला आहे. ज्या प्राचीनकालच्या चिब्चा लोकांनीं सु-

धारणेंत अगदींच अल्प प्रगति केलेली नव्हती, त्यांच्यां-तहि अशीच चाल असे. तद्वतच इरोक्काइस लोकांमध्यें इस्टेटीप्रमाणें पदव्यांचीहि संक्रान्ति स्त्रीवंशांतच होत असे, व त्या स्त्रीजातींतच वंशपरंपरेनें चालत. बापाची जी " साचेम " किंवा नाईक ही पदवी ती त्याच्या मुलास कधीं मिळत नसे, किंवा त्याची लढाईंतील " टोमे-हॉक " किंवा कुऱ्हाड हीहि मिळत नसे; आणि हे इरोक्काइस लोक बाल्यावस्थेच्या पलीकडे फार गेले होते; त्यांचा कारभार नाईकरूपी वीस प्रतिनिधींची सभा चालवीत असे, त्यांच्यांत स्वतंत्र लष्करी खातें असे, स्वतंत्र धर्म खातें असे, नियमित कायदे असत, शेतीच्या जमिनी असून त्यांजवर निरनिराळ्या व्यक्तींची स्वतंत्र मालकी असे, व त्यांच्या गांवासभोवतीं कायमची तटबंदी असे. तद्वतच आफ्रिका खंडांत किनाऱ्यावरील नीग्रो, आंतील निग्रो, कांगोमधील लोक, वगैरे लोकांत स्त्रीवंशांतच वित्तसंक्रान्ति होत असते; ह्या सर्व लोकांत स्पष्ट अशा उद्यमव्यवस्था असून, चार किंवा पांच श्रेष्ट–कनिष्ट वर्ग आहेत; तद्वतच स्थाईकची शेती, बराचसा व्यापार, आणि रस्ते पाडलेलीं शहरें, इत्यादि गोष्टी त्यांच्यांत आहेत. असल्या बाबतींत थोडकेच समाज पाहिल्यानें चूक कशी होते, हें मार्सडेन साहेबानें बाटा प्रांतांतील सुमात्रन लोकांबद्दल जें म्हटलें आहे, त्यावरून स्पष्ट होतें. तो म्हणतो, " त्या लोकांत नायकीचा हक्क प्रथम मृताच्या मुलाकडे न जातां बहिणीकडून तिच्या मुलाकडे जातो; " आणि पुढें तो असें म्हणतो कीं, " हाच विचित्र नियम त्या भागां-

तील माले लोकांमध्येंहि आढळतो." पण ज्या ह्या नि-
यमास तो विचित्र म्हणून म्हणतो, तो खरोखर असुधा-
रलेल्या व अल्पसुधारलेल्या लोकांस अगदीं सामान्य आहे.
शिनाय सर हेन्री मेन असें गृहीत करतो कीं, सरकार हें
पहिल्यापासूनच अस्तित्वांत आहे; कारण बायको, मुलें,
गुलाम, व मूळच्या सामाजिक समूहांत येणारीं इतर
सर्व माणसें यांच्यावर सर्वांत वडील पुरुषाचा अधिकार
प्रारंभीं देखील असे असें तो म्हणतो. पण जगाच्या
अनेक भागांत मुख्यविहीन असे समाज आहेत, हें आ-
ह्मी अगोदर दाखविलेंच आहे; उदाहरणार्थ, फ्यूजियन
लोक, कांहीं आस्ट्रेलियन लोक, बहुतेक एस्किमो लोक,
अराफूरा लोक, व वरच्या सारावाक नदीवरील डायाक
लोक. दुसऱ्या कांहीं जातींत नाईक कधीं कधींच असतात.
उदाहरणार्थ, तास्मेनियनलोक, कांहीं जातींचे आस्ट्रेलि-
यन लोक, कांहीं क्यारिब लोक, कांहीं उवाणी लोक.
पुष्कळ ठिकाणीं अस्पष्ट व अस्थिर अशा नायक्या दृ-
ष्टीस पडतात; उदाहरणार्थ, आन्डामानीज, आबिपोनीज
स्नेक, चिपिवायन, चिनूक, चिपिवाज, कांहीं जातींचे
कामस्चाडेल, ग्वायनामधील जाती, मण्डन, कोरेडो, न्यू-
गिनींतील लोक, तानीज लोक. जरी यापैकीं कांहीं
जाती अत्यन्त हलक्या आहेत, तरी समाजाच्या बाल्या-
वस्थेंत त्यांस न गोंवण्यास आह्मास कांहीं योग्य कारण
दिसत नाहीं. आणि ह्यांच्याबद्दल जरी कांहीं न म्हटलें,
तरी वरच्या सारावाकनदीवरील डायाक, आराफूरा, व-
गैरे जे लोक सार्वजनिक मत आणि रूढी यांखेरीज दु-
सऱ्या कोणत्याहि सत्तेविना शांतपणें आपला जीवितक्रम

चालवितात, ते बाल्यावस्थेच्या खालच्या पायरीवरील आहेत, असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. शिवाय आपल्या हें अगोदर लक्षांत आलेंच आहे कीं, पुष्कळ साध्या समूहांमध्यें नायकी जी असते ती वडील पुरुषाचीच नसते. उदाहरणार्थ तास्मेनियन वगैरे लोकांत लढाईच्या वेळीं जो नाईक नेमीत, तो योग्यता पाहून नेमीत. एडवर्ड्स साहेब म्हणतो, क्यारिब लोकांत असेंच आहे. आणि स्वान साहेब म्हणतो, क्रीक लोकांतहि असेंच आहे. राजकीय सत्ता व ज्येष्ठपुरुषसत्ता हीं एकच नाहींत, ह्याचें आणखी उदाहरण इरोकाइस लोक हे होत; कारण त्यांची नातीं गणण्याची जी चाल होती, तिच्यांत ज्येष्ठपुरुषास जागाच नव्हती; तथापि त्यांच्यांत संमिश्र अशी लोकसत्ताक व्यवस्था उत्पन्न झालेली होती. प्यूब्लो लोकांचेंहि उदाहरण असेंच आहे; ते लोक सुव्यवस्थित समाजांत रहात असून त्यांचे सुभेदार व मुत्सद्दी निवडलेले असत; तथापि त्यांच्यांत पूर्वीं ज्येष्ठपुरुषशासनपद्धति होती, ह्याचें कांहींच चिन्ह दिसत नाहीं.

मेन साहेबाच्या मताचा एक भाग असा आहे कीं, विस्तावर कुटुंबाची समूहात्मक किंवा अविभक्त सत्ता असते. तो म्हणतो, "समाजाच्या बाल्यावस्थेचा एक सार्वत्रिक विषेश असा आहे कीं, त्या अवस्थेंत माणसांना स्वतंत्र व्यक्ती म्हणून वागवीत नाहींत, तर एक विशिष्टसमूहाचे घटक म्हणून वागवितात; त्यांचें व्यक्तित्व त्यांच्या कुटुंबांत गढून गेलेलें असतें." आणि व्यक्तीचें हें गढून जाणें त्या समूहाचा जो नायक किंवा वृद्धपिता त्यासहि लागू असे. तो म्हणतो, कुटुंबांतील ज्येष्ठ पुरुषांचे हक्क

टी समाजांत देखील उपयुक्त अशा जंगम वस्तूंवर माणसाचा खासगी ताबा असतो, आणि तो ताबा तो होईल तितकें करून कायम राखीत असतो. ज्या वस्तू सहज आपल्याशा करतां येतील त्या तो आपल्याशा करीत असतो. उदाहरणार्थ, जे टिने लोक बायकांसहित सर्व मालमत्ता बलिष्ठाची म्हणून समजत असतात, ते देखील ही मालकी पूर्णपणें व्यक्तिविषयक आहे असेंच मानितात, कारण ते मृताबरोबर त्याची सर्व मालमत्ता जाळून टाकीत असतात. खरोखरच पुसाल तर पुराव्याची बाब तर एकीकडेसच राहूं द्या; पण त्याखेरीज देखील समाजाच्या बाल्यावस्थेंत ज्या आपस्वार्थी रानटी माणसास न्याय किंवा जबाबदारी ह्याची कल्पना मुळींच नसते, तो आपली मालमत्ता आपल्यावर अवलंबून राहणारासाठीं म्हणून समजून उमजून बाळगून राहील ही कल्पनाच आह्मास असंभवनीय वाटते.

मेन साहेबाच्या कृतींत, प्रत्यक्ष नाहीं तरी अप्रत्यक्ष रीत्या, दुसरें एक असें मत अंतर्भूत झालेलें आहे कीं, समाजाच्या बाल्यावस्थेंत बायका नेहमीं पराधीन असतात. "कुटुंबांतील प्रत्येक पुरुष जरी एका नव्या कुटुंबाचा मुख्य होण्याचा संभव असतो, तरी स्त्री तशी होण्याचा संभव मुळींच नसतो; ती स्वतंत्र अशी कधींच होत नाहीं; म्हणून तिला नेहमीं कुटुंबाच्या बंधनांत ठेवण्याकरितां प्राचीनकाळच्या कायद्यांत एक विलक्षण युक्ति योजिलेली आहे", असें तो म्हणतो; आणि या म्हणण्याचा आशय असा दिसतो कीं, हें जें स्त्रियांचें दास्य पितृशासनपद्धतीपासून उत्पन्न झालेलें आहे, आणि ज्या-

मध्यें सहजच स्त्रिया मालमत्तेच्या मालक बनण्यास असमर्थ असतात, तें हळूहळू कमी झालेलें आहे, आणि कुटुंबाची प्राथमिक घटना जसजशी क्षीण होत गेलेली आहे, तसतसा खासगी मिळकतीचा हक्क त्यांस प्राप्त झालेला आहे. पण हल्लीं अस्तित्वांत असलेल्या सुधारलेल्या राष्ट्रांच्या पूर्वजांकडून निघून जेव्हां आपण हल्लीं अस्तित्वांत असलेल्या असुधारलेल्या लोकांकडे वळतों, तेव्हां या सिद्धान्ताला कांहीं अंशीं तरी बाध आणणारा पुरावा आपणास आढळून येतो. रानटी समाजांत स्त्रियांचें सर्वथैव परावलंबित्व हा जरी नियम आहे, तरी त्यास अपवाद आहेत; व हे अपवाद पितृशासनपद्धतिविशिष्ट समाजांहून हलक्या प्रतीच्या समाजांमध्यें जसे आहेत, तसे ह्या पद्धतीचा ज्यांच्यांत गंधहि राहिला नाहीं अशा उच्चतर समाजांतहि आहेत. कॉक लोकांमध्यें वडील माणसांच्या पंचांचें साम्राज्य असून त्यांच्यांत जेव्हां एखादी स्त्री मरते, तेव्हां तिची मालमत्ता तिच्या मुलीकडे जाते. क्यारेन्स लोकांमध्यें नाईक बहुधा नसतात, आणि असतात तेथें निवडलेले असून त्यांच्या हातीं सत्ता अल्प असते. “ या लोकांत बाप मृत्युपत्रानें आपली जिंदगी आपल्या मुलांकडे लावून देतो; बायकोस कांहीं एक ठेवीत नाहीं; पण मरेपर्यंत इस्टेटीचा उपभोग घेण्याचा हक्क तिला असतो. ” खासिया लोकांबद्दल स्टील असें म्हणतो कीं, त्यांच्यांत “ घर बायकोचे ताब्यांत असतें; आणि नवरा तिच्यापासून विभक्त झाल्यावर मेल्यास, ती तिचीच मालमत्ता होते. समुद्रावरील डायाक लोकांत मालमत्ता वडील मुलास मिळत नसून, शिवाय त्यांच्यांत

नायक्या जेथें असतात, तेथें त्या नायकांस त्यांच्या गुणांवरूनच मिळालेल्या असतात; त्या लोकांत बायको नवऱ्याच्या बरोबरीनें खपत असल्यामुळें "काडी तोडण्याचे वेळीं त्यांच्या जोडश्रमांनीं मिळविलेल्या संपत्तींतील अर्धी तिच्या वांट्यास येते;" आणि कांहीं जमिनीवरील डायाक लोकांबद्दल ब्रूक साहेब असें म्हणतो कीं, "त्यांच्या गांवांत अत्यन्त प्रबळ माणसें म्हटलीं म्हणजे दोन स्त्रिया होत्या, व त्या वारंवार मला असें सांगत कीं, येथील सर्व जमीन व रहिवाशी आमचे आहेत." उत्तर अमेरिकेंत देखील असलीच स्थिति आढळून येते. आल्यूशन बेटांत "श्रीमान् बायकांस दोन नवरे करण्याची परवानगी आहे"; यावरून त्यांच्यांत वित्तावर स्त्रियांची मालकी असते असें गर्भित होतें. नूट्का लोकांमध्यें सोडचिठ्ठीनंतर नवराबायकोमध्यें "इस्टेटीची वांटणी अगदीं बरोबर होत असते"; आणि शिवाय, बायकोनें जें कांहीं स्वतः तयार केलें असेल किंवा विकत घेतलें असेल, तें तिलाच मिळतें. याप्रमाणेंच स्पोकानीज लोकांमध्यें "घरांतील सर्व मालमत्ता बायकोची म्हणून समजली जाते", आणि घटस्फोटाचे वेळीं इस्टेटीची न्याय्य वांटणी होत असते. इरोक्वाइस लोकांमध्यें स्त्रीवंशांत वित्तसंक्रान्ति होत असे, आणि नवऱ्याचे व बायकोचे मालकीचे हक्क अगदीं पृथक् पृथक् असत; आणि तीं विभक्त झाल्यास मुलें आईकडे जात. शांत, उद्योगी आणि लोकसत्ताप्रिय असे जे प्यूब्लो लोक, त्यांचें उदाहरण ह्याहूनहि विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें आहे; कारण त्यांच्यांत बायकांकडे इस्टेट वंशपरंपरेनें जाते इ-

तकेंच नाहीं, तर कांहीं वेळां त्या आपला एकट्याचाच हक्क तिजवर सांगत असतात. आफ्रिकेमध्यें स्त्रियांची स्थिति इतर पुष्कळ बाबतींत जरी नीच आहे, तरी त्यांच्यांत वित्तसंक्रान्ति त्यांच्याकडे होत असल्यामुळें तेथेंहि एतद्विषयक उदाहरणें आढळतात. उदाहरणार्थ, तिंबक्तूमध्यें मुलीस बापाच्या इस्टेटीचा वांटा मुलाच्या निम्मे मिळत असतो. कांगो नदीवरील यलाला धबधब्याच्या वरील प्रदेशांत कोंबडी, फळें वगैरे सर्व जिन्नस बायकांचे समजले जातात, कारण त्यांस विचारल्याविना हे जिन्नस पुरुष कधींच विकीत नाहींत, आणि त्यांच्या मोबदला गळेसर वगैरे घेतले म्हणजे ते त्यांनाच देतात.

एवंच पितृशासनपद्धतिविशिष्ट लोकसमूहामध्यें समाजाची बाल्यावस्था दृष्टीस पडते ही जी क्लृप्ति तिच्या विरुद्ध पुष्कळ गोष्टी आढळून येतात. तिसऱ्या, पांचव्या व सहाव्या प्रकरणांत आम्हीं दाखविल्याप्रमाणें अगदीं प्रारंभीच्या समाजांत ज्याप्रमाणें राजकीय व्यवस्था नव्हती, तशी गृहव्यवस्थाहि नव्हती. प्रारंभीं कुटुंब आणि बीजभूत राज्य असा दोन्ही प्रकारचा पितृशासनविशिष्ट संघ असण्याच्या ऐवजीं, स्त्रीपुरुषांचा असा समूह असे कीं, त्यांच्यामध्यें स्थाईक अशा व्यवस्था कांहींच नसत; आणि त्या स्त्रीपुरुषांमध्यें जबरदस्तीनें स्थापन होणाऱ्या आणि जबरदस्ताच्या इच्छेप्रमाणें बदलणाऱ्या संबंधाव्यतिरिक्त इतर संबंध कांहीं नसत.

४८. आणि पूर्वीं अप्रत्यक्षरीत्या दर्शविलेली जी मेनसाहेबाच्या क्लृप्तीमधील उणीव ती येथें आपल्या स्पष्ट नजरेस येते; ती ही कीं, त्या क्लृप्तीमध्यें गोधनविशिष्ट किंवा

कृषिविशिष्ट अशी जी सामाजिक प्रगतीची पायरी, तिच्या पूर्वींच्या पायऱ्यांचा अंतर्भाव मुळीं केलेला नाहीं. जेष्ठ पुरुष, त्याची बायको, त्याचीं मुलेंबाळें, गुलाम, मेंढ्यांचे कळप, गुरांचे गोठे, हीं सर्व मिळून बननेल्या ज्या समूहांचें तो वर्णन करतो, त्यावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं पाळींव जनावरें बऱ्याच जातींचीं असावीं. पण पाळींव जनावरांची पायरी येऊन पोहोंचण्याच्या पूर्वीं ज्यांचा इतिहास मुळींच उपलब्ध नाहीं अशा कित्येक पायऱ्या निघून गेल्या असल्या पाहिजेत. म्हणून पितृशासनपद्धतिविशिष्ट समूहाबद्दल समज पडण्याकरितां, तत्पूर्वींच्या समूहापासून तो कसा उत्पन्न झाला ह्याचा विचार अगोदर केला पाहिजे.

वनस्पतिभक्षक जनावरें माणसाळविण्यास कसल्या प्रकारचा जीवितक्रम असावा लागतो ह्याची जर आपण चवकशी केली, तर वरील प्रश्नाचें उत्तर सांपडण्यास कठीण पडणार नाहीं. ज्या ठिकाणीं कुरण विपुल असून मोठाल्या भागांवरून पसरलेलें असेल, तेथें गुरांढोरांचे व मेंढ्यांचे वगैरे कळप पाळावयाकरितां त्यांच्या मालकांस लहान लहान जमाव करून निरनिराळ्या ठिकाणीं राहणें भाग पडत नाहीं; उदाहरणार्थ, कोमांची लोक पारधी असून शिवाय धनगरहि आहेत, व ते सगळ्यांचीं गुरें राखण्याकरितां मोठाले जमाव करीत असतात. परंतु जेथें गवत वगैरे विपुल नसेल किंवा एकेठिकाणीं नसून, इकडे थोडें तिकडे थोडें अशा रीतीनें पसरलेलें असेल, तेथें पुष्कळ ढोरें एकत्र राखतां येत नाहीं; आणि म्हणून त्यांच्या मालकांस दूर दूर ठि-

काणीं फांकणें भाग पडतें. अशा स्थितींत निरनिराळे पुरुष ज्या बायका व जीं जनावरें जबरीनें किंवा अन्य तऱ्हेनें त्यांस मिळालीं असतील तीं घेऊन, व इतर सर्व चीजवस्त बरोबर घेऊन आपल्या गुरांढोरांच्या पोषणासाठीं इकडे तिकडे भटकत राहतात. बुशमेन लोकांप्रमाणें जे लोक धनगरी स्थितीच्या अगोदरच्या स्थितींत आहेत, त्यांस कधीं कधीं रानअन्न दुर्मिळ झालें म्हणजे अगदीं लहान लहान संघ करून राहवें लागतें, तें इतकें कीं, एकेरी कुटुंबें देखील एकेकटीं राहतात, हें आह्मीं अगोदर दाखविलेंच आहे; आणि म्हणून हें उघडच दिसतें कीं, पारध किंवा बारीक सारीक जीव मिळविण्याच्या ऐवजीं जेथें गुरें ढोरें पोसावयाचीं असतील, तेथें किती जनावरें पोसावयाचीं आणि किती लोकांनीं एकत्र रहावयाचें, हें गवताच्या कमजास्त वैपुल्यावरच अवलंबून रहात असतें.

भटकणारा कुटुंबसंघ स्वाभाविक रीत्या कशा रीतीनें उत्पन्न होतो हें ध्यानांत घेऊन आतां आपण असा प्रश्न करूं कीं, त्याच्या अंगीं कोणते स्वभावविशेष येण्याचा संभव आहे? आपल्या हें अगोदर नजरेस आलेंच आहे कीं, एकाद्या समाजाची जी नियामक सरणी असते, ती सभोंवतालच्या समाजांशीं झगडे होऊन उत्क्रान्त झालेली असते. जे धनगरी समूह विभक्त झाले असतील, व कालेंकरून एकमेकांपासून परके झाले असतील, त्यांच्यामध्यें इतर समूहांप्रमाणें वैरें उत्पन्न झालींच पाहिजेत; आणि त्यांचीं कारणें चुकून दूर गेलेलीं एका कळपाचीं गुरें ढोरें दुसऱ्यानें लुबाडून नेणें, किंवा एकमेकांच्या कु-

रणांचें अतिक्रमण करणें, असल्या प्रकारचीं असलीं पाहिजेत. पण आतां पुराणपद्धतीची टोळी आणि धनगरी टोळी यांच्या पुढच्या उत्क्रमणांतील भेद पहा. पहिल्या प्रकारच्या टोळींत ज्या माणसास शरीरसामर्थ्य, किंवा इच्छासामर्थ्य किंवा कावेबाजपणा यामुळें लढाईंत श्रेष्ठत्व प्राप्त झालें असेल, त्या माणसास तें बहुधा कायम राखतां येत नाहीं; कारण जे लोक इतर बाबतींत त्याच्या बरोबरीचे असतात, ते त्याचा ह्या श्रेष्ठत्वाबद्दल हेवा करीत असतात. पण धनगरी टोळींत ह्याहून निराळा प्रकार उत्पन्न होतो. निरनिराळ्या समूहांमध्यें लढाई झाल्यामुळें प्रत्येक समूहांत एकेक नाईक उत्क्रांत करण्याची जी प्रवृत्ति उत्पन्न होत असते, ला ह्या ठिकाणीं त्या स्थानाला योग्य असा मनुष्यल्याधींचाच तयार झालेला सांपडत असतो. कारण आपण कुटुंबांत जो मुख्यपुरुष असतो, तो अगोदरच मण्यासच्या जोरावर बायको, मुलें, व इतर सर्व ताबेदार ह्अपुढारी, मालक व धनी बनलेला असतो. धनगरी स्थितंच्या अगोदरच्या पायरीवर टोळींतील इतर माणसें त्याच्या कृत्यांना कांहींसें बंधन घालीत असतात, पण ह्या पायरीवर ते तसें करूं शकत नाहींत. पूर्व स्थितींत त्याचे मुलगे पारधी बनून स्वतंत्र होऊं शकत होते; आतां ते तसे होऊं शकत नाहींत.

ह्या दोन प्रकारच्या पायऱ्यांमध्यें आणखी एक भेद आहे. बाप दुसऱ्या माणसांपासून विभक्त झाला म्हणजे, मुलें हीं केवळ आपल्या बायकोचींच नसून आपलींहि आहेत, ही गोष्ट त्याच्या नजरेस ज्यास्त स्पष्टपणें येते.

शिवाय शेजारच्या समूहामध्यें त्याचा समूह त्याच्याच नांवानें मोडत असल्यामुळें, ज्या मुलांस त्याच्या समूहांतील म्हणून म्हणत असतात त्यांस त्याचीं म्हणूनहि म्हणत असतात. पुरुषवंशांत वित्तसंक्रांति होण्याची चाल स्थापन होण्यास अशा रीतीनें सुलभ जातें आणि त्यावरोबरच सर्वांत वडील मुलाची श्रेष्ठता स्थापन होण्याचाहि संभव उत्पन्न होतो; कारण तो मुलगा बापास सर्वांच्या अगोदर मदत करूं लागत असल्यामुळें, वयांत सर्वांच्या अगोदर येत असल्यामुळें, आणि लग्न करून पोराबाळांचा बाप तो सर्वांत अगोदर होत असल्यामुळें, बाप जसा म्हातारा होत जाऊन मरावयाच्या पंथास लागेल, तसे त्याचे अधिकार सहजच याला प्राप्त होऊं लागतात. म्हणून कुटुंबांतील सर्वांत वडील पुरुष वाढत जाणाऱ्या कुटुंबसमूहाचा मुख्य बनण्याची जी सामान्य प्रवृत्ति, ती पिढ्यानुपिढ्या बळावत जाते; आणि तो वडील पुरुष, कौटुंबिक व राजकीय शास्ता, म्हणजे ज्यास पेट्रिआर्क ( patriarch ) किंवा पितृशास्ता म्हणतात तो, तो बनून जाऊं लागतो.

याबरोबरच उद्यमविषयक सहकार्यास देखील उत्तेजन मिळतें. अत्यन्त क्षुद्र जातीचे रानटी लोक कंद,मुळें, फळें, लहानसहान मासे व इतर जीव, इत्यादि खाद्यवस्तू सहकार्याविना मिळवीत असतात. जे रानटी लोक पारधीच्या पायरीस जाऊन पोहोंचले असतील, व मोठालीं जनावरें धरूं लागले असतील, त्यांच्यामध्यें अनियमित प्रकारचें पण बऱ्याच प्रमाणावर संमेलन व्हावें लागत असतें. पण ज्या पायरीवर गुराढोरांचे व

मेंढ्याबकऱ्यांचे मोठाले कळप दररोज चारावे व संभाळावे लागतात, व त्यांच्या दुधाची वगैरे दररोज व्यवस्था लावावी लागते, त्या पायरीवर समाजघटकांस बऱ्याच प्रकारच्या समुदित क्रिया करणें भागच पडून जातें; आणि ज्येष्ठपुरुषशासनाखालीं कर्तव्यांची वांटणी होऊन ह्या क्रियांना नियमित स्वरूप येतें. ही क्रियाव्यवस्था आणि तेणेंकरून उत्पन्न होणारे निरनिराळ्या भागांचें परस्परावलंबित्व यांच्या योगानें सगळ्या समूहास सेंद्रिय शरीराचें स्वरूप प्राप्त होण्यास सुलभ होतें. कारण हळूहळू कुटुंबसमूहाच्या कोणत्याहि घटकांत अगदीं स्वतंत्ररीत्या राहणें अशक्य होऊं लागतें; म्हणजे, कुटुंबाची मदत व आश्रय, आणि पाळींव जनावरांपासून मिळणारें अन्न आणि वस्त्र, यांविना त्यांस राहतां येत नाहींसें होतें. एवंच उद्यमविषयक व्यवस्था आणि राजकीय व्यवस्था ह्या दोन्ही मिळून चांगला व्यवस्थित मांडलेला म्हणजे आंतून परस्परसंबद्ध आणि बाहेरून इतर समूहांपासून स्पष्टरीत्या पृथक् असा समुदाय उत्पन्न करितात.

नंतर कमी वाढलेले समूह नष्ट होऊन ह्या सरणीस जोर येतो. इतर गोष्टी समान असल्यास, जो समूह पुढाऱ्यांच्या अत्यन्त अंकित राहील तो लढाईत जास्त जय मिळवितो. इतर गोष्टी समान असल्यास, जे समूह जास्त काळपर्यंत नायकाच्या हुकुमाप्रमाणें वागून आकारानें वृद्धि पावत जातील त्यांचाहि त्यामुळें फायदाच होतो. आणि इतर गोष्टी समान असल्यास, ज्या समूहांमध्यें पितृशास्त्याच्या हुकुमांस अनुसरून उद्यमविषयक सहकार्य उत्तम बनलेलें असे-

ल त्यांचीहि त्यामुळें सरशीच होते. एवंच " योग्यतमाचा टिकाव " या तत्त्वास अनुसरून, एकमेकांशीं अस्तित्वासाठीं झगडणाऱ्या धनगरी समूहांमध्यें जे समूह नायकांस अंकित राहून व भागांभागांमध्यें परस्परावलंबित्व राखून, अत्यन्त प्रबल झाले असतील तेच समूह पसरत जातात; आणि कालेंकरून पितृशासनविशिष्ट नमुना चांगला ठळक असा बनून जातो. आता यावरून असें समजावयाचें नाहीं कीं, असें होतांना कमी व्यवस्थित असे जे समूह असतील ते अगदींच नष्ट होऊन जातात; कारण वरची सरणी सुलभ रीतीनें चालण्यास जसले प्रदेश असावे लागतात, त्यांमध्यें कमी धनगरी व जास्त लुटारू असे जीवनक्रम चालविणारे कांहीं लहान लहान संघ टिकाव धरून राहूं शकतात.

आतां, अशी परिस्थिति असतां, मालकीच्या संबंधाच्या कांहीं व्यवस्था कशा उत्पन्न होतात तें पहा. मालमत्तेवर व्यक्तींची मालकी उत्पन्न होण्यास वस्तूंचा जो विभाग होणें अवश्य असतें, तो रानटी माणसास गैरमाहीत अशा मापनसाधनाविना फारशा मोठ्या प्रमाणावर करतां येत नाहीं. कारण तसा विभाग करण्यास कालमापनें, संचयमापनें, आणि मूल्यमापनें यांची जरूरी लागते. ज्या वस्तू त्यास आढळतील, त्यानें पकडल्या असतील, किंवा तयार केल्या असतील, त्या आपल्याशा करण्याची जी मूळमाणसाची सरणी, तिजपासून निघून जेव्हां आपण अदलाबदल करणें व कामगिरी बजावणें ह्यांच्यायोगें वस्तू संपादण्याच्या सरणीकडे जातों, तेव्हां अदलाबदल केलेल्या व-

स्तूच्या किंमतीमध्यें लक्षांत येण्यासारखा सारखेपणा उत्पन्न झालेला असतो हें उघडच आहे; आणि जेथें हा सारखेपणा लक्षांत येत नसेल तेथें अदलाबदल करण्यास मोठा विरोध झालाच पाहिजे. म्हणून ज्या वस्तू माणसास स्वतःच मिळवितां येतात, त्या वस्तूंच्या पलीकडे रानटी माणसांत मालकी फारशी गेलेली नसते. धनगरी टोळींत देखील असल्याच अडचणी उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, समूहाच्या हितासाठीं प्रत्येकानें केलेल्या श्रमांची किंमत कशी ठरवावयाची? एक दिवस गायराख्यास जवळच गुरें चारतां येतील; दुसरे दिवशीं दूर जावें लागेल व परत उशीरां यावें लागेल. एके ठिकाणीं धनगरास मेंढ्या चारण्यास चांगलें कुरण सांपडेल; दुसऱ्या ठिकाणीं चांगलें न सांपडून मेंढ्या दूर दूर न्याव्या लागतील, व दूर गेलेल्या परत आणण्यास त्यास ज्यास्त श्रम पडतील. आतां गाईराख्यानें किंवा धनगरानें केलेल्या श्रमांचे हिशेब ठेवतां येणें शक्यच नाहीं; बरें, त्यांना मिळणाऱ्या वेतनावरून उत्पन्नाचा फायदा त्यांस अमुक द्यावयाचा हेंहि ठरविण्याची सोय नाहीं. मुलीनें किंवा दासीनें दूध काढण्याच्या कामीं किंवा कधीं जवळून व कधीं दुरून पाणी आणण्याच्या कामीं केलेले श्रम दररोज निरनिराळे असणार; आणि इतर कामांच्या किंमतीच्या मानानें त्या कामाची किंमत ठरविणें शक्य नसणार. कातडीं तयार करणें, वस्त्र बनविणें, तंबू उभे करणें, इत्यादि कामांच्या संबंधानेंहि असेंच असणार. हीं सर्व संकीर्ण कामें, त्यांस लागणारे श्रम, वेळ, चातुर्य, इत्यादि गोष्टींच्या संबंधानें भिन्न भिन्न असून, तीं द्रव्य किंवा जिन्नस दे-

ऊन घेतां येणार नाहींत; कारण निरनिराळ्या प्रकारच्या चिजा व निरनिराळ्या प्रकारचीं कामें ह्यांच्या परस्पर सापेक्ष किंमती चढाओढीनें ठरविण्यास त्या ठिकाणीं नाणेंहि नाहीं व बाजारहि नाहीं. इतक्या इतक्या कामाची इतक्या इतक्या गाईम्हशी किंवा मेंढ्याबकऱ्या किंमत, अशा रीतीचे अजमासानें ठरविलेले ठोकळ सौदे कदाचित् अशा ठिकाणीं होतील. पण अशा प्रकारचा अगदीं ठोकळमानानें रोजमुरा देण्याचा हा प्रकार टोळीच्या सर्वच घटकांच्या संबंधानें अमलांत आणणें सोईवार पडणार नाहीं हें उघडच आहे; आणि दुसरी गोष्ट अशी कीं तो तसा अमलांत आणिला अशी कल्पना केली, तरी त्या घटकांना आपापल्या रोजमुऱ्याचा स्वतंत्ररीत्या उपभोग घेतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, सर्व मेंढ्यांचा एक कळप केलाच पाहिजे; त्याचे लहानलहान भाग करून प्रत्येकावर निरनिराळा राखणारा नेमूं म्हटलें तर कधीं चालणार नाहीं. दुधाचाहि निकाल सगळ्याचा मिळूनच केला पाहिजे. तें निरनिराळ्या गवळिणींकडून काढूं व खपवूं म्हटलें तर किती तरी श्रम वांया जातील. इतर सर्व गोष्टींचेंहि असेंच होणार. म्हणून त्या टोळींतील घटकांस आपापले श्रम देऊन त्यांचें जें उत्पन्न होईल, त्यांतून आपल्या गरजा भागविण्याची संवय पडून जाते. त्यांच्यातील पितृशास्ता कुटुंबाचा मुख्य, उद्योगाचा सूत्रधार, आणि टोळीचा व तिच्या एकंदर चीजवस्तूचा मालक असल्यामुळें, तो आपल्या अंकितांपैकीं कोणीं काय व किती श्रम करावे हें ठरवीत असतो; आणि त्यांपासून होणाऱ्या उत्पन्नांतून त्यांस

पोसून, बाकीच्याची तो जी वांटणी करितो, ती रूढी, आणि सामान्य मतास फारच झुगारून दिल्यास ते आपल्यास विरोध करतील व टोळींतून निघून जातील ही भीति, ह्या दोहोंच्याच धोरणानें करीत असतो.

टोळींतून निघून जाणें हीजी गोष्ट सांगितली त्यावरून, पितृशासनपद्धतिविशिष्ट समूहाचा जो आणखी एक स्वभावविशेष, त्याची आठवण होते. लहानलहान समाज, सभोंवतालच्या समाजांपैकीं बहुतेकांशीं वैर करीत असल्यामुळें, लढाई करण्याचें ज्यास्त सामर्थ्य यावें एतदर्थ आपली पुरुषसंख्या वृद्धिंगत करण्यास नेहमीं उत्सुक असतात. यासाठीं मुलग्यांचें पोषण चांगलें करतां यावें एतदर्थ ते मुलींस पुष्कळ ठिकाणीं ठार करितात; याच कारणामुळें आफ्रिकेंतील कांहीं भागांत ज्या स्त्रीस पुष्कळ मुलें होतील तीस पाहिजे त्या दुर्वर्तनाबद्दल माफी असते; आणि म्हणूनच हीब्रू लोकांत वांझपणा हें मोठें लांछन समजत असत. असो. आपल्यांत ज्यास्त लढवय्ये आणून प्रबल करून घेण्याची जी ही प्रत्येक टोळीस इच्छा असते, तिच्यामुळें ती इतर टोळ्यांतून पळून आलेल्या लोकांस आपल्यांत घेण्यास फार उत्सुक असते. म्हणून सर्व ठिकाणीं आणि सर्व काळीं पळून जाणें चालू असतें, कधीं बंडखोरांचें आणि कधीं अपराध्यांचें. आफ्रिकेंत आजमित्तीस अशा गोष्टी आढळून येतात कीं, एकाद्या नायकानें आपल्या अनुयायांस फार कडक रीतीनें वागविल्यास ते त्यास सोडून शेजारच्या दुसऱ्या एकाद्या नायकाकडे जातात. कोरोआडो म्हणून एक भटकणारी जात आहे, तींतील लोक लहरीप्रमाणें निरनिराळ्या

टोळ्यांस जाऊन मिळत असतात. धनगरी जातींमध्यें-हि असेंच होत असतें ह्याबद्दलहि आपणास प्रत्यक्ष पुरावा सांपडतो. कालमक आणि मोंगोल ह्या लोकांबद्दल पालास आपणास असें सांगतो कीं, त्यांना त्यांच्या नायकांनीं त्रास दिला म्हणजे ते दुसऱ्या नायकाकडे निघून जातात. असली ही गोष्ट कधीं कधीं सर्वत्रच होत असल्यामुळें, असा कोणी पळून आलेला माणूस मोठ्या पदवीचा किंवा योग्यतेचा असल्यास त्यास टोळींत घेतल्याबद्दलचे कांहीं विशिष्ट विधि होत असतात; उदाहरणार्थ, नांवांची अदलाबदल करणें, रक्तांत रक्त मिसळणें, इ० इ०. या विधींबद्दल कल्पना अशी असते कीं तेणेंकरून तो त्या नव्या टोळीच्या रक्ताचा बनतो. बरें, पण विशिष्ट समूह पारधीटोळीचा नसून पितृशासनविशिष्ट टोळीपैकीं असतो तेव्हां काय होतें ? टोळींत घेणें याचा अर्थ कुटुंबांत घेणें असा त्या ठिकाणीं होतो. ह्या ठिकाणीं टोळी व कुटुंब हीं दोन्ही एकच असल्यामुळें टोळींत घेणें आणि कुटुंबांत घेणें हीं दोन्ही एकच असतात. आणि मूळचें जें टोळींत घेणें त्यापासून उत्पन्न झालेलें जें हें कुटुंबांत घेणें तें, त्याचा मूळ उद्देश नष्ट झाल्यावर देखील, दत्तक घेणें या रूपानें सुधारलेल्या समाजांतून पुष्कळकाळपर्यंत कायम राहतें.

असो. आतां उपपत्ति बरोबर आहे किंवा नाहीं तें पाहूं. धनगरी जीवितक्रम असलेल्या कांहीं निरनिराळ्या जाती स्वभावतः जरी अगदीं भिन्न आहेत, तरी त्यांच्या-बद्दल आपल्यास असें आढळून येतें कीं, ही विशिष्ट

परिस्थिति प्राप्त झाली असतां त्यांना हेंच सामाजिक स्वरूप प्राप्त होत असतें. प्रारंभींच्या सेमाइटलोकांमध्यें हाच नमुना होता हें सांगावयास नकोच; कारण त्यांच्यांतच ह्या स्वभावविशेषाचीं विशेष उदाहरणें सांपडतात. आर्यन लोक भटकणाऱ्या स्थितींत असतां हें स्वरूप त्यांच्यांत दृग्गोचर होत होतें, हें सर हेनरी मेन यानें केलेले शोध व बसविलेलीं अनुमानें यांचे जें वर परीक्षण केलें आहे त्यावरूनच व्यक्त होतें. शिवाय एशियाखंडांतील मोंगोलियन लोकांमध्यें तें दृष्टीस पडतें; आणि तद्वतच दक्षिण आफ्रिकेंतील अगदीं विजातीय लोकांमध्येंहि तें आढळून येतें. उदाहरणार्थ, हाटेंटाट हे लोक पूर्णपणें धनगरी असून शेजारच्या बेचुआना व काफिरलोकांमध्यें व त्यांच्यामध्यें असा भेद आहे कीं, हे जमीन नांगरीत नाहींत; त्यांच्यासंबंधानें आपण असें वाचितों कीं, त्यांच्यांत " सर्व इस्टेटी वडील मुलाकडे जातात, किंवा मुलाच्या अभावीं, अगदीं नजीकचा जो नात्याचा पुरुष असेल त्याच्याकडे जातात "; आणि वडील मुलास बापाच्या मृत्यूनंतर आपल्या भावांबहिणींस एकप्रकारच्या गुलामगिरींत ठेवितां येतें. दुसरी एक गोष्ट अशी ध्यानांत आणावयाची कीं, त्यांच्याच शेजारचे जे डमारा लोक ते सर्वांशीं धनगरी असूनहि त्यांच्या ह्यांच्यांत भेद हा आहे कीं, स्त्रीवंशांत वित्तसंक्रान्ति अद्यापि त्यांच्यांत कांहीं अंशीं होते; त्यांच्यांत कुटुंबाची किंवा टोळीची पितृशासनविशिष्ट घटना फारशी उत्पन्न झालेली नाहीं, आणि त्यांच्यांत सर्वांनीं एकाच्या अंकित राहण्याचीहि संवय फारच अल्प दृष्टीस पडते; आणि

शिवाय, काफिरलोक जरी बऱ्याच अंशीं धनगरी आहेत, तरी कांहीं अंशीं ते शेत्येहि आहेत; व म्हणून त्यांच्यांत कौटुंबिक व सामाजिक पितृशासनहि बेताचेंच आहे.

आतां धनगरी स्थितीखेरीज दुसऱ्या कोणत्याहि स्थितींत हा कुटुंबनमुना उत्पन्न होत नाहीं असें म्हणणें मात्र बरोबर होणार नाहीं. पारधी जीवितक्रमापासून शेती जीवितक्रमांत एकदम संक्रमण चाललें असतां, तो उत्पन्न होणार नाहीं असें म्हणण्यास आपणापाशीं पुरावा नाहीं. पण असें दिसतें कीं बहुधा अशा प्रकारचें संक्रमण होत असतां त्याबरोबर निराळ्याच प्रकारचे फेरबदल उत्पन्न होत असतात. पालिनिशियाप्रमाणें ज्या ठिकाणीं धनगरी जीवितक्रम अशक्य असेल, किंवा पेरू व मेक्सिको या देशांप्रमाणें जेथें तो पूर्वीं कधींहि होता असें मानण्यास कारण दिसत नसेल, त्या ठिकाणीं राजकीय व गृहव्यवस्था, वित्ताची स्त्रीवंशसंक्रान्ति ही जी मूळची पद्धति तिनें थोड्या फार अंशीं विशिष्ट असून, त्यांस पुरुषवंशसंक्रान्ति व तदनुषंगिक व्यवस्था यांचीं स्वरूपें कांहीं अंशीं प्राप्त झालेलीं आहेत; पण नेहमींची युद्धशील व्यवस्था असतां जीं कारणें उत्पन्न होत असतात, त्यांच्याच प्रभावेंकरून तीं स्वरूपें प्राप्त झालेलीं असतात. पेरूव्हियन लोकांत "युका लोक खेरीजकरून इतरत्र पुत्रांकडे इस्टेट न जातां पुतण्याकडे जाते" असें जें गोमारा म्हणतो तें ह्याचेंच निदर्शक होय. कांहीं आफ्रिकन् लोकांत ही गोष्ट ह्याच्याहूनहि ज्यास्त स्पष्टरीत्या दिसून येते. किनाऱ्यावरच्या नीग्रो लोकांत नातीं सामान्यतः स्त्रियांकडून लेखीत असून,

त्यांच्या निरनिराळ्या समाजांत निरनिराळ्या राज्यव्यवस्था आहेत, आणि त्यांतील बहुतेक अस्थिर आहेत; त्यांच्यापैकीं कांहीं लोकांत पुरुषवंशसंक्रान्ति स्थापन झाली आहे. किनाऱ्याच्या आंतील नीग्रोंमध्यें देखील कुटुंबांत व राज्यांत बहुतेकांशीं स्त्रीवंशांत वित्तसंक्रान्ति होत असून त्या लोकांनीं खासगी व सार्वजनिक संस्थांत पितृशासनपद्धतींतील व्यवस्थांसारख्या कांहीं व्यवस्था स्थापिल्या आहेत; आणि कांगोमध्येंहि अशीच स्थिति आहे. शिवाय, डेहामीच्या प्रबल राष्ट्रांत राजसत्ता स्थिर व पूर्णपणें स्वेच्छाचारी झालेली असून, पुरुषवंशांत वित्तसंक्रान्ति आणि ज्येष्ठपुत्राचा हक्क हीं पूर्णपणें स्थापन झालीं आहेत; आणि कमी स्वेच्छाचारी राज्यव्यवस्था असलेला जो आशान्टी देश, तेथें ह्या दोन गोष्टी अंशतः स्थापन झाल्या आहेत.

पण कुटुंबाचा पितृशासनविशिष्ट नमुना इतर प्रकारच्या स्थितींत उत्पन्न होवो वा न होवो; आपणास असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, तो उत्पन्न होण्यास धनगरी स्थिति फारच अनुकूल असते. उत्क्रान्तिविषयक सामान्य नियमापासून असा एक सिद्धान्त निष्पन्न होतो कीं, जातीनें, संचयानें, आणि दिशेनें सदृश अशा शक्तीचा ज्याच्यावर प्रभाव होत आहे असा एखादा घटकसंचय असल्यास, त्याचें संकलन सारखें चालू राहतें; आणि म्हणून हें उघडच आहे कीं, एखाद्या भटकणाऱ्या कुटुंबाचे जे घटक ते त्यांचीं स्वताचीं सामान्य हिताहितें, आणि इतर कुटुंबांशीं जीं सामान्य वैरें, त्यांनीं एकमेकांकडे ओढिले गेल्यामुळें प्राथमिक प्रकारच्या टोळींतील कुटुंब-

घटकांपेक्षां ते परस्परांशीं ज्यास्त संकलित होत असतात; कारण अशा टोळींत निरनिराळ्या कुटुंबांचीं जीं सामान्य हिताहितें असतात, तीं जातिविषयकच विशेष असतात. जसा ह्याहून मोठा असा एकादा सामाजिक समूह तसल्याच शेजारच्या समूहांशीं लढणाऱ्या आपल्या घटकांच्या सहकार्यानें सुसंबद्ध बनतो, तसाच भटकणाऱ्या लोकांच्या संघाचा बनलेला हा अत्यल्प लहान असा सामाजिक समूह त्याच कारणांनीं तसाच बनतो. ह्या सुसंबद्धतेबरोबर जीं विभिन्नीकरणें उत्पन्न होतात, त्यांजबद्दलहि असेंच म्हणतां येईल. जसें एकाद्या मोठ्या समाजाचें सरकार तसल्याच इतर समाजांशीं चाललेल्या झगड्यांमध्यें उत्क्रान्त होतें, तसेंच ह्या अत्यन्त लहान समाजाचेंहि उत्क्रान्त होतें. आणि ज्या अर्थीं ह्याठिकाणीं समाज व कुटुंब हीं एकच असतात, त्या अर्थीं समाजाच्या नियामक सरणीची ( शासनपद्धतीची ) जी वाढ, तीच कुटुंबाच्याहि नियामकसरणीची वाढ असते. शिवाय, सारखवटपणावरून असें दिसतें कीं, ह्या शासनसरणीनें कौटुंबिक समूहास जी उच्चतर घटना प्राप्त होते, तिच्या योगानें ह्या सरणींतून जे कौटुंबिक समूह गेलेले नाहींत त्या समूहांपेक्षां, हा समूह मागून बनणाऱ्या समाजांचा जास्त चांगला घटक बनतो. अगोदरच हें आपल्या लक्षांत आलें आहे कीं, मोठीं राष्ट्रें अनेक समूहांचें एकीभवन व पुनरेकीभवन होऊन बनत असतात. लहान समाजांस प्रथम कांहींसा घट्टपणा व घटना हीं प्राप्त करून घ्यावीं लागतात; नंतर त्यांच्या अंगीं संयुक्त समाजांशीं संयोग पावण्याचें सामर्थ्य येतें; आणि हे संयुक्त-

समाज चांगले संकलित झाले म्हणजे त्यांचे पुन:संयोग होऊन आणखीहि मोठाले समाज बनूं शकतात; आणि अशा रीतीनें हें गाडें चालतें. आतां असें दिसून येतें कीं, कुटुंब हा जो अत्यन्त लहान समूह तेथून ही एकीकरणसरणी सुरू झाल्यास, सामाजिक उत्क्रमण अत्यन्त उत्तम रीतीनें होतें: कारण असलेच समूह वर सांगितलेल्या रीतीनें सुसंबद्ध आणि निश्चितस्वरूप होऊन, आणि नंतर त्यांचें संयोगीभवन व पुन:संयोगीभनव होऊन, उच्चतम समाज उत्पन्न झालेले आहेत.

सामाजिक शरीरें आणि व्यक्तिशरीरें ह्यांमधील एका प्रकारच्या सारखवटपणावरून ह्या अनुमानांस जोर येतो. उदाहरणार्थ, एके ठिकाणीं सर हेन्री मेन असें म्हणतो कीं, " मूळची जी पितृशासनबद्ध कुटुंबरूप सूक्ष्म पिशवी, तिजपासून उत्पन्न झालेल्या संयुक्त कुटुंबापासून मनुष्यसमाजाच्या सर्व शाखा उत्पन्न झाल्या असतील किंवा नसतील; पण एवढी गोष्ट खरी आहे कीं, जेथें जेथें संयुक्तकुटुंब आर्य लोकांची संस्था म्हणून दृष्टीस पडते, तेथें तेथें अशा सूक्ष्म पिशवीपासूनच उत्पन्न झालेले, आणि नष्ट होतांना अशा प्रकारच्या अनेक पिशव्यांच्या रूपानें लय पावणारें, दृष्टीस पडतें. " ह्या त्याच्या म्हणण्याचा आशय अर्थात् असा आहे कीं, व्यक्तिशरीराचा शरीरघटकद्रव्याची सूक्ष्म पिशवी ( cell ) हा जसा जवळचा घटक आहे, तसा समाजशरीराचा कुटुंब हा नजीकचा घटक आहे. तथापि दोन्ही ठिकाणीं ही गोष्ट जरी सामान्यतः खरी आहे, तरी सर्वांशीं खरी नाहीं; आणि त्याला जो हा

अपवाद आहे तो अत्यन्त सूचक आहे. प्राणिकोटींतील अगदीं खालच्या थरावर कांहीं जीव असे आहेत कीं, त्यांच्या ठिकाणीं निश्चित अशी पिशवीरूप घटना दृष्टीस पडत नाहीं. उदाहरणार्थ, फोरामिनिफेरा ( Foraminifera ) नांवाचा जो सूक्ष्मतम जंतुवर्ग आहे, त्याच्या शरीरघटक स्पष्ट अशा सूक्ष्मपिशव्या किंवा " सेल्स " ( cells ) दृष्टीस पडत नाहींत. पण ह्याच्या वरचे जे जीववर्ग आहेत त्यांच्यामध्यें त्या सर्वत्र दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, सीलेंटरेटा या पुष्कळ पिशव्यांच्या प्रत्येक प्राण्याच्या, आणि मऊ अंगाच्या, कड्याकड्यांच्या, व मणक्याच्या, प्रत्येक प्राण्याच्या शरीरघटनेला, निश्चितस्वरूप अशा पिशव्यांच्या एका संचयापासूनच सुरवात होते. ह्यावरून असें दिसतें कीं, अत्यन्त क्षुद्र अशा जीवाचा घटक असा जो विभिन्नीकरण न पावलेला प्रोटोप्लाझमचा जीवघटकद्रव्याचा कण त्याचा तसल्याच इतर कणांशीं संयोग झाल्यानें त्यापासून उच्चतर जीवाची उत्पत्ति होऊं शकणार नाहीं; आणि म्हणून हें उघड होतें कीं, सरलतम अशा समूहांपासून संयोगानें बरीच वृद्धि पावणारे मोठाले समूह बनण्यास, हे सरलतमसमूह स्वतः बरीचशी पक्वदशा पावलेले असले पाहिजेत. समाजांचेंहि असेंच असलें पाहिजे. ज्या टोळ्यांमध्यें कुटुंब अस्पष्ट व अस्थाईक असेल, त्या राजकीयदृष्ट्या रानटीच राहतात. कांहीं अर्धवट सुधारलेले असे लोक त्यांच्यांत कुटुंबघटनेस कांहींशी निश्चितता व सुसंबद्धता आलेली असल्यामुळें, तितक्या मानानें उच्च अशा समाजघटनेस पावलेले आहेत. आणि जीं राष्ट्रें

प्रथम चांगल्या व्यवस्थित बनलेल्या कुटुंबसमूहाच्या संयोगीभवनानें बनलेलीं आहेत, तीं उच्चतम अशा घटनेस पोंहोचलेलीं आहेत.

४९. आणि आतां ह्या उच्चतम समाजांचाच तेवढा विचार करतां, त्यांच्या पुष्कळ कल्पना, चाली, कायदे आणि व्यवस्था, पितृशासनविशिष्ट समूहापासून कशा उत्पन्न झाल्या आहेत हें दाखविण्याबद्दल सर हेन्री मेन ह्यांचे आभार मानणें जरूर आहे.

पुष्कळ पिढ्यांपर्यंत कांहीं जीवितक्रम सुरू राहिले म्हणजे ते सर्वत्र स्वभावच बदलून टाकितात; आणि त्या क्रमांपासून जे चिरकालिक समज व रूढी उत्पन्न होतात त्या बदलणें फार कठीण पडतें. म्हणून पितृशासनविशिष्ट कुटुंबाचें चंचल असें धनगरी जीवित जाऊन जेव्हां स्थाइक असें कृषिविषयक जीवित प्राप्त झालें तेव्हां त्याचे पूर्वींचे स्वभावविशेष तसेच कायम राहिले होते; म्हणून पुढें ज्या सामाजिक रचना उत्पन्न झाल्या त्यांच्यावर त्यांचा छाप सहजच उठला. सर हेन्री मेन म्हणतो," पितृशासनविशिष्ट कुटुंब असलेल्या प्राथमिक समाजांतून कुटुंबाहून मोठाले असे जे समूह असतात ते कुटुंबच बहुगुणित होऊन बनलेले आणि बहुतेक त्याच नमुन्यावर तयार झालेले, असे आढळून येतात. " अशा रीतीनें जे भाग उत्पन्न होतात ते अनेक प्रमाणांनीं एकमेकांपासून भिन्न असे असतात. "हिंदूंच्या संयुक्त व अविभक्त अशा कुटुंबांतील निरनिराळे खुंट हे प्रत्यक्ष एकाच कुटुंबाचे भाग असतात, आणि ते घराच्या निरनिराळ्या भागांत एकत्र राहतात, आणि

यूरोपाच्या कांहीं भागांतहि अशीच स्थिति आहे. दुसरा एक ग्रंथकार असें म्हणतो कीं, रशियांतील शेतकऱ्यांप्रमाणें बल्गेरियन लोक जुन्या पितृशासनपद्धतीस चिकटून राहिलेले आहेत; आणि आजा मरेतोंपर्यंत बाप आणि त्याचे विवाहित पुत्र आपल्या मुलां व नातवंडांसह एकाच आड्याखालीं राहतात; जसें एकेका जास्त मुलाचें लग्न होत जाईल तशी जुन्या घराला एकेक नवी खोली काढितात, व अशा रीतीनें नवी पिढी धरून एकाच आढ्याखालीं वीसपासून तीस लोक देखील एकत्र राहिलेले पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतात; आणि ते सर्व कुटुंबांतील मुख्याच्या आज्ञेंत राहून त्यास पूज्य मानीत असतात. असल्या कुटुंबाची आणखी वाढ झाल्यानें ग्रामवस्ती उत्पन्न होते, आणि त्यामध्यें घरें आणि कांहीं अंशीं स्थावर इस्टेटें भिन्न झालेलीं आढळून येतात. आणि जेथें ह्याहून मोठाल्या वस्त्या होतात आणि निरनिराळे खुंट मिश्रित होतात, त्या ठिकाणीं मोठ्या समूहांमध्यें असे पोटसमूह उत्पन्न होतात कीं, तेणेंकरून रोमन लोकांतल्या सारखे कुटुंब, घर ( घराणें ) आणि टोळी असे वर्ग उत्पन्न होतात, आणि त्या सर्वांना त्यांचा जो सामान्य मूळजनक तेंच सर्वत्र बंधन असतें.

नवीन परिस्थितीमध्यें जेथें पितृशासनविशिष्ट रचना दृष्टीस पडतात, तेथें तद्विशिष्ट तत्त्वेंहि दृष्टीस पडतात. उदाहरणार्थ, अशा समाजांत ज्येष्ठ पुरुषाचें श्रेष्ठत्व कायम राहतें; आणि रोमन लोकांतल्याप्रमाणें तेणेंकरून कधीं कधीं त्या पुरुषास आपली बायको व मुलें यांस

जिवंत ठेवणें किंवा मारणें हाहि अधिकार प्राप्त होतो. तद्वतच अशा ठिकाणीं पुष्कळ काळपर्यंत अशी कल्पना कायम राहते कीं, व्यक्तीचे जे अपराध असतील, ते तो ज्या समूहांतील असेल त्या समूहाचे अपराध होत; आणि त्यामुळें त्या समूहास त्या अपराधांबद्दल जबाबदार धरणें व शिक्षा करणें हीहि चाल सुरू राहते. तद्वतच पुरुषवंशांतून नातें गणणें व तदनुरूप वारसदारीचे कायदे सुरू ठेवणें, ह्याहि गोष्टी बरोबरच येतात. आणि त्यामुळें पितृपूजाहि अशा पद्धतीची उत्पन्न होते कीं, तिजमध्यें कुटुंब, घर, आणि जात, हीं सर्व येतात आणि ज्या मानानें मूळ पुरुष ज्यास्त प्राचीन असेल, त्या मानानें हे समूह ज्यास्त मोठाले असतात. पण हे जे पुढचे परिणाम त्यांशीं आपणास एथें कर्तव्य नाहीं. कारण ते गृहविषयक चमत्कारांपेक्षां समाजविषयक चमत्कारांतच ज्यास्त मोडतात.

पण आणखी एक सत्य सर हेन्री मेन आपणास सांगतो, त्याशीं मात्र आपणास एथें कर्तव्य आहे; तें कुटुंबाचें विकलन किंवा विस्कलित होणें हें होय. तो म्हणतो, “ प्राचीन समाजाचा अत्यन्त लहान घटक म्हटला म्हणजे कुटुंब हा असे, आणि अर्वाचीन समाजाचा व्यक्ति हा आहे ”. आतां ज्या अत्यन्त प्राचीन समाजांत कुटुंब अपक्वस्थितींत असे ते समाज वजा करतां, ह्या सामान्य सिद्धान्तास पुष्कळ उदाहरणांचा आधार सांपडतो; आणि तो अत्यन्त महत्त्वाचा आहे. पितृशासनविशिष्ट कुटुंबाच्या उत्पत्तीबद्दल वर ज्या सूचक गोष्टी सांगितल्या आहेत, त्यांची आठवण करून आपण जर असा

प्रश्न केला कीं, ज्या कारणांनीं तें कुटुंब बनलें गेलें त्या कारणांच्या ऐवजीं त्यांच्या विरुद्ध कार्य करणारीं कारणें उत्पन्न झाल्यास काय होईल, तर हा फरक कां उत्पन्न झाला आहे हें आपल्या लक्षांत येईल. अत्यन्त हलक्या समूहांत निरनिराळ्या कुळांतील व्यक्तींमध्यें लढाई व शिकार या बाबतींत जरी सहकार्य होत असतें तरी कुटुंब अनिश्चित व असंबद्ध असेंच राहतें, व त्या ठिकाणीं व्यक्ति हाच मूल घटक असतो. पण जेव्हां अपूर्णपणें बनलेल्या कुटुंबांचे, व त्यांच्या जनावरांचे मिळून निरनिराळे समूह बनतात, म्हणजे जेव्हां वरील सहकार्यें समाजदृष्ट्या परस्परसंबद्ध व कुटुंबदृष्ट्या परस्परसंबद्ध अशाच व्यक्तींमध्यें होऊं लागतात, तेव्हां कुटुंब हें निश्चितस्वरूप, एकवटलेलें, व व्यवस्थित, असें बनतें; आणि त्यावर अधिकार चालविणारा पुरुष जास्त प्रबल बनतो, कारण तो त्या कुटुंबरूपी समाजाचा राजा असतो व पिताहि असतो. धनगरी समूह हा एकसमयावच्छेदेंकरून कुटुंब व समाज दोन्ही असल्यामुळें त्याला जी ही घटना प्राप्त होते, आणि जी कलहानें व योग्यतमाच्या टिकावानें हळूहळू ज्यास्त पक्क होत जाते, ती त्या समूहास स्थाईक जीवित प्राप्त झालें तरी कायमच राहते. पण स्थाईक जीवितक्रमास एकमेकांच्या जवळजवळ असलेले अनेक समूह बनून राहणें जरूरीचें असतें; आणि ह्या बदललेल्या परिस्थितींत, ह्या अनेक समूहांपैकीं प्रत्येक, प्रारंभीं ज्या क्रियांनीं त्याची घटना उत्पन्न झाली त्यांपैकीं कांहींपासून मुक्त होऊं लागतो, आणि त्याचें विघटन करितील अशा कांहीं नवीन क्रियांच्या

माऱ्यांत सांपडूं लागतो. विवृद्ध होणाऱ्या कुटुंबांमध्यें जरी अद्यापि तंटे उद्भवत असतात, तथापि पिढ्यानुपिढ्या तीं एका ठिकाणीं राहिल्यामुळें त्यांच्या आप्तपणाचा जो मनोभाव त्यांच्या मनांत आतां बिंबून गेलेला असतो, तो त्यांस आपापसांत फारसे विरोध उत्पन्न करूं देत नाहीं. शिवाय जी एकाच मूळ पुरुषाची पितृपूजा कांहीं विशिष्ट कालीं ते मोठ्या तत्परतेनें करीत असतात, तिचा देखील त्यांच्या परस्परद्वेषांवर आळाबंदा पडतो, आणि ती त्यांस एकत्र ठेवण्यास कारणीभूत होत असते. शिवाय, आतां एकेकट्या कुटुंबावरच शत्रूंचा हल्ला होण्याचा संभव नसतो, तर अनेक कुटुंबांवर मिळून हल्ला झाल्यास होत असतो, आणि तीं सर्व मिळून त्याचा प्रतिकार करीत असतात; अशा रीतीनें त्यांच्यांत सहकार्यास उत्तेजन मिळतें. सामाजिक वाढीच्या पुढच्या सर्व पायऱ्यांवर हें सहकार्य वाढत जातें; आणि जीं कुटुंबें सारख्याच बाह्य शक्तींच्या माऱ्यांत असतात, तीं संकलन पावत जातात. अगोदरच हें आपल्या लक्षांत आलें आहे कीं असल्याच सरणीनें टोळ्या, जमीनदाऱ्या, लहान लहान राज्यें इत्यादि लोकवस्त्या संयोग पावून मोठाल्या बनत असतात, आणि सहकार्याच्या योगानें प्रथम इतरांवर हल्ले करणें व आपलें संरक्षण करणें यांसाठीं, आणि मागून इतर कार्यांसाठीं, त्यांच्यामध्यें जो संयोग किंवा एकवटपणा बनत जातो, त्याबरोबरच त्या समूहांतील जो भेदभाव तो हळू हळू नष्ट होऊन जाऊं लागतो, आणि ते एकमेकांत जास्त जास्त मिळून जाऊं लागतात. असो. ह्या ठिकाणीं लक्षांत आणावयाचें तें हें कीं, अ-

त्यन्त लहान समूहांच्या संबंधानें देखील असेंच होत असतें.

रोमनलोकांमध्यें पुढें ज्येष्ठपुरुषाचा अधिकार कमी कसा होऊं लागला त्याची उपपत्ति जी मेन साहेबानें केली आहे, ती ह्या सामान्य तत्त्वासच धरून आहे. त्यासंबंधानें तो असें सांगतो कीं, पुढें बाप आणि मुलगा ह्यांस लष्करी व दिवाणी अशीं सरकारी कामें सारख्याच नात्यानें करावीं लागूं लागलीं, व तो सारखेपणा घरच्या भेदभावाहून अर्थातच निराळा असे; त्यामुळें पुढें मुलाला अधिकार, सत्ता, लूट, इत्यादि स्वतंत्रपणें मिळूं लागल्यामुळें त्याच्यावरील बापाचा अनिर्बंध अधिकार हळूहळू कमी होऊं लागला. ह्याप्रमाणें एकाच कुटुंबांतील व्यक्ती भिन्नभिन्न नात्यांनींच केवळ न वागतां, सरकारी अधिकार व शत्रू ह्यांचे संबंधानें सारख्या नात्यानें वागूं लागल्यामुळें, खासगी सहकार्य व आज्ञांकितपणा हीं कमी होऊन सार्वजनिक सहकार्य व आज्ञांकितपणा हीं वाढत चाललीं. आणि शेवटीं जे मोठाले समुदाय बनले, त्यांमध्यें उद्यमविषयक क्रियांचाहि परिणाम असलाच होत गेला. कारण स्वतःच्या उद्योगधंद्यापासून होणाऱ्या किफायतीचा जो तो मालक, असें झाल्याशिवाय उद्योगधंद्यास तेजी अशी कधींच येत नाहीं.

असो. आतां सामाजिक शरीराच्या रचनेंतील हा फेरबदल आणि व्यक्तिशरीराच्या घटनेंतील एक फेरबदल ह्यांच्यामध्यें जें विलक्षण साम्य आहे, तें लक्षांत आणूं. आधीं आपल्या नजरेस आलेंच आहे कीं, निश्चितस्वरूप व ठिपक्याच्या अशा सूक्ष्म पिशव्यांच्या एकीभवनापासूनच उच्चतर शरीरांचे पाये घातले जातात; त्याप्रमाणेंच-

चांगले पक्क झालेले जे साधे पितृशासनविशिष्टसमूह त्यांच्या संयोगीभवनापासूनच उच्चतर समाजांचें अखेरीस उत्क्रमण होत असतें. ह्याठिकाणीं आतां असें ज्यास्त सांगणें जरूर दिसतें कीं, उच्चतर अशा व्यक्तिशरीरामध्यें ज्या एकीभूत पिशव्यांचा गर्भ बनत असतो, व ज्या पिशव्या कांहीं काळपर्यंत पृथक् पृथक् राहत असतात, त्यांच्या ऐवजीं पुढें अशा घटना उत्पन्न होतात कीं, त्यांच्यांत पिशव्यांचें स्वरूप स्पष्ट दिसत नाहीं, व बहुतेक नष्टच होतें; त्याप्रमाणेंच समाजशरीरामध्यें जे साधे कुटुंबसमूह व संयुक्त कुटुंबसमूह उच्चतर समाजाचे प्रारंभीं मुख्य घटक असतात, ते अखेरीस स्पष्टपणें पृथक् म्हणून दिसत नाहींसे होतात; आणि त्यांच्या ऐवजीं पुष्कळ निरनिराळ्या कुळांतील व्यक्ती संमिश्रित होऊन त्यांच्याच सामाजिक घटना बनून जातात.

५०. ह्या ठिकाणीं एक फार महत्त्वाचा प्रश्न उभा राहतो, आणि त्याचा समाजनीतीशीं फारच निकट संबंध आहे; तो हा कीं, कुटुंबाचें हें जें विघटन किंवा विकलन होत जातें त्यास कांहीं मर्यादा आहे काय?

ज्या सरणीनें कुटुंबसमूह विस्कळित होऊन गेले, आणि टोळ्या व जाती ह्या फांकून जाऊन कुटुंब तेवढें शिल्लक राहिलें, ती सरणी मोठाल्या राष्ट्रांतून आज पुष्कळ दिवस पुरी होऊन गेलेली आहे, आणि कुटुंबाचींहि कांहींशीं विकलनें होऊन गेलीं आहेत. ज्या फेरबदलांच्या योगानें अपराधांच्या संबंधानें कुटुंबाची जबाबदारी उत्पन्न झाली आहे त्या फेरबदलांबरोबरच दुसरे असे कांहीं

फेरबदल होऊन गेले आहेत कीं, तेणेंकरून कुटुंबांची त्यांतील माणसांबद्दल इतर बाबतींतील जी जबाबदारी ती कांहीं अंशीं निघून गेली आहे. ज्या मुलांचीं आई-बापें त्यांस पोसण्यास नाखुश किंवा असमर्थ असतील, त्यांस पोसण्याची सार्वजनिक तरतूद " गरीबांच्या कायद्यानें " जेव्हां करून दिली, तेव्हां समाजानें तितक्या पुरतीं कुटुंबकर्तव्येंच आपल्या शिरावर घेतलीं; आणि मुलें पोशीत नाहींत अशा आईबापांची काळजी जेव्हां सरकार घेऊं लागलें, तेव्हांहि कांहीं अंशीं तसेंच झालें. आपल्या मुलांच्या मनांची काळजी वाहण्याच्या जबाबदारींतून आईबापांस मुक्त करून, आणि आईबापांच्या नजरेखालीं मुलांचें शिक्षण होण्याच्या पद्धती ऐवजीं सरकारच्या नजरेखालीं तें देण्याची पद्धति स्थापन करून, कायद्यानें कुटुंबबंधनें जास्तच सैल करून टाकिलीं आहेत, आणि ज्याठिकाणीं, आईबापांनीं टाकून दिलेल्या मुलांना शाळेंत पाठविण्यापूर्वीं त्यांना अंगावर घालण्यास वस्त्रें करून देणें, व त्यांनीं शाळेंत जावें एतदर्थ त्यांस मार देणें, हें अधिकाऱ्यांस जरूर वाटूं लागलें आहे, त्या ठिकाणीं जबाबदारीची ही संक्रान्ति जास्तच झाली आहे. समाजाचा घटक कुटुंब न मानतां व्यक्ति मानणें ही कल्पना हल्लीं इतकी बळावली आहे कीं, सरकारानें मुलांस बापाप्रमाणें वागविलें पाहिजे ही गोष्ट पुष्कळांना स्वतः स्पष्ट वाटूं लागली आहे; आणि अपराध्यांना " समाजाच्या चुकीचे परिणाम " असें म्हणूं लागले आहेत.

**स्पेन्सर** साहेब म्हणतात, हीं जीं विकलनें झालीं आहेत,

तीं योग्य प्रगतीचेंच भाग आहेत असें समजावयाचें कीं काय ? अमेरिकेंत व इतर कांहीं ठिकाणीं कांहीं सोशियलिस्ट ( राष्ट्रांतील सर्व वस्तूंवर सर्वांची सारखी मालकी असावी असें म्हणणारे ) लोकांची जी स्थिति झाली आहे, तिकडेच आपण चाललों आहों कीं काय? ह्या लोकांमध्यें सर्व मालमत्तेवर, आणि कांहींअंशीं बायकांवरहि सर्वांची सारखी मालकी असून, मुलांच्या जोपासनेच्या संबंधानेंहि सर्वांवर सारखीच जबाबदारी आहे: म्हणजे, ह्यांच्यांत कुटुंबाचें पूर्ण विघटन झालेलें आहे. साहेब म्हणतात, आह्मीं ( इंग्रज लोकांनीं ) अशा प्रकारच्या व्यवस्थेकडे कांहींअंशीं प्रगति केली आहे; ती कालान्तरानें सर्वांशीं करणार कीं काय ?

जीवशास्त्रविषयक ज्या सिद्धान्तांचें ह्या ग्रंथाच्या प्रारंभींच आपण निरूपण केलें, त्या सिद्धान्तांमध्येंच ह्या प्रश्नाला स्पष्ट उत्तर दिलेलें आहे. दुसऱ्या प्रकरणांत आपण असें दाखविलें कीं, उच्चतम प्रकारच्या प्राण्यांकडे जशी प्रगति होत जाते, तसा आईबापांनीं संततीची काळजी वाहण्याचा जो काळ त्याची मर्यादा वाढत जाते; आणखी तेथें आपण असें दाखविलें कीं, मानवजातीमध्यें आईबापांकडून होणारी मुलांची जोपासना सगळ्या मूलवयांत चालू राहत असून ती विशेष संकीर्णहि होऊन जाते; आणखी तिसरी गोष्ट अशी दाखविली कीं, उच्चतम जातीच्या उच्चतम घटकांमध्यें ही जोपासना मूल प्रौढवयांत आल्यावरहि कांहीं काळ सुरू राहते: कारण ह्या अमदानींत आईबाप मुलांचें शारीरिक कल्याण व्हावें एतदर्थ अनेक उपायांची यो-

जना करीत असतात, त्यांच्या नैतिक शिक्षणाबद्दल खबरदारी घेतात, आणि त्यांच्या बुद्धिविषयक शिक्षणाखालीं संमिश्र योजना करीत असतात. शिवाय, तेथें आपल्या लक्षांत अशी गोष्ट आली कीं, आईबापांची मुलाबद्दलची काळजी ह्या रीतीनें जशी बळावत व दृढावत जाते, तशी आईबापांबद्दल मुलालाहि जास्त जास्त आस्था वाटूं लागते. मानवी जातीच्या खालच्या नमुन्याचे जे प्राणी आहेत त्यांच्यांतील उच्चतमांमध्यें देखील आईबापांबद्दलची ही काळजी संततीमध्यें असत नाहीं. हलक्या मानवजातींमध्यें ती अगदीं अल्प प्रमाणावर असते; कारण त्यांच्यांत कांहीं ठिकाणीं वृद्ध मातापितरांस ठारच करितात, व कांहीं ठिकाणीं अन्नावांचून मरूं देतात. आणि उच्चतर उच्चतर अशा सुधारलेल्या जातींकडे जसें जावें, तशी आईबापांस मदत करण्याची व त्यांचें संरक्षण करण्याची प्रवृत्ति मुलांमध्यें ज्यास्त जास्त दिसून येते. असें जर आहे, तर आणखी उत्क्रमण चाललें असतां, ही सर्व सरणी आह्मी उलटी करणार कीं काय? प्राणिसुधारणेच्या अलीकडच्या पायऱ्यांवर पितृप्रेमाचे व पुत्रप्रेमाचे जे बंध ज्यास्त ज्यास्त निकट व बळकट होत चालले आहेत, ते आतां अविश्वसनीय मानावयास लागावयाचें कीं काय? आणि त्यांच्या ऐवजीं सामाजिक बंधनांवर तेवढा भरंवसा टाकावयाचा कीं काय? ज्या अत्यन्त जोराच्या मनोवृत्तींमुळें आईबापांना मुलांसंबंधी आपलीं कर्तव्यें बजावणें ह्यांतच फार सुख वाटतें, त्या मनोवृत्ती आतां कुचकामाच्या म्हणून समजावयाच्या कीं काय? आणि सर्व मुलांबद्दलची जी सामान्य

लोकांची कर्तव्यबुद्धि, ती आईबापांची उपजतबुद्धि आणि सहानुभूति यांच्यापेक्षां ज्यास्त चांगली व ज्यास्त कार्यकर असें मानून ती प्रत्येक पुरुषानें व स्त्रीनें ज्यास्त अमलांत आणावी असें ठरवावयाचें कीं काय? या प्रश्नांस कांहीं आत्यन्तिक लोक खेरीजकरून बाकी थोडेच लोक 'होय' म्हणून उत्तर देतील.

कुटुंबाचें विघटन ह्याहूनहि जास्त होण्याचा संभव नाहीं इतकेंच नाहीं, तर हल्लींच तें बेताबाहेर गेलें आहे असें मानण्यास कारण आहे. बहुधा फेरबदलांचा जो तालबंध किंवा झोंका आहे त्याच्या नेहमींच्या सरणीस अनुसरून आपण एका टोंकावरून निघून दुसऱ्या टोंकाकडे बरेच लांबवर गेलों आहों; म्हणून आतां उलट दिशेस त्याची गति होण्याचा विशेष संभव आहे. याच्याशीं सूचक रीतीनें सदृश अशी दुसरी एक गोष्ट आहे; तिचा एथें उल्लेख करणें गैरवाजवी होणार नाहीं. अगदीं प्रारंभीच्या पायऱ्यांवर जनकजन्य नातें म्हणून जें कांहीं ओळखत असत, तें आईचें व मुलाचें तेवढेंच असे; नंतर हळू हळू प्रगति होतां होतां जनकाचें व मुलाचें तेवढेंच नातें ओळखूं लागले; आणि आईचें नंतर ओळखीनासें झालें; नंतर आणखी पुष्कळ काळानें दोघांचेंहि नातें ओळखूं लागले. त्याप्रमाणेंच ज्या स्थितीमध्यें कुटुंबसमूह तेवढेच ओळखीत व व्यक्तींस ओळखीत नसत, त्या स्थितींतून निघून आपण अशा उलट स्थितीकडे चाललों आहों कीं ज्या स्थितींत कुटुंबास न ओळखणें व व्यक्तीस ओळखणें हें फारच बेसुमार वाढलें आहे; तें इतकें कीं वयांत आलेल्या व्यक्तीस तेवढेंच आपण समा-

जघटक म्हणून समजतों असें नाहीं, तर वयांत न आलेल्यासहि ( मुलासहि ) तसें समजतों. ह्या आत्यन्तिक स्थितीपासून पिछेहाट होऊन आपण अशा मध्यम स्थितीस परत जाण्याचा संभव आहे कीं, त्या स्थितींत अयोग्य असा संयुक्तकुटुंबसमूह नाहींसा होऊन, आईबाप व मुलें यांचा बनलेला जो योग्य कुटुंबसमूह तो पुनः उत्पन्न होईल.

५१. आणि ह्या ठिकाणीं आपणास असें एक सत्य दृग्गोचर होतें कीं, तें मुत्सद्दी व जगन्मित्र या दोघांनीं नीट लक्षांत घेण्यासारखें आहे. प्रत्येक प्राणिजातीप्रमाणें प्रत्येक मनुष्यसमाजाचें तारण कुटुंबशासनपद्धति आणि सरकारशासनपद्धति ह्यांच्यामध्यें पूर्ण विरोध कायम ठेवण्यावर अवलंबून राहणार आहे.

जीवनार्थ कलहांत टिकाव धरून राहण्यास प्रत्येक प्राणिजातीस दोन परस्पर विरुद्ध अटी पाळाव्या लागतात. कांहीं नियमित काळपर्यंत त्या जातीच्या प्रत्येक घटकाला त्याच्या दौर्बल्याच्या मानानें त्यास फायदे मिळत गेले पाहिजेत; आणि त्या काळाच्या नंतर त्यास ते फायदे त्याच्या सामर्थ्याच्या मानानेंच मिळाले पाहिजेत. पक्षी आपल्या पिलांचें किंवा पशू आपल्या पोरांचें संगोपन करीत असतांना काय करीत असतात तें पहा, म्हणजे तुमच्या लक्षांत असें येईल कीं पुरतीं न वाढलेलीं व दुर्बल अशीं पोरें किंवा पिलें त्यांचें तो पोषण करीत असतो; व तीं जशीं स्वपोषण करण्यास जास्त जास्त समर्थ होत जातील, तसतशी अन्न व ऊब ह्या दोन प्रकारची त्यांस द्यावयाची जी मदत ती तो कमी करीत जातो. आतां हें

उघडच आहे कीं, अत्यन्त कमी योग्य असेल त्यास अत्यन्त मदत करणें ही गोष्ट अप्रौढांच्या संबंधानें अत्यन्त आवश्यक आहे; कारण त्याप्रमाणें आईबापें न वागल्यास ती प्राणिजाति एकाच पिढींत नष्ट होऊन जाईल. आतां प्रौढांच्या संबंधानें कोणती गोष्ट आवश्यक आहे ती पहा. ह्या ठिकाणीं व्यक्तींस त्यांच्या गुणानुसार फायदे मिळत असतात. त्यांच्यांत जे बळकट, किंवा चपळ किंवा तीक्ष्णदृष्टि असतात, त्यांस त्यांच्या त्यांच्या ह्या श्रेष्ठत्वाचा योग्य फायदा मिळतो; म्हणजे, त्यांस जरूरीप्रमाणें आपलें भक्ष्य पकडतां येतें, किंवा शत्रूपासून स्वसंरक्षण करतां येतें. त्यांच्यांत जे कमी हुशार असतील त्यांची कमी भरभराट होते, व एकंदरींत त्यांस कमीच संतति वाढवावयास सांपडते. आणखी अगदींच अल्प योग्यतेचे जे असतील ते, त्यांस अन्न मिळवतां न आल्यामुळें किंवा शत्रूपासून स्वतःचा बचाव करतां न आल्यामुळें, नष्ट होऊन जातात. आणि इतर प्राणिजातींशीं जीवनार्थ कलहांत टिकाव धरण्यास ह्या जातीच्या अंगीं जो गुण असावा लागतो तो तीस ह्या सरणीनें प्राप्त होतो. एवंच अप्रौढ वयांतील नियमाच्या उलट नियमाची बजावणी प्रौढ वयांत करावी लागते.

अगोदरच ( कलम ६ ) ही गोष्ट आपल्या लक्षांत आली आहे कीं, विशिष्ट प्राणिजातीचा तिच्या घटकांशीं जो संबंध असतो, तोच समाजाचा नागरिकांशीं असतो; आणि म्हणून वरील सत्य जसें प्राणिजातीस लागू आहे तसेंच समाजांसहि लागू आहे. अप्रौढाबद्दलचा कायदा असा आहे कीं, जेथें अत्यन्त कमी गुण असेल तेथें

अत्यन्त मोठी मदत करावयाची. अनाश्रित व अनुपयोगी असें जें तान्हें मूल, तें अत्यन्त कडक नोकरी मागत असून,त्यास तासातासाला पाजावें लागतें. त्याच्या अंगावर पांघरूण घालावें लागतें, त्यास चुचकारावें लागतें, आणि हातांत घेऊन फिरवावें लागतें, किंवा पाळण्यांत घालून हालवावें लागतें; म्हणजे, त्यास व्यायाम द्यावा लागतो. पुढें मूलवयांत त्याच्या स्वसंरक्षणाच्या शक्ती जशा वाढत जातील तसतशी तें कमी सारखी नोकरी मागूं लागतें व त्यास ती नोकरी कमी मिळतहि जाते; तथापि एकंदरींत त्याची जोपासना बरीच करावी लागत असते. जेव्हां तारुण्य किंवा प्रौढपण जवळजवळ येऊं लागेल तेव्हां त्याच्या अंगीं कांहीं योग्यता व हुशारी येऊन ही जोपासना बरीच कमी होते. पण जेव्हां तो तरुण मनुष्य जीवनक्रमाच्या लढाईस सुरवात करितो, तेव्हां ही सरणी अगदीं उलट होते. कारण तेव्हांपासून त्यास अशा सामान्य तत्त्वांवर वागवूं लागतात कीं,बक्षीस हें गुणाच्या मानावर अवलंबून असावें.आईबापांची मदत ह्या वेळीं एकदम अगदींच बंद न झाल्यामुळें ह्या सामाजिक नियमाचे जे परिणाम ते प्रथमप्रथम जरी अंमळ कमी भासत असतात तरी तो कमीपणा अल्पच असतो; आणि आईबापांच्या मदतीखेरीज व्यक्ति-औदार्याच्या योगानेंहि ह्या कायद्याची कडक अंमलबजावणी अल्प अंशीं कमी होत असते हें खरें आहे. पण पुढें कांहीं वर्षांनीं आईबापांची मदत अगदींच नाहींशी झाली म्हणजे ह्या कलहाचें काठिण्य जास्तच तीक्ष्ण होतें, आणि भरभराट व हुशारी ह्यांचा मेळ ज्यास्त कडक रीतीनें

उघडच आहे कीं, अत्यन्त कमी योग्य असेल त्यास अत्यन्त मदत करणें ही गोष्ट अप्रौढांच्या संबंधानें अत्यन्त आवश्यक आहे; कारण त्याप्रमाणें आईबापें न वागल्यास ती प्राणिजाति एकाच पिढींत नष्ट होऊन जाईल. आतां प्रौढांच्या संबंधानें कोणती गोष्ट आवश्यक आहे ती पहा. ह्या ठिकाणीं व्यक्तींस त्यांच्या गुणानुसार फायदे मिळत असतात. त्यांच्यांत जे बळकट, किंवा चपळ किंवा तीक्ष्णदृष्टि असतात, त्यांस त्यांच्या त्यांच्या ह्या श्रेष्ठत्वाचा योग्य फायदा मिळतो; म्हणजे, त्यांस जरूरीप्रमाणें आपलें भक्ष्य पकडतां येतें, किंवा शत्रूपासून स्वसंरक्षण करतां येतें. त्यांच्यांत जे कमी हुशार असतील त्यांची कमी भरभराट होते, व एकंदरींत त्यांस कमीच संतति वाढवावयास सांपडते. आणखी अगदींच अल्प योग्यतेचे जे असतील ते, त्यांस अन्न मिळवतां न आल्यामुळें किंवा शत्रूपासून स्वतःचा बचाव करतां न आल्यामुळें, नष्ट होऊन जातात. आणि इतर प्राणिजातींशीं जीवनार्थ कलहांत टिकाव धरण्यास ह्या जातीच्या अंगीं जो गुण असावा लागतो तो तीस ह्या सरणीनें प्राप्त होतो. एवंच अप्रौढ वयांतील नियमाच्या उलट नियमाची बजावणी प्रौढ वयांत करावी लागते.

अगोदरच ( कलम ६ ) ही गोष्ट आपल्या लक्षांत आली आहे कीं, विशिष्ट प्राणिजातीचा तिच्या घटकांशीं जो संबंध असतो, तोच समाजाचा नागरिकांशीं असतो; आणि म्हणून वरील सत्य जसें प्राणिजातीस लागू आहे तसेंच समाजांसहि लागू आहे. अप्रौढाबद्दलचा कायदा असा आहे कीं, जेथें अत्यन्त कमी गुण असेल तेथें

अत्यन्त मोठी मदत करावयाची. अनाश्रित व अनुपयोगी असें जें तान्हें मूल, तें अत्यन्त कडक नोकरी मागत असून,त्यास तासातासाला पाजावें लागतें. त्याच्या अंगावर पांघरूण घालावें लागतें, त्यास चुचकारावें लागतें, आणि हातांत घेऊन फिरवावें लागतें, किंवा पाळण्यांत घालून हालवावें लागतें; म्हणजे, त्यास व्यायाम द्यावा लागतो. पुढें मूलवयांत त्याच्या स्वसंरक्षणाच्या शक्ती जशा वाढत जातील तसतशी तें कमी सारखी नोकरी मागूं लागतें व त्यास ती नोकरी कमी मिळतहि जाते; तथापि एकंदरींत त्याची जोपासना बरीच करावी लागत असते. जेव्हां तारुण्य किंवा प्रौढपण जवळजवळ येऊं लागेल तेव्हां त्याच्या अंगीं कांहीं योग्यता व हुशारी येऊन ही जोपासना बरीच कमी होते. पण जेव्हां तो तरुण मनुष्य जीवनक्रमाच्या लढाईस सुरवात करितो, तेव्हां ही सरणी अगदीं उलट होते. कारण तेव्हांपासून त्यास अशा सामान्य तत्त्वांवर वागवूं लागतात कीं,बक्षीस हें गुणाच्या मानावर अवलंबून असावें.आईबापांची मदत ह्या वेळीं एकदम अगदींच बंद न झाल्यामुळें ह्या सामाजिक नियमाचे जे परिणाम ते प्रथमप्रथम जरी अंमळ कमी भासत असतात तरी तो कमीपणा अल्पच असतो; आणि आईबापांच्या मदतीखेरीज व्यक्ति-औदार्याच्या योगानेंहि ह्या कायद्याची कडक अंमलबजावणी अल्प अंशीं कमी होत असते हें खरें आहे. पण पुढें कांहीं वर्षांनीं आईबापांची मदत अगदींच नाहींशी झाली म्हणजे ह्या कलहाचें काठिण्य जास्तच तीक्ष्ण होतें, आणि भरभराट व हुशारी ह्यांचा मेळ ज्यास्त कडक रीतीनें

बसून जातो. आतां हें उघडच आहे कीं एकाद्या प्राणिजातीप्रमाणें एकाद्या समाजाचा टिकाव लागणें ही गोष्ट ह्या दोन्ही परस्परविरुद्ध कायद्यांस अनुसरून वागण्यावर अवलंबून आहे. समाजाचा कायदा कुटुंबांत आणा, आणि अर्भकावस्थेपासून जीवितपोषणार्थ मुलाच्या हातून होणाऱ्या श्रमांच्या मानानें जीवितपोषणाच्या वस्तूंचा त्यास पुरवठा करा, म्हणजे सगळीं लहान मुलें मरून जाऊन समाज लागलाच नष्ट होईल. उलट पक्षीं, समाजांत कुटुंबाचा कायदा आणा, आणि एकाद्याच्या हातून जीवितपोषणार्थ होणारे श्रम ज्या मानानें कमी असतील, त्या मानानें जीवितपोषणाच्या वस्तूंचा पुरवठा त्यास जास्त करीत जा; म्हणजे, समाजाच्या अत्यन्त कमी योग्यतेच्या घटकांची संख्या वृद्धिंगत होऊन आणि अत्यन्त ज्यास्त योग्य घटकांची संख्या कमी होत जाऊन, समाज क्षय पावून जाईल. असला समाज इतर समाजांशीं होणाऱ्या झगड्यांत तगाव धरण्यास असमर्थ होईल, कारण कर्तबगारीच्या मानानें भरभराट असावी हा जो सृष्टिनियम तो ते समाज पाळीत असणार, व हा समाज पाळीत नसणार.

कुटुंबनीति आणि राष्ट्रनीति ह्यांच्यांतील जो अत्यन्त गंभीर भेद तो पाळण्याची आवश्यकता ह्यावरूनच उत्पन्न होते. ह्यावरूनच, कुटुंबाचें धोरण आणि राष्ट्राचें धोरण ह्यांचा गोंधळ उडेल इतकें कुटुंबविघटन झाल्यास, त्यापासून घातुक परिणाम उत्पन्न होतात. संतति अगदीं प्रारंभीच्या पायऱ्यांवरून जात असतां तिच्यासंबधानें अमर्यादित औदार्य हाच कुटुंबाचा कायदा कायम रा-

हिला पाहिजे; आणि ती जशी प्रौढदशेप्रत ज्यास्त येत जाईल तसतशी न्यायाची त्या औदार्यात ज्यास्त जास्त भेसळ करणें हा कुटुंबाचा कायदा असला पाहिजे. उलट पक्षीं, नागरिकांच्या परस्पराशीं होणाऱ्या वर्तनास दिशा लावून देणारें सामाजिक तत्त्व न्याय हें असलें पाहिजे; आणि त्या न्यायांत नागरिकास आपखुशीनें वाटेल तितक्याच औदार्याची भेसळ झाली पाहिजे; आणि नागरिकांच्या संबंधानें समाजाच्या ज्या समुदित म्हणून कृती असतील त्यांसंबंधानें शुद्ध न्याय ( औदार्यानें अमिश्रित असा न्याय ) हेंच तत्त्व असलें पाहिजे. प्रौढांमध्यें चाललेल्या जीवनकलहात त्यांस त्यांच्या गुणांनुरूप फल मिळावें ह्या तत्त्वाचा कडकपणा खासगी रीत्या त्यांशीं सहानुभूति दाखवून कमी करणें ही गोष्ट कितीहि योग्य असली, तरी गुणवानाचें नुकसान करून गुणहीनाचा फायदा करून द्यावयाचा, इतका जर सार्वजनिकरीत्या वरच्या तत्त्वांत हात घातला गेला, तर सर्वांशीं अनिष्टच परिणाम होणार आहे.

५२. असो. कुटुंबाच्या ह्या एथवर केलेल्या पाहणीपासून विविधजातीय पण परस्परसंवद्ध असे जे अनेक सिद्धान्त निष्पन्न झाले आहेत, त्यांची आतां गोळाबेरीज सांगू.

अनेकपत्नीपद्धति व युद्धशीलनमुना, आणि एकपत्नीपद्धति व उद्यमशील नमुना, ह्या दोहोंदोहोंमध्यें परस्परसंबंध आहेत ह्याबद्दल आपणास चांगला पुरावा सांपडला. पहिली पद्धति व पहिला नमुना ह्यांच्यामधील संबंध कांहीं अंशीं लढाईत स्त्रिया चोरण्याच्या चालीपासून उत्पन्न होतो; आणि कांहीं अंशीं जेथें लढाई नित्य होत

असेल, तेथें पुरुष पुष्कळ मरून बायकांची संख्या त्यांच्यापेक्षां ज्यास्त झाल्यामुळें उत्पन्न होतो. कांहीं उद्यमसंस्था उत्पन्न होण्याइतक्या सुधारलेल्या समाजांतून लढाऊ वर्ग अनेकपत्नीविशिष्ट राहतात, आणि उद्योगी वर्ग बहुधा एकपत्नी बनतात; आणि नेहमींच्या लढाऊपणामुळें स्वैच्छिक राजामध्यें असा एक इच्छाविशेष सामान्यतः उत्पन्न होतो कीं, त्यास पुष्कळ बायका कराव्याशा वाटतात. आणखी आपल्या नजरेस असें आलें कीं, यूरोपच्या इतिहासांत हा संबंध जरी प्रथमदर्शनींच स्पष्ट दिसत नाहीं तरी बारीक शोधाअंतीं आढळून येतो. उलट पक्षीं, आपण असें पाहिलें कीं, उद्योगधंद्यांची वाढ होत जाऊन त्यामुळें स्त्रिया व पुरुष यांच्या संख्या जशा बऱ्याच सारख्या होऊं लागल्या, तशी अनेकपत्नीपद्धति मोठ्या प्रमाणावर चालू ठेवणें अशक्य होऊन, एकपत्नीपद्धति सामान्य होत गेली. आणखी आपले लक्ष्यांत असें आलें कीं. युद्धशील समाजाच्या घटनेचें जबरीचें सहकार्य हें जें तत्त्व आहे त्यामध्यें आणि अनेकपत्नीविशिष्ट कुटुंबामध्यें जें जबरीचें सहकार्य दिसून येतें त्यामध्यें, एक प्रकारचें आनुरूप्य आहे; आणि इकडे स्वैच्छिक सहकार्याच्या तत्त्वावर बनविलेला जो उद्योगशील समाजनमुना तो, स्वैच्छिक घरगुती सहकार्यामध्यें अंतर्भूत होणाऱ्या एकपत्नीसंयोगाशीं चांगला जुळतो. शेवटीं हे परस्परसंबंध एका विलक्षण पुराव्यावरून चांगलेच दिसून आले; तो पुरावा हा कीं, जगाच्या निरनिराळ्या भागांत आणि माणसांच्या निरनिराळ्या जातींत कांहीं साधे समाज असे आहेत कीं, ते इतर बाबतींत अगदींच मागसलेले असून

फारच शांत असल्यामुळें त्या बाबतींत जसे इतर मागसलेल्या समाजांना अपवादरूप आहेत, तसेच ते एकपत्नीपद्धतिप्रिय आहेत ह्या बाबतींतहि त्या समाजांना अपवादच आहेत.

नंतर कुटुंबाच्या स्वरूपाकडे वळून त्या संबंधाच्या कांहीं क्लृप्त्यांचें आपण परीक्षण केलें. त्या क्लृप्त्यांचा एक गर्भित अर्थ असा आहे कीं, प्रारंभीं कांहीं स्थाईक असे वैवाहिक संबंध होते; पण त्यासंबंधानें विचारान्तीं आपणास असें आढळून आलें कीं, अशी कांहीं वास्तविक गोष्ट नाहीं; त्या क्लृप्त्यांचा दुसरा एक असा गर्भित अर्थ आहे कीं प्रथम पुरुषवंशांत वित्तसंक्रान्ति होत असे; पण हीहि कल्पना पुराव्यावरून खोटी ठरते; आणि त्यांचा तिसरा गर्भितार्थ असा आहे कीं, अगदीं प्रारंभीच्या जनसमूहांत लोक एका मुख्याचे स्पष्टरीत्या अंकित असत; पण हाहि सिद्धान्त पुराव्यानें बरोबर म्हणून दाखवितां येत नाहीं. शिवाय, प्रारंभीं पित्राज्ञा मान्य करण्याचा स्वाभाविक मनोभाव मुलांमध्यें असून त्यापासून पितृशासनपद्धति सुरू झाली, आणि प्रारंभीं कौटुंबिक संबंधावरूनच काय तो राजकीय संयोग घडून येत असे, ह्या ज्या त्या क्लृप्तींत अंतर्भूत झालेल्या आणखी दोन गृहीत गोष्टी आहेत त्याहि असुधारलेल्या लोकांचीं जीं वर्णनें आपणास प्रवासी देतात त्यांशीं विरुद्ध आहेत. सारांश, कुटुंबाच्या उच्चतर स्वरूपांची बरोबर उपपत्ति लागण्यास, अत्यन्त क्षुद्र अशा सामाजिक स्थितींत जीं कुटुंबांचीं अत्यन्त क्षुद्रस्वरूपें दृष्टीस पडतात, तेथून सुरवात करून वरवर पाहत गेलें पाहिजे ही गोष्ट ध्याना-

त आणून विचार करतां, तरुण व वृद्ध अशा लोकांचा एकादा लहान समूह असून तो कांहीं आप्तपणामुळें एकत्र राहिला असतां, धनगरी स्थितींत त्याच्यांत पुरुषवंशांत वित्तसंक्रान्तीची स्थापना कशी झाली आणि त्याच्यांत निकटभाव, आज्ञांकितपणा, आणि स्वसंरक्षणार्थ व अन्यातिक्रमणार्थ एकत्र होणें, ह्या गोष्टी जास्त जास्त वाढत कशा गेल्या ह्या गोष्टी आपल्या ध्यानांत आल्या; आणि ही रचना संपादन करणें सुलभ होण्याचें कारण असें झालें कीं तेणेंकरून गृहशासनपद्धति आणि राजकीय शासनपद्धति ह्या एकरूप होऊन गेल्या. पूर्वींच्या सर्व समाजांहून ज्यास्त पक्व, आणि उच्चतर समाजांची घटना करण्यास जास्त योग्य, अशा सरल समाजाची उत्पत्ति या रीतीनेंच होऊन गेलेली आहे.

एवंच विशिष्ट प्रकारच्या सरणीनें उत्पन्न झालेला जो पितृशासनविशिष्टसमूह, त्याच्यांत त्यास योग्य अशा कल्पना, मनोवृत्ती, रूढी आणि व्यवस्था उत्पन्न होऊन, पुढपुढच्या पिढ्यांतून त्याचे विभाग होऊन पोटसमूह होत गेले, आणि पोटसमूह परिस्थितीप्रमाणें लहान किंवा मोठ्या संघांच्या स्वरूपानें एकत्र राहूं लागले; आणि म्हणून ही शासनपद्धति स्थाईक स्थितींतहि कायमच राहिली; पुढें ह्या समूहांत ज्या इष्टकार्यकर अशा सुव्यवस्था उत्क्रान्त झाल्यामुळें, त्यांचें एकीभवन होऊन बनलेले जे मोठाले समाज, त्यांच्यामध्येंहि तसल्याच सुव्यवस्था उत्पन्न होणें सुखकर झालें. हल्लींच्या अर्धवट सुधारलेल्या अशा कांहीं आफ्रिकेंतील राष्ट्रांच्या, आणि गत अशा कांहीं अमेरिकेंतील राज्या-

च्या इतिहासावरून असें दिसतें कीं, कमी उत्क्रांत घटनेनें आणि अन्य प्रकारच्या कुटुंबरचनेनें विशिष्ट अशा रानटी समूहांचेहि बरेच मोठे व संकीर्ण असे संयुक्त समाज बनूं शकतात; तथापि अनुभवावरून असें सिद्ध होतें कीं, अत्यन्त मोठे व अत्यन्त सुधारलेले असे समाज जे उत्पन्न झालेले आहेत, ते उच्चतर प्रकारच्या कुटुंबानें विशिष्ट अशा पितृशासनपद्धतिविशिष्ट समूहांपासूनच उत्पन्न झालेले आहेत.

पितृशासनविशिष्ट समूहाच्या गुणीभवनानें ज्या लोकवस्त्या बनतात त्यांच्या ठिकाणीं, वडील पुरुषाचें श्रेष्ठत्व, पुरुषवंशांत वित्तसंक्रांति, मूळ पुरुषाची सर्वांनीं मिळून पूजा, शेजाऱ्यांशीं हाडवैरें, आणि स्त्रिया व मुलें यांचा पूर्ण आज्ञांकितपणा, इत्यादि गोष्टी कायम राहिल्यामुळें, त्या समूहाचें व्यक्तित्वहि त्यांच्या ठिकाणीं पुष्कळ दिवस कायमच राहतें. पण इतर प्रकारच्या वस्त्यांप्रमाणें ह्या वस्त्यांमध्येंहि सहक्रियेच्या योगानें हळूहळू संयोगिता उत्पन्न होऊन जाते; त्यांच्यांतील भेदभाव हळू हळू कमी ठळक व्हावयास लागतात; आणि सरते शेवटीं, सर हेन्री मेन म्हणतो त्याप्रमाणें, ज्या समाजांचा मूलघटक कुटुंब हा आहे अशा स्थितींतून, ज्यांचा मूलघटक व्यक्ति हा आहे, अशा स्थितीप्रत ते जातात.

हें जें विघटन, ज्याच्या योगानें प्रथम संयुक्त कुटुंबसमूह विभक्त होऊन त्यांचे कमी संकीर्ण असे समूह बनतात, तें शेवटीं अत्यन्त साध्या कुटुंबावरहि आपला व्यापार चालवूं लागतें: म्हणजे काय, तर, नवरा, बायको व मुलें, हें जें शुद्ध किंवा अगदीं साधें कुटुंब, त्यां-

तीलहि घटक व्यक्तिविषयक हक्क व व्यक्तिविषयक जबाबदाऱ्या संपादन करूं लागतात. आणि ही जी फेरबदलाची लाट, तिनें तालबंधाच्या किंवा आंदोलनाच्या सामान्य नियमांस अनुसरून, अर्वाचीन राष्ट्रांत कौटुंबिक जीविताचे जे संबंध त्यांची अर्धवट तुटातूट करून टाकिली आहे, आणि त्यांच्या ऐवजीं सामाजिक जीविताचीं बंधनें उत्पन्न केलीं आहेत. त्यामुळें प्रत्येक कुटुंबांतील तरुण व्यक्तींचेच हक्क व जबाबदाऱ्या सरकार कबूल करूं लागलें आहे असें नाहीं, तर बऱ्याच अंशीं सरकारानें मुलांच्या संबंधाचीं जीं आईबापांचीं कर्तव्यें तींहि बळकाविलीं आहेत, आणि आपल्यावरील त्यांचे हक्क गृहीत धरून, त्यांच्यावर जबरीचें नियंत्रण सुरू केलें आहे.

पण, जीविताच्या सामान्य नियमांची आठवण करतां, आणि कुटुंबजीविताचें तत्त्व आणि सामाजिक जीविताचें तत्त्व ह्यांच्यांतील अत्यन्त खोल भेद लक्षांत आणतां, आपणास असें म्हणावें लागतें कीं, हें कुटुंबविघटन अतिरिक्त झालें आहे, आणि म्हणून ह्याच्यापुढें कांहीं अंशीं कुटुंबाचें पुनःसंकलन उत्पन्न होईल.

# प्रकरण दहावें

## स्त्रियांची स्थिति

५३. रानटी लोकांमधील स्त्रियांची स्थिति आणि अत्यन्त सुधारलेल्या लोकांमधील स्त्रियांची स्थिति ह्या दोहोंमधील महदंतर पाहिलें, म्हणजे मनुष्यजातीची नैतिक प्रगति किती झाली आहे हें जितकें स्पष्टरीत्या ध्यानांत येतें, तितकें दुसऱ्या कोणत्याहि रीतीनें येत नाहीं. एका टोंकाकडे पहावें तों अत्यन्त असह्य अशा क्रूर रीतीनें त्यांस वागविलेलें आढळून येतें; आणि दुसऱ्या टोंकाकडे पहावें तों त्यांस अशा रीतीनें वागविलेलें दृष्टीस पडतें कीं, कांहीं बाबतींत त्यांस पुरुषांपेक्षांहि जास्ती महत्त्व मिळतें.

अत्यन्त हलक्या जातींमध्यें पुरुष बायकांस ज्या क्रूरपणानें वागवितात त्यास मर्यादा म्हणून इतकीच असते कीं, त्यांस जास्त क्रूरतेनें वागविल्यास त्या जगणार नाहींत, व प्रजोत्पादन करूं शकणार नाहींत. आतां हें उघडच आहे कीं, वाईट रीतीनें वागवणें, कमी खावयास घालणें, आणि फाजील काम करावयास लावणें, ह्या गोष्टी कधीं कधीं इतक्या अतिरिक्त होऊं शकतात कीं, त्यांच्या योगानें बायका जरी प्रत्यक्ष मेल्याच नाहींत, तरी लोकवस्ती कायम राहील इतकें शिशुसंवर्धन करण्यास त्या असमर्थ होतात; आणि नंतर

मग तो समाज नष्ट होतो. अशा प्रकारचा अतिरिक्त कडकपणा, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीत्या इतर जातींशीं टक्कर देऊन राहण्यास त्या जातीस असमर्थ करितो; कारण तेणेंकरून मुलांची मृत्युसंख्या फार वाढली जाऊन जीं शिल्लक राहतील त्यांस पोटभर दूध मिळत नाहींसें होतें, आणि म्हणून त्यांची वाढ अपुरीच राहते. पण प्रारंभीं पुरुषांनीं स्त्रियांवर किती जुलूम करावयाचा ह्याला ह्यापलीकडे कांहींच मर्यादा असत नाहीं. स्त्री प्रथम दुसऱ्या टोळींतून चोरून आणलेली असावयाची; त्या वेळीं तिनें प्रतिरोध करूं नये म्हणून बहुधा ठोसा देऊन बेशुद्ध केलेली असावयाची; त्या रानटी नवऱ्याची तब्यत बिघडली म्हणजे तिला नुसता मारच मिळावयाचा नाहीं तर हातापायांवर भाल्याच्याहि जखमा व्हावयाच्या; तिला सर्व कावाडकष्ट करावयास लागून सर्व ओझींहि वाहावयास लागावयाचीं; आणि मुलांचीहि सर्व प्रकारची जोपासना करावयास लावावयाची; आणि तिच्या नवऱ्याचें पोट भरल्यावर कांहीं शिल्लक राहील त्याच्यावर तिनें निर्वाह करावयाचा; अशी स्त्रियांची स्थिति असल्यामुळें त्यावेळीं त्या व त्यांचीं मुलें जिवंत राहतील हीच काय ती त्यांच्या हालांस मर्यादा असते.

असल्या ह्या वागणुकीमुळें, स्त्रीपुरुषांचे परस्परसंबंध बदलण्यास कठीण जात असेल, ही गोष्ट असंभाव्य दिसत नाहीं; ह्याचें कारण असें कीं, क्रूर वागणुकीमुळें शारीरिक कुरूपता किंवा कमीपणा उत्पन्न होतो; आणि ह्या कुरूपतेमुळें ह्या क्रूर वागणुकीस आळाबंदा घालतील असे मनोविकार पुरुषांमध्यें उत्पन्न होत नाहींत. ब-

हुशः रानटी लोकांत पुरुषांपेक्षांहि बायका ज्यास्त कुरूप असतात. उदाहरणार्थ, पाटुवा लोकांत पुरुष खुजे असून बायका त्यांच्याहूनहि खुज्या असतात; म्हणून पुरुष "सुंदर मुळींच नसतात, पण असौंदर्यामध्यें बायकांची पुरुषांवर-हि ताण आहे. त्यांना काबाडकष्ट फार करावे लागतात, व त्यांस पुरतें खावयास मिळतेंसें दिसत नाहीं." कोरियांतील रहिवाशांबद्दल गुड्झलाफ् असें म्हणतो कीं, "या लोकांत बायका फार कुरूप असतात, पण पुरुष सगळ्या एशियाखंडांत अत्यन्त सुंदर आहेत. त्यांच्यांत बायकांस ओझ्याच्या जनावरांप्रमाणें वागवितात."आणि अशा प्रकारचा जो हा भेद सर्वत्र दृष्टीस पडतो, त्याला बहुधा असलेंच कारण सर्वत्र असतें. ह्याच्या उलट पुरावा कालमक व खिरगीज ह्या लोकांमध्यें सांपडतो; कारण त्यांच्यामध्यें नवरे बायकांस कमी क्रूरपणानें वागवीत असल्यामुळें त्या ज्यास्त सुंदर असतात.

तथापि आपण असें मात्र समजतां कामा नये कीं, अत्यन्त रानटी जातींत स्त्रियांची जी ही हलकी स्थिति दृष्टींस पडते, तीस कारण पुरुषांचा तेवढाच निगरगट्टपणा असतो, आणि स्त्रियांचा नसतो. जेथें शत्रूंचे हालहाल करण्याची चाल आहे, तेथें त्या कामांत स्त्रिया पुरुषांस मागें सारितात असें जेव्हां आपण ऐकतों,—ब्रूकनें केलेलीं दोन डायाक नायकिणींच्या क्रूर कृत्यांची किंवा विनवूड रीडनें केलेलीं एका क्रूर आफ्रिकन् राणीच्या भयंकर कृतीचीं, वर्णनें जेव्हां आपण वाचितों,—तेव्हां आपल्या ध्यानांत असें येतें कीं, रानटी पुरुषांप्रमाणें रानटी बायकांचे स्वभाव क्रूर दिसत नाहींत ह्यास कारण त्यांच्या

ठायीं इच्छेची वाण असते हें नव्हे, तर शक्तीचा अभाव असतो हें होय. दोघांच्याहि ठिकाणीं असणारा जो सारखाच रानटीपणा त्याचे परिणाम त्यांच्या त्या परिस्थितींत व्हावे तसेच होतात. असो. ते काय होतात तें आतां ज्यास्त बारीक रीतीनें पाहूं.

५४. पण प्रथम कांहीं अपवादात्मक गोष्टींचा विचार करूं. अतिशय रानटी माणसांत देखील सामान्यतः स्त्रियांस जरी अत्यन्त वाईट रीतीनें वागवितात, तरी स्त्रियांचें प्राबल्य त्यांच्यांत अगदींच अपरिचित आहे असें नाहीं. फ्यूजिअन लोकांबद्दल **स्नो** साहेब असें म्हणतो कीं, " त्यांच्यापैकीं एक अत्यन्त वृद्ध स्त्री बाकीच्या आपल्या लोकांवर अधिकार चालवितांना आपण पाहिली आहे "; आणि आस्ट्रेलियन लोकांबद्दल **मिचेल** असें म्हणतो कीं, त्यांच्यांत वृद्ध पुरुष व वृद्ध स्त्रियाहि फार अधिकार चालवितात. आणखी एक गोष्ट अशी आहे कीं पुष्कळ रानटी लोक जरी बायकांस नीच स्थितींत ठेवितात, तरी त्यांच्यांत स्त्रीशास्ते आहेत; उदाहरणार्थ, सुमात्रामधील बाटा प्रांतामध्यें, मादागास्कारमध्यें, आणि वर सांगितलेल्या फ्यूजिअन लोकांमध्यें ह्या अपवादाचें कारण स्त्रीवंशांत वित्तसंक्रांति होण्याची रूढी हें बहुधा असावें. कारण त्या रूढीप्रमाणें जरी बहुतकरून बहिणीच्या मुलग्यांकडे सत्ता व संपत्ति हीं वंशपरंपरेनें जात असतात, तरी प्रसंगवशात् मृतास एकच बहीण असून तीस मुलगे नसल्यास, मुलीस कधीं कधीं गादीवर बसवीत असतात. **स्पेन्सर** साहेब म्हणतात, हें मी लिहीत असतांच, पुराव्याकडे पाहतां मला पुढील ढळढळीत उदाहरण

आढळून आलें. हैदालोकांचें वर्णन करीत असतां बँक्रॉफ्ट म्हणतो:—" त्यांच्यांतील बहुतेक सर्व लोकांत पदवीचें संक्रमण नांवाचें वंशपरंपरा आहे, आणि बहुधा स्त्रीवंशांत आहे ... पुष्कळ ठिकाणीं स्त्रियांस नायकीचा हक्क असतो. "

पण ह्या अपवादरूप गोष्टी एकीकडे ठेवून सामान्य गोष्टींकडे पाहतां, त्या, उच्चतर मनोभाव उत्पन्न होण्याच्या अगोदरच्या पायऱ्यांवर पुरुषांच्या अंगांतील ज्यास्त शक्तीमुळें जशा असल्या पाहिजेत, तसल्याच असतात. अगोदर सांगितलेल्या अनेक उदाहरणांवरून असें दिसतें कीं, प्रारंभीं पुरुषांस बायका म्हणजे केवळ घरांतील चीजवस्तूसारख्या वाटत असतात, आणि पुढच्या बऱ्याच पायऱ्यांवर ते त्यांस तशाच मानीत राहतातः म्हणजे, त्यांस घरांतल्या जनावरांप्रमाणें लेखितात. चिपिवायामधील एक नाईक हर्न यास म्हणाला:—" बायका ह्या काबाडकष्टाकरितां निर्मिलेल्या आहेत; दोन पुरुषांचें ओझें एक स्त्री उचलूं किंवा वाहून नेऊं शकते. त्या आमचे तंबूहि मारितात, आमचे कपडे शिवतात व ठिगळवितात, आणि रात्रीं आह्मांस उबेंत ठेवितात; आणि ह्या आमच्या देशांत बराच लांब प्रवास करावयाचा असल्यास तो त्यांच्या मदतीविना होतच नाहीं. " आणि ही जी स्त्रीविषयक कल्पना आहे, ती ह्यांच्या इतक्या हलक्या लोकांमध्येंच आहे असें नाहीं, तर ह्यांच्याहूनहि बऱ्याच ज्यास्त सुधारलेल्या लोकांमध्येंहि आहे. ब्यारोनें ह्याबद्दल, एक उदाहरण दिलें आहे तें येथें सांगूं. तो म्हणतो:—"एक काफिर मला एकदां म्ह-

णाला, बायका म्हणजे नवऱ्याचा बैल होय; तो म्हणाला तिला जर विकत घेतलेलें आहे तर तिनें काम केलेंच पाहिजे "; आणि ह्या लोकांबद्दल शूटर साहेब असें सांगतो कीं, एकाद्या काफिरानें आपल्या बायकोस ठार कां केलें म्हणून कोणीं विचारल्यास तो असा जबाब देतो कीं, " मी तिला कायमची विकत घेतली होती".

चोरून किंवा विकत घेऊन बायका मिळविण्याची जी पद्धति आहे, तिच्या योगानें हा स्त्रीपुरुषसंबंध कायम राहतो, हें ह्या उदाहरणावरूनच व्यक्त होतें. जिंकलेल्या टोळींतील एकादी स्त्री न मारतां परत जिवंत आणणाराला, किंवा किंमत देऊन तीस विकत घेणाराला, सहजच ती आपली पूर्ण मालकीची आहे असें वाटतें. चिब्चालोकांमधील स्त्रियांच्या स्थितीचें निरूपण करीत असतां सायमन म्हणतोः—" मला वाटतें इंदियनलोक आपल्या स्त्रियांस इतक्या वाईट रीतीनें व गुलामाप्रमाणें वागवितात, ह्याचें कारण त्या त्यांनीं विकत घेतलेल्या असतात हें असावें. " पण हें सत्य पूर्णपणें सांगावयाचें असल्यास आपण असें म्हटलें पाहिजे कीं, बायकांचा व्यापार करण्याच्या रूढीवरून ज्या नैतिक व सामाजिक वस्तुस्थितीचें निदर्शन होतें, ती ह्या वाईट वागवणुकीचें मूळ कारण आहे; कारण स्वताच्या मुलीच्या इच्छेची किंवा कल्याणाची विकत घेणाऱ्या नवऱ्या इतकीच विकत देणारा बाप अवहेलना करीत असतो. कोणत्याहि समाजांत होणाऱ्या ह्या व्यापाराच्या वर्णनावरून हें स्पष्ट दिसतें. मण्डन जातीचा बाप " मुलीची विक्री केवळ नफ्याच्या दृष्टीनें करीत असतो, कारण तो तिची येईल

तितकी ज्यास्त किंमत मिळण्यासाठीं अडून बसत असतो." प्राचीनकाळच्या युकाटानीज लोकांमध्यें, "बायकोस मुलें नसल्यास, व तिचा बाप तिच्याबद्दल घेतलेली किंमत परत देण्यास तयार नसल्यास, नवरा तीस विकूं शकत असे." पूर्व आफ्रिकेमध्यें मुलीचा "बाप तिच्याबद्दल वरास देतां येतील तितक्या गाई, कपडे, व कांकणें त्याजपाशीं मागत असतो. ... नवऱ्यास बायकोला विकतां येतें, किंवा तीस तिच्यापासून दुसरा माणूस घेऊन गेल्यास, गुलामांच्या बाजारांत तिची जितकी किंमत आली असती तितकी तो त्याच्यापासून घेतो." आतां हें उघडच आहे कीं, जेथें बायका देऊन बैल किंवा दुसरीं जनावरें विकत घेतात, तेथें त्यांस जनावरांप्रमाणेंच लेखीत असले पाहिजेत; म्हणजे त्यांस स्वतःचे हक्क मुळींच नाहींत असें मानीत असले पाहिजेत.

मानवी उत्क्रमणाच्या ज्या पायऱ्यांवर परार्थदृष्टीनें स्वार्थदृष्टीस आळाबंदा मुळींच घातलेला नसतो, त्या पायऱ्यांवर बायकांची स्थिति किती नीच असते, हें एकादा माणूस मेल्यावर त्याच्या इतर मालमत्तेबरोबर त्याच्या बायकोचीहि संक्रान्त त्याच्या आप्तांकडे जी होत असते, त्यावरून फारच ढळढळीत रीतीनें दिसून येतें. ह्याचीं कांहीं उदाहरणें अगोदर ( कलम ३१ ) दिलीं आहेत; आणि आणखी पुष्कळ देतां येण्यासारखीं आहेत. मापुची लोकांत मृताची बायको, त्याला दुसऱ्या बायकांच्या पोटचे मोठाले मुलगे नसल्यास, स्वताची मालकीण बनते, पण असल्यास ती त्या सर्वांची सामान्य राख बनते; कारण ती इतर वस्तूंप्रमाणें मानली

गेल्यामुळें इस्टेटीच्या वारसांकडे सहजच जाते.

एवंच जोंपर्यंत बायका चोरून आणण्याचा किंवा विकत घेण्याचा प्रघात सुरू राहतो, तोंपर्यंत रानटी लोक त्यांचें मनुष्यदृष्ट्या व्यक्तित्व ओळखीत नाहींत ही गोष्ट ध्यानांत धरून, ह्या स्थितीपासून स्त्रीपुरुषांमध्यें श्रमविभाग काय उत्पन्न होतो तो पाहूं; हा श्रमविभाग कांहीं अंशीं हा जो पुरुषांचा अनिर्बंध जुलूम, त्याच्यावरून निश्चित होत असतो, आणि कांहीं अंशीं स्त्रियांच्या आंगचें जें कांहीं बाबतींत दौर्बल्य, त्याच्यावरून निश्चित होत असतो.

५५. रानटी समाजांतील गुलामांचा वर्ग बायकांचा बनलेला असतो; आणि अगदीं प्रारंभीं जो श्रमविभाग उत्पन्न होतो तो त्या बायका व त्यांचे धनी ह्यांमध्यें उत्पन्न होतो. तास्मेनियन, आस्ट्रेलियन, बुशमेन, फ्यूजियन आंडामानीज, वगैरे अगदीं हलक्या लोकांमध्यें अर्थात् ह्याच्यापेक्षां ज्यास्त श्रमविभाग असण्याचा संभव मुळींच नाहीं. आणि कोमाची, चिपिवाज, आणि डाकोटा वगैरे ज्या ह्यांच्याहून वरच्या प्रतीच्या पारधी जाती त्यांच्यामध्येंहि ह्या बाबतींत कांहींच सुधारणा झालेली दृष्टीस पडत नाहीं.

ह्याप्रमाणें कामांची वांटणी करतांना, बायकांना शक्ति, चापल्य आणि चातुर्य यांच्या कमतरतेमुळें जें जें करण्यास दुर्घट असेल, तें तेंहि त्यांच्यावर पुरुष लादितात. उदाहरणार्थ, हल्लीं नष्ट झालेल्या तास्मेनियन लोकांत पुरुष कांगारूपी पारध करून जें काय मिळेल तेवढेंच खाद्य घरांत आणून देत असत; आणि बाकीचें खाद्य स्त्रिया मिळवून आणीत असत; उदाहरणार्थ, झाडांवर चढून खारी धरून

आणणें, जमिनींतील मुळें काठ्यांनीं खणून काढणें, पाण्यांत बुडी मारून कालवें काढणें, आणि मासे धरणें; शिवाय मुलांची निगा त्यांस करावी लागे ती निराळीच; आणि हल्लीं फ्यूजियन, आंडामानीज व आस्ट्रेलियन ह्या लोकांत कामांची वांटणी स्त्रीपुरुषांत सरासरी अशाच धर्तीवर झालेली आहे. जेथें मोठाले स्तनवत् प्राणी हेंच मुख्य खाद्य असेल, तेथें पुरुष त्यांस मारितात व बायका वाहून नेतात. उदाहरणार्थ, चिपिवायन लोकांबद्दल आपण असें वाचितों कीं, "जेव्हां पुरुष एकादें मोठें जनावर मारितात, तेव्हां तें तंबूंत आणण्यासाठीं नेहमीं स्त्रियांस पाठवून देतात"; कोमांची लोकांबद्दल आपण असें वाचितों कीं, "त्यांच्या स्त्रिया नेहमीं नवऱ्याबरोबर पारधीस जात असतात. नवरा पारध मारितो, बायका ती तोडितात, मांस वाहून नेतात, चामडीं तयार करितात, इ०इ०". एस्किमो लोकांबद्दल आपण असें वाचितों कीं, "पुरुषानें सावज किनाऱ्याजवळ आणिलें म्हणजे तो त्याबद्दल ज्यास्त कांहीं करावयाचा नाहीं, कारण तें जर त्यानें पाण्याबाहेर ओढून काढिलें, तर त्याच्या अब्रूस बट्टा लागेल." आतां असल्या ठिकाणीं जरी अशी सबब दाखविण्यांत येते कीं, पारधीनें येणारा थकवा फार असतो; तरी जेव्हां आपण असें वाचितों कीं, एस्किमो लोकांच्या बायका लांकूड काम खेरीज करून, "घरें बांधण्याचें व तंबू तयार करण्याचें इतर सर्व काम करितात, आणि बहुतेक त्यांच्या पाठी मोडून जातील एवढाले जड दगड त्या नेत असल्या तरी पुरुष त्यांस मुळींच हातभार न लावतां

तटस्थ रीतीनें पाहत राहतात, तेव्हां ही सबब योग्य आहे असें म्हणतां येत नाहीं. शिवाय या हलक्या जातींमध्यें मग त्या पुऱ्या भटक्या असोत, किंवा अर्धवट भटक्या असोत, अशी चाल असते कीं सामानसुमान एके ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं बायकांनीं वाहून न्यावयाचें. उदाहरणार्थ, तास्मेनियन लोकांच्या बायका इतर सामानसुमानाबरोबर तूर्त उपयोगाला नकोत असे भाले व व सोंटे वाहून नेत असत; आणि अर्धवट शेती व धनगरी अशा ह्यांच्याहून बऱ्याच उंचप्रतीच्या जातींमध्येंहि अशीच स्थिति आहे. डमारा लोकांमध्यें नवरा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जातो तेव्हां "त्याच्या जिनसा त्याची बायको वाहून नेते". तुपी लोक स्थानांतर करितात तेव्हां त्यांच्या बायका घरगुती सर्व सामानसुमान नव्या ठिकाणीं वाहून नेत असतात: "नवरा नुसतीं हत्यारें नेतांना दृष्टीस पडतो, आणि बायको खेंचरासारखी लादलेली असते." दक्षिण ब्राझीलमध्यें बायका काय काय कामें करितात हें सांगतांना स्पिक्स व मार्श्यस हे असें म्हणतात कीं, बायका "स्वतःच्या ओझ्यास जनावरांप्रमाणें लादून घेतात"; आणि ड्राब्रिझॉफर म्हणतो कीं "आपलें सर्व सामानसुमान बायकांच्या माथीं मारून आबिपोन लोक हातांत भाला तेवढा घेऊन प्रवास करितात, अशासाठीं कीं वाटेंत लढण्याचा किंवा शिकार करण्याचा प्रसंग आल्यास अडचण पडूं नये", ह्या शेवटच्या उताऱ्यांत सांगितलेलें कारण रानटी लोकांतील प्रवासाच्या वेळच्या ह्या चालीचें कांहीं अंशीं समर्थन करितें; कारण छपून बसलेल्या शत्रूंनीं एकदम हल्ला केला असतां पुरुष

जर तत्क्षणीं त्यांच्यांशीं लढण्यास तयार नसतील, तर एकादे वेळीं त्यांच्या जीवावरच बेतेल. आणि बहुधा ही भीति आणि रूढीचा महिमा ह्यांच्या योगानें बायकाहि स्वतः ती चाल चालू ठेवण्यास कारणीभूत होत असाव्या.

आतां अर्धवट किंवा पूर्ण रीत्या स्थाईक झालेल्या व अंमळ ज्यास्त संमिश्र बनलेल्या, अशा समाजांकडे पाहतां स्त्रीपुरुषांमधील श्रमविभागांत बरेच निरनिराळे प्रकार आपल्या दृष्टीस पडूं लागतात. त्यांच्यांत घरें वगैरे बांधण्याचें काम बहुधा पुरुष करीत असतात, परंतु नेहमीं नव्हे: कारण बेचुआना, डमारा, काफिर, आणि न्यूगिनीमधील उटानाटा ह्या लोकांत झोंपड्या बायकाच उभारितात; आणि कोठें कोठें झाडें तोडण्याचेंहि काम बायकाच करितात, जरी इतरत्र तें काम बहुतकरून पुरुषांवरच पडत असतें. कोरोआडो लोकांबद्दल असें सांगतात कीं, स्वयंपाक तयार करणें व चुलींत विस्तव कायम राखणें हें काम त्यांच्यांत पुरुषांवर पडत असतें; सामोआमध्यें असेंच आहे; आणि चमत्कार हा कीं, ही गोष्ट तेथें नायकांसहि करावी लागत असते. अर्धवट सुधारलेल्या व असुधारलेल्या लोकांत व्यापाराचें काम बहुधा पुरुषच करितात, पण सर्वच ठिकाणीं मात्र नव्हे. जाव्हा बेटांत बायकाच बाजारांत जात असतात, आणि क्रयविक्रयाचें सर्व काम त्याच करीत असतात. आंगोलामध्येंहि असेंच आहे; तेथें बायका क्रयविक्रय करून शिवाय इतर देशांत जीं कामें पुरुष करितात, तीं तेथें सर्व त्याच करीत असतात; इकडे पुरुष घरीं बसून सूत काढणें, कापड विणणें, वगैरे बायकी

धंदे करीत असतात. पेरू देशांत प्राचीन काळीं असलाच श्रमविभाग असे: पुरुष चातीचें व मागाचें काम करीत व बायका नांगर धरीत. आबिसिनियामध्यें पुरुषानें कांहींहि विकत घेण्यास बाजारांत जाणें ही गोष्ट निंदास्पद समजतात. त्यास पाणीहि आणतां येत नाहीं किंवा भाकरीहि भाजतां येत नाहीं; परंतु त्यास पुरुषांचीं व स्त्रियांचीं दोघांचींहि वस्त्रें धुवावीं लागतात, आणि ह्या कामीं स्त्रिया त्यास मदत करूं शकत नाहींत. तद्वतच, कांहीं आरब लोकांत स्त्रिया सुईस हात लावावयाच्या नाहींत, कारण त्यांस जें थोडेंसें शिवणकाम लागतें, तें त्यांचे नवरे व भाऊ करीत असतात.

एवंच ह्या ठिकाणीं संक्षिप्तपणें दिग्दर्शन केलेल्या अनेक व नानाविध गोष्टींचा सामान्य विचार करतां, त्यापासून निश्चित असा सिद्धान्त एवढाच निघतो कीं, नेहमीं ज्यांस शक्तीची व चपलतेची जरूर आहे, असे धंदे पुरुष बळकावून बसतात; ते धंदे अर्थात् लढाई व पारध हे होत. शत्रूशीं लढण्यास व वन्यपशूंची पारध करण्यास इतर काळीं स्त्रिया कितपत योग्य आहेत, ह्या प्रश्नाचा विचार बाजूस ठेविला तरी हें स्पष्टच आहे कीं, मुलें होत असतात त्या वयांत प्रथम गर्भारपणामुळें आणि पुढें पोरांस पाजावें लागत असल्यामुळें, त्यांस ते धंदे करतां यावयाचेच नाहींत. डाहोमन लोकांमध्यें स्त्रीयोद्धे असल्यामुळें, स्त्रिया लढूं शकतात हें जरी सिद्ध होतें, तरी या उदाहरणावरून हेंहि स्पष्ट होतें कीं, त्यांस योद्धे होण्यास स्त्रीजातीचीं विशिष्ट कर्तव्यें टाकून द्यावीं लागतात; कारण ह्या स्त्रिया राजाच्या नांवाच्या बायका अ-

सून, वास्तविकरीत्या ब्रम्हचारीच असतात, आणि त्यांनीं कोणतेंहि कुकर्म केल्यास त्यांस सैन्यांतून काढून लावितात. परंतु ज्या धंद्यांना बायका त्यांच्या आयुष्याच्या बऱ्याच काळामध्यें शरीरदृष्ट्या अयोग्य असतात, किंवा ज्यांमध्यें त्यांच्यापैकीं बऱ्याचजणी शिरल्यास लोकसंख्येस चांगलाच धक्का बसल्याशिवाय रहावयाचा नाहीं, ते धंदे वजा करतां बाकीच्या धंद्यांतील स्त्रीपुरुषांमधील श्रमविभागासंबंधानें निश्चितरीत्या आपणास एवढेंच म्हणतां येईल कीं, सुधारणेस सुरवात होण्याच्या पूर्वीं बलिष्ठ अशी जी पुरुषजाति, ती दुर्बल अशा स्त्रीजातीस सगळें काबाडकष्टाचें काम करावयास लावीत असते; आणि समाजप्रगति जशी होत जाईल, तसा हा विभाग कांहीं अंशीं कमी कठीण असा होऊन, निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळ्या रीतीनें विशिष्ट होत जातो.

श्रमविभाग कमी कठीण होण्याचीं जीं कारणें आह्मी आतांच सांगणार आहों, त्यांच्याशीं संबद्ध अशी एक गोष्ट एथें सांगतों, ती ही कीं, जेथें परिस्थितीस अनुसरून स्त्रीपुरुषांचे धंदे सारखेच असतील, तेथें स्त्रियांस वरच्यापेक्षां चांगल्या रीतीनें वागविलें जात असतें. चिपिवायन लोकांबद्दल स्कूलक्राफ्ट असें म्हणतो कीं, “ ते पारधीच्या कामांत विशेषसें चापल्य दाखवीत नाहींत; ह्याचें कारण हें कीं, ते हरिणांस सहज जाळ्यांत पकडूं शकतात, आणि मासे भाल्यांनीं धरूं शकतात; आणि हे धंदे त्यांच्यांतील वृद्ध पुरुष, स्त्रिया व मुलगे ह्यांच्या शक्तीच्या पलीकडचे नाहींत ”; आणखी तो असेंहि म्हणतो कीं, “ त्यांच्यांतील स्त्रिया मालकीच्या इतर व-

स्तूंप्रमाणें जरी पुरुषांच्या पूर्ण स्वाधीन असतात, तरी पुरुष त्यांचा सल्ला नेहमीं घेत असतात, आणि यूरोपियन लोकांशीं व्यापार करण्याच्या व इतर कामांत त्यांचें बरेंच वजन पडतें ". आह्मी असेंहि वाचितों कीं, "क्लाटसॉप व चिनूक हे लोक मासे व मुळें याच्यावर निर्वाह करीत असून, तीं मिळवून आणण्याच्या कामीं बायका पुरुषांइतक्याच हुशार असल्यामुळें, त्यांना ह्या लोकांत जितका मान मिळतो तितका इंदियन लोकांत क्वचितच मिळतो. त्यांच्यांत बायकांस पुरुषांदेखत उघडपणें बोलण्याची मोकळीक असते, आणि त्या कधीं कधीं पुरुषांस हुकूम करतांनाहि पाहण्यांत येतात"; तसेंच "क्युएबा प्रांतांत बायका पुरुषांसमवेत जाऊन त्यांच्या बरोबरीनें लढतात, आणि कधीं कधीं पुढारीपणहि पत्करितात "; आणि ह्याच लोकांबद्दल वेफर असें म्हणतो कीं, "त्यांचे नवरे त्यांच्यांशीं फार दयाळूपणानें व ममतेनें वागतात; मीं एकाद्या इंदियनास बायकोस कधीं मारतांना किंवा तीस शिव्या देतांना पाहिलें नाहीं ". डाहोमन लोकांबद्दल एक गोष्ट सांगतात तिचा अर्थ असलाच निघतो; कारण ते लोक जरी फार क्रूर व अगदीं निर्दय आहेत, तरी त्यांच्या बायका त्यांना लढाईत मदत करीत असून त्यांची स्थिति इतर जातींतील स्त्रियांपेक्षां पुष्कळ चांगली आहे; कारण बर्टन असें म्हणतो कीं, डेहामी देशांत "सरकारी नात्यानें स्त्री श्रेष्ठ गणली जाते, पण इतर गोष्टींत तिला अद्यापि पुरुषांच्या गर्विष्ठपणाचा त्रास होतोच ".

बायकांना मिळणाऱ्या वागवणुकींत सुधारणा होण्या-

चें आणखी एक संभाव्य कारण एथें सांगितल्यास वावगें होणार नाहीं. तें हें कीं, कोठें कोठें मालमत्ता देऊन बायका मिळविण्याच्या ऐवजीं नोकरी करून त्यांस पुरुष मिळवीत असतात. जेकबच्या संबंधानें जी रूढी हीब्रयू लोकांच्या दंतकथांवरून आपणास समजून येते ती बऱ्याच लोकांत सुरू आहे असें दिसतें. कारण ती भिल, गोंड, आणि नेपाळांतले पहाडी लोक ह्यांच्यांत सामान्य आहे; ती जाव्हा बेटांत मुसलमानी धर्म सुरू होण्यापूर्वीं चालू होती; ती प्राचीन पेरू व मध्य अमेरिका एथें सुरू होती; आणि कांहीं अमेरिकन जातींत ती अद्यापि चालू आहे. आतां हें उघडच आहे कीं ज्या बायकोसाठीं पुष्कळ दिवस मेहनत केली असेल, तिची किंमत चोरलेल्या किंवा विकत घेतलेल्या बायकोपेक्षां ज्यास्त वाटली पाहिजे. आणि हेंहि उघडच आहे कीं, नोकरीच्या मुदतींत ठरविलेल्या मुलीशीं बोलण्याचालण्याचे प्रसंग वारंवार येत असल्यामुळें, आणि पुढें ही आपली बायको होणार हा विचार त्याच्या मनांत घोळत असल्यामुळें तिच्याबद्दल त्याच्या मनांत नैसर्गिक कामवासनेहून कांहीं तरी उच्चतर मनोविकार उत्पन्न होण्यास जागा असते; म्हणजे अर्वाचीन सुधारलेल्या लोकांचा जो प्रीतिसंपादनाचा संप्रदाय आहे त्याच्यासारखें कांहीं तरी ह्याठिकाणीं दृष्टीस पडतें. परंतु ह्याठिकाणीं मुख्यत्वेंकरून ध्यानांत ठेवावयाच्या गोष्टी ह्या कीं, ( १ ) जी सुधारणा रानटी अशा भटक्या लोकांत मोठ्या मुष्किलीनें अमलांत येत असते, ती नोकरी करतां येईल असे धंदे जसे वाढत जातील तशी ज्यास्त

सुलभपणानें अमलांत येत जाते; आणि ( २ ) बायको विकत घेण्याच्या ऐवजीं नोकरी करून तीस मिळविण्याची चाल जी अत्यन्त मोठ्या प्रमाणावर सुरू होते, ती अर्थात् देशांतील विशेष गरीब असे जे वर्ग, जे काबाडकष्टाच्या कामांत गुंतलेले असून बायका विकत घेण्यास असमर्थ असतील, त्यांच्यामध्यें विशेष प्रमाणावर सुरू होते: ह्यावरून अर्थात् असें व्यक्त होतें कीं, हा जो विवाहाचा उच्चतर नमुना तो उद्यमशील वर्ग प्रथम प्रचारांत आणीत असल्यामुळें त्याची प्रगति उद्यमशील नमुन्याच्या प्रगतीबरोबर होत असते.

आतां ह्या ठिकाणीं एक सामान्य प्रश्न सहज उत्पन्न होतो; तो हा कीं स्त्रियांची स्थिति आणि सामाजिक घटनेचा नमुना ह्यांच्यामध्यें काय संबंध आहे ?

३६. युद्धशीलता व अनेकपत्नीपद्धति आणि उद्यमशीलता व एकपत्नीपद्धति, ह्या दोहोंदोहोंमध्यें नैसर्गिक साहचर्यें आहेत असा जेव्हां आपण सिद्धान्त काढिला, तेव्हांच ह्या प्रश्नाचें अर्धवट उत्तर दिल्यासारखें झालें. कारण ज्या अर्थीं अनेकपत्नीपद्धतीवरून स्त्रियांची नीच स्थिति व्यक्त होते, आणि ज्या अर्थीं एकपत्नीपद्धति ही उच्चस्थिति प्राप्त होण्यास आवश्यक आहे, त्या अर्थीं असें सिद्ध होतें कीं, युद्धशीलता कमी होणें आणि उद्योगशीलता वाढणें ह्या गोष्टी त्यांच्या स्थितीच्या उन्नतीच्या सामान्य सहचारीच आहेत. हा सिद्धान्त वर जी गोष्ट सांगितली तिच्याशींहि सुसंगतच दिसतो. इतर बाबतींत कनिष्ठ असलेल्या लोकांत जेथें स्त्रियांचे धंदे सरासरी पुरुषांच्या धंद्यांसारखेच असतात, तेथें त्यांची स्थिति इतर स्त्रियांच्या मा-

नानें चांगली असते हें सत्य, युद्धविषयक व्यवहार कमी हो-ऊन उद्यमविषयक व्यवहार जसे वाढत जातील तशी स्त्रियांची स्थिति सुधारत जाते, ह्या जास्त व्यापक सत्याशीं जुळणारेंच दिसतें. कारण जेव्हां स्त्रिया व पुरुष दोघेंहि, कितीहि भिन्नभिन्न प्रकारच्या पण उत्पादक अशा उद्योगांत गुंतलेलीं असतात, तेव्हां त्यांच्या उद्योगांत जो भिन्नपणा असतो, त्यापेक्षां जेव्हां बायका काम करीत असून पुरुष लढत असतात, तेव्हां त्यांच्या उद्योगांत ज्यास्त भिन्नपणा असतो. त्या दोहोंमध्यें हा संबंध आहे असें म्हणण्यास हीं जीं सामान्य कारणें दाखविलीं, त्यांकडून निघून आतां विशिष्ट कारणांकडे वळूं.

हलक्या व सरळ अशा टोळ्यांमध्यें ज्या सारख्या लढाया चाललेल्या असतात, त्याबरोबरच त्यांच्यांत अनेकपत्नीपद्धतिहि दृष्टीस पडते, हें सिद्ध करण्यास जसा फारसा पुरावा मांडण्याची जरूर पडली नाहीं, तद्वतच ह्या सारख्या लढाईच्या स्थितीबरोबर स्त्रियांची पशुवत् वागवणुकहि दृष्टीस पडते, हें सिद्ध करण्यास पुराव्याची फारशी मांडणी करावयास नको. ज्या फारच थोड्या साध्या टोळ्यांमध्यें उद्योगशीलता दृष्टीस पडून त्याबरोबरच स्त्रियांची उच्चतर स्थितीहि नजरेस पडते, त्यांच्याकडे नुसती नजर फेंकली तरी पुरें होणार आहे. अगदीं रानटी अशा टोडा लोकांमध्यें अनेकपत्नी व अनेकपति ह्या दोन्ही पद्धति जुळलेल्या असल्यामुळें त्यांच्यांत स्त्रीपुरुषव्यवहारस्थिति जरी अगदीं नीच दिसते, आणि त्यांच्या अर्धवट स्थाईक अशा गवळ्याच्या जीवितावरून त्यांची उद्यमशीलता जरी अगदीं अल्प अशीच पक्क

झालेली दिसते, तरी त्यांच्यामध्यें देखील वरील सत्याचा निदर्शक पुरावा सांपडतो. कारण त्यांच्यांत सगळीं विशेष कष्टाचीं कामें पुरुष व मुलगे यांच्याकडे सोंपविलेलीं असतात, आणि "त्यांच्या बायका पाणी किंवा लांकूडफाटें आणण्यास देखील घराच्या दरवाज्याबाहेर पडावयाच्या नाहींत; तर त्या वस्तू त्यांच्याकरितां त्यांचा एकादा नवरा आणून देतो", आणि ही जी त्यांच्यांत विशेष गोष्ट दिसते त्याबरोबरच शांतस्वभाव, आणि समाजघटेंनत युद्धशीलनमुन्याचा अत्यन्त अभाव, ह्या दोन गोष्टी त्यांच्यांत दिसून येतात. दुसऱ्या एका पहाडी टोळीमध्यें ह्या गोष्टीचें मोठें लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण सांपडतें; तें बोडो व ढिमाल या लोकांमध्यें होय. आपल्या हें अगोदर लक्षांत आलेंच आहे कीं, सुधारणेच्या खालच्या पायरीवरील लोकांत हे लोक म्हणजे अयुद्धशीलता, युद्धशीलतेपासून उत्पन्न होणाऱ्या राजकीय घटनेचा अभाव, वर्णभेदांचा अभाव, आणि उद्यमशीलतेमध्यें गर्भित अशी कामांची स्वैच्छिक अदलाबदल, ह्या गोष्टींचें ठळक उदाहरण आहेत; आणि ते मागें सांगितल्याप्रमाणेंच एकपत्नी असून त्यांच्याबद्दल आपण असें वाचितों कीं, " बोडो आणि ढिमाल हे लोक आपल्या बायकांस व मुलींस चांगल्या रीतीनें वागवितात; त्यांच्यावर ते ममता करितात व विश्वास टाकितात; आणि त्यांस घराबाहेरचें कोणतेंहि काम करावयास सांगत नाहींत ". दुसरें उदाहरण डायाक लोकांचें घ्या. ह्या लोकांत टोळी टोळींचे तंटे व त्यांचे परिणाम हे जरी आहेतच, तरी त्यांच्यांत स्थाईक ना-

यकी आणि लष्करी घटना हीं नसून ते मुख्यत्वेंकरून उद्यमशील आहेत, आणि त्यांच्यांत मालकीचे हक्क चांगले वृद्धिंगत झालेले आहेत. त्यांच्यांतील निरनिराळ्या पोटजातींत जरी रूढी कांहीं अंशीं भिन्न भिन्न आहेत, तरी सामान्य गोष्ट अशी आहे कीं श्रमाचें असें जें घराबाहेरचें काम तें मुख्यत्वेंकरून पुरुष करितात, आणि ते स्त्रियांस चांगल्या रीतीनें वागवीत असून, त्यांस बरेच विशेष हक्क आहेत. त्यांच्यांत एकपत्नीपद्धतीबरोबर प्रीतिसंपादन संप्रदायहि आहे, आणि मुली आपले वर पसंत करीत असतात. समुद्रावरील डायाक लोकांबद्दल **सेंट जॉन** असें म्हणतो कीं, त्यांच्यांत " नवराबायको आयुष्यक्रमण एकत्र राहून फार चांगल्या रीतीनें करितात असें दिसतें "; आणि ब्रूक साहेब बोर्निओमधील मुका नामक एका ठिकाणची अशी हकीकत सांगतो कीं, तेथें बायका घरांचे दरवाजे बंद करून ठेवीत असतात,आणि नवरे मासे धरून आणितील तरच त्यांस आंत घेतात. आतां समाज सरळ असून त्याच्यांत त्या मानानें बरीच उच्च अशी उद्यमघटना असल्याचें, व निवडलेला मुख्य आणि प्रतिनिधिसभा हीं असून त्याच्या बरोबरच्या इतर सहचारिणी गोष्टी असल्याचें, उत्कृष्ट उदाहरण म्हटलें म्हणजे प्यूब्लो लोकांचें होय; हे लोक " उद्योगी, प्रामाणिक व शांतताप्रिय " असे वर्णिलेले असून ते एकपत्नी आहेत, आणि त्यांच्यांत स्त्रियांची स्थितीहि बरी उच्च आहे, कारण त्यांच्यांत प्रीतिसंपादन संप्रदाय, आणि मुलींकडून वराची निवड, एवढयाच गोष्टी आहेत असें नाहीं,—म्हणजे त्यां-

च्यांत " आईबापांस एकादा संबंध कितीहि योग्य वाटला तरी मुलीस तिच्या इच्छेविरुद्ध लग्न करावयास लावीत नाहींत इतकेंच नाहीं, तर प्रीतिसंपादनाचा जो नेहमींचा क्रम तोहि कधीं कधीं फिरवितातः म्हणजे जेव्हां एकाद्या मुलीस एकाद्याशीं लग्न करावेंसें वाटतें, तेव्हां तो त्याबद्दल गोष्ट काढील ह्याविषयीं ती वाट पहात बसत नाहीं, तर आपली आवड आपल्या बापास कळविते, तो त्या तरुणाच्या आईबापांकडे जातो, आणि आपल्या मुलीची इच्छा काय आहे हें त्यांस कळवितो. "

आतां सरल समाजांकडून निघून संयुक्त समाजांकडे वळतां आपणास पालिनिशियामध्यें शेजारीं शेजारीं दोन असे समाज आढळतात कीं, त्यांच्या सामाजिक नमुन्यांत युद्धशील व उद्यमशील असा भेद आहे, आणि तितकाच भेद त्यांच्या स्त्रियांच्या ज्या स्थिती त्यांच्यांतहि आहे. हे दोन लोक फिजियन व सामोअन हे होत. फिजियन लोकांमध्यें युद्धयोग्य घटना, क्रिया, आणि मनोभाव हे अत्यन्त जाड्या प्रमाणावर दृष्टीस पडतात. त्यांच्यांत अनिर्बंध अशी स्वैच्छिक राज्यपद्धति असून ठराविक पदव्या आहेत, आज्ञाधारकपणा अत्यन्त पूर्ण आहे, आणि आज्ञांकितपणाच्या खुणा देव आणि दास ह्यांच्याच मधल्या जणूं काय आहेत; त्यांच्यांत सुव्यवस्थित अशी सेना असून तिच्यांत निरनिराळ्या दर्जाचे अंमलदार आहेत; खालच्या प्रतीच्या लोकांचें काम, लढवय्ये लोकांस आवश्यक वस्तूंचा पुरवठा करण्याचेंच केवळ आहे; आणि लढवय्ये लोकांचें काम केवळ क्रूरपणानें लढाई करण्याचें असून त्यांच्यांत माणसें खा-

ण्याचीहि चाल आहे. आणि या लोकांत अनेकपत्नीपद्धति असून व नायकांमध्यें दहापासून शंभरांपर्यंत बायका करितां येतात इतक्या कळसास ती गेलेली असून स्त्रियांची स्थिति इतकी नीच आहे कीं, त्या अगदीं हलक्या प्रतीच्या रानटी लोकांतल्या सारख्या ओझ्याच्या पशूंसारख्या वागवितात इतकेंच नाहीं, तर त्या पाहिजे तेव्हां विकतां येत असून शिवाय नवऱ्यास वाटल्यास बायकोला मारून खाण्याचीहि परवानगी आहे. उलटपक्षीं सामोआमध्यें शासनसरणी बऱ्याच अंशीं उद्यमशील बनलेली आहे.त्यांच्यांत प्रतिनिधिसत्ताक राज्यवस्था आहे; नाईक कांहीं अंशीं निवडलेले असून त्यांच्या अधिकाराला बरींच बंधनें आहेत; उद्यमघटना इतकी सुवृद्ध झालेली आहे कीं, त्यांच्यांत दुकानावरून रोज कामें आणि मुदतीनें शिकावयास राहिलेले असे शिष्य आहेत, श्रमाबद्दल मजुरा आहे, आणि धंदे-सभांचें बीज असून संपहि आहेत. आणि ह्या लोकांत स्त्रियांस केवळ थोड्या श्रमांनीं होणारीं कामें करावयास लागतात हें एक स्त्रियांच्या उच्चतर स्थितीचें चिन्ह असून, शिवाय, दुसरें एक असें चिन्ह आहे कीं, त्यांच्यांत बायकोप्रमाणें नवऱ्यासहि विवाहद्रव्याची ( हुंड्याची ) तरतूद करावी लागते, आणि दोघांचेहि हुंडे सरासरी सारख्याच मोलाचे असतात; आणि तिसरें चिन्ह असें आहे कीं, जीं नवराबायको बरींच वर्षें एकत्र नांदलीं असतील, तीं विभक्त होते समयीं मालमत्ता सरासरी सारख्याच प्रमाणावर वांटून घेतात. परस्परांशीं तुलना करण्यासारख्या इतर संयुक्तसमाजांपैकीं अमेरिकेंतील दोन समाज

सांगण्यासारखे आहेत; ते इरोकाइस व आरॉकेनियन हे होत. हे दोन्ही समाजघटनेच्या प्रमाणानें सदृश असून सुधारलेल्या लोकांच्या हल्ल्यांपासून स्वसंरक्षण करण्यासाठीं संयुक्त होऊन बनलेले होते; तरी त्यांच्या सामाजिक रचनेंत असा भेद होता कीं, आरॉकेनियन लोकांची नियमनसरणी स्पष्टरीत्या युद्धशील अशी होती, आणि इरोकाइस लोकांची नव्हती; कारण पहिल्या लोकांतील शास्ते व्यक्तिरूप आणि अनुवांशिक असून, दुसऱ्या लोकांतील प्रतिनिधिस्वरूप होते. आतां स्त्रीपुरुषांमधील श्रमविभागाच्या संबंधानें हे दोन लोक जरी बऱ्याच अंशीं परस्परसदृश होते—कारण त्यांच्यांत पुरुष लढाई करणें, शिकार मारणें, आणि मासे धरणें एवढींच कामें करीत असून, बायकांकडे शेतांतील व घरांतील सर्व कामें सोंपवीत असत—तरी इरोकाइस लोकांमध्यें ज्यास्त स्वतंत्र अशा राजकीय नमुन्याबरोबर ज्यास्त स्वतंत्र असा कौटुंबिक नमुनाहि दृष्टीस पडत असे; कारण त्यांच्यांत स्त्रियांस स्वतंत्र मालकीचे हक्क असून विभक्तपणाचे समयीं मुलें त्यांस मिळत असत, आणि शिवाय त्यांचीं लग्नें त्यांच्या आया जुळवीत असत.

आतां प्राचीन व अर्वाचीन असे जे उच्चतम समाज त्यांच्यापैकीं पुष्कळ ह्या किंवा त्या कारणामुळें तुलना करण्यास अयोग्य झालेले आहेत. कांहीं समाजांसंबंधानें पुरावा अपुरा आहे; कांहींचा पूर्व इतिहास उपलब्ध नाहीं; कांहीं ठिकाणीं निरनिराळ्या समाजांचें संमिश्रण झाल्यामुळें पुरावा घोंटाळ्याचा झाला आहे; आणि सर्वच समाजांच्या संबंधानें असें झालें आहे कीं, सहकारी

कारणांची संख्या फारच वाढलेली आहे. तरें, अत्यन्त प्राचीन समाजांच्या संबंधानें आपणास माहिती अगदींच अल्प असल्यामुळें एवढेंच म्हणतां येईल कीं, त्यांच्यामध्यें दिसणारीं विशिष्ट स्वरूपें एथें प्रतिपादिलेल्या मतांशीं विसंगत नाहींत. आर्केडियन लोकांत उच्चारानुरूप लिहिण्याची पद्धति सुरू व्हावी इतकी उच्चतर सुधारणा होण्यापूर्वीं, पुष्कळच काळपर्यंत ते लोक स्थाईक अशा पुष्कळ वस्तीच्या स्थितींत राहिले असले पाहिजेत, आणि त्यांच्यांत औद्योगिक संस्थाहि पुष्कळ वर्षेंपर्यंत अस्तित्वांत असल्या पाहिजेत; आणि म्हणून असा संभव दिसतो कीं, सभोंवतालच्या भटकणाऱ्या टोळ्यांच्या मानानें हे लोक फार प्रबल असल्यामुळें त्यांच्या सामाजिक जीवितास शत्रूंपासून फारसा त्रास न पोहोंचून ते चांगले शांततेनें राहत असले पाहिजेत. यावरून त्यांनीं आपल्या स्त्रियांस बरीच उच्च अशी स्थिति आणून दिलेली होती असें जें त्यांच्या लेखांवरून दिसतें, त्यांत असंबद्धता कांहींच दिसत नाहीं. त्यांच्यांत बायकांची मालमत्तेवर स्वतःची मालकी असे, आणि आयांस मान द्यावा अशा आशयाच्या त्यांच्या कायद्यांच्या विशेष आज्ञा असत. इजिप्शन लोकांबद्दल कांहीं अशाच प्रकारचें विधान करतां येईल. त्यांच्या अगदीं प्रारंभीच्या भिंतींवरील चित्रांवरून असें दिसतें कीं, ते लोक कला, उद्यम, रूढी, आणि जीवितक्रम ह्या बाबतींत फार सुधारलेले होते. यावरून सहजच असें अनुमान निघतें कीं इतकी उच्च स्थिति त्यांस प्राप्त होण्यापूर्वीं पुष्कळ काळपर्यंत त्यांची हळूहळू सुधारणा होत गेली असली पाहिजे; आणि त्यां-

च्या चित्ररूपी इतिहासावरून असें सिद्ध होतें कीं, त्यांचा पुष्कळ काळपर्यंत बऱ्याच अंशीं उद्यमशील असा जीवितक्रम झालेला होता. म्हणून त्यांचें संकलीभवन चाललेलें असतां उत्क्रान्त झालेला, आणि त्यांच्या धर्माच्या विशिष्टस्वरूपावरून बनलेला, असा जो त्यांच्या सामाजिक घटनेचा विशिष्ट नमुना, तो जरी कायम राहिला, तरी त्यांच्यांत उद्यमशीलतेस बरेंच महत्त्व आलेलें होतें, तिचा त्यांच्या सामाजिक रचनांवर बराच पगडा बसलेला होता, आणि तीस अनुरूप अशा मनोवृत्ती व कल्पना त्या लोकांत उत्पन्न झालेल्या होत्या. त्याबरोबरच त्यांच्या स्त्रियांचीहि स्थिति इतर स्त्रियांच्या मानानें चांगली होती. त्यांच्यांत अनेकपत्नीपद्धति जरी अस्तित्वांत होती, तरी ती अगदीं अपवादात्मक होती; कारण त्यांचे वैवाहिक संबंध अगदीं कडक असून त्यांस घटस्फोट करावयास मोठी मारामारी पडे; " विवाहित जोडप्यांचा परस्परांशीं पूर्ण संबंध असे "; इंग्लंदांतून वगैरे स्त्रिया जशा सामाजिक मेळ्यांतून मिळूं मिसळूं शकतात, तशा त्यांच्यातहि शकत; कांहीं बाबतींत त्यांचें पुरुषांवर वर्चस्व असे; आणि एबर्स असें म्हणतो कीं, " त्यांच्यांत वैवाहिक जीविताची स्थिति फार उच्च होती असें दाखविणाऱ्या दुसऱ्या पुष्कळ गोष्टी सांगतां येण्यासारख्या आहेत ".

प्राचीनकाळच्या आर्य लोकांच्या समाजांवरूनहि कौटुंबिक शासनपद्धति आणि राजकीय शासनपद्धति ह्यांच्यामधील संबंध चांगला निदर्शनास येतो. युद्धशील नमुन्याच्या समाजामध्यें अनियंत्रित नायकाची जी स्वेच्छाचारी सत्ता दृष्टीस पडत असते, ती मूळच्या पितृशासनबद्ध कुटुं-

बामध्यें, ज्यांचा मूळपुरुष एकच आहे अशा कुटुंबसंघामध्यें, आणि ज्या संयुक्त कुटुंबसंघांचे मिळून मूळचे आर्यसमाज बनलेले होते त्या संघांमध्यें दृष्टीस पडत असे. मॉम्सेननें वर्णिल्याप्रमाणें प्रारंभीचा रोमन लोकांतील शास्ता एकदां अधिकारारूढ झाला म्हणजे, कुटुंबांतील मुख्यपुरुषाचे त्याची बायको, मुलें आणि गुलाम ह्यांच्याशीं जे संबंध, तेच त्याचे सर्व नागरिकांशीं असत. त्यांच्यांत "राजाच्या सत्तेस कायद्यानें कोणतींहि बाह्य नियंत्रणें उत्पन्न केलेलीं नव्हतीं, किंवा करतां येण्यासारखींहि नव्हतीं. कुटुंबपित्यास ( घरच्या मालकास ) तूं काय करितोस म्हणून विचारणारा जसा कोणी कुटुंबांत नसे, तसा समाजाच्या धन्यास तसें विचारणारा समाजांत कोणी नसे. त्याची सत्ता त्याच्या मृत्यूबरोबरच काय ती लयास जात असे." ज्या ह्या पहिल्या पायरीवर राजकीय मुख्य पूर्ण स्वेच्छाचारी असे, आणि कौटुंबिक मुख्यहि इतका अनिर्बंध सत्ताधारी असे कीं त्याला आपल्या बायकोचा जीव घेण्याचाहि अधिकार असे, तेथून स्त्रियांच्या उच्चतर स्थितीकडे प्रगती जी झाली, ती सर हेनरी मेन म्हणतो त्याप्रमाणें विजयाच्या योगानें लहानलहान समाजांचे संयोग होऊन जे जास्त जास्त मोठाले समाज बनत गेले त्याबरोबर होणाऱ्या कुटुंबविघटनामुळेंच बऱ्याच अंशीं उत्पन्न झाली असली पाहिजे. पण अशा रीतीनें प्रारंभीं जरी विजयी अशा युद्धशील स्थितीमुळेंच स्त्रीदास्यविमोचनास उत्तेजन मिळालें, तरी तें पुढें ती युद्धशीलता कमी होऊनच मिळालें; आणि हें जें विमोचन उत्पन्न झालें तें खरोखरच उद्यमाविषयक रच-

ना आणि क्रिया ह्यांच्या प्रगतीबरोबरच वाढत गेलें. पूर्वी स्पष्ट करून सांगितल्याप्रमाणें युद्धशीलता जी मापावयाची ती युद्धांत मिळणाऱ्या जयांवरून फारशी मापावयाची नाहीं, तर विशेषेंकरून लढाईच्या कामांत पुरुषमंडळी कितपतशी गुंतलेली असते ह्यावरून मापावयाची. जेथें सर्व पुरुष लढवय्ये असून इतर सर्व काम बायकांसच करावें लागत असतें, तेथें युद्धशीलता अत्यन्त जाज्या प्रमाणावर असते. पुढें एकादा पुरुषवर्ग उत्पादक श्रमांत अंग घालून औद्योगिक घटनेचा पाया घालूं लागला, म्हणजे ही युद्धशीलता कमी होते. आणि अनियंत्रित अशा उद्यमशील वर्गाचें लढवय्या वर्गाशीं असणारें प्रमाण जसजसें वाढत जाईल तसतशा त्या समाजाच्या एकंदर क्रिया जास्त जास्त उद्यमविशिष्ट आणि कमी कमी युद्धविशिष्ट होत जातात असें म्हटलें पाहिजे. उलट पक्षीं, जेव्हां प्रबलतम टोळीचा जय होऊन पुष्कळ लहान वैरी टोळ्या संकलित होतात, तेव्हां शेजारच्या तसल्याच मोठाल्या टोळ्यांशीं ह्या संकलित टोळीचीं जरी मोठालीं युद्धें कधीं कधीं झालीं, तरी त्या एकंदर प्रदेशांत होणाऱ्या युद्धांचा एकंदर संचय पूर्वीपेक्षां कमी होतो; ही गोष्ट लक्षांत आणतां देखील वरील सत्य स्पष्टपणें लक्षांत येतें. प्रारंभीच्या रोमन लोकांत एकंदर लोकवस्तीशीं लढवय्ये लोकांचें प्रमाण काय बसत होतें, आणि पुढें रोमचें साम्राज्य बनलें तेव्हां तें प्रमाण काय बसूं लागलें, ही गोष्ट ध्यानांत आणतांहि हेंच सत्य स्पष्ट होतें. आणि दुसरी गोष्ट अशी कीं, विजयाच्या योगानें शेवटीं बनलेले

जे हे संयुक्त व दुहेरे संयुक्त समाज, ते एकत्र राखणें आणि युद्धविषयक कामांसाठीं त्यांच्या निरनिराळ्या भागांमध्यें योग्य सहकार्य उत्पन्न करणें, ह्या गोष्टी योग्य रीतीनें घडून येण्यास देखील उद्यमविषयक संस्थांची योग्य वाढ होणें आवश्यकच असतें. विस्तृत राज्याच्या मर्यादांवर विस्तृत सैन्यांस लढतां येण्यास देशांत बराच मोठा कामकरी वर्ग असला पाहिजे, त्यांच्यांत बराच मोठा श्रमविभाग असला पाहिजे, आणि धान्य वगैरे जिन्नस एके ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्याचीं योग्य साधनें असलीं पाहिजेत: म्हणजे काय, तर, मोठाल्या लष्करी संस्था क्रियावान् होण्याच्या अगोदर देशांतील पोषक व विभाजक इंद्रियसरणींची वाढ चांगलीच झालेली असली पाहिजे. एवंच असें ठरतें कीं, रोमच्या साम्राज्याच्या वाढीबरोबर पितृशासनबद्ध कुटुंबाचें जें विघटन होत गेलें, आणि त्यामुळें जें स्त्रीदास्यविमोचन उत्पन्न झालें, त्याची खरी सहचारी म्हटली म्हणजे उद्यमघटनेची वाढ हीच होती.

५७. रोमच्या साम्राज्याच्या मागूनच्या यूरोपिय समाजांच्या वाढीमध्येंहि असला कार्यकारणसंबंध इतर रीतींनीं आपल्या दृष्टोत्पत्तीस येतो.

यूरोपांत मध्ययुगामध्यें स्त्रियांची स्थिति कशी होती ह्याबद्दल सर हेनरी मेन असें म्हणतो:—" रोमच्या साम्राज्याची जी वाताहात झाली तिचा अखेरचा परिणाम स्त्रियांच्या व्यक्तिविषयक व वित्तविषयक स्वातंत्र्यास फार घातक झाला ह्याबद्दल फारसा संशय नाहीं ". ह्या त्याच्या म्हणण्यावरून त्या वाताहतींनंतर पुनः उत्पन्न

झालेली युद्धशीलता आणि स्त्रियांची ही दैन्यावस्था ह्यांमध्यें स्पष्ट संबंध दिसून येतो. कारण जोंपर्यंत रोमची सत्ता यूरोपाच्या विस्तृत भागांवर कायम होती, तोंपर्यंत तेथें बरीच शांतता वसत होती; पण ती सत्ता जसजशी क्षीण होत चालली तशा सर्वत्र लढाया सुरू होऊं लागल्या. पुढें जेव्हां जमीनदारीचीं लहान लहान राज्यें एकत्र होऊन मोठालीं राज्यें बनावयास लागलीं, तेव्हां स्त्रियांची स्थिति पुनः सुधारूं लागली; कारण ह्या मोठाल्या राज्यांतून लढाया कमी होऊं लागल्या, व त्या कमी भागावर पसरूं लागल्या.

हल्लींच्या सुधारलेल्या मुख्य राष्ट्रांमध्यें तुलना करून पाहतां ह्या सिद्धान्ताच्या सत्यतेसंबंधानें आणखी ताळे सांपडतात. पहिली गोष्ट ध्यानांत धरावयाची ही कीं फ्रान्सांत जेव्हां प्रथम लोकसत्ताकाची स्थापना झाली, तेव्हां स्त्रियांची स्थिति सुधारत गेली. दुसरी गोष्ट ध्यानांत धरावयाची ही कीं पुढें जेव्हां त्या देशांत बादशाही अमलाची स्थापना झाली, तेव्हां ती स्थिति पुनः बिघडूं लागली. ह्यासंबंधानें व्हेकौंट डी सीगर असें म्हणतो, " केवळ उच्चतर वर्गांतूनच स्त्रियांस कोणी विचारीनासें झालें असें नाहीं...तर लढाईच्या संवयीमुळें पुरुषांच्या मनांत एकप्रकारचा असला कांहीं गर्विष्ठपणा व बेपर्वाईपणा उत्पन्न झाला कीं, स्त्रियांचें जें नैसर्गिक दौर्बल्य तिकडेहि ते लक्ष्य देईनासे झाले. " यूरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांमधील गरीब लोकांच्या नेहमींच्या राहणीवरून त्यांची जी स्थिति व्यक्त होते, तिजकडे पाहतां असें स्पष्ट दिसतें कीं, ज्या देशांत लष्करी चळव-

ळ व घटना ह्या फार जोरावर आहेत, तेथील स्त्रियांची स्थिति, जेथें औद्योगिक संस्था व चळवळी विशेष जोरावर आहेत, तेथील स्त्रियांच्या स्थितीपेक्षां जास्त खडतर आहे. पुरुष ज्या मानानें लढाईत जास्त गुंतलेले असतील, त्या मानानें स्त्रियांवर कामाचा बोजा जास्त पडत असतो, हा जो कार्यकारणभाव प्रवाशांच्या नजरेस आफ्रिकेंत येतो, तो फ्रान्स व जर्मनी या दोन्ही देशांत अनुभवास येतो. समाजसंधारण कसें तरी झालेंच पाहिजे, आणि म्हणून जितके जितके पुरुष लष्करी नोकरींत गुंतून जातील, तितक्या जास्त स्त्रिया त्यांच्या कामकरी म्हणून रिकाम्या पडलेल्या जागा भरून काढण्यास गुंतल्याच पाहिजेत. म्हणूनच जर्मनींत घराबाहेरच्या काबाडकष्टाच्या कामांत—म्हणजे खणणें, ओझीं वाहणें, गाड्या इकडून तिकडे नेणें वगैरे कामांत,—स्त्रिया इतक्या पुष्कळ गुंतलेल्या दृष्टीस पडतात, आणि म्हणूनच फ्रान्सामध्यें शेतांतील काबाडकष्टाच्या कामांस स्त्रिया इतका हातभार लावितात. इंग्लंदांत स्त्रियांस जर्मनींतील स्त्रियांइतकें घरांत राबावें लागत नाहीं, फ्रान्सांतील दुकानांतून स्त्रिया जितक्या खपतात तितक्या इंग्लंदांत खपत नाहींत, आणि यूरोपांतील इतर देशांत स्त्रियांस घराबाहेर जितकें काम करावें लागतें त्यापेक्षां इंग्लंदांत कमी करावें लागतें, ह्या गोष्टी उघड आहेत; आणि त्याबरोबर हीहि गोष्ट उघड आहे कीं, इंग्लंदांतील पुरुषवस्तीवर यूरोपांतील इतर देशांपेक्षां लष्करी कामांत शिरण्याची सक्ती कमी आहे. आणि ज्या युनैटेड्स्टेट्स् देशांत परवांच्या लढाईपर्यंत यु-

द्धशीलता इतकी कमी होती, आणि औद्योगिक रचना आणि क्रिया इतक्या प्रबल होत्या, तेथें स्त्रियांची स्थिति जितकी उच्च झालेली आहे, तितकी इतर कोठेंच नाहीं.

हल्लीं अस्तित्वांत असलेल्या पौर्वात्य देशांतून मिळणारा पुरावा ह्याच म्हणण्यास पुष्टिदायक असा आहे. चीन देशाचा इतिहास ख्रिस्ती शकापूर्वीं दोन हजार वर्षांपासून उपलब्ध असून, त्या काळामध्यें त्या देशांत सारख्या लढाया सुरू असत; आणि त्यामुळें संघटनें, विघटनें, आणि पुनःसंघटनें इत्यादि गोष्टी तेथें सारख्या होत आलेल्या आहेत; आणि म्हणून ह्या काळांत व पुढील टार्टार व मोंगल लोक ह्यांच्या स्वाऱ्यांच्या काळांत, त्या देशांत औद्योगिक संस्थांची वाढ जरी सारखी होत गेली, तरी त्या राष्ट्राची जी युद्धशील घटना ती कायम राहिलेली आहे; आणि राज्यविषयक जी ही स्वैच्छिक सत्ता तिच्याबरोबर कुटुंबविषयक स्वैच्छिक सत्ताहि तेथें उत्पन्न झालेली आहे; आणि ह्या दोन्ही प्रकारच्या स्वैच्छिक सत्तेंत जो कांहीं कमजास्तपणा उत्पन्न झाला आहे, तो उद्यमशीलतेनें पोषिलेल्या ज्या रूढी व मनोवृत्ती त्यांनीं उत्पन्न झालेला आहे: तेथें बायकांस विकत घेतात; श्रीमंत लोकांत राखा ठेवण्याची रूढी सामान्य आहे; सासरे विधवा सुनांस कधीं कधीं राखा म्हणून विकीत असतात; आणि स्त्रिया काबाडकष्ट करीत असून कधीं कधीं त्यांस नांगरासहि बांधितात; असें आहे तथापि सार्वजनिक मत ह्या नीच स्थितीच्या विरुद्ध असल्यामुळें कायद्यानें अनुमत अशा क्रूर वागणुकीस बरेंच बंधनहि होत असतें.

जपानांत देखील अंतःकलहाचा पुष्कळसा काळ गेल्या-

नंतर त्यास पुढें सर्वांशीं युद्धशील अशी घटना प्राप्त झाली; त्यावेळीं जसें त्यास राजकीय स्वातंत्र्य माहीत नव्हतें, तसें कौटुंबिक स्वातंत्र्यहि माहीत नव्हतें; आणि म्हणून बायका विकत घेणें, राखा ठेवणें, केवळ नवऱ्याच्या इच्छेवरून घटस्फोट करणें, आणि जारकर्माबद्दल स्त्रियांचा शिरच्छेद करणें किंवा त्यांस सुळावर चढविणें, इत्यादि गोष्टी तेथें चालू होत्या. पण पुढें जेव्हां जपानांत औद्योगिक संस्थांची वाढ झाली, तेव्हां तेथील स्त्रियांच्या स्थितींत इतकी सुधारणा झाली कीं, जारकर्माबद्दल बायकोस पाहिजे ती शिक्षा करण्याचा नवऱ्याचा अधिकार नष्ट झाला; आणि अद्यापि जरी त्या देशांत स्त्रियांच्या हातांत भात झोडण्याची काठी कधीं कधीं दृष्टीस पडते, तरी पुरुष " स्त्रियांकडे घरांतील हलकी कामें संपवून बाहेरचीं खडतर कामें स्वतःच करितात. "

५८. जातीचे विशिष्ट गुणधर्म, धर्मविषयक समज, टिकाव धरून राहिलेल्या रूढी व दंतकथा, शिक्षणाचें मान, वगैरे अनेक गोष्टी ज्यास कारणीभूत आहेत, अशा चमत्कारांवरून एकादा व्यापक सिद्धान्त बसविणें कठीण आहे हें उघडच आहे; आणि हेंहि तितकेंच उघड आहे कीं, ह्या चमत्कारांच्या उद्भूतींत अनेक कारणें व्यापृत होत असल्यामुळें ज्या असंबद्धता सहजच उत्पन्न होतात, त्यामुळें त्यांपासून काढिलेल्या सिद्धान्तास कांहीं तरी बाध उत्पन्न होतोच होतो. तथापि ह्या प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टींची गोळाबेरीज करतां, त्यांवरून काढिलेला सिद्धान्त तत्त्वतः बरोबर आहे असें आपल्या ध्यानांत येईल.

हा सिद्धान्त जो आपणास अगदीं स्पष्ट रीतीनें दिसतो, तो अगदीं कमी घोंटाळ्याच्या पुराव्यावरून दिसतो. साधे आणि असुधारलेले असे बहुतेक सर्व समाज मुख्यत्वेंकरून युद्धशील आहेत, आणि त्यांच्या स्त्रियांची स्थिति अत्यन्त नीच आहे, ह्या गोष्टी ध्यानांत आणतां, जे थोडे सरल समाज शांतिशील आणि उद्यमशील आहेत त्यांच्यांत स्त्रियांचीहि स्थिति तशीच उच्च आहे, ही एवढीच एक गोष्ट वरील सिद्धान्त बरोबर ठरविण्यास पुरेसा पुरावा आहे: कारण ह्याठिकाणीं स्त्रियांच्या ह्या उच्चस्थितीचें कारण जात, किंवा धर्म, किंवा शिक्षण, ह्यांपैकीं कोणतेंहि आहे असें म्हणतां येत नाहीं.

युद्धशीलता व अनेकपत्नीपद्धति आणि उद्यमशीलता व एकपत्नीपद्धति, ह्या दोहोंदोहोंमध्यें जे संबंध आपल्या दृष्टीस पडले, तेहि हेंच सत्य दुसऱ्या एका स्वरूपीं दर्शवितात; कारण अनेकपत्नीपद्धतीवरून स्त्रियांची स्थिति नीच आहे, हें अवश्यच गर्भित होतें; आणि एकपत्नीपद्धतीवरून त्यांची उच्च स्थिति जरी अवश्यमेव गर्भित झाली नाहीं, तरी त्यांच्या उच्चस्थितीचें तें एक अत्यन्त महत्त्वाचें कारण आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.

शिवाय, कमी होणारी युद्धशलिता आणि वाढत जाणारी उद्यमशीलता, ह्यांपासून स्त्रीपुरुषसंख्या जी जवळजवळ सम होत जाते, तीहि स्त्रियांच्या उन्नतीस कारणीभूत होत असते; कारण सामाजिक संभरण चालविण्यास उपलब्ध अशा पुरुषांचा पुरवठा जसा वाढत जातो, तसे त्या संभरणाचे श्रम स्त्रियांवर कमी पडूं लाग-

तात. आणि दुसरी एक गोष्ट एथें सांगण्यासारखी आहे ती ही कीं, ज्या समाजांत हे उपलब्ध पुरुष जास्त कठीण कामें शिरावर घेतात, आणि अशा रीतीनें फाजील अशा शारीरिक झिजीपासून स्त्रियांस मुक्त करून त्यांस जास्त व जास्त चांगली अशी संतति उत्पन्न करण्यास समर्थ करितात, ते समाज, इतर गोष्टी समान असतां, ज्या समाजांत स्त्रियांस अशी सबलत मिळालेली नाहीं, त्या समाजाशीं जीवनार्थ कलहांत टक्कर देतांना सरशी पावतात. अशा रीतीनें ज्या समाजामध्यें स्त्रियांची स्थिति सुधारलेली आहे, त्या समाजांचा सहजच जास्त प्रसार होत जातो.

आणखी एक गोष्ट अशी आहे कीं, युद्धासाठीं योग्य बनलेल्या समाजांत जी अनियंत्रित सत्ता दृष्टीस पडत असते, तिचा कुटुंबांतील तसल्या सत्तेशीं तत्त्वतः संबंध असतो; आणि, उलट पक्षीं, उद्यमशील समाजांत सार्वजनिक जीवितांमध्यें जें स्वातंत्र्य दृष्टीस पडत असतें तें सहजच त्याबरोबर असणाऱ्या कौटुंबिक जीवितामध्येंहि दृग्गोचर होत असतें. एके ठिकाणीं जबरीचें सहकार्य दोन्ही बाबतींत दृष्टीस पडतें; आणि दुसऱ्या ठिकाणीं दोन्ही बाबतींत स्वैच्छिक सहकार्य आढळून येतें.

असल्या दोन समाजांतील नैतिक भेद पाहतां हेंच सत्य अन्यस्वरूपीं दृष्टोत्पत्तीस येतें. शत्रूंशीं नेहमीं वैर करीत असल्यानें आणि त्यांचा नेहमीं संहार करीत असल्यानें, सहानुभूती जळून जातात; उलट पक्षीं, नागरिकांमध्यें जिन्नस आणि कामें ह्यांच्या अदलाबदलीनें सहानुभूतीच्या उत्पत्तीस अडथळा येत नाहीं. आणि

शांत रीतीनें होणाऱ्या सहकार्याबरोबर ज्या परार्थ दृष्टी·
ची वाढ होत असते, ती घराबाहेरील जीवित आणि घरांती-
ल जीवित ह्या दोहोंमध्यें एकसमयावच्छेदेंकरून सुधार-
णा करीत असते.

---

## प्रकरण अकरावें

### मुलांची स्थिति



५९. पशु देखील, कितीहि क्रूर असले तरी, आपल्या संततीस कोमलपणानें वागवितात, ही गोष्ट परिचित आहे; आणि अत्यन्त क्रूर अशीहि मानवजाती आपल्या संततीस तशाच रीतीनें वागविते, ही गोष्ट वंरील गोष्टींशीं सुसंगतच आहे. आतां प्रथमदर्शनीं विलक्षण वाटणारी जी ही गोष्ट तिचें कारण उघडच आहे. आपल्या हें अगोदर लक्षांत आलेंच आहे कीं, स्त्रियांना क्रूरतेनें वागविण्याची अशी एक मर्यादा आहे कीं, तिच्या पलीकडे गेल्यास जात अजबाद नष्ट झाल्याशिवाय रहावयाचीच नाहीं; तसें ह्या ठिकाणींहि आपण असें लक्षांत आणिलें पाहिजे कीं, संततिप्रेम प्रबल नसेल तर जात कायम रहावयाची नाहीं. म्हणून आण्डामान बेटांतील लोकांचें वर्णन करतांना मोवाट जेव्हां असें म्हणतो कीं, "मिंकोपी लोकांतील आईबाप मुलांना अत्यन्त ममतेनें व कोमलतेनें वागवितात; किंवा फ्यूजिअन लोकांबद्दल स्नो जेव्हां असें म्हणतो कीं, त्यांच्यांतील स्त्रीपुरुषें दोघेंहि आपल्या संततीवर फार प्रेम करितात; किंवा स्टर्ट जेव्हां म्हणतो कीं, आस्ट्रेलियन आईबापें आपल्या मुलांवर फार माया करितात; तेव्हां त्याबद्दल आपणांस आश्चर्य वाटण्याचें कारण

नाहीं. खरोखर पाहतां, रानटी स्थितींत शिशुसंवर्धन विशेषतःच दुर्घट असल्यामुळें त्या स्थितींत पुष्कळ आत्मत्याग करावयास लावील इतकें शिशुप्रेम आईबापांचे ठिकाणीं असणें जरूरीचेंच आहे. आणि ज्या कुटुंबामध्यें असें प्रेम वसत नसेल तीं नष्ट होत असल्यामुळें, तें प्रेम कायम राहणें ही गोष्ट आपोआपच साधून जाते.

पण पशूंमधील शिशुप्रेमाप्रमाणें रानटी माणसांतील हें शिशुप्रेम फार अनियमित रीतींनीं व्यक्त होत असतें. पशूंमध्यें संततिप्रेमाची उपजतबुद्धि जशी कधीं कधीं पोरें ठार मारण्याच्या, व तीं खाऊन टाकण्याच्याहि वासनेनें दबली जाते, तशी रानटी लोकांतहि ही उपजतबुद्धि तत्क्षणीं उत्पन्न झालेल्या कांहीं प्रेरणांनीं कधीं कधीं वायफळ होऊन जात असते. उदाहरणार्थ, आस्ट्रेलियन आया आपल्या मुलांवर जरी प्रेम करीत असतात, तरी संकटसमयीं त्या कधीं कधीं त्यांस सोडूनहि जातात; आणि अंगस असें म्हणतो कीं, ठार केलेल्या मुलाच्या मांसाचे तुकडे आमिष म्हणून त्यांच्यांतील पुरुषांनीं गळास लाविलेले आपल्या पाहण्यांत आलेले आहेत. फ्यूजियन लोकांचें शिशुप्रेम स्पष्ट असूनहि ते त्यांस गुलाम म्हणून विकतात. चोनास नांवाच्या इंदियन लोकांत बाप मुलाचे जरी अत्यन्त लाड करीत असला, तरी आकस्मिक अपराधाबद्दल, रागाच्या भरांत तो त्यास कधीं कधीं ठारहि करितो. हलक्या जातींतून असले विलक्षण प्रकार सर्वत्र दिसून येतात. पाटागोनियन लोकांच्या प्रबल शिशुप्रेमाचें वर्णन करीत असतां फॉकनर असें म्हणतो कीं, ते ब्रांडीसाठीं आपल्या बायकांस व मुलांसहि

स्प्यानिअर्ड लोकांपाशीं वरचेवर गहाण ठेवितात, व विकतातहि. सौंड इंदियन व त्यांचीं मुलें ह्यांबद्दल बोलत असतां ब्यांक्रॉफ्ट असें म्हणतो कीं, " ते आपल्या मुलांस विकतात किंवा जुगारांत पणासहि लावितात." पायमीडीस हे लोक " यूटी लोकांना आपलीं मुलें थोड्याशा बारीक सारीक वस्तू किंवा कापडाचे तुकडे यांच्या मोबदला देऊन टाकितात ". आणि माकूसी लोकांमध्यें, " एकादा इंदियन जेवढी किंमत आपल्या कुत्र्याबद्दल मागतो, तेवढीच मुलाबद्दल मागतात ".

मुलांच्या संबंधानें हें जें क्रूर दिसणारें वर्तन तें पुष्कळ वेळां त्यांस पोसण्याच्या कामीं येणाऱ्या अडचणींपासून उत्पन्न होत असतें. असुधारलेल्या व अर्धवट सुधारलेल्या लोकांत सामान्य असा जो बालवध तो ह्याच कारणावरून मुख्यत्वेंकरून उत्पन्न होत असतो. त्याचीं अनेक स्वरूपें आहेतः—बाळंत होत असतां मृत झालेल्या आयांबरोबर त्यांच्या जिवंत अर्भकांस पुरणें; जुळीं मुलें झाल्यास त्यांपैकीं एकास मारणें; वडील मुलें बरींच असल्यास धाकट्यांस ठार करणें. आजारी व वृद्ध यांस मारतांना जी सबब पुढें आणीत असतात, तसलीच ह्या प्रसंगींहि बहुधा आणीत असतात. अमेरिकेंतील मोठाल्या मैदानांतील भटकणाऱ्या टोळ्या आपल्यांतील वृद्ध माणसांस सोडून जात असतात, त्या गोष्टीस अनुलक्षून क्याट्लिन म्हणतो कीं, " कधीं कधीं त्यांस अशा रीतीनें सोडून जाणें अगदीं आवश्यक होतें; आणि ते ह्याप्रमाणें नेहमीं करितात, आणि असें म्हणतात कीं, हीं माणसें आतां वृद्ध झालीं असून आमच्या मुलींच

उपयोगाचीं नाहींत, त्यांनीं आपल्या वडिलांस अशाच रीतीनें सोडून दिलें होतें; त्यांची मरावयाची इच्छा आहे, आणि म्हणून त्यांच्या मुलांनीं त्यांजकरितां रडतां कामा नये "; हडसनच्या उपसागरानजीकच्या प्रदेशांत राहणाऱ्या लोकांबद्दल हरियट असें म्हणतो कीं, " त्यांच्यांत बाप वृद्ध झाला म्हणजे जो मुलगा त्याचा अत्यन्त लाडका असेल त्याच्याकडून आपला शिरच्छेद करवून घेतो "; केनच्या ग्रंथांत आपण असें वाचितों कीं, " एका आसिनिबॉईन नायकानें आपल्या आईस ठार केलें, कारण ती वृद्ध व अशक्त झाली असल्यामुळें त्यास म्हणाली कीं, मजवर दया कर आणि माझ्या दुःखाचा शेवट करून टाक "; ह्या सर्व गोष्टी वाचून असें वाटतें कीं, आजारी आणि दुर्बल ह्यांना मारिल्यानें, रानटी स्थितींत होणारीं जीं एकंदर दुःखें, त्यांचा संचय कदाचित् कमी होत असेल; आणि तद्वतच जेव्हां वसतिप्रदेश नापीक असेल, किंवा जीवितक्रम कष्टमय असेल, तेव्हां बालवधापासून अशीच फलोत्पत्ति होत असेल. आणि जे रानटी लोक आपलीं मुलें विकतात, किंवा जिनसांबद्दल देऊन टाकितात, त्यांच्या कृतीचेंहि असेंच मण्डन करतां येण्यासारखें आहे.

तर मग, सामान्यतः पाहतां, पशूंप्रमाणें असुधारलेल्या लोकांमध्येंहि उपजतबुद्धि आणि क्षणिक प्रेरणा ह्यांच्या जोरावर सर्व क्रिया व क्रियाभाव होत असतात. रानटी माणसाच्या मुलाची स्थिति म्हणजे आस्वलाच्या बच्चाच्याच स्थितीसारखी आहे. कारण त्याच्या ठिकाणीं ( रानटी माणसाच्या ठिकाणीं ) नैतिक बंधन नसतें किंवा नै-

तिक नियंत्रणहि नसतें; म्हणून राग किंवा लोभ जशी प्रेरणा करील तदनुसार पोरास सोडून देणें, किंवा ठार करणें, किंवा पोसणें, ह्यांतून पाहिजे तें करण्याची अनियंत्रित वासना त्याचे ठायीं वसत असते.

६०. नैसर्गिक प्रेमाच्या उमाळ्यांत सुधारणेच्या पहिल्या पहिल्या पायऱ्यांवर, कांहीं अंशीं व्यक्तिविषयक आणि कांहीं अंशीं समाजविषयक अशा कांहीं वासनांची भर पडत असते कीं, ती मुलांचीं जीवितें कायम राखण्याच्या कामीं उपयोगीं पडते; पण ह्या वासनांनींच मुलगे व मुली ह्यांच्या स्थितीमध्यें भेदहि उत्पन्न होत असतात. पहिली वासना लढाईच्या कामांत टोळी प्रबल करण्याची होय; दुसरी वासना खासगी शत्रूंचा सूड घेणारा तयार करण्याची होय; तिसरी वासना मृताचे स्मशानविधि करील आणि थडग्यापाशीं वेळोवेळीं बळी नेऊन ठेवील, असा कोणी आपल्या मागें ठेवून जाण्याबद्दलची होय.

टोळींतलि योद्ध्यांची संख्या वाढविण्याची जी विशेष जरूरी, तिच्यामुळें मुलींहून मुलगे जास्त पसंत करण्याची मनोवृत्ति रानटी माणसांत सहजच उत्पन्न होते. चेचिमेक नामक एका लढवय्या जातीबद्दल जेव्हां आपण असें वाचितों कीं, " त्यांस त्यांचे मुलगे फार आवडतात, व त्यांस काळजीपूर्वक वाढवितात, पण मुली असतील त्यांचा ते तिरस्कार व द्वेष करितात "; किंवा पंचा लोकांबद्दल जेव्हां आपण असें वाचितों कीं, त्यांच्यांत " बायकोला पहिली मुलगी झाल्यास तिला ( मुलीला ) ते ठार करीत, आणि मुलापूर्वीं हो-

णाऱ्या सर्व मुलींची वासलात ते अशीच लावीत ", तेव्हां ह्या पुत्रेच्छेचे परिणाम काय होतात हें आपणास दिसून येतें; आणि सर्वत्र आपणांस असें आढळून येतें कीं, या इच्छेमुळें मुलींस एक ठार करितात, किंवा त्यांची कमी किंमत समजून त्यांस वाईट रीतीनें वागवितात. अशा रीतीनें उत्पन्न झालेली ही इच्छा सुधारणेच्या पुष्कळ चढत्या पायऱ्यांवर कायम राहते; उदाहरणार्थ, प्रसिद्ध इतिहासकार हिरोडोटस असें म्हणतो कीं, प्रत्येक पर्शन ( इराणी ) माणसाला आपल्याला अमुक मुलगे आहेत ह्याबद्दल मोठा गर्व वाटे, आणि जो कोणी सर्वांत ज्यास्त जिवंत मुलगे दाखवील, त्यास बादशाह वर्षास एक इनाम देत असे. आतां, पुत्रप्रेमांत भर घालणारा जो हा सामाजिक हेतु, तो मुलीच्या स्थितीपेक्षां मुलाची स्थिति उच्चतर करण्यास कारणीभूत होई हें उघडच आहे.

आपल्या मागें सूड उगविणारा ठेवून जाणें हा उद्देश सगळ्या रानटी व अर्धवट सुधारलेल्या लोकांस महत्त्वाचा वाटतो. आप्ताला इजा करणाराचा सूड घेण्याचें कर्तव्य हें सर्वांत प्रथम पवित्र वाटावयास लागून, जोंपर्यंत समाज मुख्यत्वेंकरून युद्धशील राहतील, तोंपर्यंत ही कल्पना कायम राहते, आणि त्यामुळें आपल्याबद्दल शत्रूंचा सूड उगविणारा मुलगा असावा ही इच्छा उत्पन्न होते; आणि तीहि मुलींपेक्षां मुलांची स्थिति उच्चतर होण्यास कारणीभूत होते.

रानटी लोकांत जी पूर्वजपूजा उत्पन्न होते, आणि जिच्या अनुरोधानें ते आपले मृत वाडवडील आणि त्यां-

च्याहि अगोदरचे पूर्वज ह्यांच्या थडग्यांशीं बळींचें अर्पण करीत असतात, तीहि मुलींपेक्षां मुलगे ज्यास्त इष्ट वाटण्यास कारण होते. कारण आपल्या पूर्वजांना जसें आपण बळी देतों, तसें आपण मेल्यावर आपणासहि बळी देणारा आपल्यामागें कोणी असावा असें रानट्यास सहजच वाटतें. ह्या इच्छेचे परिणाम हल्लीं आपल्यास चिनी लोकांमध्यें दृष्टीस पडतात. त्यांच्यांत एकाद्याचा एकुलता एक मुलगा मेल्यास तो त्याचा विशेषच शोक करितो, तो अशा समजुतीवर कीं, आपल्या थडग्यापाशीं बळी देण्यास आतां कोणी राहिला नाहीं. म्हणून त्या लोकांत अशी चाल उत्पन्न झाली आहे कीं, एकाद्यास लग्नाच्या बायकोचा मुलगा नसल्यास ( मुली असल्या किंवा नसल्या तरी सारख्याच ) मुलगा होण्यासाठीं त्यास राख बाळगण्याची परवानगी असते; एरवीं कोणी राख बाळगणें हें निंद्य समजतात. इजिप्शन लोकांचीं भिंतींवरील व सालीच्या कागदांवरील चित्रें, आणि आसिरियन लोकांच्या लेखावरून मिळणारा तसलाच पुरावा— ज्यावरून त्या लोकांत पूर्वजांना त्यांचे पुरुषवंशज बळी अर्पण करीत असें स्पष्ट दिसतें, त्याच्याकडे पाहतां, आणि हिंदू, ग्रीक, व रोमन ह्या सर्व प्राचीन आर्य लोकांत हे विधी मुलीस करतां येत नसत हें ध्यानांत आणतां, आपणास असें स्पष्ट दिसतें कीं, ह्या पूर्वजपूजेमुळें जसा मुलांचा अंकितपणा वाढत गेला, तसाच आईबापांनीं मुलींपेक्षां मुलांची काळजी जास्त घेण्याचा प्रघात जास्त जास्त दृढ होत गेला.

सारांश, मानवजातीमध्यें प्रौढांचे तरुणांशीं जे संबंध, ते प्रारंभीं इतर प्राण्यांमधील संबंधांसारखे असून, पुढें ते अनेक इच्छांच्या जोरावर उच्चतर स्वरूपें धारण करूं लागले;—पहिली इच्छा शत्रूशीं लढण्याच्या कामीं मदतीस मिळविणें, दुसरी इच्छा आपणास इजा करील त्याचा सूड उगविणाराची तरतूद करणें आणि तिसरी इच्छा मरणानंतर आपली काळजी करील असा कोणी तरी मागें ठेवून जाणें. ह्या इच्छा समाज पहिल्या पहिल्या पायऱ्या चढून जात असतां जास्त जास्त प्रबल होत जाऊन, तेणेंकरून मुलींपेक्षां मुलांचे हक्क जास्त जास्त अमलांत येऊं लागले. ह्या ठिकाणींहि, पुरुषांची युद्धशीलता आणि स्त्रियांची नीचावस्था ह्या दोहोंमध्यें किती निकट संबंध आहे, हें आपल्या पुनः नजरेस येतें.

६१. आतां असा प्रश्न उभा राहतो कीं, मुलांची स्थिति आणि समाजघटनेचें स्वरूप ह्यांच्यामध्यें काय संबंध असतो? ह्या प्रश्नाचें उत्तर गतप्रकरणांत दिलेल्या उत्तरासारखेंच आहे; तें हें कीं, समाजाचें युद्धशील स्वरूप जाऊन त्यास जसें उद्यमशीलस्वरूप येत जाईल तशी मुलांची वागवणूक कमी कमी क्रूर होत जाते.

ज्या अत्यन्त हलक्या स्थितींत संततीचें, त्या त्या वेळच्या प्रबल मनोवृत्तींस अनुसरून, कधीं कधीं देव्हारें होतें, कधीं कधीं बळी पडतो, आणि कधीं कधीं विक्री होते, त्या स्थिती म्हणजे अर्थात् सभोवतालच्या टोळ्यांशीं सारख्या संग्रामाच्या स्थिती होत. आईबापांच्या इच्छेवर संततीचें हें सर्वांशीं अवलंबून राहणें, युद्धशीलता अगदीं प्राचीन समूहांमध्यें दिसणा-

री असो किंवा त्यांच्याहून उच्चतर समूहांमध्यें दिसणारी असो, दोन्ही ठिकाणीं सारखेंच दिसून येतें. दोन्ही प्रकारच्या समूहांत मुलांवर आइबापांची जीव घेण्यापर्यंत सत्ता असते, आणि अशी सत्ता असणें म्हणजे त्यांचा (मुलांचा) कोणताहि हक्क किंवा मागणी न ओळखणें असेंच अर्थात् होय. अतिशय रानटी अशा युद्धशील टोळ्यांतील मुलांची स्थिति, आणि ज्या युद्धशील टोळ्या पितृशासनबद्ध, किंवा असल्या अनेक टोळ्यांच्या मिळून बनलेल्या आहेत त्यांतील मुलांची स्थिति, ह्यांची तुलना करून पाहतां, दुसऱ्या स्थितीच्या वतीनें आपणास एवढेंच म्हणतां येतें कीं, असल्या समाजांमध्यें पूर्वीची कल्पना जरी कायम राहिली, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत कांहीं फेरबदल होतो, आणि उद्यमशीलता जशी वाढत जाईल तसा हा फेरबदलहि वाढत जातो. आतां ह्याबद्दलचा पुरावा पाहूं.

फिजियन लोकांची राज्यव्यवस्था अत्यन्त जुलमी, आणि त्यांची युद्धाची पद्धति अत्यन्त क्रूर असून, त्यांच्यांत मुलांचीहि स्थिति अत्यन्त नीच अशी आहे. त्यांच्यांत बालवध, व विशेषतः मुलींचा, निम्मेपेक्षां दोनतृतीयांशांशींच ज्यास्त जवळ आहे; ते " आपल्या अर्भकांस केवळ लहरीवरून, सोईसाठीं, रागावरून, किंवा आळसामुळें, ठार मारीत असतात "; आणि " एकाद्या प्रबल नायकास प्रसन्न करण्यासाठीं ते आपल्याच टोळींतील मुलें त्यास देतात ", आणि तीं गुलाम करण्यासाठीं नव्हत, तर खाण्यासाठीं. चिचिमेक नांवाची जी क्रूर व लढाऊ अशी मेक्सिकोमधील एक जात आ-

हे, तीहि अतिरिक्त पितृसत्तेचें आणखी एक उदाहरण आहे. त्यांच्यांत "मुलांस आईबापांच्या परवानगी व्यतिरिक्त लग्न करतां येत नाहीं, आणि एकाद्या तरुणानें हा कायदा मोडिल्यास त्यास देहान्त शिक्षा होते". ह्या उदाहरणावरून प्राचीन मेक्सिकन लोकांच्या कौटुंबिक स्थितीची आठवण होते; ते मेक्सिकन लोक बऱ्याच प्रमाणानें विजयी अशा नरभक्षक चिचिमेक लोकांचे बनलेले होते; त्यांची समाजघटना फारच युद्धशील होती, आणि त्यांच्याबद्दल क्लाव्हिगेरो असें म्हणतो:—" त्यांच्या मुलांना आईबापांची इतकी भीति मानण्याचें शिक्षण मिळालेलें असे कीं, ते मोठे होऊन विवाहित झाले तरी त्यांच्यादेखत बोलण्याचें धैर्य त्यांस होत नसे ". प्राचीनकाळच्या मध्य अमेरिकेंत कुटुंबशासन असेंच होतें; आणि प्राचीन पेरू देशांत असा कायदा आहे कीं, " मुलांचें वय पंचवीस वर्षांचें होईतोंपावेतों त्यांनीं आपल्या बापांच्या आज्ञेंत राहून त्यांची सेवा करावी. "

आतां जे थोडे असुधारलेले व अर्धवट सुधारलेले समाज, सर्वांशीं किंवा बहुंशीं उद्यमशील आहेत, तिकडे जर आपण वळलों, तर त्यांच्यामध्यें बायकांप्रमाणेंच स्त्रियांचीहि स्थिति बरीच उच्चतर आढळून येते. शांतिशील अशा बोडो व ढिमाल लोकांत, " बालवध मुळींच माहीत नाहीं "; मुलीस " विश्वासपूर्वक व दया पूर्वक " वागवितात; आणि त्यामुळें मुलांमध्यें सहजच अशी मनोवृत्ति उत्पन्न होते कीं, मातापितरांस वृद्धपणीं अगदींच एकटें सोडून जाणें हें अत्यन्त लज्जास्पद होय ". त्यांच्या बहुतेक जवळचे जे कॉच लोक,

ते असेच शांतिशील असून, त्यांच्यांत जेव्हां लग्नें ठरवीत असतात, तेव्हां " निश्चित वधूस अगोदर विचारीत असतात". तद्वतच बऱ्याच अंशीं उद्यमशील व युद्धपराङ्मुख असे जे डायाक लोक त्यांच्याबद्दल असा पुरावा मिळतो कीं, त्यांच्यांत " अर्भकवध क्वचितच ऐकूं येतो ", आणि त्यांच्या मुलांस प्रीतिसंपादनाची मोकळीक असून, त्यांच्यांत मुली आपले नवरे पसंत करीत असतात. सामोअन लोक शेजारच्या मॅलेपोलिनिशियन लोकांपेक्षां अधिक उद्यमशील असून त्यांच्यांत अर्भकवध नाहीं म्हणून सांगतात, आणि मुलांमुलींस आईबापांकडून लग्नाची संमति न मिळाल्यास पळून जाण्याची परवानगी असते म्हणूनहि सांगतात. तद्वतच टाना बेटांत राहणाऱ्या नीग्रीटो लोकांत युद्धशीलता फारच अल्प प्रमाणावर असून ठराविक अशा नायक्या मुळींच नाहींत; त्यांजबद्दल टर्नर असें म्हणतो कीं, " टानीज लोक आपल्या मुलांचे फार लाड करितात; त्यांच्यांत अर्भकवध मुळींच नाहीं; ते आपल्या मुलांस व मुलींसहि प्रत्येक प्रकारची सवलत देत असतात ". शेवटचें उदाहरण उद्यमशील प्यूब्लो लोकांचें घ्या; त्यांच्या मुलांस लग्नासंबंधानें कांहीं निर्बंध मानावा लागत नसे, आणि ते आपल्या मुलींस विशेषच हक्क देत.

एवंच समाजनमुना अत्यन्त युद्धशील असला म्हणजे तेथें मुलांची अगदीं अंकितावस्था दृष्टीस पडते, आणि मुलींची तर स्थिति मुलांच्या स्थितीहून अधिक नीच असते; उलट पक्षीं, समाजनमुना जसजसा युद्धपराङ्मुख होत जाईल, तसतसे मुलांचे हक्क जास्त जास्त ओळखूं

लागतात इतकेंच नाहीं, तर मुलांचे व मुलींचे ओळखिलेले हक्क परस्परसम होण्याच्या पंथास लागतात.

६२. जे समाज कौटुंबिक व राजकीय शासनपद्धतीच्या पितृशासनरूप स्वरूपामधून जाऊन मोठाल्या राष्ट्रांचीं स्वरूपें उत्क्रमणानें प्राप्त करून घेते झाले आहेत, त्यांच्याहि ठिकाणीं असलाच पुरावा सांपडतो. विशिष्ट जाती टुरोनियन असो, सेमिटिक असो, वा आर्य असो, तिच्यामध्यें प्रजेवरील राजकीय जुलूम आणि मुलांवरील कौटुंबिक जुलूम ह्या दोहोंमध्यें एकच संबंध दृष्टीस पडतो.

चीन देशांत अर्भक मुलींचा वध सामान्य आहे; आईबापें आपलीं मुलें गुलाम म्हणून विकतात; लग्नाचे वेळीं " मुलीचीं आईबापें मुलीबद्दल नेहमीं पैसा मागतात". " केवळ प्रेमावरून झालेला संयोग, पुत्राचा जो आज्ञाधारकपणाचा धर्म त्याचा भयंकर भंग म्हणून समजला जातो, आणि एकाद्या मुलीनें एकाद्या तरुणाविषयीं विशेष आवड दाखविणें म्हणजे दुराचरणा इतकाच महान् अपराध करणें होय असें समजलें जातें. ह्यासंबंधानें त्यांची म्हण अशी आहे कीं, बादशहानें आपल्या प्रजेची जशी बापाप्रमाणें काळजी वाहणें युक्त आहे, तशी बापाला आपल्या कुटुंबावर राजाची सत्ता चालवितां यावी हेंहि योग्य आहे. पण हीहि गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं, युद्धशील कालापासून चालत आलेली व कायद्यानें अनियंत्रित, अशी जी ही पितृसत्ता, ती जरी समाजघटनेच्या युद्धशील स्वरूपाबरोबर कायम राहिली आहे, तरी उद्यमशील नमुन्याब-

रोबर ज्या मनोवृत्ती उत्पन्न होतात तेणेंकरून प्रत्यक्ष व्यवहारांत तींत बराच फरक झालेला आहे. अर्भकवध जाहीरनाम्यानें निषिद्ध केलेला असून, गरीबी आणि मुलग्याचें संगोपन करण्याची जरूरी, ह्या दोन सबबींवरच माफ केला जातो, आणि जे मुलें विकत घेतात त्यांच्या कृतीवर सार्वजनिक मताचा दाब आहे.

प्रारंभींच्या अमदानींत जपानी लोकांत जी युद्धशील घटना बरीच वृद्धिंगत झाली, तिच्यावरोबर मुलांचा विशेष आज्ञांकितपणा त्यांच्यांत उत्पन्न झाला. मिटफर्डसाहेब असें सांगतो कीं, त्यांच्यांतील गरीबलोक " आपल्या मुलींस हाटेलांतील वगैरे नोकर बाया, गाणाऱ्या नायकिणी, आणि शुद्ध पण्यांगना होण्यासाठीं विकतात "; आणि सर रूदरफर्ड आलकॉकहि असें म्हणतो कीं, आईबापांस सगळ्या नाहीं तरी " कांहीं प्रसंगीं आपलीं मुलें विकण्याची सत्ता आहे ". आणखी हेंहि सांगितलें पाहिजे कीं, तेथें पुरुषांप्रत स्त्रियांच्या अंकितपणापेक्षां वृद्धांप्रत तरुणांचा अंकितपणा जास्त आहे; कारण त्यांच्यांत बायको जरी नवऱ्याची पक्की गुलाम असते, तरी त्याच्या मरणानंतर तिची " मुलावर जी सत्ता उत्पन्न होते ती तिचें पूर्वीं झालेलें नुकसान भरून काढिते; कारण मुलाचें वय किंवा पदवी केवढीहि असली, तरी आई या नात्यानें तिचा त्याच्यावर फार अधिकार चालतो ". आणि चिनीलोकांतहि असेंच आहे.

सीमाइट लोकांमध्यें बापाला मुलांचा जीव घेण्याचा देखील अधिकार कसा असे, आणि त्याबरोबर मुलांपेक्षां मुलींची स्थिति जास्त नीच कशी असे, ह्याबद्दल पुरावा

देण्याची जरूरी नाहीं. पण त्यांच्यामधील आईबाप व मुलें ह्यांच्यांतील परस्परसंबंध आणखी लक्षांत येण्यासाठीं एथें हें सांगितलें पाहिजे कीं, मुलें म्हणजे आईबापांची इतकी मालमत्ता समजली जात असे कीं, तीं त्याच्या कर्जाबद्दल विकलीं जात असत; शिवाय मुलींनाहि विकण्याची त्यांना परवानगी असे; आणि मुलांस कसें वागवावें ह्याबद्दलच्या सर्व आज्ञा बापाच्या फायद्याच्या असत. हीब्रयू लोकांच्या पुढच्या पुढच्या अमदानींत बापाच्या पूर्ण सत्तेमध्यें जरी थोडाबहुत फेरबदल उत्पन्न झाला, तरी सरकाराचा युद्धशील नमुना जोंपावेतों कायम होता, तोंपावेतों मुलांचाहि आज्ञांकितपणा अतिशय होता.

" कुटुंब " ह्या प्रकरणांत, यूरोप जिंकतांना आर्य लोकांची सामाजिक व कौटुंबिक घटना कशी होती ह्याचें उदाहरण म्हणून रोमन लोकांविषयीं बोलतांना, त्यांच्यांत मुलांची स्थिति कशी असे ह्याबद्दल थोडेंबहुत ध्वनित केलेलें आहे. त्यासंबंधानें मॉम्सेन असें म्हणतो कीं, बापाच्या संबंधानें पाहतां त्यांच्यांत " कुटुंबांतील सर्व माणसांना कायदेशीर हक्क कांहींहि नसत; म्हणजे, बैल आणि गुलाम ह्यांच्याप्रमाणें बायको व मुलें हीं अगदीं हक्कविहीन असत ". मुलांस उघड्यावर टाकण्याचा बापास हक्क असे. " कुरुप मुलगे खेरीजकरून सर्व मुलगे व निदान पहिली मुलगी ", ह्यांच्यासंबंधानें ह्याविरुद्ध जी धर्माज्ञा असे, तीस दिवाणी कायद्याची संमति नव्हती. त्यास " त्यांच्यावर न्यायाचा अधिकार चालविण्याची, आणि त्यास योग्य वाटेल त्याप्रमाणें, जीव किंवा अवयव ह्यासंबंधानें पाहिजे ती शिक्षा

करण्याची, सत्ता व जबरी असे ". त्यास आपलें मूल विकतांहि येत असे. आणि दुसरी गोष्ट ध्यानांत आणावयाची ती ही कीं, रोमच्या साम्राज्याची वृद्धि होत असतां उद्यमशीलतेच्या वाढीबरोबर स्त्रियांची स्थिति जशी सुधारत गेली, तशी मुलांचीहि सुधारत गेली. एथें हेंहि सांगणें इष्ट दिसतें कीं, ग्रीसमध्यें देखील बापाच्या अनियंत्रित सत्तेचीं असलींच स्वरूपें दृग्गोचर होत गेलीं. तेथें एकादा माणूस आपली बायको व मुलगी यांस मृत्युपत्रानें देणगी म्हणून कोणासहि देऊं शके.

६३. तद्वतच, हल्लीं अस्तित्वांत असलेल्या यूरोपियन राष्ट्रांच्या सततयुद्धशीलताविशिष्ट अशा प्रारंभींच्या स्थितींचीं, त्यांच्या नंतरच्या कमी सततयुद्धशील व ज्यास्त ज्यास्त उद्यमशील अशा स्थितींशीं तुलना केल्यास, असल्याच प्रकारचे भेद दृग्गोचर होतात.

उदाहरणार्थ, फ्रान्स देशांतील सेल्ट लोकांबद्दल सीझर असें म्हणतो कीं, त्या लोकांत "मुलें मोठीं होईतोंपावेतों त्यांस बाप चारचौघांत आपल्यापाशीं येऊं देत नाहींत." मेरोव्हिजियन लोकांच्या अमदानींत बापास व विधवा आईस आपल्या मुलास विकण्याचा अधिकार असे व हा अधिकार नवव्या व दहाव्या शतकापर्यंत कायम होता. फ्रान्सांतील महाराज्यक्रांति होण्याच्या पूर्वीं जमीनदारीची पद्धति क्षीणावस्थेंत असतां, कौटुंबिक अंकितता,–व विशेषतः सरदारवर्गामध्यें–इतकी होती कीं, **चॅाहोटो ब्रायांड** म्हणतो:–माझी आई, माझी बहीण व स्वतः मी, हीं सर्व माझ्या बापाच्या समक्ष पाषाणाच्या मूर्तीं सारखीं बनलेलीं असूं, आणि तो खोलीबाहेर जाईल तेव्हां आह्मास

आपलेपणा पुनः येत असे; आणि टेन साहेब दुसऱ्या दोघांच्या लेखांच्या आधारावर असें म्हणतो कीं, ही पितृसत्ता सर्वसामान्य असे. पुढें, राज्यक्रांतीच्या नंतर व्हैकौंट डी सीगर म्हणतो:—" आमच्या पूर्वजांच्या अमदानींत तीस वर्षांचा माणूस, हल्लींच्या अठरा वर्षांच्या मुलाहून कुटुंबनायकाचा जास्त आज्ञांकित असे."

स्वतः इंग्रजांच्या इतिहासामध्यें असाच पुरावा सांपडतो. पंधराव्या शतकांतील चालीरीतींचें वर्णन करीत असतां राईट साहेब म्हणतो:—"मोठ्या कुटुंबांतील मुलींवर देखील आईबापांची केवळ सक्त नजर असे इतकेंच नाहीं, तर जुलमाचीहि असे. ....आईबापांचा अधिकार त्यावेळीं बहुतेक अतिरिक्त झालेला होता." सतराव्या शतकापर्यंत, मुलें आईबापांच्या देखत कांपत कांपत स्तब्धपणें उभीं असत, किंवा गुडघे टेंकून रहात, आणि त्यांच्या परवानगीशिवाय त्यांस बसतां येत नसे ". अठराव्या शतकांतील इंग्लिश ग्रंथांकडे पाहतां त्यांत आईबापांस, 'महाराज' व "बाईसाहेब" हे शद्ब मुलांनीं लाविलेले आढळून येतात; त्यावेळीं मुलांचीं लग्नें ठरविण्याचा अधिकार आईबाप आपल्या हातीं घेत, आणि मुलगे, व विशेषतः मुली, आईबापांनीं पसंत केलेले संबंध कबूल करीत; ह्यावरून त्या काळीं राजकीय अंकितपणाच्या प्रमाणानें मुलांचा अंकितपणा होता हें स्पष्ट दिसतें. बरें, एकोणीसाव्या शतकांत इंग्लंदांत उद्यमशीलता जेव्हां फार जाड्या प्रमाणावर सुरू झाली आणि त्याबरोबरच समाजघटना त्या मानानें जेव्हां ज्यास्त स्वतंत्र झाली, तेव्हां मुलांचें स्वातंत्र्यहि तितकेंच वाढलें गेलें; आणि ही

गोष्ट आईबापांच्या ज्यास्त बेताबाताच्या आज्ञा, शिक्षांचा कमीपणा, आणि घरांतील संभाषणांत आलेला ज्यास्त स्वाभाविकपणा ( ज्याच्या योगानें बाप हे मुलांस मालकांसारखे न वाटतां मित्रांसारखे वाटूं लागले आहेत ) ह्या सर्वांवरून व्यक्त होते.

हल्लीं अस्तित्वांत असलेल्या ज्यास्त युद्धशील व कमी युद्धशील अशा यूरोपीय समाजांत अशा प्रकारचे भेद दृष्टोत्पत्तीस येतात. इंग्लंदापेक्षां फ्रान्स व जर्मनी या देशांत औद्योगिक घटनेचा राजकीय घटनेवर पगडा कमी बसलेला असल्यामुळें, तेथें इंग्लंदापेक्षां मुलांस कमी स्वतंत्रपणा आहे. फ्रान्सांत मुलांचा लडीवाळपणा जरी बराच आहे, तरी त्यांच्यावर देखरेखहि ज्यास्त कडक आहे, आणि त्यांच्या कृत्यांना बंधनेंहि ज्यास्त घट्ट आहेत. तेथें घरीं मुली आईच्या नजरेपलीकडे कधीं रहावयाच्या नाहींत, आणि मुलांस शाळेंत लष्करी दराऱ्यांत रहावें लागतें. शिवाय त्यांच्यांत अविवाहित मुलांमुलींवर आईबापांचा इतका अधिकार चालतो कीं, तरुण जोडप्यास स्वतः निवड करण्यास फारच अल्प संधि सांपडते. शिवाय, जर्मनींत राजकीय शासनाच्या कडकपणाशीं समानाशिक्षणाच्या बाबतींत कडकपणा आहे. ह्यासंबंधानें **स्पेन्सर** साहेब म्हणतात, इंग्लंदांत पुष्कळ दिवस राहून शिक्षकीण या नात्यानें बराच अनुभव घेतलेली एक जर्मन बाई मला लिहितेः—" इंग्लिश मुलांवर आईबापांचा जुलूम होत नाहीं तर तीं त्यांस केवळ मार्ग दाखवितात. स्वतंत्रपणा व व्यक्तिविषयक हक्क यांबद्दलच्या मुलांना वाटणाऱ्या अभिमानाला तीं उत्तेजन देतात. म्हणून एका इंग्रज मुलापेक्षां

वीस जर्मन मुलें शिकविणें मला ज्यास्त सोपें वाटतें, असें जेव्हां एक शिक्षक मला म्हणाला, तेव्हां त्याच्या म्हणण्याचा अर्थ माझ्या ध्यानांत बरोबर आला. पण त्याचा अर्थ जरी ध्यानीं आला, तरी त्याचें म्हणणें मला पसंत पडलें नाहीं. इंग्लिश मुलाच्या मानानें जर्मन मूल म्हणजे सरासरी गुलामच असतें; म्हणून सत्ताधारी माणसास त्यास जास्त सहज रीतीनें कह्यांत आणतां येतें."

शेवटची गोष्ट ही कीं, युनैटेड् स्टेट्स्‌मध्यें, आज पुष्कळ दिवस, युद्धशील घटनेची बहुतेक मुळींच भेसळ नाहीं अशी उद्यमशील समाजघटना उत्पन्न झालेली असल्यामुळें, तेथें पितृशासन अतिशय सईल झालेलें आहे, आणि मुली व मुलगे ह्यांच्या स्थिति बहुतेक परस्परसमान आहेत, त्यांच्यांत हें स्वातंत्र्य इतकें वाढलेलें आहे कीं, त्यांच्यांतील तरुण ललना आपापल्या ओळखी स्वतःच बनवीत असतात, आणि त्यांस आपले निकट व्यवहार बापांकडून किंवा आयांकडून अनुमतिविना किंवा अडथळ्याविना चालवितां येतात.

६४. एवंच गतप्रकरणांत स्त्रियांच्या स्थितींत जसे फरक होत गेलेले आपल्या दृष्टीस पडले, त्यांशींच सदृश असे फेरबदल मुलांच्या स्थितींत झालेले, प्रस्तुत प्रकरणांत, दृष्टीस पडतात; आणि ही गोष्ट नैसर्गिकच आहे.

प्राचीन पद्धतीच्या समाजांत कायदे मुळींच नसून रूढी जीवितक्रमाच्या केवळ कांहींच भागांसंबंधानें असल्यामुळें आईबापांच्या अधिकारांस तेथें मुळींच मर्यादा नसतात. आणि त्याच्या मनोविकारांस पशू किंवा माणसें ह्यांशीं होणाऱ्या झगड्यांनीं चेतना नित्य मिळत अस-

त्यामुळें संततीशीं त्यांच्या असलेल्या संबंधांना जें नियंत्रण असतें तें केवळ संतत्यनुकूल उपजतबुद्धीचेंच असतें.

पुढें लवकरच, मदतनीस योद्ध्याची, सूड उगविणाराची आणि बळी देणाराची, आवश्यकता भासूं लागल्यामुळें तेणेंकरून पितृयोग्य मनोवृत्तींमध्यें व्यक्तिविषयक व सामाजिक हेतूंची भर पडूं लागते. आणि तेणेंकरून मुलग्यांस योग्य स्थितीसारखें कांहीं प्राप्त होऊं लागतें; पण मुली अद्यापि पशूंच्या पोरांच्याच स्थितींत असतात.

पुराणपद्धतीच्या सुधारलेल्या समाजांत मुलांशीं व मुलींशीं बापाचे अशा प्रकारचे संबंध उत्पन्न होऊन, जेथें धनगरी जीवितक्रमामुळें पितृशासनबद्ध कुटुंब उत्पन्न होतें, तेथें ते ज्यास्त दृढ होतात; आणि जे समाज विशेषेंकरून युद्धशीलच रहातील, त्यांच्या ठिकाणीं ते तसेच कायम रहातात; मग ते समाज पितृशासनबद्ध कुटुंबापासून उत्पन्न झालेले असोत, किंवा अन्य तऱ्हेनें उत्पन्न झालेले असोत. युद्धविषयक चापल्यापासून उत्पन्न होणारे जे जयापजय त्यांचे, लष्करी घटनेंत, राजकीय घटनेंत, आणि कौटुंबिक घटनेंत, समानसंबंधी म्हटले म्हणजे शास्त्यांचा स्वैच्छिक अधिकार, आणि शासितांची गुलामगिरी हे होत.

युद्धशील घटनेंत दिसून येणाऱ्या जबरीच्या सहकार्यांत, उद्यमयोग्य घटनेंत दिसून येणाऱ्या स्वैच्छिक सहकार्याची जशी भर पडत जाईल, तशी स्त्रियांच्या स्थितीप्रमाणेंच मुलांचीहि स्थिति सुधारत जाते. ही गोष्ट, असुधारलेल्या युद्धशील समाजांची तसल्याच अयुद्धशील इतर समाजांशीं, सुधारलेल्या राष्ट्रांच्या प्रारंभींच्या युद्धशील

स्थितींची त्यांच्या नंतरच्या विशेष उद्यमशील स्थितीशीं आणि हल्लींच्या सुधारलेल्या राष्ट्रांपैकीं विशेषतः युद्धशील राष्ट्रांची विशेषतः उद्यमशील राष्ट्रांशीं, तुलना करतां स्पष्टरीत्या दिसून येते.

पण हा संबंध अत्यन्त स्पष्ट रीतीनें ध्यानांत आणावयाचा असल्यास विशिष्ट गोष्टी पुढें सांगितल्याप्रमाणें परस्परांशीं विरुद्ध रीतीनें मांडाव्या. एका पक्षीं, बहुतेक रानटी जाती नित्यशः युद्धशील असून, जुन्या काळच्या विशेषतः युद्धशील राष्ट्रांतल्याप्रमाणें त्यांच्यांतहि बापास मुलांचा जीव घेण्याचा अधिकार असतो. दुसऱ्या पक्षीं, ज्या थोड्याशा असुधारलेल्या जाती शांतिप्रिय व उद्यमशील आहेत त्यांच्यांत अत्यन्त पुढें गेलेल्या सुधारलेल्या राष्ट्रांतल्याप्रमाणें मुलांचे जीव पवित्र मानिले जातात, आणि मुलगे व मुली ह्या दोघांसहि बऱ्याच प्रमाणांवर स्वतंत्रता देतात.

---

# प्रकरण बारावें

## गृहसंस्थांची भूत व भावि स्थिति



६५. गेल्या सर्व प्रकरणांतून निष्पत्तिपद्धतीपेक्षां ( Deduction ) अनुमिति पद्धतीचेंच ( Induction ) विशेष अवलंबन केलेलें आहे; आणि दुसऱ्या भागाच्या शेवटीं समाजविषयक चमत्कारांची उपपत्ति निष्पत्तिपद्धतीनें लावावयाची असें म्हटलेलें ज्या वाचकांनीं लक्षांत ठेविलें असेल, ते कदाचित् आतां असें म्हणतील कीं, आह्मीं तेव्हां केलेला बेत एक विसरून गेलों, किंवा कौटुंबिक गोष्टींचा अभ्यास अनुमितिसरणीहून अन्य सरणीनें विचार करणें अशक्य म्हणून प्रत्ययास आलें. पण आतांपर्यंत केलेल्या कोटिक्रमाचे निरनिराळे तंतू एके ठिकाणीं गोळा करतां आपल्यास असें दिसून येईल कीं, प्रत्यक्ष पुराव्यावरून जे सिद्धान्त अनुमित होतात, तेच उत्क्रान्तिनियमावरून निष्पन्न होतात.

ह्यासंबंधानें ध्यानांत आणावयाची पहिली गोष्ट ही कीं, कुटुंबाची उत्पत्ति उत्क्रान्तिनियमाच्या मुख्य विशेषांस अनुसरूनच होते. अत्यन्त रानटी सामाजिक समूहांत ज्यास विवाह म्हणतां येईल असें कांहींच नसतें: म्हणजे स्त्रीपुरुषसंयोग अत्यन्त अनियमित असतात. कुटुंबसमूह आई, व बापाच्या नित्य मदतीवांचून वाढवतां येतील अशीं मुलें, एवढ्यांचे प्रत्येकीं बनलेले अ-

सल्यामुळें सहजच लहान असतात, व त्यांची ताटातूट लवकरच होत असते. म्हणजे, त्यांच्यांत संकलन स्वल्प असतें. प्रत्येक समूहांत नातीं अल्प निश्चित असतात; कारण त्यांतील मुलें बहुतेक सावत्र भावंडें असतात, आणि बाप बहुधा अनिश्चित असतो. अशा रीतीनें लहान, असुसंबद्ध आणि अनिश्चित अशा रानटी कुटुंबांपासून उत्क्रान्तिनियमास अनुसरून, परस्परांपासून सामान्यपणें विजातीय, व विशेषेंकरून विजातीय, असे कुटुंबप्रकार उत्पन्न होतात; त्यांपैकीं कांहींत अनेकपत्नीपद्धति व अनेकपतिपद्धति ह्यांचें मिश्रण झालेलें असतें; कांहीं अनेकपतिपद्धतिविशिष्ट असून त्यांचे ठिकाणीं बंधुघटित व अबंधुघटित असे दोन भेद उत्पन्न होतात; कांहीं अनेकपत्नीपद्धतिविशिष्ट असून त्यांच्यामध्यें बायकांचे बनलेले, व बायको व राखा ह्यांचे बनलेले, असे दोन भेद उत्पन्न होतात; कांहीं एकपत्नीपद्धतिविशिष्ट असून त्यांच्यांत नेहमींचा प्रकार, आणि आठवड्यांतून कांहीं दिवस नवऱ्याची बायको हा प्रकार, असे दोन भेद असतात. कुटुंबांचे हे जे प्रकार व पोटप्रकार, त्यांपैकीं जे सुधारलेल्या समाजांत आढळून येतात ते सर्वांत अत्यन्त सुसंबद्ध, अत्यन्त निश्चित, व अत्यन्त संमिश्र असे आहेत. मधील प्रकारांचा विचार एकीकडे ठेवून मूळचा कौटुंबिक समूह आणि सुधारलेल्या लोकांत दिसणारा अत्यन्त उच्च कौटुंबिक समूह, यांची तुलना करून पाहतां, या शेवटच्या समूहाचें उत्क्रमण किती जाड्या प्रमाणावर झालेलें आहे हें लक्षांत येतें. त्या समूहांत विवाहसंबंध अगदीं निश्चित झालेला आहे; तो

अत्यन्त सुसंबद्ध झालेला आहे, कारण बहुधा तो जन्मभर कायम रहात असतो; आईबाप व मुलें हें जें त्या समूहाचें मूळस्वरूप त्या स्वरूपीं तो पहिल्यापेक्षां मोठा झालेला आहे ( कारण रानटी लोकांच्या मुलांची संस्था बहुधा लहान असते); आणि नातवंडें, पतवंडें, इत्यादिकांचा समावेश ज्याच्यांत होतो असें जें त्याचें विवृद्ध स्वरूप, त्या स्वरूपीं तर तो फारच मोठा झालेला आहे; आणि ह्या मोठ्या समूहाचे किंवा संघाचे जे घटक असतात त्यांचीं परस्पर नातीं फारच विजातीय असतात.

शिवाय, सर्व प्राणिकोटीमध्यें अनुक्रमें ज्यास्त ज्यास्त उच्च अशा ज्या संतत्युत्पादनाच्या व्यवस्था आहेत, त्याचे जे विशेष म्हणून प्रारंभींच आपल्या नजरेस आले, ते ज्यास्त ज्यास्त पक्क होणाऱ्या मानवी कुटुंबामध्यें ज्यास्त ज्यास्त प्रमाणावर आढळून येतात. सगळ्या उपजातीचें संरक्षण ही गोष्ट व्यक्तिजीविताच्या संरक्षणाहून अर्थात् ज्यास्त महत्त्वाची असल्यामुळें, आपण जसे ज्यास्त ज्यास्त उच्च प्राण्यांकडे वळतों, तसें आपणांस असें दिसून येतें कीं, हा उद्देश साधण्यास व्यक्तिजीविताचा जो बळी द्यावा लागतो त्याचें प्रमाण कमी कमी होत जातें. उच्चतर प्रकारच्या मानवजातींच्या मानानें नीचतर मानवजातींमध्यें उपजातीला प्रौढ व्यक्तींचा बळी ज्यास्त द्यावा लागत असतो. ही गोष्ट तीन प्रकारांनीं त्यांच्यामध्यें दिसून येते; संतत्युत्पादनाच्या पूर्वीचा त्यांचा जीवितकाळ ऱ्हस्व असतो, शिशुसंवर्धनाचें ओझें त्यांच्यावर जास्त असतें आणि त्याच्या मागूनचा जीवितकाळ ऱ्हस्व बनतो:

मुख्यत्वेंकरून रानटी स्त्रियांस मुलें लहान वयांत होऊं लागून, आणि बाळंतपणाच्या कष्टांनीं त्या थकून जाऊन अल्पवयांतच वृद्ध होतात, आणि लवकरच मरतात. पण उच्चतर प्रकारच्या जातींत अर्भकांचाहि बळी कमी पडत असतो; कारण रानटी माणसाच्या दारिद्र्यपीडित समूहांमध्यें समाजसंरक्षणासाठीं जो अर्भकवध करणें जरूरच पडत असतें, तो ह्या जातींत कमी कमी जरूरीचा होत जातो; आणि एरव्हीं होणारी संततीची मृत्युसंख्याहि त्याबरोबरच कमी होत जाते. शिवाय, प्रौढ जीविताचा बळी जसा कमी होत जाईल तसा त्या बळीबद्दल मोबदलाहि जास्त मिळूं लागतो; म्हणजे, शिशुसंवर्धनापासून आईबापांस उच्चतर व दीर्घतर सुखांची प्राप्ति होऊं लागते किंवा ज्या स्थितीमध्यें मूलवय गेलें म्हणजे रानटी पशूंप्रमाणें बाप व मुलगा हे निसर्गवैरी बनतात, किंवा भांडणामध्यें एकमेकांस ठार करण्याचा यत्न करितात, अशा स्थितीच्या ऐवजीं आतां अशी स्थिति उत्पन्न होते कीं, तिजमध्यें आईबापांस मुलगे व मुली यांच्या कल्याणाची कळकळ आमरण वाटून राहते. आणि ही सुखदायक अशी जी मुलांची निगा तिच्यामध्यें आणखी एका नव्या सुखसाधनाची भर पडते, तें साधन हें कीं मुलें आईबापांची निगा ठेवूं लागतात. हें सुखसाधन जेथें कुटुंब सरलस्वरूप असेल तेथें अल्प असून, तें जसें ज्यास्त ज्यास्त संकीर्ण होत जाईल, तसें वाढत जातें, आणि अशा रीतीनें व्यक्तीचा उपजातीला पडणारा जो बळी त्यांत आणखी कमतरता उत्पन्न होऊं लागून, ते-

णेंकरून, उलट, उपजाति व्यक्तीचें जीवित उच्चतर व दीर्घतर करण्यास कारणीभूत होऊं लागतें.

अद्यापि न सांगितलेली अशी एक गोष्ट राहिलीच आहे. ती ही कीं, समाजाच्या उच्चतर प्रकारांच्या उत्क्रमणाप्रमाणें कुटुंबाच्या उच्चतर प्रकारांचें उत्क्रमण मानवी बुद्धि व मनोवृत्ति ह्यांच्या उत्क्रमणाबरोबरच सारखें होत गेलेलें आहे. समाजघटकाचें स्वरूप आणि सामाजिक समूहाचें स्वरूप यांच्यामध्यें एकप्रकारचा आवश्यक संबंध असतो हें सत्य जसें राजकीय घटनेस लागू आहे, तसेंच कौटुंबिक घटनेसहि लागू आहे. कुटुंबांत काय किंवा राष्ट्रांत काय, ज्या कल्पनांमुळें व मनोवृत्तींमुळें सामाजिक जीविताला कांहीं तरी ज्यास्त उन्नतस्वरूप प्राप्त होण्याची शक्यता उत्पन्न होते, त्या कल्पना व मनोवृत्ति उत्पन्न होण्यास पूर्वीचें कांहीं तरी असें समाजस्वरूप असलेंच पाहिजे कीं, ज्यांतील अनुभवांवरून व ज्याच्या शिक्षणावरून त्या प्राप्त व्हाव्या; व त्या समाजस्थितीच्या वेळच्या कल्पना व मनोवृत्ति उत्पन्न होण्यास तदनुरूप तत्पूर्वीची समाजस्थिति असली पाहिजे; आणि अशी ही गोष्ट प्रारंभापासूनच होत गेली असली पाहिजे. उच्चतर मानसिक शक्ती सामाजिक जीवितापासून जी परिस्थिति उत्पन्न होते तिजपासूनच उत्पन्न होणें शक्य असल्यामुळें, ती परिस्थिति जशी उत्क्रान्त होत जाईल, तशा त्या उत्क्रान्त होतात, आणि एकाची जशी वाढ होत जाईल तशी दुसऱ्याचीहि होत जाते. आणि ज्या अर्थी पक्वदशेस आलेल्या कौटुंबिक जीवितांत परार्थबुद्धीचें महत्त्व फार आहे, त्या

अर्थीं सामाजिक स्थितीला मनुष्याची अनुरूपता जशी वाढत गेली आहे, तसेच उत्तर असे जे कौटुंबिक संबंध ते शक्य होत गेले आहेत.

६६. कौटुंबिक जीविताचीं रूपें आणि सामाजिक जीविताचीं रूपें यांमधील संबंधांचा निष्पत्तिरीत्या विचार करीत असतां, आणि हे संबंध व्यक्तिस्वभावाच्या एकाच प्रकाराशीं संयुक्तरीत्या संबद्ध असल्यामुळें प्रत्येक प्रकारच्या समाजामध्यें एकमेकांशीं संबद्ध कसे असतात हे दाखवीत असतां, वैवाहिक व्यवस्था, कुटुंबरचना, स्त्रियांची स्थिति, आणि मुलांची स्थिति, ह्या सर्वांचा एकसमयावच्छेदेंकरून विचार करणें सोईचें होणार आहे.

रानटी माणसें, पशुरूपी व मनुष्यरूपी भक्ष्य आणि शत्रु ह्यांच्याशीं वैर करीत असल्यामुळें, परजीवांवर जय मिळविण्यापासून उत्पन्न होणारें आत्मविषयक सुख दररोज प्राप्त करून घेत असल्यामुळें, आणि ज्या कृतींपासून दुःखोत्पत्ति होईल अशा कृत्यांपासून दररोज सुखसंपादन करीत असल्यामुळें त्यांचें जीवित अशा प्रकारच्या स्वभावघटनेस उत्तेजक होतें कीं, तेणेंकरून सामाजिक व कौटुंबिक जुलमी अधिकाराची उत्पत्ति होत असते. पशुवत् सामर्थ्य अंगीं असलेले लोक सन्मान्यता उत्पन्न करणाऱ्या वरिष्ठपणांत शेखी मिरवीत असल्यामुळें आणि इतरांच्या कल्याणाची पर्वा त्यांस मुळींच नसल्यामुळें,लहर लागेल त्या बायका ते धरीत असत, आणि वाटेल तेव्हां त्यांस टाकून देत असत. आणि मुलें हीं असल्या पूर्ण आपलपोटे आईबापांच्या पूर्ण कह्यांत असल्यामुळें पितृयोग्य उपजतबुद्धि जेव्हां व जितकी प्रबल असेल

तेव्हां व तितकेंच त्यांचें संरक्षण होत असतें. ह्यावरून, एकंदरींत, असें स्पष्ट होतें कीं, वैवाहिक संबंधाचें दौर्बल्य, कुटुंबाचे अनिश्चित असुसंबद्ध असे प्रकार, स्त्रियांची क्रूर वागवणूक, आणि अर्भकवध, ह्या गोष्टी अत्यन्त उग्र अशा युद्धशीलतेच्या स्वाभाविक सहचारिणी आहेत.

ज्यास समाज ही संज्ञा शोभत नाहीं अशा ह्या अत्यन्त हलक्या सामाजिक समूहांपासून मोठ्या अगर ज्यास्त संघटित अशा समूहांकडे प्रगति होण्यास अगोदर जास्त सहकार्य उत्पन्न झालें पाहिजे. हें सहकार्य जुलमाचें असेल किंवा स्वैच्छिक असेल; किंवा कांहीं अंशीं स्वैच्छिक व कांहीं अंशीं जुलमाचें असेल, आणि बहुधा तें असेंच मिश्रित असतें. आपल्या हें नजरेस आलेंच आहे कीं, युद्धशीलतेमध्यें जबरीच्या सहकार्याच्या प्राबल्याचा अंतर्भाव होत असतो, आणि उद्यमशीलतेमध्यें स्वैच्छिक सहकार्याच्या प्राबल्याचा होत असतो. ह्या ठिकाणीं आपण लक्षांत आणावयाचें तें हें कीं, त्याबरोबर येणारे जे कौटुंबिक संबंध ते प्रत्येक ठिकाणीं त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सामाजिक संबंधांशीं अनुरूप असतात, ही गोष्ट जशी आपणास अनुभवजन्य अनुमितिरीत्या खरी म्हणून आढळांत आली आहे, तशी ती विचारजन्य निष्पत्तिरीत्याहि उघड आहे. वाढणाऱ्या समाजांमध्यें जी ठळक अशी युद्धशीलता असते तिच्यांत अंतर्भूत होणारा अनियंत्रित अधिकार चालविणारा व अत्यन्त दास्यत्व पत्करणारा जो व्यक्तिस्वभाव, तो लढाईंत सर्व

आयुष्य जाऊन सारखा घट्ट होत जात असल्यामुळें, त्याला अनुरूप अशा कौटुंबिक व राजकीय व्यवस्था ठरत असतात. म्हणून रानटी लोक बायका चोरण्याच्या व विकत घेण्याच्या कामीं त्यांच्या हक्कांकडे अगदीं दुर्लक्ष करितात; म्हणूनच अनेकपत्नीपद्धतीपासून स्त्रीवर्ग व पुरुषवर्ग ह्यांच्या स्थितींत फरक उत्पन्न होतो; म्हणूनच स्त्रियांचा काम करणाऱ्या गुलामांप्रमाणें उपयोग करूं लागतात; म्हणूनच बायको व मुलें ह्यांचा जीव घेण्याचाहि अधिकार त्यांस प्राप्त होतो; आणि म्हणूनच कुटुंबाचे सर्व घटक सर्वांत वडील पुरुषाचे अंकित व्हावे अशी कौटुंबिक घटना उत्पन्न होते. उलटपक्षीं जे समाज प्रमुखत्वेंकरून उद्यमशील आहेत—मग त्या शांतिप्रिय अशा साध्या टोळ्या असोत वा युद्धशीलतेच्या बरींच पलीकडे गेलेलीं अशीं राष्ट्रें असोत—त्यांच्यामध्यें स्वैच्छिक सहकार्यानें बनलेला जो व्यक्तिस्वभावाचा नमुना तो वरच्या मानानें परार्थशील असा असतो. कामांची ( नोकऱ्यांची ) अदलाबदल करण्याची, किंवा केलेलें काम दर्शविणाऱ्या पैशाबद्दल केलेलें काम दर्शविणारा जिन्नस देण्याची, रोजची जी संवय आहे, ती संवय म्हणजे ज्यांच्याशीं आपण व्यवहार करितों त्यांना सदृश सुखोत्पत्ति करून देईल असेंच सुख त्यांच्यापासून स्वतः भोगण्याची संवय होय. अशा ठिकाणीं दुसऱ्याच्या हक्कांना मान देणें भागच होत असतें; त्यामुळें त्याबरोबर त्यांच्या हक्कांचें चित्र मनापुढें मांडावें लागत असतें, आणि असें चित्र मांडणें म्हणजे तितक्या पुरती सहानुभूति उत्पन्न होणेंच होय; किंवा जु-

लमामध्यें सहानुभूतिरूप मनोवृत्तीला दाबून टाकावें लागत असतें त्या दाबण्याचा ह्या ठिकाणीं अभाव असतो. आतां हें उघडच आहे कीं, अशा रीतीनें बनलेला जो स्वभावनमुना तेणेंकरून जसा सामाजिक क्रिया व व्यवस्था यांजमध्यें फेरबदल होतो, तसाच कौटुंबिक क्रिया व व्यवस्था यांजमध्येंहि फेरबदल उत्पन्न होतो. ज्या शिक्षणाच्या योगानें जातिबांधवाचे हक्क जास्त जास्त ओळखण्याची वृत्ति उत्पन्न होते, त्याच्याच योगानें स्त्रिया व मुलें यांचेहि हक्क जास्त जास्त ओळखण्याची वृत्ति उत्पन्न होते. ज्यांच्याशीं घराबाहेर सहकार्य करावयाचें त्यांच्या इच्छा काय आहेत हें पहाण्याची संवय लागली म्हणजे, त्याबरोबरच, ज्यांच्याशीं घरांत सहकार्य करावयाचें त्यांच्या इच्छा काय आहेत हें पाहण्याची संवय उत्पन्न होते. धनी व चाकर असें जें वैवाहिक संबंधाचें प्रथम स्वरूप असतें, तें बदलून त्याच्या ऐवजीं सरासरी बरोबरीचे भागीदार असें स्वरूप त्यास येतें; आणि त्यांच्यांतील बंधनाचें केवळ कायदेशीर स्वरूप जाऊन त्यास प्रेमाचें स्वरूप येऊं लागतें. आईबाप व मुलें यांचा प्रारंभीं संबंध असा असतो कीं, मुलानें पितरास बळी पडावें; पण पुढें हें त्या संबंधाचें जुलमी स्वरूप जाऊन त्यास असें स्वरूप येतें कीं आईबाप मुलांच्या कल्याणास बळीं पडूं लागतात.

एवंच युद्धशीलता व उद्यमशीलता यांच्या स्वरूपांवरून जे परिणाम निष्पन्न होतात, ते प्रत्यक्ष दृष्टीस पडणाऱ्या परिणामांशीं बरोबर जुळतात. आणि आम्ही म्हणतों हे संबंध प्रत्यक्ष आहेत, हें सिद्ध करण्यासाठीं

एथें दुसरी एक गोष्ट अशी ध्यानांत आणावी कीं, एकाच समाजांत, त्याचा जो युद्धशील भाग असेल त्याचे कौटुंबिक संबंध युद्धशीलच राहतात, आणि जो भाग उद्यमशील असेल त्याचे उद्यमशील बनूं लागतात. उदाहरणार्थ, फ्रान्सांत प्राचीनकाळीं, मृताच्या मालमत्तेच्या वांटणींत, जमीनदार व सरदार लोक असमतेच्या तत्त्वाला नेहमीं चिकटून राहिलेले असत, आणि व्यापारी वगैरे जे इतर वर्ग असत ते समतेच्या कल्पना सर्वत्र ग्रहण करूं लागले होते. तेराव्या शतकांत स्त्रीपुरुष व मुलें यांना सारखी संपत्ति मिळावी असा एक नवा कायदा तेथें झाला, त्यास उद्देशून थीएरी हा ग्रंथकार असें म्हणतो कीं, हा कायदा सरदारांच्या कायद्याच्या विरुद्ध असून त्या दोहोंत फारच खोल भेद होता; तो हा कीं, हा कायदा स्वाभाविक समतेच्या तत्त्वावर रचलेला होता व तो नव्हता.

६७. एथें एक फार महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो; तो हा कीं, ह्या कौटुंबिक संबंधाचें पुढें काय होणार? कुटुंबाच्या उत्पत्तींत आजपर्यंत उत्क्रमणाच्या नियमाची सामान्यतः पूर्तता कशी झाली आहे हें आपल्या लक्षांत आलेंच आहे. आणखी एकंदर सेंद्रिय उत्क्रमणामध्यें उपजाति, आईबाप, आणि संतति ह्यांच्या हिताहितांचा जो समेट चाललेला आहे, तो सुधारणा होत असतां आणखीहि वृद्धिंगत कसा झालेला आहे हेंहि आपल्या लक्षांत आलेंच आहे. शिवाय हेंहि आपल्या ध्यानांत आलेंच आहे कीं, सामाजिक उत्क्रमणाबरोबर स्त्रीपुरुषांच्या परस्परसंबंधांत व मुलांशीं असणाऱ्या

संबंधांत जे उच्चतर विशेष आलेले आहेत, ते सुधारत जाणाऱ्या सामाजिक स्थितींतील अनुभवांनीं व शिक्षणांनीं उत्पन्न झालेल्या बुद्धिविषयक व मनोवृत्तिविषयक उच्चतर विशेषांमुळेंच उत्पन्न झालेले आहेत आणि आपल्या असेंहि ध्यानांत आलें आहे कीं, अशा रीतीनें संपादन केलेले विशेष, आणि समाजघटनेचे व क्रियावर्त्तेचे विशेष प्रकार, ह्यांच्यांत कांहीं विशेष संबंध आहेत. असो तर आतां अशाच धर्तींवर उत्क्रमण झाल्यास पुढें कोणत्या प्रकारचे संबंध उत्पन्न होण्याचा संभव आहे?

ह्यासंबंधानें पहिलें अनुमान असें निघतें कीं, एकंदर भाविष्यत् काळांत पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांवर राहणाऱ्या निरनिराळ्या लोकांमध्यें कौटुंबिक संबंध परस्परविसदृशच राहतील. पृथ्वीतलावर सर्वत्रच सुधारलेले समाज उत्पन्न होतील अशी कल्पना आपणास मुळींच करतां येत नाहीं. शिवाय सेंद्रिय उत्क्रान्तीप्रमाणेंच सेंद्रियोत्तर उत्क्रान्तीमध्यें उच्चतर प्रकार उत्पन्न होण्यास नीचतर प्रकार अगदीं नष्टच झाले पाहिजेत असेंहि नाहीं. ज्याप्रमाणें उच्चतर जातींचे प्राणी जरी त्यांच्याशीं स्पर्धा करणाऱ्या कांहीं नीचतर जातींच्या प्राण्यांना स्थानभ्रष्ट कारितात, तरी दुसऱ्या पुष्कळ नीचतर जातींच्या प्राण्यांना नीचतर ठिकाणीं स्वस्थ राहूं देतात, त्याप्रमाणें उच्चतर जातीच्या समाजांनीं आपल्यास उपयोग करतां येईल अशा स्थानांपासून जरी तेथील नीचतर समाजांना हुसकून लाविलें, तरी जे क्षुद्र समाज नापीक किंवा वाईट हवेच्या प्रदेशांत राहत असतील, त्यांस कांहीं ते तेथून हुसकून लावणार नाहींत. उदाहरणार्थ सुधारलेले

लोक एस्किमोलोकांना ग्रीनलंदमधून हांकून लावतील ही गोष्ट संभवनीय दिसत नाहीं. फ्यूजियन लोक बहुधा टिकाव धरून राहतील असें वाटतें, कारण त्यांच्या बेटांत सुधारलेल्या लोकांचा निर्वाह होणें शक्य नाहीं. जे भटकणारे सीमाइट लोक आज हजारों वर्षें वालुकामय प्राच्य अरण्यांतून राहिले आहेत, त्यांस तेथून उच्चतर राष्ट्रें काढून लावतील असें वाटत नाहीं. आणि उष्णकटिबंधांत मलेरियापीडित असे जे पुष्कळ वाफाळ प्रदेश आहेत ते बरीच सुधारणा करून घेण्यास क्षम अशा जातींच्या उपयोगी बहुधा कधीं पडावयाचे नाहींत. एवंच, नीचतर प्रकारच्या मानवजातींना योग्य असे जे सामाजिक व कौटुंबिक संबंध ते केवळ नामशेष होण्याचा संभव दिसत नाहीं. अनेकपतिपद्धति कदाचित् तिबेटांत टिकाव धरून राहील; आफ्रिकेच्या कांहीं भागांत अनेकपत्नीपद्धति कदाचित् सदासर्वकाळ कायम राहील; आणि हैपरबोरियन लोकांच्या अगदीं दूरच्या समूहांमध्यें संमिश्र आणि अनियमित असे स्त्रीपुरुषसंबंध बहुधा चालू राहतील.

आणि हेंहि शक्य दिसतें कीं पृथ्वीच्या कांहीं भागांत युद्धशीलता कायम राहील; आणि म्हणून त्या ठिकाणीं त्या स्थितींत साहजिक अशा राजकीय संबंधांबरोबर तीस साहजिक असे कौटुंबिकसंबंधहि कायम राहतील. ईशान्य एशियांतील प्रदेशांसारखे जे प्रदेश सुधारलेल्या अशा उद्यमशील समाजांस पुरे एवढाले लोकसमूह पोसण्यास असमर्थ असे आहेत, त्यांत कदाचित् असेच समाज वस्ती करून राहतील कीं, ज्यांमध्यें युद्धशीलता काय-

म राहून राजकीय व कौटुंबिक घटना अपक्व अशा असतात.

अशा प्रकारचे टिकाव धरून राहणारे हलक्या प्रकारचे समाज एकीकडे ठेवून, आतां आपण अशाच प्रकारच्या समाजांकडे लक्ष देऊं कीं, जे सुधारलेल्या राष्ट्रांतून हल्लीं दिसणारें उत्क्रमण ज्यास्त पुढें नेण्यासारखे आहेत. आतां अशा राष्ट्रांतून उद्योगशीलता वाढत जाईल आणि युद्धशीलता कमी होत जाईल, ही गोष्ट गृहीत धरून आपणास असा प्रश्न करावयाचा कीं, पूर्ण उद्यमशीलतेबरोबर कोणत्या प्रकारचे कौटुंबिकसंबंध अस्तित्वांत येण्याचा संभव आहे ?

६८. स्त्रीपुरुषसंबंधाचा एकपत्नीरूपी जो प्रकार आहे तो उघडच शेवटचा प्रकार आहे; आणि त्याच्यामध्यें जे फेरबदल होण्याचा संभव दिसतो, तो त्यास पूर्णत्व येणें व त्याचा विस्तार होणें ह्याच दिशांनीं होण्याचा दिसतो. पूर्वींच्या व्यवस्था व संवयी ह्यांपासून जास्त भिन्नता उत्पन्न होण्याची शक्यता किती आहे हें लक्षांत आणिल्यानें, एकपत्नीपद्धतींत कोणते फेरबदल होणें संभवनीय आहे, हें आपल्या ध्यानांत येणार आहे.

पुष्कळ कृती अशा आहेत कीं, त्या असुधारलेल्या लोकांच्या दृष्टीनें योग्य असून, सुधारलेल्या लोकांच्या दृष्टीनें अपराधरूपी आहेत. उदाहरणार्थ, संमिश्र व्यवहार पूर्वी अगदीं अनियंत्रित असून, समाजांची जसजशी प्रगति होत गेलेली आहे, तसा तो जास्त जास्त निंद्य मानिला गेला आहे; स्त्रिया चोरून नेणें पूर्वीं अब्रूचें असून हल्लीं गर्ह्य झालें आहे; एका काळीं दोन किंवा अधिक बायका करणें ही गोष्ट नीचतर समाजांत अनु-

मत व अर्वाचीहि असून, उच्चतर समाजांत हल्लीं तीस गुन्ह्याचें स्वरूप आलेलें आहे. म्हणून उत्क्रमण हल्लींच्याच दिशांशीं होत जाऊन, म्हणजे, संमिश्रव्यवहार आणि अनेकपत्नीविवाह व परस्त्रीगमन, असले अपराध अगदीं बंद होऊन, एकपत्नीसंबंधाची वृद्धि होणार आहे. तद्वतच विवाहामध्यें जें व्यापारी तत्त्व आहे तेंहि नष्ट होत जाईल असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. कारण, स्त्रीचौर्याच्या मागून स्त्रीक्रय आला, आणि नंतर अशा रूढी उत्पन्न झाल्या कीं, जेणेंकरून व्यक्तिविषयक आवडनावडीच्या विचारांपेक्षां वित्तविषयक विचारांस जास्त महत्त्व देऊं लागले. सारांश, हें उघडच आहे कीं, वधूक्रय आणि वरक्रय ( ही चाल अद्यापि कांहीं अर्धवट सुधारलेल्या समाजांत सुरू आहे ) ह्या रूढींचीं जरी प्रारंभींचीं अगदीं ठळक स्वरूपें नष्ट झालीं आहेत, तरी त्यांचीं गूढ स्वरूपें कायमच आहेत. द्रव्य किंवा पदवी ह्यांसाठीं जे लग्नें करितात त्यांच्याबद्दल कांहींशी नापसंती लोक हल्लींच दर्शवूं लागले आहेत; आणि ही नापसंती हळूहळू जास्त स्पष्ट होत जाऊन तिच्या योगानें एकपत्नीसंबंध जास्त जास्त शुद्ध होत जाईल, म्हणजे, कांहीं ठिकाणीं तो जो हल्लीं नांवाचा आहे, तो सर्वच ठिकाणीं खराखुरा होऊन जाईल, असा अंदाज करण्यास हरकत नाहीं.

नैसर्गिक बंधन ( प्रेमबंधन ) उत्पन्न झाल्याशिवाय कायदेशीर बंधन करून घेऊं नये असा सार्वजनिक मनोविकार उत्पन्न होऊन एकपत्नीविवाहाचें स्वरूप उच्चतर होण्याचा जसा संभव आहे, तसाच दुसरा असा मनो-

विकार उत्पन्न होण्याचा संभव दिसतो कीं, नैसर्गिक बंधन नष्ट झाल्यावर कायद्याचें बंधन कायम ठेवणें गैर आहे. घटस्फोटाबद्दल हल्लींच ज्या सवलती सुधारलेल्या देशांतून देण्यांत येत आहेत, त्यांवरून पुढें मागें असें वाटूं लागण्याचा संभव दिसतो कीं, प्रेमसंयोग हा जास्त महत्त्वाचा होय, आणि कायद्यानें केलेला संयोग हा कमी महत्त्वाचा होय; व असें वाटूं लागलें म्हणजे, प्रेमसंयोग तुटून गेल्यावर वैवाहिक संबंध चालू ठेवणें गर्ह्य म्हणून वाटूं लागेल. **स्पेन्सर** साहेब म्हणतात, हें अनुमान पुष्कळांस बहुधा, कदाचित् खात्रीनेंच, अग्राह्य वाटेल. अमुक अमुक गोष्टींत अमुक अमुक सुधारणा करावी असें कोणीं सुचविल्यास त्यावर टीका करतांना बहुतेक सर्व लोक अशी चूक करितात कीं, बाकी सर्व गोष्टी तशाच राहतील असें समजून, ह्या सुधारणेपासून काय परिणाम होण्याचा संभव आहे तें ते दाखवूं लागतात. पण एक गोष्ट बदलली म्हणजे तिजबरोबर तत्संबंधी इतर गोष्टी अवश्यच बदलतात. स्त्रीपुरुषसंयोगाबरोबर येणारे जे उच्चतर मनोविकार रानटी लोकांमध्यें मुळींच नसून, प्रारंभींच्या यूरोपियन राष्ट्रांत हल्लींपेक्षां कमी पक्व दशेंत होते, ते, युद्धशीलता कमी होऊन व उद्योगशीलता वृद्धिंगत होऊन परार्थबुद्धि जसजशी वाढत जाईल, तसे हल्लींपेक्षां जास्त प्रगल्भ होण्याचा संभव आहे; कारण सहानुभूति ही परार्थबुद्धीच्या मुळाशीं असून ह्या मनोविकारांचीहि ती एक मुख्य घटक आहे. शिवाय, परार्थबुद्धीच्या वृद्धीबरोबर कौटुंबिक कलहहि कमी होत गेले पाहिजेत; आणि म्हणून एकसम-

यावच्छेदेंकरून नैतिक बंधन बळकट होत जाईल, आणि तें सईल करूं पाहणारीं कारणें दुर्बल होत जातील. एवंच ज्या फेरबदलांच्या योगानें कांहीं प्रकारच्या परिस्थितींत घटस्फोट जास्त सुलभ होण्याचा संभव आहे ते फेरबदल असे आहेत कीं, तेणेंकरून ती परिस्थिति उत्पन्न होण्याचा संभवच जास्त जास्त कमी होणार आहे.

तद्वतच मुलांबद्दलची आई व बाप ह्यांनाहि वाटणारी जी सारखी काळजी तिचें बनलेलें जें जादा बंधन, तेंहि जास्त जास्त बळकट होण्याचा संभव दिसतो. सर्व समाजांतच ही एक फार महत्त्वाची गोष्ट आहे, आणि कधीं कधीं अगदीं रानटी समाजावरहि तिचे सुपरिणाम होत असतात. उदाहरणार्थ, पाटागोनियन लोकांबद्दल फॉकनर असें म्हणतो कीं, " त्यांच्यांत लग्नें केवळ ऐच्छिक असतात; तरी एकदां वधूवरांचें एकत्र रहावयाचें ठरलें आणि त्यांस मुलें झालीं म्हणजे तीं बहुधा एकमेकांस अगदीं वृद्धवयांतहि सोडून जात नाहींत ". आणि मुलांबद्दलची काळजी सुधारणेबरोबर जसजशी ज्यास्त होत जाईल, तसतसें हें कारण ज्यास्त ज्यास्त महत्वाचें होणार आहे.

परंतु नांवाच्या संयोगा ऐवजीं खरा संयोग वृद्धिंगत करितील अशा प्रकारचे एकपत्नीपद्धतींत काय फेरबदल होण्याचा संभव आहे हा प्रश्न तसाच ठेविला तरी, एक अनुमान मात्र खात्रीपूर्वक आपणास काढतां येतें. उपजातिकल्याण, संततिकल्याण, आणि जनकजननीकल्याण, ह्या ज्या तीन गोष्टी साधावयाच्या, त्यांचें महत्त्व वर दिलेल्या क्रमाप्रमाणेंच आहे ही गोष्ट ध्या-

नांत आणतां, आणि सुधारलेल्या राष्ट्रांतून लोकसंख्या कायम राखण्यापुरतें तरी उपजातिकल्याण साधत आहे हीहि गोष्ट लक्षांत घेतां, त्यावरून सहजच असें अनुमान निघतें कीं, ह्यापुढें कौटुंबिक उत्क्रमणाची प्रवृत्ति संततिकल्याणाकडे मुख्यत्वेंकरून असणार आहे. ज्या समाजांत पिढ्यानुपिढ्या शारीरिक, नैतिक व बौद्धिक दृष्ट्या परिस्थितीस उत्तम रीतीनें योग्य अशी विपुल माणसें उत्पन्न होतील, ते समाज सर्वांत वरचढ झाले पाहिजेत; आणि औद्योगिक चढाओढीच्या धिम्या सरणीनें इतर समाजांचा पाडाव त्यांच्या हातून हळूहळ झालाच पाहिजे. म्हणून ह्या गोष्टीस अत्यन्त अनुकूल असे जे वैवाहिक संबंध त्यांचा प्रसार झाला पाहिजे; आणि त्यांस अनुकूल अशा रीतीनें प्रस्तुत मनोविकार व कल्पना ह्यांमध्यें असा फेरबदल झालाच पाहिजे कीं, तेणेंकरून इतर प्रकारचे वैवाहिक संबंध नीतिविरुद्ध म्हणून ठरून जावे.

६९. गतकालिक उत्क्रमणसरणीचें धोरण लक्षांत ठेवून, स्त्रियांच्या स्थितींत कोणते फेरबदल होण्याचा संभव आहे ह्या प्रश्नाचें असें उत्तर दिसतें कीं, स्त्रीपुरुषांची स्थिति हल्लींपेक्षांहि जास्त सम होण्याचा संभव आहे. युद्धशीलतेची क्षीणता व उद्यमशीलतेची वृद्धि, जबरीच्या सहकार्यांची क्षीणता व ऐच्छिक सहकार्यांची वृद्धि, आणि व्यक्तिविषयक हक्कांच्या कल्पनेची वृद्धि व त्याबरोबरच इतरांच्या हक्कांबद्दलची जी कळकळ तिच्यामध्यें होणारी वृद्धि, ह्या सर्व गोष्टींबरोबर, स्त्रियांच्या कौटुंबिक व राजकीय बाबतींतील

हक्कांत जीं वैगुण्यें आहेत तीं इतकीं कमी झालीं पाहिजेत कीं, शेवटीं त्यांच्या शरीरघटनेंतील भेदांमुळें जेवढीं वैगुण्यें अवश्य उत्पन्न झालेलीं असतील तेवढींच कायम रहावीं.

ह्याच्याहून ज्यास्त विशिष्ट अशीं अनुमानें करणें हें कांहींसें धोक्याचें आहे; कारण शक्य गोष्टी कोणत्या आहेत व संभवनीय कोणत्या आहेत ह्यांचेंच कायतें दिग्दर्शन करतां येण्यासारखें आहे. **स्पेन्सर** साहेब म्हणतात, कांहीं दिवसांनीं स्त्रियांचें दास्यविमोचन जरी ह्याच्याहि पुढें नेणें जरूर आहे, तरी दुसऱ्या कांहीं दिशांनीं तें योग्य मर्यादांच्या पलीकडे आधींच गेलेलें आहे असा संशय येण्यास जागा आहे. प्रारंभीं स्त्रियांची स्थिति इतकी नीच होती कीं, त्यांस नेहमीं चोरून नेत, विकीत व विकत घेत असत; त्यांस ओझ्याच्या जनावरांप्रमाणें वागवीत, व मालमत्तेप्रमाणें त्यांची वंशपरंपरा संक्रान्ति होत असून, वाटेल तेव्हां त्यांस ठारहि मारीत; पण हल्लींची अमेरिकेंतील स्थिति पाहतां तेथें स्त्रियांचें प्रस्थ इतकें माजलें आहे कीं, सार्वजनिक गाड्यांतून वगैरे एकाद्या स्त्रीस जागा पाहिजे असल्यास तेथें बसलेल्या पुरुषाकडे ती डोळे वटारून पाहूं लागते, आणि त्यानें ती रिकामी करून दिली म्हणजे त्याचे आभार मानिल्याशिवायच तिजवर मुकाट्यानें जाऊन बसते; ह्या दोन स्थितींतील फरक पाहतां त्यावरून सहजच असें अनुमान निघतें कीं, सर्व प्रकारच्या फेरबदलांमध्यें जो एकप्रकारचा आंदोलनप्रकार दिसत असतो, तेणेंकरून ही गोष्ट एका टोंकाहून अगदीं दुसऱ्या टोंकाकडे गेलेली असून तेथून जोरानें मागें

सरकलीच पाहिजे. दुसऱ्या कांहीं गोष्टींबद्दल असेंच म्हणतां येईल. पूर्वीं ज्या गोष्टी स्त्रियांना विशेष देणग्या म्हणून दिल्या गेल्या, त्या आपल्या हक्काच्याच आहेत म्हणून त्या आतां म्हणूं लागल्या आहेत; आणि म्हणून जी त्यांजमध्यें शोभा होती ती निघून गेली आहे. तथापि हें खचीत आहे कीं, पुरुष व स्त्रिया ह्यांच्या सामाजिक संबंधांमध्यें सर्व प्रकारच्या बलिष्ठांना सर्व प्रकारच्या दुर्बलांबद्दल आणि सामान्यतः पुरुषांना सामान्यतः स्त्रियांबद्दल जी सहानुभूति वाटत असते तिनें प्रोत्साहित असे कांहीं आचारप्रकार कायम राहतील इतकेंच नाहीं, तर स्त्रियांच्या नैसर्गिक घटनेमुळें त्यांना जें कांहीं नुकसान अवश्य सोसावें लागतें त्याबद्दल त्यांची कांहीं भरपाई करावी, आणि अशा रीतीनें स्त्रीपुरुषांचीं जीवितें होतील तितकीं सम करावीं, अशी जी पुरुषांस सहजच मनीषा वाटते, तिच्या योगानें उत्पन्न झालेले कांहीं आचारप्रकार कायम राहतील.

कौटुंबिक गोष्टींच्या संबंधानें स्त्रियांची स्थिति अर्थात् हल्लींहून उच्चतर होईल; परंतु त्या सर्वतोपरी पुरुषांशीं सम होतील ही गोष्ट असंभाव्य दिसते. नवराबायकोमध्यें कधीं कधीं लढे पडून, आणि दोघांमध्यें कोणीं कोणास हार जावें असले प्रश्न उपस्थित होऊन, त्याबद्दल कोर्ट जें निर्णय करितें त्याच्या योगानें पूर्वीचे सगळेच निकाल उलथून पडतील असा संभव दिसत नाहीं. स्त्रीपुरुषांच्या हक्कांमध्यें कायद्यानें जरी समतोल ठेविला, तरी जरूरी पडेल तेथें, नवरा बहुधा ज्यास्त न्यायबुद्धिप्रेरित असतो ह्या दृष्टीनें, कायदा

त्यासच कमी अनिष्ट समजून, हल्लींप्रमाणें वर्चस्व देत राहील. आणि तद्वतच, वैवाहिक जीविताच्या नैतिक संबंधांमध्येंहि स्वभावघटनेच्या ज्यास्त प्रागल्भ्यांमुळें उत्पन्न होणारें जें सत्ताधिक्य, तें कितीहि परिछिन्न झालें, तरी पुरुषांपाशींच राहील.

अत्यन्त नीच अशा रानटी स्थितीपासून सुधारणा होत असतां जे सुपरिणाम उत्पन्न झाले आहेत, त्यांमध्यें उदरनिर्वाहाकरितां लागणाऱ्या श्रमांपासून स्त्रियांची ज्यास्त ज्यास्त मुक्तता हा एक आहे, आणि उच्चतर समाजांमध्यें त्यांच्याकडे गृहव्यवस्था आणि शिशुसंवर्धन एवढींच कामें बहुधा राहिलेलीं आहेत, ह्या गोष्टी ध्यानांत आणिल्या म्हणजे, आह्मांस सगळीं घरातलींच कामें करावीं लागतात अशी स्त्रिया जी तक्रार करितात, आणि घराबाहेरच्या सर्व धंद्यांमध्यें पुरुषांशीं चढाओढ करण्यास आह्मांस पूर्ण मोकळीक असली पाहिजे अशी जी त्या मागणी करितात, तिजबद्दल सहजच आश्चर्य वाटतें. पण ह्या क्रमविरुद्ध गोष्टीचें एक कारण स्त्रियांची बेताबाहेर संख्यावृद्धि हें आहे; आणि ज्या नैसर्गिक स्थितींत ( वैवाहिक स्थितींत ) स्त्रिया उदरभरणाच्या कामीं पुरुषावर अवलंबून राहतात त्या स्थितीस पुष्कळ स्त्रिया सध्यां मुकत असल्यामुळें, आह्मांस स्वतंत्र धंदे करण्याची मोकळीक असूं द्या असें जें त्या म्हणतात तें ठीकच आहे. म्हणून त्यांच्या मार्गांत असणाऱ्या सर्व अडचणी दूर कराव्या, व होतीलहि, ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे. पण त्याबरोबरहि असेंहि म्हणणें जरूर दिसतें कीं, अशा रीतीनें एकंदर स्त्रियांच्या

सामान्य जीवितक्रमामध्यें फारसा फेरबदल करणें इष्ट नाहीं; आणि दुसरी गोष्ट अशी कीं, त्यांना धंदेरोजगारांकरितां योग्य करण्यासाठीं त्यांच्या शिक्षणक्रमांत फारसा फेरबदल केल्यास त्यापासून नुकसानहि होईल. कौटुंबिक कर्तव्यसमूहाच्या आटोक्यांत किती गोष्टींचा समावेश होतो तें जर स्त्रियांच्या पूर्णपणें लक्षांत आलें तर त्या त्याहून ज्यास्त काम मागणार नाहींत. मुलांच्या योग्य शिक्षणामध्यें कशाकशाचा समावेश होतो हें अद्यापि कोणत्याहि पुरुषाच्या पूर्ण ध्यानांत आलेलें नाहीं, मग स्त्रियांची तर गोष्टच नकोच. पण हें जर त्यांच्या ध्यानांत आलें तर त्या त्याच्याहून उच्चतर काम आपणास द्या असें कधीं म्हणणार नाहींत.

भविष्यत् काळीं स्त्रियांची राजकीय स्थिति सुधारत जाऊन ती कांहींशी पुरुषांच्या राजकीय स्थितीशीं सम होईल हा सिद्धान्त पूर्वी काढिलेल्या सिद्धान्ताचा साहजिक सहचारी दिसतो. पण अशा प्रकारची जवळजवळची समता पूर्णपणें उद्यमशील समाजघटनेमध्यें उत्पन्न होणें जरी साहजिक आहे, तरी अंशतः युद्धशील अशा समाजघटनेमध्यें ती उत्पन्न होणें शक्य नाहीं. लढाईमुळें उत्पन्न होणारी राजकीय जबाबदारी केवळ पुरुषावरच असतां, त्यांस व स्त्रियांस सारखे राजकीय अधिकार दिल्यास मोठी असमता उत्पन्न होईल; आणि म्हणून लढाया सुरू राहतील तोंपर्यंत इष्ट समता असाध्य आहे, ही गोष्ट ध्यानांत घेऊन असें म्हणतां येण्यासारखें आहे कीं, ज्या समाजांत शुद्ध उद्यमशीलतेस योग्य अशा मर्यादांच्या

आंतच राजकीय नियंत्रण आलेलें आहे, अशा समाजांत स्त्रियांस राजकीय अधिकार दिल्यानें जरी यदाकदाचित् फायदा होण्याचा संभव आहे, तरी ज्या समाजांत कमजास्त अशा युद्धशीलतेस योग्य असें त्याच्याहून जास्त व्यापक असें राजकीय शासन आहे, त्या समाजाचें त्यापासून नुकसान होणार आहे. अशा समाजांची अशा गोष्टीपासून पिछेहाट होण्यास कित्येक कारणें उत्पन्न होतील. बाबावाक्याला जास्त मान देणें, आणि व्यक्तिस्वातंत्र्याची कमी चाड वाटणें, हे जे स्त्रीस्वभावाचे दोन विशेष आहेत, त्यांच्यायोगानें व्यक्तिस्वातंत्र्यावरील नियंत्रणें कायम राहतील इतकेंच नाहीं तर उलट वाढूं लागतील. विशिष्ट व तात्कालिक परिणाम समजण्याचें सामर्थ्य, आणि सामान्य व दूरवरचे परिणाम ध्यानांत आणण्याचें गैरसामर्थ्य, ह्या गोष्टी बहुतेक पुरुषांमध्यें, आणि त्यांच्याहूनहि ज्यास्त प्रमाणावर स्त्रियांमध्यें, असल्यामुळें, स्त्रियांस राजकीय अधिकार दिल्यास, तेणेंकरून सद्योहित साधण्याकरितां जुलमाच्या कायद्यांची वृद्धि होईल, आणि ह्या नियंत्रणाच्या अतिरेकामुळें पुढें नुकसान होईल. पण राजकीय शासनाचें उद्यमशील स्वरूप अपूर्ण असे तोंपावेतों, राजकीय अधिकार स्त्रियांच्या हातीं दिल्यानें नुकसान होईल असें म्हणण्यास ह्याच्याहून ज्यास्त प्रत्यक्ष असें एक कारण आहे. तें असें:— आपल्या हें अगोदर नजरेस आलेंच आहे कीं, समाजाचें कल्याण साधणें असेल, तर कुटुंबनीति आणि राष्ट्रनीति ह्या दोन्ही भिन्न ठेविल्या पाहिजेत. कुटुंबनीती-

खालीं, जेथें योग्यता अत्यन्त कमी असेल, तेथें फायदे अत्यन्त मोठे द्यावे लागतात; राष्ट्रनीतीखालीं, फायदे योग्यतेशीं अनुरूप असेच असावे लागतात; सारांश, अर्भकाला अत्यन्त औदार्यपूर्वक वागवावें लागतें, आणि प्रौढाला पूर्ण न्यायानें वागविणें इष्ट असतें. कुटुंबनीतीशीं निकटसंबद्ध गोष्टी म्हटल्या म्हणजे पितृयोग्य व मातृयोग्य अशा उपजतबुद्धी व मनोवृत्ती ह्या आहेत, आणि पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें ह्या मनोवृत्तींत इतर मनोवृत्तींची भेसळ कमी प्रमाणावर झालेली असते. हल्लींच मातापितरांस योग्य अशा ज्या ह्या मनोवृत्ती, त्या पुरुषांमध्यें विशिष्ट मानानें असल्यामुळें त्या मानानें ते राजनीतीच्या धोरणांत कुटुंबनीतीचीं तत्त्वें घुसडून देण्यास प्रवृत्त होत आहेत; म्हणून स्त्रियांमध्यें त्या मनोवृत्ती जास्तच मानानें असल्यामुळें त्यांचा जर राष्ट्रनीतीवर पगडा बसूं लागला, तर जास्तच नुकसान होणार आहे. कारण तेणेंकरून सामाजिक रचनांची न्याय्यतेकडे जी प्रगति व्हावयाची, तीस हिसका बसेल; आणि योग्यांच्या खर्चानें अयोग्यांचा फायदा हल्लींपेक्षांहि जास्त होऊं लागेल.

शुद्धसमतेबद्दलच्या कल्पना जसजशा जास्त जास्त स्पष्ट होत जातील; व्यक्तिविषयक स्वातंत्र्याबद्दलचा मनोभाव, व त्याबरोबरच इतरांच्या तसल्याच स्वातंत्र्याबद्दल वाटणारी काळजी, हे मनोविकार जसजसे ऐच्छिक सहकार्याच्या भरांत पूर्णत्वास पावत जातील; इतर नागरिकांच्या समस्वातंत्र्यास जरूर अशा नियंत्रणाखेरीज व्यक्तिस्वातंत्र्यावर इतर नियंत्रणें लादावयाचीं नाहींत ही स्थिति जितकी लवकर येत जाईल; उ-

द्यमशीलतेस योग्य अशी राजकीय शासनसरणी जसजशी उत्क्रान्त होत जाईल; आणि तेणेंकरून नागरिकांमध्यें समसंबंध कायम राहून, युद्धशील समाजासच योग्य अशीं जीं फाजील नियंत्रणें तीं जसजशीं निघून जातील;- तसतसा स्त्रियांस ज्यास्त ज्यास्त राजकीय अधिकार अनिष्टाविना देतां येईल. ज्या नैतिक उत्क्रमणानें तो त्यांस मिळेल, त्याच नैतिक उत्क्रमणानें ती देणगी अनिष्टरहित, आणि बहुधा फायद्याचीच, होऊन जाईल.

७०. मुलांच्या स्थितींत पुढें काय फेरबदल होणार आहेत ह्याबद्दल फारशीं निश्चित अशीं कांहींच अनुमानें काढतां येत नाहींत.

मुलांचें स्वातंत्र्य सामान्यतः हल्लींहून ज्यास्त वाढेल असा अजमास दिसतो. तथापि कांहीं ठिकाणी तें बेताबाहेर सध्याच गेलें आहे असें वाटतें. **स्पेन्सर** साहेब म्हणतात, हें मी विशेषतः युनैटेडस्टेटस् या देशास अनुलक्षून म्हणत आहें. त्या ठिकाणीं मुलांस इतकें स्वातंत्र्य देतात कीं, तेणेंकरून कांहीं गोष्टींत प्रौढांच्या जीविताची बेताबाहेर नुकसानी होऊन, शिवाय मुलें जगापुढें फारच कोंवळ्या वयांत येतात असें दिसतें, आणि प्रौढवयास योग्य अशा उत्क्षोभजनक गोष्टींमध्यें त्यांचा लहान वयांत प्रवेश होऊन, आयुष्य अर्धें निघून जाण्यापूर्वींच, त्यांतील सुखदुःखाविषयीं तीं उदासीन व्हावयास लागतात. प्रौढवयांतील उद्योग व मजा यांचा स्वाद घ्यावयास लागण्यापूर्वीं तरुणवयांतील उद्योग व मजा यांचा पूर्ण अनुभव घेतां येईल अशी जी बा-

लशासनसरणी, ती जशी आईबापांस ज्यास्त इष्ट आहे, तशी मुलांमुलींसहि आहे.

आईबापांचा अधिकार किती चालूं द्यावा, आणि राजकीय अधिकाऱ्यांनीं त्यास केव्हां बंधन घालावें, ह्या प्रश्नांस समाधानकारक उत्तरें देतां येत नाहींत. स्पेन्सर साहेब म्हणतात, आधींच मीं असें मानण्यास कारणें दिलीं आहेत कीं, सरकारानें आईबापांचीं कर्तव्यें व अधिकार बेताबाहेर उचलिले आहेत, आणि म्हणून कुटुंबाच्या हल्लींच्या फाजील विघटनामागून त्याचें पुनःसंकलन होणार आहे. तथापि मुलांवर आईबापांनीं आपले अधिकार किती चालवावे, आईबापांना मुलांबद्दलची आपली जबाबदारी कितपत टाकूं द्यावी, आणि मूल कुटुंबघटक असावयाचें बंद होऊन राष्ट्रघटक केव्हां बनतें, हें ठरविण्याच्या कामीं विचारदृष्टया पुष्कळ अडचणी येतात. असें आहे तरी व्यवहारदृष्टया ह्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याची जरूरी पडणार नाहीं. कारण मनुष्यस्वभावांत होणाऱ्या ज्या फेरबदलांनीं कुटुंबास उच्चतर स्वरूप येणार आहे, त्याच्या योगानेंच नीचतर समाजांस योग्य अशा नीचतर स्वभावांपासून ज्या अडचणी उत्पन्न होतात त्या बंद होणार आहेत.

शिवाय, ही गोष्ट साधण्याचें आणखी एक खात्रीचें कारण नेहमीं कायम राहणार आहे. कनिष्ट आईबापांचीं कनिष्ट रीतींनीं वाढविलेलीं मुलें जाऊन, व त्यांच्या ऐवजीं श्रेष्ठ आईबापांचीं श्रेष्ठ रीतींनीं वाढविलेलीं मुलें येऊन, संततीच्या उच्चतम कल्याणास अनुकूल अशा ज्या गोष्टी त्यांची जास्त जास्त वृद्धि झालीच पाहिजे. ज्या अर्थीं

मनुष्याहून एकंदर हलक्या प्राण्यांचें संरक्षण व प्रगमन जनकजननींच्या उपजतबुद्धींच्या द्वारा झालेलें आहे; आणि ज्या अर्थी मानवी उत्क्रमणाच्या सरणींत संततीच्या दीर्घकालीन निगेकरितां स्थापन झालेले कौटुंबिक संबंध उच्चतर स्वरूपें धारण करीत आहेत; त्याअर्थी, भविष्यत् कालीं, उच्चतर समाजघटनेबरोबर जो परार्थपर स्वभाव येणार आहे, त्यामुळें आईबाप व मुलें यांच्यामध्यें निःसंशय असे संबंध उत्पन्न होतील कीं, ते चांगल्या रीतीनें चालण्यासाठीं बाह्य नियंत्रणाची जरूरी मुळींच रहावयाची नाहीं.

७१. कौटुंबिक उत्क्रमणांत आणखी एक विशेष उत्पन्न होण्याचा संभव आहे. ज्या मनोवृत्तींमुळें कुटुंब एकत्र रहात असतें, त्यांपैकीं संततीनें आईबापांची काळजी घेणें ही जी शेवटीं उत्पन्न होणारी मनोवृत्ति, तिला वाढण्यास अद्यापि अत्यन्त मोठी जागा आहे. मुलांचें मातृपितृविषयकप्रेम, जें पशूंमध्यें मुळीं दिसत नाहीं, रानटी लोकांत अल्प असतें, अर्धवट सुधारलेल्यांत बरेंचसें असतें, आणि पुष्कळ सुधारलेल्या लोकांत त्याहूनहि जास्त दिसतें, तें अद्यापि पुष्कळ वाढण्यासारखें असून, कौटुंबिक जीविताची सर्वतोपरी वाढ करण्यास त्याची आवश्यकता आहे. **स्पेन्सर** साहेब म्हणतात, हल्लीं ज्या वृद्धांचीं विवाहित मुलें त्यांच्यापासून पृथक राहतात, त्यांना आपलीं मुलें, नातवंडें, नेहमीं जवळ असल्यापासून जीं सुखें व्हावयाचीं तीं होत नाहींत, आणि त्यामुळें त्यांचीं शेवटचीं वर्षें उदासीन होतात; पण पुढें असा काळ खचीत येईल कीं, त्यावेळीं मुलांचें आईबापांवरील

प्रेम आईबापांच्या मुलांवरील प्रेमाइतकें जरी बळकट न झालें, तरी त्याच्या जवळ जवळ बळकट होऊन, ही तक्रार निघून जाईल.

पण, साहेब म्हणतात, ज्या सामाजिक व्यवस्थांमुळें आईबापें मुलांबद्दलच्या काळजींतून अंशतः मुक्त होतात, त्या व्यवस्था कायम आहेत तोंपावेतों ह्या दिशेनें जास्त प्रगति होणार नाहीं. उत्तरवयांत पितरांबद्दल मुलाला जास्त काळजी उत्पन्न होण्यास, पूर्ववयांत त्या दोघांमध्यें हल्लींपेक्षां जास्त नैकट्य असलें पाहिजे. चिनी लोक आज दोन हजार वर्षें जो मार्ग मळीत आहेत, त्या मार्गानें गेल्यानें असली उच्चतर पायरी कधींहि चढली जाणार नाहीं. जे निर्दय मेक्सिकन लोक मुलांना वयाच्या चवथ्या वर्षीं किंवा अंमळ उशीरां, शिक्षणाकरितां उपाध्यायांकडे पाठवीत, त्यांचा कित्ता अंशतःहि गिरविल्यानें आह्माला त्या पायरीवर कधींहि जातां येणार नाहीं. कूसाकाफिर लोकांमध्यें दहा-अकरा वर्षांवरील सर्व मुलें नायकाच्या देखरेखीखालीं सार्वजनिक रीतीनें शिकत असतात, त्यासारखी व्यवस्था करून, साहेब म्हणतात, आह्मास कौटुंबिक मनोवृत्तीची वृद्धि कधीं करतां येणार नाहीं. आण्डामानीज लोकांत कुटुंबाचें जें मूल तें होईल तितकें लवकर टोळीचें मूल बनवीत असतात; तसल्या रूढींकडे पिछेहाट केल्यानें हें सर्वांच्या मागून उत्पन्न होणारें जें कौटुंबिक प्रेम तें कधीं पोसलें जाणार नाहीं. म्हणून हल्लीं बहुतेक कोणीच देत नाहीं अशा प्रमाणावर आईबापें जेव्हां मुलांना बौद्धिक व नैतिक शिक्षण स्वतः देऊं लागतील, तेव्हांच व त्या

मानानेंच ही प्रगति होणार आहे. मंदधी शिक्षकांच्या यंत्रवत् शिकविण्यानें मुलांच्या मनाचा विकास हल्लीं कुंठित, खुजट, आणि वेडावांकडा होत असतो; तो जेव्हां तसा व्हावयाचा बंद होईल—योग्य स्वरूपीं दिलेलें योग्य ज्ञान आपलेंसें करून घेण्यास उत्सुक अशा ज्या निरनिराळ्या मानसिक शक्ती त्यांस योग्य क्रमानें शिक्षण मिळाल्यामुळें, जेव्हां शिक्षक व शिष्य हे परस्परांस कंटाळा आणण्याच्या ऐवजीं उत्साह आणूं लागतील— जेव्हां शिक्षणाबद्दलच्या सयुक्तिक कल्पना, आणि प्रौढशिक्षणाची प्रचुर प्रवृद्धि, यांचे योगानें, हल्लींहि विलक्षण ज्ञानसंपादनशक्तीमुळें कधीं कधीं दृष्टीस पडणारें लहान मुलांचें जें मानसिक विकसन, तें जेव्हां सामान्य होऊन जाईल—जेव्हां शिक्षणाच्या पहिल्या पहिल्या पायऱ्या घरामध्यें चढून गेल्यामुळें बौद्धिक व नैतिकसहानुभूतीच्या बळकटीस,हल्लीं स्वप्नींहि नाहीं अशा मार्गांनीं त्या दररोज सहाय्यकारी होतील,आणि अशा रीतीनें जेव्हां जास्त विशिष्ट शिक्षण तेवढेंच इतरांच्या हस्तें होऊं लागेल, तेव्हां लहान वयांत आईबापांनीं घेतलेली जी ही मुलांची जास्त काळजी तिजबद्दल त्यांच्या वृद्धवयांत मुलें त्यांची जास्त काळजी घेऊं लागून, तो काळ त्यांचा हल्लींहून जास्त सुखानें जाऊं लागेल.

---

# शुद्धाशुद्ध

## अनुभवजन्य सिद्धान्त

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | ७ | शिष्पांचे | शिष्यांचें |
| ,, | १७ | परस्परसदृश्य | परस्परसदृश |

## शुद्धाशुद्ध

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | ३ | नाहींत | नाहींत; |
| १७ | १५ | मित्रभाव | भिन्नभाव |
| १८ | ९ | अंड यांतील | अंड्यांतील |
| १९ | ८ | चमत्कारिक जनक | चमत्कारजनक |
| २१ | ५ | नियुक्त | वियुक्त |
| २२ | १७ | समाज देहाचें | समाजदेहाचें |
| २३ | १६ | जरी | जरी अगदीं |
| २५ | ७ | परस्परांशीं | परस्परांमध्यें |
| २८ | २ | आकार भेद | आकारभेद |
| ३१ | २० | मोलस्कव आन्युलोरा | मोलस्क व आन्युलोस |
| ३३ | १८ | त्यांच्या | त्याच्या |
| ३७ | १० | आवरण | आवरण, |
| ३९ | २५ | नरक्षकपणा | नरभक्षकपणा |
| ४० | १३–१४ | म्हणून | म्हणून ज्या |
| ,, | २५ | झाली कीं | झाली |
| ४१ | १ | विजय हे | विजय |
| ५६ | १५ | इतर | इतरत्र |
| ५९ | २२ | वैसदृशाच | वैसदृश्य |
| ६३ | १८ | नांवाची | नांवाचा |
| ६९ | २६ | ज्ञातो, | जातों, |
| ७१ | ६ | बनलेले | बनलेल्या |
| ,, | १८ | वर्ग | वर्ग व |
| ७३–७७ | मथळा | समाजव्यापार | इंद्रियसमूह |
| ९७ | २६ | व्यापार | बाजार |
| ९८ | १७ | जें प्रथम | प्रथम जें |
| १११ | ४ | जड | नड |
| १२२ | १३ | दुसरें त्याचें | दुसरे त्याचे |
| १३३ | ७ | भागाप्रमाणें | भागांप्रमाणें |
| १३७ | ८ | सदृश्य | सदृश |
| १४२ | ३ | क्रियासाठीं | क्रियांसाठीं |
| १५५ | १४ | झालेले | झालेले जे |
| १५६ | १२ | होणारी उत्पत्ति | उत्पत्ति |
| १५७ | ३ | बनून | बनावे |

# शुद्धाशुद्ध

| | | | |
|---|---|---|---|
| १८७ | ८ | निषेध म्हणून | म्हणून निषेध |
| २०२ | ११ | नियामक | नियामक जाल |
| २३० | १३ व १७ | आक्रमीत | आक्रमीत |
| २३२ | ८ | पस्थितीशीं | परिस्थितीशीं |

## गृहसंस्था.

| | | | |
|---|---|---|---|
| १० | ४ | बदा | बैदा |
| १३ | ७ | बायकांच्या | वाचकांच्या |
| ,, | २२ | त्या | त्या त्या |
| ४१ | २१ | एका | एका जातीच्या |
| ४६ | २३–२४ | मारावयास | मागावयास |
| ४७ | १० | नसते | नसतो |
| ,, | ११ | प्रसंग | प्रसगीं |
| ,, | १२ | झाडीला, | झाडील, |
| ४९ | ३–४ | मैत्रिणी | मैत्रिणीच |
| ६० | १२ | असते, बहुधा तरी | जरी असते तरी बहुधा |
| ७३ | १५ | वधु विवाह | वधू |
| ८८-१११ | मथळा | अनेकपति-विवाहपद्धति | अनेकपत्नी विवाहप° |
| ९० | १२ | समाजाबदल | समजाबद्दल |
| ११८ | ७ | समाजाकडून | समाजाहून |
| ,, | २६ | मदतीस | मदतनीस |
| १२० | २० | अभाव | प्रभाव |
| १६३ | २३ | आतां | आतांहि |
| १६८ | १८ | अशा | तें अशा |
| ,, | १९ | झालेले | झालेलें |
| १६९ | १४ | जीवघटकद्रव्याचा | ( जीवघटक द्रव्याचा ) |
| १८८ | २१ | समूहांत ज्या | समूहांत |
| १९२ | १६ | लावावयाची | लागावयाची |
| १९६ | १ | बायका | बायको |
| १९७ | १९ | संक्रान्त | संक्रान्ति |
| २०० | १८ | स्वतःच्या ओझ्यास | स्वतःसे ओझ्याच्या |
| २११ | १३ | रोज कामें | रोजकाम्ये |
| २३१ | ४ | जसें | जसे |
| ,, | ,, | तसें | तसे |

